# A HISTORY OF MODERN INDIA

## PART II

# MARATHA PERIOD



*Vol. IV, Panipat.*

**1750-61.**



BY

G. S. SARDESAI, B. A., Baroda



**1922.**




पानिपतची मोहीम
अटक
लाहोर
सिमला
सरहिंद
कुंजपुरा
साहरणपुर
हरिद्वार
कुरुक्षेत्र
पानिपत
बागपत
शुक्रताल
मीरत
दिल्ली
बरेली
ने पा ळ
सतलज नदी
बिकानेर
रेवाडी
कोटपुतळी
मथुरा
आग्रा
कनोज
लखनौ
कानपुर
नागोर
जयपुर
मेडता
जोधपुर
अजमीर
धुवुलपुर
ग्वाल्हेर
काल्पी
नरवर
दतिया
बांदा
बुंदी
काशी
३०

श्री सयाजी साहित्यमाला-पुष्प ६८ वें.

780

[ इतिहास-गुच्छ ].

हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास.




# मराठी रियासत,

## मध्य-विभाग ३,

पानिपत प्रकरण, ( स. १७५०-६१ ).

लेखक

गोविंद सखाराम सरदेसाई, बी. ए., बडोदें.

प्रकाशक

गणेश महादेव आणि कंपनी.

सन १९२२.

किंमत सव्वा दोन रुपये.

श्री.

# जाहिरात.

आपल्या देशी भाषेच्या साहित्याची अभिवृद्धि करण्याच्या सद्धेतूनें श्रीमंत महाराजा साहेब सयाजीराव गायकवाड सेना-खासखेल, समशेरबहादूर, जी. सी. एस. आय्., जी. सी. आय्. ई., ह्यांनीं कृपावंत होउन दोन लक्ष रुपयांची जी रक्कम अनामत ठेविली आहे, तिच्या व्याजांतून श्रीसयाजी साहित्य-मालेंत विविध विषयांवर पुस्तकें तयार करण्यांत येत असतात.

हा हिंदुस्तानचा अर्वाचीन इतिहास, मराठी रियासत, मध्य-विभाग २ स्वतंत्र पुस्तक असून उक्त मालेंतील 'इतिहास-गुच्छांत' अठ्ठसष्टावें पुष्प ह्मणून रा. रा. गोविंद सखाराम सरदेसाई., बी. ए., यांचे कडून तयार करवून प्रसिद्ध करण्यांत येत आहे.

| | | |
|---|---|---|
| भाषांतर-शाखा,<br>विद्याधिकारी कचेरी,<br>**बडोदें.**<br>५-१०-१९२२. | ज. पु. जोषीपुरा.<br>भा. म. | नन्दनाथ के. दीक्षित.<br>विद्याधिकारी,<br>**बडोदें.** |

गो. स. सरदेसाई

# ऐतिहासिक पुस्तकें.

| | | |
|---|---|---|
| १ | मुसलमानी रियासत | रु. ४—० |
| २ | मराठी रियासत ( पूर्वार्ध ) | रु. ३—८. |
| ३ | ” ” मध्यविभाग १ | रु. २-१२ |
| ४ | ” ” मध्यविभाग २ | रु. ३--० |
| ५ | ” ” मध्यविभाग ३ | रु. २—४ |
| ६ | ब्रिटिश रियासत नवीन आवृत्ति | रु. ३— ० |

# प्रस्तावना.

—— :o: ——

कौरव-पांडव संगर-तांडव द्वापरकालीं होय अती ।
तसे मराठे गिलचे साचे कलींत लढले पानपतीं ॥

गडकरी.

उद्योग करूं लागल्यावर मराठी रियासतीचें काम कसकसें वाढत गेलें त्याची हकीगत पूर्वीच वाचकांस सादर केली असल्यामुळें ह्या भागाच्या प्रस्तावनेंत विशेष कांहीं सांगण्यासारखें नाहीं. **पूर्वार्ध, मध्यविभाग,** व **उत्तरार्ध** असे मराठ्यांच्या इतिहासाचे तीन भाग संकलिपत आहेत. पैकीं पूर्वार्ध, व मध्यविभाग १ (१७०७ ते १७४०), आणि मध्य-विभाग २ (१७४० ते १७६१), या पूर्वी प्रसिद्ध झाले असून त्याच कालखंडापैकीं प्रस्तुत मध्य-विभाग ३ ह्यांत सन १७५० पासून १७६१ पावेतोंचा उत्तर हिंदुस्थानांतील मराठशाहीचा समग्र वृत्तान्त आला आहे. म्हणजे यांत मुख्यतः पानिपत प्रकरणाचा इतिहास देऊन नानासाहेब पेशव्याच्या कारभाराचा समारोप केला आहे. विषयपूर्ततेसाठीं मराठशाहींतिल कित्येक प्रसिद्ध ऐतिहासिक घराण्यांचे वृत्तान्त व उपलब्ध झाल्या तितक्या वंशावळीही ह्या भागांत दिल्या आहेत. आपला इतिहास अद्यापि बनावाच्या स्थितींत असून संशोधन व चर्चा सारखी चालू असल्यामुळें अद्यापि ह्यांत पुष्कळच भर पडण्याजोगी आहे. तत्राप प्रसिद्ध झालेल्या सामुग्रीचा शक्य तितका उपयोग मीं केला आहे. यांत अपूर्तता किंवा दोष राहिले असतील ते कृपा करून कळवावे, म्हणजे पुढील आवृत्तींत दुरुस्ती करितां येईल.

अभ्यासकांच्या सोईसाठीं प्रत्येक बाबतीचे आधार ठिकठिकाणीं दर्शविले आहेत. विशेष निर्देश न करतां जेथें कंसांत नुसता आंकडा येईल तेथें तो रा. राजवाड्यांच्या खंडाचा समजावा. पानपतचा संग्राम भूगोलिक परिस्थितीवरून यथास्थित कळण्यासाठीं एक नकाशा देऊन त्यांत सदाशिवरावाचा मार्ग व शक्य तितकीं स्थळें दाखविलीं आहेत. हा नकाशा वाचकांस पसंत पडेल अशी आशा आहे.

या कामीं अनेक मित्रांनीं स्वराष्ट्रेतिहासाची कळकळ बाळगून नानाविध कागद व माहिती देऊन मला जें साह्य केलें त्याबद्दल मी सर्वांचा आभारी आहें. तसेंच बडोदें राज्याच्या शाळाखात्यानें या पुस्तकास उदार आश्रय दिला ह्मणून त्यांचेही मी फार फार आभार मानितों.

सन १७६१ पासून पुढील मराठशाहीच्या अखेरपर्यंतचा अवशिष्ट भागही यथावकाश वाचकांस देण्याची उमेद आहे.

ता. [illegible] [illegible]बर १९२२, मु. बडोदें. **गोविंद सखाराम सरदेसाई.**

---

# अनुक्रमणिका.

## प्रकरण सव्विसावें.

### उत्तरेकडील कारभाराचें बीज.



## प्रकरण सत्ताविसावें.

### मराठ्यांचा बादशाहींत शिरकाव.



## प्रकरण अठ्ठाविसावें.

### अब्दालीचा पाठलाग.

## प्रकरण एकुणतिसावें

### अब्दालीकडून शिंदेहोळकरांचा पाडाव. पृ.



## प्रकरण तिसावें.

### पानपतचा घनघोर संग्राम.



## प्रकरण एकतिसावें.

### नानासाहेब पेशव्याची योग्यता.

## प्रकरण बत्तिसावें.

## शाहूकालीन प्रसिद्ध घराणीं.

वंशावळी, ( वरील घराण्यांशिवायच्या ).

श्री.

# मराठी रियासत

## मध्यविभाग ३.

### पानिपत, म. १७५०-६१.

## प्रकरण सतविसावें

### उत्तरेकडील कारभाराचें बीज.

१. प्रास्ताविक. २. बादशाही अहवाल.
३. रोहिल्यांचा पाडाव. ४. दिल्लींतील भानगडी
५. बादशहा-वजिरांचें युद्ध. व मराठ्यांची हेळसांड.

१. **प्रास्ताविक**.—पानपतचा प्रसंग उत्तर हिंदुस्थानांतील महाराष्ट्राच्या समुचित कर्तृत्वाचा कळस होय. एखाद्या उदात्त नाटकाप्रमाणें त्यास हळूहळू रंग भरत जाऊन शेवटाकडे अंतःकरणवृत्तींना तो उचंबळून सोडतो. नाटकांत ज्याप्रमाणें आरंभींच्या भागांत निरनिराळया व्यक्तींचें व घडामोडींचें स्वरूपोद्‌घाटन करावें लागतें, त्याचप्रमाणें पानपतच्या प्रसंगांतलेही आरंभींचे भाग स्पष्ट केल्याशिवाय पुढील रंग मनांत यथायोग्य उतरणार नाहीं. सबब मराठ्यांचा उत्तरेंतील एकंदर उद्योग कसकसा बनत गेला, हें प्रथम सांगावयाचें आहे. या उद्योगांत विविध व्यक्तींचा व पक्षांचा संबंध येतो. मराठ्यांकडील अनेक सरदार, दिल्लींतील बादशहा व उमराव, जाठ, बुंदेले, रोहिले, शीख वगैरे उदयेच्छु लोक, रजपूत राजे आणि अहंमदशहा अब्दाली व त्याचे अफगाण अनुयायी, इत्यादिकांचा या भागांत संबंध येणार आहे, ह्मणून त्या सर्वांचे वर्तनोद्देशही समजून घ्यावे लागतात.

शाहू छत्रपतीच्या मृत्यूपर्यंत मराठ्यांच्या उत्तरेकडील उद्योगाचें विवेचन पूर्वी आलें आहे. बाजीरावानें आपली दृष्टि सर्वथैव उत्तरेकडे ठेविली होती. नानासाहेबाचीही आरंभीं तशीच दृष्टि होती. शाहूच्या मृत्यूनंतर मराठशाहीच्या कारभारास निराळें वळण लागलें, आणि एक नवीन विघ्नही उपस्थित झालें. स. १७५० च्या आरंभापासून स. १७६१ च्या जून महिन्यांत पेशवा पर्वतीवर मरण पावला, तेथपर्यंतच्या साडेअकरा वर्षांच्या काळापैकीं पहिलीं तीन वर्षें पेशवा साताराच्या भानगडींत गुंतलेला होता, त्यामुळें उत्तरेंतील उद्योगांत लक्ष घालण्यास त्यास सवड झाली नाहीं. शिंदे–होळकरच तिकडचा कारभार पाहत होते. शाहूच्या हयातींत मराठशाहीच्या कारभारास एक प्रकारचें नियंत्रण होतें. प्रतिपक्ष्यांच्या ओढाताणींत पेशव्यास एकाच दिशेकडे वाहतां येत नसे. परंतु रामराजाचे अंगीं कर्तबगारी नसल्यामुळें पेशवा अनियंत्रित झाला; आणि निजामशाही व कर्नाटक यांसंबंधीं नजीकच्या भानगडींत द्रव्यार्जनाचे पाठीस लागून गुरफटून गेल्यामुळें, उत्तरेंतील दूरच्या उद्योगाकडे त्याचें दुर्लक्ष झालें. या अनुसंधानानें पानपतचा प्रसंग अंगावर येण्यास आरंभापासून कसकशीं कारणें बनत गेलीं हें नीट समजून घेणें अवश्य आहे.

या अकरा वर्षांतील कित्येक ठळक प्रसंग व त्यांचे काळ दृष्टीसमोर पाहिजेत:—

ता. १४·४·१७४८ महंमदशहा बादशहाचा मृत्यु व अहंमदशहाची स्थापना. सफ्दरजंग वजीर स. १७५३ पावेतों.

ता. २१·५·१७४८ निजामुल्मुल्कचा मृत्यु.

ता. १५·१२·१७४९ शाहूचा मृत्यु.

सप्टेंबर–१७५२ गाजीउद्दिनाचा औरंगाबादेस खून.

ता. ३·६·१७५४ अहंमदशहा बादशहा स्थानभ्रष्ट, दुसरा आलमगीर. याची स्थापना, वजीर मीरशहाबुद्दीन, मराठ्यांचे मदतीनें

ता. १४·१०·१७६४ सफदरजंगाचा मृत्यु, मुलगा सुजाउद्दौला.

ता. १९·५·१७५८ अलीगौहर ( शहाआलम ) याचें दिल्लींतून पलायन.

ता. २८·११·१७५९ आलमगीर बादशहाचा खून.

ता. १०·१·१७६० दत्ताजी शिंद्याचा पाडाव. वजीर मीरशहाबुद्दीन दिल्लीचे कारभरांतून निघून गेला.

**अहंमदशहा अब्दालीच्या स्वाऱ्याः**-१ ली, जानेवारी-मार्च १७४८; २ री, जानेवारी-एप्रिल १७५१; ३ री, डिसेंबर १७५६-एप्रिल १७५७; ४ थी ऑगष्ट १७५९-मार्च १७६१.

**रघुनाथरावाच्या स्वाऱ्याः**-गुजराथेवर २०·१२·१७५२-जून १७५३; उत्तर हिंदुस्थानांत पहिली ३०·८·१७५३—ऑक्टोबर १७५५; लाहोरची अटकेपावेतों नोव्हेंबर १७५६-ऑक्टोबर १७५८.

**सदाशिवरावाची पानपतची स्वारी**-१४·३·१७६०-१४·१·१७६१. २३·६·१७६१ पर्वतीवर पेशव्याच्या मृत्यु.

---

१. **टीपः**—पानपतसंबंधीं संदर्भग्रंथ. उल्लेख नसेल तेथें आंकडे राजवाड्यांच्या खंडाचे समजावे.

**का. सं.**-भा. सा. ब; भा. सा. कै.; रघुनाथ यादवची बखर; प. या; धा. रा. च.

**भा. व.**-पुस्तक १-२, बंदेल्यांची कैफीयत, शकावली वगैरे.

**इ. सं.**-ऐ. टि. २-३१, ३३, ४१, ४५ व ३-३३.

**पे. ले. सं** पु. १.

**पारसनीस**-म. प्र. बुंदेलखंड-एकत्रुटित बखर.

**काशीराय** बखर-Asiatic Researches vol. 3.

**श्री. वि. आठल्ये**-रिंगणगांवकर दप्तर-होळकरांची थैली पूर्ण, व सोनपतची बखर व कांहीं पत्रें,-सर्व अप्रकाशित.

**वि. त्रि. वैद्य**-दुर्दैवी रंगू.

**ना. वि. बापट**-पानपतची मोहीम.

Elliot vol. 8; Duff; Elphinstone; and Tates' Kingdom of Afghanistan (Times of India).

**२. बादशाही अहवाल, मराठ्यांशीं चौथाईचा करार** (१७५०).– पानपतावर मराठ्यांशीं झगडणारा अहंमदशहा अब्दाली यानें हिंदुस्थानावर पहिली स्वारी स. १७४८ चे आरंभीं केली आणि त्याच वेळीं दिल्लीचा बादशहा महंमदशहा मरण पावून त्याचा मुलगा अहंमदशहा तख्तावर आला, ही घडामोड हिंदुस्थानचे इतिहासांत महत्वाची आहे. औरंगजेबाचे वेळेस मोगल बादशाहीची वायव्य हद्द मध्य आशिया पर्यंत होती, ती नादीरशहाचे स्वारीनें आकुंचित होऊन सिंधु नदीवर आली. पुढें इतर प्रांतांप्रमाणें पंजाब प्रांतही हातचा जातो कीं काय अशी धास्ती बादशहास पडली असतां, अब्दाली त्या प्रांतावर आला. अहंमदखान दुराणी याचा जन्म स. १७२४ चा असून तो नादीरशहाचे पदरीं नोकर होता. १९ जून १७४७ रोजीं नादीरशहा मारला गेला आणि अफगाणिस्तानचें राज्य अहंमदखानास मिळालें. त्यानें शहानवाजखान बामीझै यास वजीर नेमून त्यास शहावलीखान असा किताब दिला. या वजिराच्या मदतीनें अहंमदशहाचे पुष्कळसे उद्योग सिद्धीस गेले. प्रत्येक स्वारींत व उलाढालींत दोघे एकमेकांच्या विचारानें वागत. पानपतावर व पुढेंही हा शहावलीखान अहंमदशहाचा केवळ उजवा हात होता. सरदार जहानखान पोपलझै व शहापसंतखान हेही अहंमदशहाचे साह्यकर्ते असून त्यांचीं नांवें पुढें वारंवार येत असतात. नादीरशहानें कमाविलेली सर्व संपत्ति अहंमदशहास मिळाल्यामुळें त्यास पुढें येण्यास पैशाची अडचण भासली नाहीं, लगेच त्याचा जम बसला. जवळच्या फौजेस बाहेर काम मिळाल्यास स्वदेशांतील बंडाळी मोडून आपली व्यवस्था सुरळीत लागेल, या हेतूनें त्यानें प्रथम पेशावर हस्तगत केलें. आणि पंजाबच्या अधिकाऱ्याकडून मदतीची मागणी येतांच तो लाहोरावर चालून आला.

नादीरशहाच्या स्वारींत वजीर खानडौरान मरण पावल्यावर कमरुद्दीनखान वजिरीचें काम पाहत होता. कमरुद्दीनखानाचाच कोणी आप्त शहानवाजखान पंजाबचा कारभारी असून, त्याचें व त्याच्या भावाचें जुळत नव्हतें. या दोघां भावांच्या भांडणांत अदिनाबेग नांवाच्या इसमानें भर घातली. हा अदिनाबेग

महाकारस्थानी असून, अब्दालीस इकडे आणण्यास तोच कारण झाला. हा मूळचा लाहोर जवळील सडकपुर गांवचा राहणारा. त्याच्या बापाचें नांव छन्नू. लहानपणीं तो अलाहबाद, कानपूर वगैरे ठिकाणीं फौजेंत नोकरी करून वाढला. पुढें लष्करी नोकरी न आवडून त्यानें मुलकी खात्यांत प्रवेश केला, आणि हिशेबी कारकुनी वगैरे कामांत प्रवीणता मिळविली. तेव्हां नोकरींत चढत चढत नादीरशहाचे स्वारीच्या वेळीं तो पंजाबांत सुलतानपुरचा कारभारी होता. सरहद्दीकडील कारस्थानांची त्यास चांगली वाकबगारी झाल्यामुळें सर्व अधिकाऱ्यांस त्याची जरूर लागत असे. तो स्वभावानें क्रूर व प्रसंगीं वाटेल तें करण्यास कचरणारा नव्हता. ( एल्यट पु. ८ ). स. १७४७ त शहानवाजखान व त्याचा भाऊ यांचें पंजाबांत भांडण लागलें असतां, अदिनाबेगानें अब्दालीशीं खटपट करून त्याची मदत वडील भावास आणून दिली आणि इकडे हें कारस्थान वजीर कमरुद्दीनखानास लिहून पाठविलें, त्याबरोबर वजिरानें त्या बंडखोर अधिकाऱ्याचा निषेध केला. परंतु अब्दालीनें मात्र पंजाबावर स्वारी करण्याची संधि घालविली नाहीं. स. १७४८ च्या जानेवारींत पेशावराहून खालीं उतरून त्यानें लाहोर व मुलतान हे प्रांत हस्तगत केले सुभेदार शहानवाजखान त्याजवर चालून गेला, परंतु ता. २० जानेवारी रोजीं पराभव पावून त्यास पळून जाणें भाग पडलें. ता. २२ रोजीं अब्दालीनें लाहोर हस्तगत केलें. इकडून वजीर कमरुद्दीनखानही अब्दालीवर ताबडतोब चालून गेला. तों अब्दाली पुढें येऊन सरहिंद काबीज करून बसला होता. स्वतः बादशहा अर्धांगवायूनें घोड्यावर बसण्यास असमर्थ होता, म्हणून त्यानें जयपुरचा ईश्वरसिंग, सफदरजंग, मीरमन्नू वगैरे मंडळी वजिराचे मदतीस पाठविली. परंतु अब्दालीपुढें त्यांचा जोर चालेना, तेव्हां वजिरानें शहाजादा अहंमद यास आपल्या मदतीस पाठविण्याविषयीं बादशहास लिहिलें. (का. सं. प. या. ९२). शहाजादा तिकडे जाऊन स्वतंत्र होईल या भीतीनें बादशहा त्यास पाठविण्यास खुषी नव्हता. पण वजिराचे आग्रहावरून त्यानें शेवटीं शहाजाद्यास रवाना केलें. शहाजादा आल्यावर ता. ३ ते १० मार्च पावेतों सरहिंद येथें लढाई होऊन

अब्दालीचा पराभव झाला. परंतु १० मार्च रोजीं कमरुद्दीनखान तंबूंत निमाज पढत असतां, एकाएकीं तोफेचा गोळा लागून मरण पावला. इकडे त्यापूर्वीच अब्दाली सरहिंद सोडून परत निघाला असतां बादशाही फौजेनें त्याचा धुव्वा उडवून दिला. तेव्हां पंजाबचा कारभार कमरुद्दीनखानाचा मुलगा मूइनुन्मुल्क मीरमंनू यास ता. २–४–१७४८ रोजीं देऊन अब्दाली तावडतोब ११ एप्रिल रोजीं सिंधूवर आला आणि १२ मे रोजीं कंदाहार येथें पोंचला. कमरुद्दीनखान मेल्याची बातमी मागाहून त्यास कळली, तेव्हां आपण उगाच परत फिरलों असें त्यास वाटलें. पुढील दोन वर्षे अब्दाली उत्तरेस व पश्चिमेस बंडखोरांचें पारिपत्य करून राज्याची व्यवस्था लावीत होता, म्हणून हिंदुस्थानाकडे आला नाहीं. ठठ्ठा व काबूल हे दोन प्रांत पूर्वी नादीरहास दिलेलेच होते, सबब ते आपल्या हवालीं करावे असें अब्दालीचें मागणें होतें. परंतु सरहिंदच्या लढाईनंतर शहाजाद्यानें मीरमंनूच्या मदतीनें अब्दालीस काबुलापर्यंत मार दिला, तेव्हां ज्यास्त प्रांत देण्याची जरूर राहिली नाहीं. मागें बादशहा मरण पावल्याची बातमी आली म्हणून पंजाबावर मीरमंनूची नेमणूक करून शहाजादा लगेच परत आला. रस्त्यांतच त्यानें बापाच्या मरणाचें वर्तमान ऐकून बादशाही पद धारण केलें. आणि निजामुल्मुल्क यास दक्षिणेंतून बोलावून वजिरी देण्याचा विचार केला, इतक्यांत पुढें २१ मे रोजीं निजामही मरण पावला. तेव्हां सादतखानाच्या बहिणीचा मुलगा मनसूरअली सफदरजंग यास अहंमदशहानें वजिरी व निजामाचा मुलगा गाजीउद्दीन यास बक्षीगिरी दिली. मात्र बादशहाची आई उधम व जनानखान्यावरील मुख्य जावेद यांचे तंत्रानें बादशहा वागूं लागला.

इकडे बादशाही शक्य तितकी आपल्या कबजांत आणण्याचा मराठ्यांचा प्रयत्न चालूच होता. स. १७४५ चे प्रथमार्धांत पेशव्यानें भेलशाची स्वारी केली, तेव्हां दिल्ली दरबाराशीं कांहीं नवीन करार ठरवून घेण्याचा त्याचा विचार होता. त्याचे वकील-हिंगणे या गोष्टीचा पाठपुरावा दरबारांत करीत होते, आणि अंताजी माणकेश्वर, विठ्ठल शिवदेव वगैरे सरदार त्याच उद्योगावर होते. ( ६. १८९ ). स. १७४८ त पेशव्यानें नेवाईची स्वारी केली त्या वेळीं

अब्दाली लाहोरावर आला. तेव्हांच्या घडामोडींवर मराठ्यांची दृष्टि परिपूर्ण होती. ( का. सं. प. या. ९२ ). नवीन वजिरास आपले लक्षांत आणण्या-संबंधानें पेशवा रामचंद्रबाबास लिहितो. ' सफदरजंग यास निमरजाबंद करून आपले लगामीं लावावयाचा विचार केला असे, ह्मणून लिहिलें तें कळलें. ऐशियास हा विचार उत्तम केला. आह्मींही त्यास विचारानुरूप लिहिणें तें लिहून लगामीं लावून घ्यावें, रकारपूर्वकाचें ( रघूजी भोसले ? ) साह्य न करावें ह्मणोन लिहिलें असे. ज्यांत आपल्या मनसुबियास व कर्तव्य-तेस उचित आणि उपयोगी, परिणाम उत्तम लोकोत्तर, योग्यतर लौकिक-कीर्तिस्पद, तेंच करणें व कराल हा निशा आहे. सफदरजंग उमदा मनुष्य त्याचा स्नेह हरप्रकारें रक्षण करणें उचित. दुसरें, काशी त्याचे हातीं. त्याशीं निखालसता असलिया, कालगतीनें काशीचें स्पष्ट दर्शन होणार तो महा लाभ आहे. यासाठींही स्नेह रक्षावा. अप्रिय भाषण करून विग्रह वाढविणें उचित नव्हे. थोडासा तोटा जाहला तरी सोसून स्नेह रक्षणें उचित असे. ' हें पत्र स. १७४८ च्या पावसाळ्यांतलें किंवा किंचित् पुढचें असावें. या वेळीं बादशहाशीं कांहीं नवीन करार ठरला असावा असें अनुमान होतें. ( ६. १९२ पृ. २९३, बापूजी हिंगण्याचें पत्र ७- २- १७४९ ). परंतु या सालच्या पावसाळ्यांत शाहू छत्रपति आजारी पडून, भावी व्यवस्थे संबंधानें सरदार चिंताग्रस्त होऊन सातार्‍यास जमा झाले, त्यांत एक वर्ष फुकट जाऊन स. १७५० च्या पावसाळ्यांत शिंदे होळकर उत्तरेंत रवाना झाले, तेव्हां त्यांनीं पुढें बादशाहींत नवीन कारस्थान रचिलें.

सफदरजंगाकडे वजिरी आल्यानें रोहिल्यांचें प्रकरण उपस्थित झालें. हे पठाण गंगायमुनांच्या दुआबांत राहत असून इकडे बादशाही प्रदेशास व तिकडे अयोध्येच्या सुभ्यांतील अलाहबाद लखनौ या प्रांतांस भारी उपद्रव देत असत. त्यांचीं अनेक लहान राज्यें असून मुख्य ठिकाण बरेली होतें. रोहिले सुनी पंथाचे व वजीर शिया पंथाचा असल्यामुळें दोघांच्या भांडणांत धर्मद्वेषाची भर पडली. अलीमहंमद रोहिल्यानें मोगल अधिकार्‍यांस ठार मारून स. १७४४ त स्वतं-

व्रता धारण केली, तेव्हां त्याचा बंदोबस्त करण्यासाठीं खुद्द महंमदशहा व सफदरजंग फौजेसुद्धां त्याजवर चालून गेले, (स. १७४५), परंतु त्यांचे हातून अलीमहंमदाचा पाडाव झाला नाहीं. सफदरजंगानें पुढें त्याजवर सारखी मोहीम चालविली होती आणि वजिरी प्राप्त झाल्यावर तर हा उद्योग त्यानें नेटानें चालविला. त्यासाठीं त्यानें मराठ्यांशीं नवीन करार करून शिंदे होळकरांची मदत घेतली. स. १७४९ त अलीमहंमद मरण पावला, तेव्हां त्याचा अल्पवयी मुलगा सादुल्लाखान याचा कारभार दुंदेखान व हाफीज रहमतखान हे दोन सरदार पाहूं लागले. अलीमहंमदास तीन मुलगे असून, दोघे अब्दाली जवळ कैदेंत होते, तेव्हां तिसरा धाकटा मुलगा सादुल्लाखान यास हाफीजरहमतनें गादीवर बसविलें. ही गोष्ट ऐकून अब्दालीकडे असलेले दोघे मुलगे गादीवर हक्क मागण्यास परत आले, तेव्हां त्या तिघांचा झगडा लागला. याचा फायदा घेऊन सफदरजंगानें रोहिलखंडांत स्वारी केली, आणि बहुतेक प्रांत जिंकून तेथें आपल्या तर्फेने नवलराय कायस्थ यास कारभारी नेमिलें. परंतु रोहिल्यांनीं नवलरायावर चाल करून त्यास ठार मारिलें, तेव्हां स्वतः सफदरजंग पुनः रोहिल्यांवर चालून गेला असतां पराभव पावून मागें आला. अशा स्थितींत मराठ्यांची मदत घेतल्याशिवाय वजिरास गत्यंतर राहिलें नाहीं. दुंदेखानाचा जांवई वजीरखान व त्याचा भाऊ सुलतानखान हेही या वेळेपासून रोहिलखंडांत वावरत असून मराठ्यांच्या मदतीनें आपल्या जातभाईंचा पाडाव होणार याजबद्दल वैषम्य बाळगीत होते.

महंमदशहाच्या मृत्यूनंतर बादशहाहीचा बचाव कसा होतो याची वजीर व इतर मुत्सद्यांना मोठी पंचाईत पडली. आदिनाबेग वगैरेच्या मार्फत अब्दालीची कारस्थानें चालत असून त्याची भीति सर्वांच्या डोळ्यांपुढें उभी होती. रोहिल्यांशींही अब्दालीचें कारस्थान होतें. तेव्हां मोगल बादशाही उलथून जाऊन पुनः पठाणांचें राज्य दिल्लीस होणार असा रंग दिसूं लागला. 'पातशहात रोहिले पठाण घेऊं चाहत होते' (का. सं. प. या. ३६४). वजीर सफदरजंग व मीरबक्षी गाजीउद्दीन हे दरबारांत कर्ते पुरुष असून, त्यांस

पठाणांचें प्राबल्य नको होतें. गाजीउद्दीनचा ओढा मूळपासून मराठ्यांकडे असून वजिराचें मनही मराठ्यांसंबंधानें निर्विकारच होतें. पठाणांची वृत्ति नेहमींच उचल्यासारखी असून, कसा तरी स्वार्थ साधण्यापलीकडे, त्यांचा विचार नव्हता. दोनशें वर्षें पराक्रमी मोगल बादशहांनीं राज्य संभाळिलें, तें हे पठाण व अब्दाली उलथून पाडणार अशी वेळ येऊन ठेपली, तेव्हां मराठ्यांची मदत घेण्याशिवाय बादशहास आपल्या बचावाचा दुसरा उपाय राहिला नाहीं.

मराठ्यांचीही मदत घेताना बादशहानें मराठ्यांशीं एक विशिष्ट करार केला. हा करार महत्वाचा असून तो. १-१ व ६-१९९ यांत दिलेला आहे. पेशव्यांचे तर्फे जयापा शिंदे व मल्हारराव होळकर यांनीं हा करार केला. ठठ्ठा, मुलतान ( म्ह० सिंध ), पंजाब, रजपुताना व रोहीलखंड एवढ्या प्रदेशावरील चौथाई बादशहानें मराठ्यांस फौजेच्या खर्चासाठीं करून दिली. त्यांतील मुख्य अट अशी होती कीं, अब्दाली, रोहिले, रजपूत राजे व सिंधचे अमीर यांनं मराठ्यांनीं तंबी पोंचवून त्यांजपासून पातशाहीचें संरक्षण करावें. वरील प्रांतांपैकीं दोन हिस्से सरकारांत व एक हिस्सा, फौज हजूरची, त्यास ठरविले; आणि प्रांताचा बंदोबस्त झाल्यावर चौथा हिस्सा मराठ्यांचा. सरकारचे दरोगे व किल्लेदार सुदामतप्रमाणें प्रांतांत राहवे. भोगवटाप्रमाणें पातशाही बंदोबस्त ठेवून शहरच्या लोकांस आणि जहागीरदारांस राजी राखूं, नंतर आपली चौथाई घेऊं. यास 'श्री ईश्वर व मार्तंड व सांब साक्ष आहे. पोथी, बेलभंडार, तुळसी, गंगा प्रत्यक्ष साक्ष.' बादशहाचा बोज राखण्यासाठीं हा करार अर्जी व उत्तर या स्वरूपांत ठरला. करारांत छत्रपतीचें नांव नसून पेशव्याचें आहे. सिंध पासून काशीपावेतों सर्व प्रदेशाचा बंदोबस्त राखण्याची जबाबदारी या करारानें मराठ्यांनीं स्वीकारिली. कराराचा मुख्य रोंख रोहिले व अब्दाली यांसंबंधीं होता. रोहिल्यांस नरम करण्याचें काम शिंदे होळकरांनीं लगेच अंगावर घेतलें. अर्थात् या करारानें अब्दालीस चीड येऊन तो मराठ्यांचे पाठीस लागला. बादशाही दरबारांत दोन पक्ष उत्पन्न झाले, एक मराठ्यांचा व दुसरा अफगाणांचा. अब्दालीकडील वकील व हस्तक दिल्लीस राहून त्यास

येथील इत्थंभूत बातमी कळवीत असत. रजपूत राज्यांतही मराठ्यांनीं इतउत्तर उघड प्रवेश केला याचें कारणही हा करार होय. ह्या महत्वाच्या कागदाची मिति उपलब्ध नाहीं. तो केव्हां तरी स. १७५० त झालेला दिसतो. करार झाल्यानंतर त्याची उस्तवारी करण्यास पेशव्यास एकवार उत्तरेंत जातां आलें असतें तर त्याचे पुढील परिणाम कदाचित् निराळे झाले असते. पेशवा साताराचे भानगडींत गुंतून राहिला; शिंदे होळकरांत वितुष्ट पडलें; हिंगणे, अंताजी माणकेश्वर इत्यादि दुसऱ्या मंडळींचा बेबनाव झाला; ' कोणी तरी खासा इकडे एकवार येऊन व्यवस्था लावा,' असें सरदार लोक पेशव्यास लिहीत असतां, रघुनाथरावाशिवाय दुसरा कोणी कर्तबगार इसम तिकडे गेला नाहीं, त्यामुळें अब्दाली व मराठे यांची चुरस वाढत जाऊन पानपतचा प्रसंग पुढें उद्भवला, त्याचें बीज वरील करार होय.

**३. रोहिल्यांचा पाडाव, फरुखाबादची लढाई.**—(२१-३-१७५१). वरील करारा अन्वयें शिंदे होळकरांनीं रोहिल्यांवर स्वारी सुरू केली. जुलई महिन्यांत ( १७५० ) ते दाक्षिणेंतून निघाले. नोव्हेंबरांत होळकर अडाण्यास व जयापा कोंथ्यास पोंचले. ( ६-२१३ ). सखाराम बापू व गोविंदपंत बुंदेले त्यांजबरोबर होते. २८-९-५० च्या पत्रांत होळकर लिहितो. ' गंगापार होऊन पठाणास तंबी पोहोंचावयाचा विचार करून पुलाची तर्तूद करवीत असों.' ( ६-२०६ ). ही तयारी करण्यांत चारदोन महिने गेले. फेब्रुवारी १७५१ त ' मल्हारजी यमुनेपार होऊन, सांप्रत विचार पठाणांशीं युद्ध प्रसंग करण्याचा आहे.' ( ३·३७५ A ). मराठ्यांची फौज अंतर्वेदींत उतरली ही गोष्ट दरबारांत पुष्कळांस आवडली नाहीं. ( ६-२०७ A )* रोहिल्यांनीं अब्दाली-कडे संधान करून त्याजकडून पंजाबावर स्वारी करविली. तेथील सुभेदार मीरमंनूनें बादशहाकडे मदत मागितली. परंतु सफदरजंगानें मदत पाठविली नाहीं. बादशहा तर चैनींत निमग्न होता. २.३.१७५१ रोजीं अब्दालीनें

* **टीपः**—राजवाडे खं. ६ ले. १६६–२५२ चे आंकडे छापलेले नाहींत. हातानें घातले पाहिजेत. एल्यट पु. ८ पृ. ११६.

मीरमंनूचा पराभव केला. त्या प्रसंगीं मीरमनूंचा कारभारी कौरीमल्ल मारला गेला. तेव्हां ठठ्ठा, मुलतान, लाहोर व काबूल हे चार परगणे अब्दालीस देऊन मीरमंनूनें त्यास पुढें दिल्लीकडे येऊं न देतां परभारें वाटेस लाविलें. मागें त्यानें आपला सरदार नासिरखान पंजाबांत ठेवून दिला. ज्या प्रांताच्या बंदोबस्ताची हमी मराठ्यांनीं घेतली, तोच हस्तगत करून अब्दालीनें या हमीची किंमत दिल्ली दरबारास प्रत्यक्ष दाखवून दिली.

इकडे रोहिल्यांनीं प्रयागकाशीपर्यंत हिंदु क्षेत्रांवर चाल करून धुमाकूळ उडवून दिला. फेब्रुवारीचे अखेरीस दीक्षित लिहितो. 'ब्राह्मणभोजन होत होतें एवढ्यामध्यें बापूजीपंत हिंगण्याचें पत्र जे, पठाण प्रयागास आले, नवें शहर लुटलें, बायका बंद नेल्या, काशीमध्यें मोठा आकांत झाला. दोन दिवस शहरांत दिवा लागत नाहीं. दहा दिवस काशीमध्यें मोठा आकांत जाहला. ऐशीं रुपये गाडीचें भाडें पाटण्याचें झालें. ओझ्यास मनुष्य मिळेना. मनुष्य निघोन ज्यास जिकडे वाट फावेल तिकडे गेले. तंव पठाणास वर्तमान कळलें. तेव्हां त्यानें साता सावकारांचे नांवें परवाने पाठविले जे, तुम्ही कां पळतां! मी पातशाही बंदा आहें. शहर लुटावयासी आलों नाहीं. रयतेशीं काय आहे! लोकांस दिलासा देऊन शहरांत सुखरूप राहणें. तरी लोक बहुत गडबडून गेले आहेत. विश्वेश्वर काय करील तें खरें.' (३.३७६). ही सर्व धामधूम फर्रुखाबादचा नबाव अहंमदखान बंगश यानें उठविली होती. काशीचा राजा बळवंतसिंग यानें प्रयाग येथें अहंमदखानास भेटून, सात लक्ष दंड भरून काशींत स्वस्थता केली. पुढें रोहिल्यांचें व मराठ्यांचें युद्ध झालें.

'अहंमदखान बंगस बहादुरखां रोहिल्यास शरण जाऊन, त्यास दहाबारा हजार स्वार व प्यादे घेऊन कुमकेस आणिलें. सरदारांची फौज व जाठांची व नवाब वजिराचीं फौज अशा गंगापार होऊन २० मार्च रोजीं लढाई जाली. बहादुरखां रोहिला बुडविला. पंनास साठ हजार फौज बुडविली. हजारों घोडीं व हत्ती व तोफखाना पाडाव केले. बंगस घाबरा होऊन गंगापार पळून गेला.' हें वर्तमान पेशव्यास कळल्यावर त्यानें सरदारांस मोठी

शाबासकी दिली. ‘ शाबास तुमच्या हिंमतीची व दिलेरी रुस्तुमीची. दक्षिणच्या फौजांनीं गंगायमुनापार होऊन पठाणांशीं युद्ध करून फत्ते पावावें हें कर्म लहान सामान्य नव्हे. तुम्ही एकनिष्ठ कृतकर्मे दौलतीचे स्तंभ आहां. इरान तुरान पावेतों लौकिक झाला कीं वजीर पळाला असतां फिरोन फत्तेच्या मसनदीवर बसविला. या उपर स्वकार्य साधून आपले मुलखांत येणें योग्य आहे. ( का. सं. प. या. १६२–१६३ ). साबाजी शिंद्यासही असेंच पत्र आहे. ‘ आम्ही आगऱ्यापासून लांबलांब मजली करून दर्यागंज पर्यंत आलों. अद्यापि मल्हाररायाचे फौजेचा सुमार कळत नाहीं. सुरजमल्लाचा मुकाम पठारीवर आहे. वजिरांचा व सरदारांचा मुकाम कोठें आहे तें लिहिणें, ’ असें नारोशंकर विचारितो. ( ६–२२२ ). लढाईच्या बातमीचें १७ एप्रिलचें जयापाचें पत्र ७ जूनला पेशव्यास पोचलें. त्यांत जयापा लिहितो, ‘सादलखान पठाण लुटून फस्त केला. तदुत्तर अहंमदखान प्रयागींहून जलद स्वारीनें फर्रुखाबादेस आला. त्याची बातमी कळोन मोर्चेबंदी करून राहिलों. पठाणांस सामान सरंजाम पलीकडून पोंचत होता, त्यामुळें जेरीस न येत. नबाब वजीर पांच कोस कनोजजवळ होते. त्यांजकडून गंगेस पूल तयार करवून पार उतरून पठाणांस गांठून लुटून फस्त केला. अहंमदखान पठाण तेच रात्रीं मोर्च्यांतून पळून गेला. त्याचा पिच्छा करून बुडविला. दत्ताजी शिंदे यांणीं फार फार शर्थ केली. या उपरी वजिराशीं काशी प्रयाग वगैरे क्षेत्रांचा मजकूर घातला आहे, ( का. सं. प. या. ३६४ ). ‘ मनसूर अली वजीर यासी मदत होऊन पठाणावर चढाई केली. मग यमुनापार होऊन भागीरथीचे तीरीं पठाणांची गांठ पडली. दाणापाणी पलीकडून येत असे यास्तव दिरंग लागला. मग भागीरथीस पूल बांधून रा. गंगाधर यशवंत याजबरोबर फौज देऊन पलीकडे गेलों. उभयतां श्रीमंत अलीकडे पठाण होता त्याजवर राहिले. मग ईश्वरकृपें पलीकडील फौज मोडून तारांगण केलें. अलीकडे ही मोडला. खासा तीराउतानशीं पळोन गेला. मनसूरअलीनें काशीची व प्रयागाची क्रमणा केली. यंदा लष्करें देशास येतील.’ ( १२ मे, ३-३८३ A ). ‘ मल्हारजी फर्रुखाबादेकडे आहेत. नबाब शिष्टाचरा

बहुत करतो. मोठें यश आलें. रोहिले नबाबाशीं सख्य करून द्यावें ह्मणून मध्यस्थ पडले आहेत. नबाब ह्मणतो ( पावसाळ्याची ) छावणी अंतर्वेदींत करावी. बहुधा छावणी होईलसें दिसतें. लूट सर्व हरिभक्तांहीं घेतली. तोफा काल्पीस पाठविल्या. गोविंदपंत, नारो शंकर, लक्ष्मण शंकर सर्व सांगातेंच आहेत. गाजीपुऱ्यांमध्यें पठाण होते, त्यांची राजा बळवंतसिंगाशीं लढाई झाली. राजाचा जय झाला, ते लुटून घेतले. गाजीपुरांत याचा अंमल झाला.' ( ता. १५ मे, ३·३८४ ) काशी प्रयाग, वगैरे हिंदूंचीं पवित्र स्थळें रोहिल्यांचे कबजांत होतीं, तीं सोडविण्याचा पेशव्याचा फार दिवसांचा संकल्प असून त्या स्थळांस उपद्रव करणें ह्मणजे मराठ्यांच्या नाकांवर मिऱ्यें वाटण्या-प्रमाणें होतें. वास्तविक हीं स्थळें अयोध्येच्या सुभ्यांत मोडत असून त्यांची मागणी सफ्दरजंगाकडे मराठ्यांनीं केलेली होती. वर सांगितलेला काशीतील उपद्रव व लढाया हीं स्थळें सोडविण्यासंबंधाच्या होत. ' मल्हारजीनें छावणी अंतर्वेदींत केली. त्याचे चित्तांत कीं विश्वेश्वराची ज्ञानवापीजवळील मशीद पाडून देवालय करावें. परंतु ब्राह्मण चिंता करितात कीं हे मशीद प्रसिद्ध आहे. पातशहाचा हुकूम नसतां पाटील देऊळ करील, ह्मणजे ब्राह्मणांस मरण येईल. जीवच घेईल. या प्रांतीं यवन विशेष प्रबळ आहेत. गंगा समर्थ. मना करावें तरी पाप. देवाची स्थापना मना करावी हा दोष. परंतु ब्राह्मणांस संकट न पडे तें करावें, हें पुण्य विशेष. याजवर विश्वेश्वराचे चित्तांत येईल तें करील. मशीद पाडूं लागतील, तेव्हां सर्व ब्राह्मण मिळून श्रीमंतांस विनंतिपत्र पाठवितील ऐसा विचार झाला आहे.' (१८ जून १७५१, ३–३९७ ). स्वधर्माविषयींची ब्राह्मणांची ही कळकळ वाखाणण्याजोगी नाहीं असें कोण ह्मणेल !

वरील लढाईस फर्रुखाबादची लढाई असें म्हणतात. रोहिल्यांस याप्रमाणें पादाक्रान्त केल्यावर त्यांजपासून ५० लाख रुपये घेण्याचा करार होळकरानें करून घेतला, असें डफ् म्हणतो. हा फक्त त्या मोहिमेचा खर्च असावा. कारण रोहिल्यांपासून जिंकलेल्या मुलखाची वांटणी करून त्याची सनद पेशव्यानें शिंदे–

होळकरांस करून देण्यास बराच अवधि लागला. याबद्दलच्या सनदा मार्च १७५४ च्या आहेत. ( ना. सा. रो. १.१८६–१८७ ).

या मोहिमेच्या परिणामासंबंधानें गोविंदपंत बुंदेले ता. १५ मे च्या पत्रांत, पठाणाच्या धांदलीनें उत्तरहिंदुस्थानांत व्यापाराची व पैशाची गडबड किती उडाली आणि हुंड्या वगैरे कशा चालत नाहींत, याचें वर्णन करून, पुढें लिहितो. 'पठाण मारले गेले. याउपरी सुबत्ता होईल. पठाण मारले न जाते तरी आमचे अंमल न राहते. जमीनदार पठाण सुद्धां एक झाले होते. पठाणांचा मनसुबा पातशाही घ्यावयाचा होता. पातशाही हातांत न ये तर, पातशहास दबवून, वजिरास मारून वजीर, बक्षी व दिवाण आपण व्हावें, हा मनसुबा होता. श्री गंगातीरीं बंदी बहुत केली, त्याचें फळ सध्यां पावला. श्री. नानास्वामीचें पुण्य समर्थ आहे. इजतखान तरवाईवाला बेइमान पठाणास मिळाला होता, त्याचे सर्व स्वार मारले लुटले गेले. फजीत पावला. ( ३-१६० ). पठाण व रोहिले दोनही फौजा मातबर बुडवितांच पातशहास मोठा वसवसा जाला जे, श्रीमंत नानाची फौज इकडे आली त्यामुळें हे पातशाही बुडवितात, मोडितात, तेव्हां आतां मराठ्यांहून आणीक कोणी मातबर नाहीं. त्यास वजिराचें वर्तमान तर वजिरांत कांहींच पीळ नाहीं, तिळमात्र मर्दुमी राहिली नाहीं, निर्माल्य जाला आहे. जर करितां श्री. नानास्वामी अगर भाऊस्वामी कोणी एकजण असते, तर आजी पातशाहीचा मामला हलका पडला होता. या समयीं, मातबर कार्य करून घ्यावयाचा समय होता. पठाणांचे दंग्यामुळें श्री-काशीप्रयाग उजाड झाली, मातबर सावकार दिल्लीस गेले. मोठमोठीं मातबर शहरें जयनगरसुद्धां लुटलीं मारलीं गेलीं. आश्विनमासीं गारा पडल्या, खरीप बुडालें; दुसऱ्यानें फाल्गुनमासीं पडल्या, रब्बी बुडाली. तमाम रयत पाटील पळतात. चवथाई वसूल या सालांत आला नाहीं.' १५ मे ( ३-१५८ ). एकंदरींत हें साल लोकांस फार वाईट गेलें ( ३.४१७ ). काशीकडील अनर्थाची अहवाल स. १७५२ त सुद्धां अशीच वर्णिलेली आहे. ( ३·५४६ ). बहुधा रोहिल्यांना मदत या सर्व युद्धांत अब्दालीची असून, पठाण म्हणून जे

उल्लेख ठिकठिकाणीं आहेत ते अब्दालीचेच होत.' रा. खं. ६. २३१, २३३, २४६–२४८ व ५५०, ४८९, ४९३, ४९६, ५७१, ५७६ वगैरे कागद वरील मोहिमेचेच आहेत.

**४. दिल्लींतील भानगडी व मराठ्यांच्या कारभाराची हेळसांड,** ( स. १७५१–५३ ).-मल्हारराव होळकरानें वजिरास मदत करण्याचें पत्करून रोहिल्यांवर मोहीम काढिली, त्या वेळीं ह्मणजे बादशहाशीं नवीन करार केला तेव्हांपासूनच, मराठ्यांकडील या नवीन उद्योगाची उभारणी किती अव्यवस्थित होती, निरनिराळ्या सरदारांत अंतर्वैमनस्यें कशीं बोकाळलीं होतीं, आणि तडे गेलेल्या मडक्या प्रमाणें हा व्यूह किती त्वरेनें कोसळून पडण्याजोगा होता, याची कल्पना खालील पत्रांतील उताऱ्यांवरून उत्कृष्ट येते. हें पत्र बापूजी महादेवानें दिल्लीहून आपल्या भावास ह्मणजे दामोदर महादेवास होळकराचे लष्करांत लिहिलेलें आहे. [ ६-५५६ ][१] 'स्वामीस लिहून पांच हजार स्वार तुह्मां समागमें ( पेशव्यांकडून ) येत असें करणें. तुह्मी ह्मणाल मल्हारबा देतील, तर त्यांजला हितोपदेशी आहेत. पठाण व मल्हारबा व सुरजमलजी व वजीर अवघे एकवट झाले, तरी पठाण झुंज घेतल्याखेरीज राहत नाहीं. हे चांडाळ चौकडी मल्हारबास मारल्याखेरीज राहत नाहीं. आधीं तर रजपूत या प्रकारचे पाठी लागले आहेत जे, दक्षणी होय ऐसा पाहिल्यास मारूनच टाकितात. बोलावून मारतात, कौल देऊन मारतात, मेजवानीस बोलावून मारतात. या प्रकारचा त्यांचा विचार. तिकडून पठाण प्राणच घेतील किंवा देतील. मल्हारबा ह्मणतात, मजला हें करणें, अथवा हरद्वारास जाऊन गोसावी होणें. त्यासी याच राज्यांत पडल्यावर ना निजामुल्मुल्कचें काम होय, ना आपला लौकिक होय. या करितां

---

१ **टीप**–या पत्राची तारीख २३ जानेवारी १७५१ आहे. कारण याच सालीं ९ रबिलाखर सोमवारीं पडतो. यांत सफदरजंग जयाप्पा व खंडेराव होळकर यांचे उल्लेख असल्यामुळें, त्यांच्या हयातींतलें हें पत्र असून, खंडेराव होळकर २४ मार्च १७५४ रोजी मरण पावला, त्यापूर्वीचा सोमवारीं येणारा ९ रबिलाखर १७५१ त येतो.

कोट कामें एकीकडे ठेवून निजामुल्मुल्कास नेऊन सुभेदारीवर बसवून अवघी दक्षिण सोडवून घेणें, यापेक्षां दुसरा विचार थोर नाहीं. हें तों कर्तव्य. परंतु मल्हारबा आम्हांसी खुनस राखितो, तरी, इतका तरी भ्रम आहे जे, आम्हांसी ( बापूजी महादेव) त्याचा ऋणानुबंध नाहीं, दादासीं ( दामोदर महादेवासीं ) तरी आहे, त्यासी तो भ्रमही जात राहिला; आणि हा पुरताच दुश्मन जाला तर संकष्ट. या दुष्टांहीं त्यास आग्रहांत पाडून मारूंच म्हणतात. त्यास श्रीमंत स्वामीचें साहित्य करणें. श्रीमंत स्वामींचा हुकूम बाविसा सुभ्यांवर आहे. त्यांत अंतर म्हट-ल्यास सुभेदारांहीं घेऊन पाडलें. फलाणीयांणीं सांभाळिलें ऐसें म्हणतील. याच गोष्टीकरितां ( आम्हीं ) सर्व श्रीमंत स्वामींचे हातीं ठेविलें. मुखत्यार होऊन आजच श्री. स्वामीशीं अटकेपासून तों श्वेतबंध रामेश्वर पर्यंत ज्यांनीं शत्रुत्व केलें, त्या सर्वांस अद्यापपर्यंत मित्रत्व तरी ठेविलें आहे. आपला स्वामी साक्षात् सीताराम अवतार आहे. श्री याजहून विशेष ऊर्जित करो. हिंदुस्थानच्या पादशहाजवळी यांचा अखतियार येथपर्यंत कीं जे चित्तास येईल त्यासीं राज्य द्या लिहिल्यावर सुभेदाऱ्या राज्य घेतात, खाविंद कांहींच न करीत, यासी काय करावें ! पेशव्यांचे खात्रीस्तव हिंदुस्थानचें राज्य बादशहानें माधोसिंगास दिलें. कछवाहांचें ( जयपुरवाल्यांचें ) घर पेशव्यांचे वडिलांहीं हिंदुस्थान संपादन दिधलें, त्या पेशव्यांशीं बिघडून रजपुतांहीं दक्षिणी मात्राशीं दुष्मन केलें. रावराजे दलेलसिंगास थोरल्या बाईनीं म्हणजे मातुश्री राधाबाईनीं सवाई जयसिंगाची कन्या मांडीवर घेऊन राज्य दिधलें, जे, माझे वंशीचा जो कोणी होईल तो तुमचे राज्याकडे पाहणार नाहीं. त्याचे पंनास हजार बाईचीं भेटी ह्मणून देत होते. त्या रजपुतांहीं मराठयांसीं चहूंकडे मारिलें. त्यासी तुम्ही आलियानें पठाणाचेंही यश येऊन, मल्हारबाची अबरू राहून खाविंद काम होऊन हेंहीं यश येतें. इकडे तर रांडा देखील मराठ्यांवर शेर जाहल्या आहेत. दिल्लींत काय फजिती लिहितां पुरवत नाहीं. अहोरात्र हे चिंता लागली आहे जे, मल्हारबा फसल्यावरी काय करावें ! त्यास वाटतें आमचे मनसबे शेवटास जाऊं नयेत. रांगड्यांत मन मानेल

बोलून आपल्या मुखत्यारपणास डाग लावितात. असो. आम्ही त्यांचीं लेकरें, वडील आहेत, विहित जाणतील तें करतील. आपण स्वामिंदाचे चाकर आहों, त्यांतील चाकरी ती करूं. तीर्थी बसून भटपणही करूं तर अशक्य नाहीं. परंतु कारण आम्हांस ये समयीं गांजिलें तें ईश्वर जाणें. पातशहास लिहितात जे, हे आमचे दुश्मन आहेत, यांसी काढा, नाहीं तरी आम्ही मरूं किंवा मारूं. तर मल्हारबा येऊन ( आमची ) वकालत करीत असतील, तर यापेक्षां काय विशेष आहे? परंतु जीवच घेऊं म्हणतात. जर श्रीमंत स्वारीस हिंदुस्थान राखणें आहे, तर नर्मदेजवळी यावें. आजी पांच हजार स्वार दिल्लींत आला तर श्रीमंत स्वामीची रक्षण आहे. दोन हजार स्वारही न आले तर स्वल्पच जाईल. येविशीं श्रीमंत स्वामीस लिहून पाठवा. ज्या रीतीनें लौकिक होईल व सयश पदरीं पडे तें करणें. जे उत्तम मसलत असेल ते करणें. हे आशीर्वाद.' या पत्रावरून मल्हाररावाचें दुटप्पी वर्तन, रजपुतांचा संताप, बाळाजी पेशव्याची इभ्रत, इत्यादि प्रकरणांसंबंधानें लेखकाचा अभिप्राय मार्मिक असून, तो पुढील घडामोडींचा सूचक आहे. पेशव्यानें स्वतः येऊन सर्व व्यवस्था केली पाहिजे होती, ती न केल्यामुळें उत्तरोत्तर विषाद वाढत जाऊन त्याचा कळस पानपतावर झाला. मल्हारराव होळकरामुळें पानपत बुडालें असा जो पुढें कैक वर्षे दृढ समज सर्वत्र प्रचलित झाला, त्याचा प्रस्ताव या वेळेपासूनच कसा होत चालला हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे.

एकंदरींत मराठशाहीचें गाडें शाहू छत्रपतीच्या पश्चात् खडकाळ सडकेवर आचलें. खुद्द पेशव्याला तर ही अटकळ थोडी बहुत होतीच. कारण रोहिल्यांवर जय मिळल्याबद्दल आभिनंदन करतांनाच, 'तुम्हीं सत्वर निघून दक्षिणेंत यावें, उगाच कामें वाढवीत पुढें पुढें जाऊं नये,' असें पेशवा तिकडील मंडळीस वारंवार लिहितो. निदान या सालीं किंवा पुढील सालीं पेशवा हिंदुस्थानांत गेला असता तर तिकडील कारस्थानांस निराळें स्वरूप आलें असतें. बुंदेले तर ही विनंति सालोसाल पेशव्यास करीत आला आहे. पेशवा उत्तरेंत मुळींच गेला नाही ही त्याची मोठी चूक होय. एकवार तो जाता तर

त्यास तिकडील प्रकार चांगले समजून आले असते. मात्र हे प्रकार तो जाणत नव्हता असें नाहीं. कारण तिकडील उद्योगाची जबाबदारी सर्वस्वी शिंदे होळकरांवर न टाकितां पेशव्यानें आतां स्वतःची फौज व दुसरे स्वतःचे सरदार तिकडे पाठविले आणि लवकरच त्यानें रघुनाथरावास या उद्योगांत सामील केलें.

सन १७५० त चौथाईचा उघड करार मराठ्यांशीं करून त्यांची मदत बादशहानें घेतली हें वर्तमान अब्दालीस समजतांच, रोहिल्यांचा पक्ष घेऊन त्यानें पंजाबावर स्वारी केली आणि मराठ्यांस त्यानें शब्द्यावर बसविलें; म्हणजे हा उपमर्द मुकाट्यानें सहन तरी करावा, नाहीं तर पंजाबपर्यंत स्वारी करून अब्दालीच्या हातून ते प्रांत परत सोडवावे, अशा थरास हे व्यवहार आले. मराठे-अब्दालीची चुरस अशा प्रकारें रंगत चालली. मात्र पुढील दोन तीन वर्षांत हें काम अंगावर घेण्यास मराठ्यांस फुरसत झाली नाहीं. वास्तविक दक्षिणेंतील अल्प कारस्थानांच्या नादीं लागून नानासाहेबानें उत्तरेंतील उद्योग बुडविला असें वाटूं लागतें. गाजीउद्दीन यास दक्षिणेंत नेऊन निजामशाहींत दुफळी करण्याचा प्रयत्न केवळ स्वार्थासाठीं पेशव्यानें अंगीकारिला. तो न करतां १७५२-५३ या सालीं पुनः जोराचा झपाटा पंजाबपर्यंत केला असता तर कदाचित् या बाजूचा उद्योग कायमचा निगेस लागला असता. परंतु स. १७५२ सालीं शिंदे होळकरांस वर्षभर दक्षिणेंत जावें लागल्यामुळें ५१ त केलेला रोहिल्यांवरचा उद्योग सर्व व्यर्थ गेला आणि रोहिल्यांस पुनः तयारी करण्यास अवकाश मिळून, स. १७५४ त रघुनाथराव तिकडे गेला तेव्हां पुनः सर्व मांडणावळ त्यास नव्यानें हातीं घ्यावी लागली.

रोहिल्यांना जिंकण्याचें काम वजिरानें पार पाडलें ही गोष्ट बादशहाला रुचली असें दिसत नाहीं. बादशहा स्वतःच्या तंत्रानें चालणारा नसून तो ज्यांच्या तंत्रानें चाले, त्यांस वजिराचें वर्चस्व मान्य नव्हतें. शिवाय कोणाहि एकाच इसमास किंवा पक्षास वरचढ होऊं न देतां, जरूरीप्रमाणें इतरांशीं संधान ठेवून बादशहा आपला बचाव करी. पठाणांच्या बाजूचे त्याचे सल्लागार त्यास दहशत घालीत, कीं सय्यदांच्या वेळेस ज्या प्रमाणें मराठ्यांच्या

मध्यंतरी पठाणांचा प्रभाव अधिक झाला, तसाच प्रकार पुनरपि होईल. याच हेतूने अब्दालीच्या स्वारीचा यत्किंचित् प्रतीकार स. १७५१ त बादशहानें केला नसावा. पुढें स. १७५२ त वजिराचें व बादशहाचें बरेंच वांकडें आलें. गाजीउद्दीनास घेऊन शिंदे होळकर दक्षिणेंत गेले असतां मागें दिल्लीत बादशहा व वजीर यांची झटापट सुरू झाली. पेशव्यांचा सरदार अंताजी माणकेश्वर आज पंचवीस वर्षें दिल्लींत वावरत होता, त्यानें दिल्लींतील स्थितीचें वर्णन ता. २८ मार्च १७५३ च्या पत्रांत पेशव्यास लिहिलें तें असें. 'सुरजमल जाठ चार महिने घरास गेला होता, त्यास वजिरांनीं मागतीं दिल्लींत आपल्यापाशीं घेऊन आले. दिल्लींतील वर्तमान तरी आज महिनाभर कमरुद्दीनखानाचा पुत्र खानखानान इंतिज्झुद्दौला व मीर शहाबुद्दीन इमादुन्मुल्क, व आणखी एक गृहस्थ तिघांनी मिळून एक विचार केला कीं, नबाब वजीर जबरदस्त जाहला. पातशहा त्याचे हुकमांत आहे, कोणाचें चालूं देत नाहीं. त्यास किल्यांत खलबतास बोलावून आणून ठिकाणीं लावावें आणि खानखानास वजारत द्यावी. इमादन्मुल्क मीर बक्षी आहेच. आपलाच कारभार सर्व असावा. या गोष्टीचा विचार कोणास व आम्हांसही तिळमात्र कळों दिल्हा नाहीं. प्रातःकाळींच बापूजी महादेवांनीं पातशहाची चिठ्ठी मात्र दाखविली कीं फौज पांच हजार घेऊन, मजला रुबरू पाहून, गणती घेणें. तयार होऊन येणें. याच समयीं बापूजी महादेवाची एक चिठ्ठी, याच कारभाराची, पातशहाची सापत्न माता मलकाजमानी तिनें धरून किल्यांतून वजिराकडे पाठविली कीं, तूं न येणें, तुजला दगा आहे. तेच समयीं वजीर पंचवीसहजार फौज व तोफखाना तयार करून आला कीं, ज्यांनीं एवढा खेळ केला त्यांस ठिकाणीं लावूं, पातशहा कैदेंत ठेवूं, दुसरा महंमदशहाचा भाऊ आहे त्यास पातशहा करूं. तेव्हां तमाम शहरांत हंगामा झाला. पातशहांनीं वारंवार सांगून पाठविलें कीं 'मोठा भरंवसा तुमचा ( अंताजीचा ) आहे, मी बाळाजी रायाचा आहें. आजी माझा जीव जतन करणें. मजला आजी जन्माची चाकरी लाखा फौजेची पावली.' तेव्हां पातशहाचें समाधान केलें कीं हजरत, आम्ही चाकर. मरून वरें म्हणूं,

आपली खातरजमा असों द्यावी. तोंवरी बापूंनीं कळों दिल्हें नव्हतें. मग बापू गळां पडिले कीं, आजी पातशहाचे व आमचे जिवाचे सोबती होणें. पातशहा जन्मवरी श्रीमंतांचा उपकारी होईल. त्यावरून मान्य करून झुंजास उभा राहिलों. त्या समयीं पातशहाचें लहान मोठे अमीर वजिरास सामील जाले. खानखानान, मीरबक्षी व आम्ही, तिघे मागें राहिलों. इतक्यांत नबाब वजिराची चिठी आली कीं सरदार शिंदे होळकर आमचे भाऊ. अंतर्वेद आम्हीं दिल्ही तेव्हां करार कीं ज्याजवरी तुमची चढाई, त्याजवरी आमची, आमची त्याजवरी तुमची. ऐसा करार आहे. तुम्ही सरदार एक असाल तरी येणें. त्याजवरून आम्ही त्रिंबकपंत सुभेदार वजिराकडे पांच स्वारांनिशीं पाठविला जे हें कांहीं आम्हांस ठाउक नाहीं. आम्हीं यमुनास्नानास आलों. ते अकस्मात् पाहिले म्हणून उभे राहिलों. तेव्हां त्यानीं आमच्या गृहस्थाची चिठीच दाखविली. वजीर म्हणों लागला कीं तुम्ही माझे अहां. बरें, समजोन घेईन. एके दिवशीं तमाम हिंदुस्थानचा अंमल उठवीन. तुम्हीं मजशीं बेइमानी केली. राजश्री पंतप्रधान व सरदार मजला बेइमान म्हणतील म्हणून चिठी दाखविली. त्याजवरून बहुतां प्रकारें वजिराचें समाधान केलें, कीं ' आजी पातशहास तुम्हीं वाईट केलें तरी तुमचे पदरीं स्वामिद्रोह पडिला. मागें सय्यदाचें नांव घ्यावयास राहिलें नाहीं व तुम्हांस बरें वाईट तरी यांची पातशहात जाईल. शत्रु अब्दाली साठ हजार फौज अटकेवरी येऊन त्याचा येलवी दिल्लींतच आहे, आणि हें काम काय करितां. ! कृपाकरून आपल्या ठिकाणास जावें.' त्यावरून वजीर आपल्या ठिकाणास गेले. पातशहा वगैरे आपआपले ठिकाणी बैसले. आम्ही ही आपल्या ठिकाणीं आलों. दुसरे दिवशीं तों फौजेची तयारी मागती सर्वांची जाली. मागती पातशहाची चिठी आली कीं ' मी खावंद आहें. माझे चाकरीस पंत प्रधान यांनीं पाठविलें तरी साफ मजपाशीं येऊन मरणें. मी आज वजिराचे दोन सुभे अयोध्या व प्रयाग आहेत ते बाळाजीरायास देतों. माझ्या कामास तुम्हीं येणें. नाहीं तर तुम्हांस वजिराकडे पाठविलें असलें तरी वजिराकडे जाणें.'

बापूचा कौल करार पातशहांचा पहिलाच होता कीं हे फौज पांच हजार तुमची आहे. तेव्हां बापूजी महादेवास सांगून पातशहाचे स्वदस्तुरचे दोन सुभ्याचे शिक्के करून घेवविले. पुढें होतां होईल तें पाहवें. वजीर मारून टाकावा तेव्हां ते सुभे खरे. असो. दुसरे दिवशीं वजिरांनीं चिठी पाठविली कीं 'माझी वजारत तुह्मी करूं चाहतां. बरें तूर्त सनद आगऱ्याची सुरजमल्लास देतों. अंतर्वेद पठाणास देतों. श्रीकाशीचा अंमल तगीर (रद्द) करितों. पुढें रजपूत आह्मीं एक होऊन जें आह्मांस घडेल तें करितों.' त्याजवरून अर्जी केली कीं या प्रसंगीं मी चाकर आहें. त्यांनीं मेळविलें आह्मीं गमाविलें, ऐसें न करणें. त्यांनीं सांगितलें, मजकडे येणें, जहागीर दहा लाख रुपयांची तुह्मांस देतों. त्याजवरून विनंती केली कीं आह्मी चाकर श्रीमंतांचे तैसे तुमचे, तैसेच पातशहाचे. सर्वांनीं आह्मांवरी कृपा करावी. तुह्मी उभयतां न भांडावें. पातशाही न बुडवावी. आह्मांस पातशहाकडेच असों द्यावें. चार दिवस आपण डेरे बाहेर देऊन राहवें. त्याजवरून त्यांनीं अर्जीमाफीक डेरे बाहेर दिल्हे. आमचीं ताकीदपत्रें अंतर्वेदीच्या अमलाचीं दिल्हीं, तीं गोपाळ गणेश बर्वे याजकडे रवाना केलीं. कामांतील फितूर तोडला. हें वर्तमान बापूस सांगितलें. बापूंनीं साफ सांगितलें जें, 'जर पांच स्वार तुमचे वजिराकडे गेले तरी पातशहा आमचा तुटतो. आह्मांस पुढें अयोध्या प्रयाग दोन सुभे घेणें. श्रीमंतांजवळ तुमचें घर बुडेल. आमचे आज्ञेप्रमाणें तुह्मीं पातशहाची चाकरी करणें. वजिराचा पैका व जहागीर लागत नाहीं.' आह्मीं बापूस सांगितलें जे, उभयतांची समजाविशी करूं. उभयतांही आह्मीं राजी केले आहेत. परंतु बापूच्या व खानखानानच्या दिलास येत नाहीं. याजमुळें नबाबही आपले डेऱ्यांत चाळीस हजार फौज जमा करितात. युद्ध होईल, दहा पांच हजार माणूस मरेल तेव्हां हे कलागत तुटेल. वजीर ही डोहणा भारी करील. कलागत कोण्या थरास जाईल पाहवें. अब्दाली अटकेवरी आहे. मीरमन्नू लाहोरीं आहे. पठाणाचा येलची आला होता तो यांचा घरकलह पाहून गेला आहे. वजीर फारच बिघडला तर अब्दालीसही आणील किंवा काय कळेना,

किंवा आम्हांकडे बिघडील पाहवें. अयोध्या व प्रयाग दोन सुभे वजिराचे आहेत. याशीं मारल्या उपरी उत्तमच आहे. पाया करून घेतला आहे. चिंता काय ! सारांश, बापूजी महादेवाचे आज्ञेनें आह्मों. काशीचा अंमल करून घेतला. अंतर्वेद, आगरें राखिलें. पुढेंही सरदार या प्रांती येत तोंवरी आपल्याकडील बंदोबस्त राखूं. वजिराचा व सरदारांचा फारसा घरोबा आहे. रात्रंदिवस त्यांचीं पत्रें यांस यांचीं त्यांस येत जात असतात. सरदारांचा व वकिलांचा फारसा मनोदय आहे कीं मागती गाजुद्दीखानाचे पुत्रास दक्षणेचा सुभा सांगावा. परंतु त्याजवळ दोन हजार फौज नाहीं. दक्षिणेची सुभेदारी स्वामीची आहे. ज्याजकडे स्वामी तोच सुभेदार. स्वामीच्या आज्ञेप्रमाणें सलावतजंगास सनद करून देववितों. आमचा जीव लहान आणि यंदांची चाकरी आम्हांवरी केवढी भारी पडली. हे चाकरी उभयतां सरदारांनीं करावी. ते सेवकानें केली. आमचा कारकून वजिराकडे जाऊन काशीचे [redacted] घेतले, आगरें अंतर्वेदीच्या ताकिदी घेतल्या आणि गोड गोष्टी सांगितल्या. याजमुळें बापू आम्हांवरी श्रमी आहेत. वरकड पातशहास सोडून जातों तरी पैका व जहागीर तयार होती. परंतु वकिलांनीं साफ सांगितलें कीं तुमचे चाकरीवरी आजी पातशहा राजी. श्रीमंतांचा लौकिक राहून दोन सुभे मिळतात, नाहीं तरी हें अपेश तुमचे माथां. त्यावरून वकिलाच्या सांगितल्यावरून पातशहाकडेच राहिलों. दिल्लींत आमची फौज पांच हजार आहे आणि स्वामीच्या फौजेचा नक्ष आहे त्याप्रमाणें दुसऱ्याचे फौजेचा नाहीं. चाकरीचा मजुरा तों जिवापेक्षां करून दाखविला. स्वामींची फौज येथें राहिली, त्यानें मोठासा लौकिक राहिला, आणि बंदोबस्त राहिला; पातशहा उपकारी जाला. आह्मीं आपले तोंडें स्तुति काय लिहावी. पातशहाच लिहितील. वकील ( हिंगणे ) आमची चाकरी लिहितील न लिहितील. आजी दिल्लींत फौज एक एक स्वार लाखाचा जाला, त्यांत मराठी फौज तरी बहुतच चहातात. पातशहापाशीं पैका नाहीं. मुलूख जो मागाल तो हजामीर देईल, याप्रमाणें राजी करून ठेविला आहे. येथें पातशहांनीं आह्मांस सप्तहजारी केलें, साहेबनौबत

मरातब दिल्हे; स्वामींनीं मात्र कृपा करून या साहेबनौबतीची आज्ञा केली पाहिजे, नाहीं तरी येथील येथें ठेवावयाची आज्ञा जाली तरी ठेवूं. पाऊण लक्ष रुपयांची तपशीलवार पुरवणी आलाहिदा लिहिली आहे. गोविंदबल्लाळा-वरील पाऊण लक्षाची सनद जरूर पाठविणें.' [भा. व. ऐ. प. या., पु. १ ले. ५०] हें विस्तृत पत्र दिल्लींतील स्थिति चक्क दाखवितें. पुढें अंताजी माणकेश्वर व हिंगणे यांचा तंटा बराच विकोपास गेला, त्याचें बीज असें कीं, अंताजी थोडासा स्वतःची प्रौढी मिरविणारा असून तो परभारें वजिराशीं वगैरे उलाढाली करूं लागला हा प्रकार हिंगण्यांस सहन जाला नाहीं. स. १७५२–५३ त शिंदे होळकर दक्षिणेंत असल्यामुळें, एकटा अंताजी पेशव्याची पांच हजार फौज घेऊन पातशहाचे संरक्षणासाठीं दिल्लीस होता. मराठ्यांचा अंमल उत्तर हिंदुस्थानांतून उठविण्याविषयीं अब्दाली कसा टपून बसला होता, याचा उल्लेख वरील पत्रांत आहे. अंताजीनें फौज वाढविली तिला आगाऊ परवानगी घेतलेली नव्हती आणि तिच्या खर्चास पैसा नसून तारांबळ उडाली होती. पेशव्यानें अंताजीचा बंदोबस्त २०·१०· १७५३ रोजीं करून दिला. [ना. रो. १·६९] अंताजी माणकेश्वराच्या कामगिरीचे उल्लेख ६.१४९, १८९, २०१ वगैरे ध्यानांत ठेवण्याजोगे आहेत.

सन १७५२ नंतर पेशव्याचा जम दक्षिणेंत चांगला बसला, तेव्हां स. १७५३ त कर्नाटकाकडे नजर टाकण्या ऐवजीं त्यानें उत्तरेंत स्वारी केली असती तर वरील भानगडींचा बंदोबस्त त्यास करतां आला असता. विशेषतः शिंदे होळकरांचें भांडण मिटविलें पाहिजे होतें (३· ४३३). 'सांप्रत जयापाचे कागद येतात, त्यांत मल्हारबाची व त्याची चित्त शुद्ध नाहीं. ओढ करून स्वतंत्र जाऊन उत्पात करावा असें दिसतें. याच प्रमाणें मल्हारबाकडील ही पत्रें येतात, त्यांतही भाव हाच आहे. जयापाचें केले शेवटास न जावें. ऐसे परस्परें विरोध व परराज्यांतील कलहांचें मूळ आजीपासूनच लागलें आहे.'[1] (१·२). 'थालनेरांत राघोबा व मल्हारजी होते. ते तेथून कूच करून

१ टीपः—हें पत्र १०·६·१७५० चें आहे, २·६·१७५० चें नव्हे.

हिंदुस्थानांत गेले. पृथ्वीपतीकडील बोलावणें आलें कीं कोटि रु. देतों, आह्मांकडे येणें. त्यास हे पृथ्वीपतीकडेच जाणार. जयाजी शिंदा पुण्यांतच होता, त्यास सांप्रत निरोप दिल्हा. कोणीकडे जाणार कळत नाहीं.' [३·४३३, ३०·९·५३ ] सारांश, वजीर बादशहांचें अत्यंत वांकडें येऊन मराठे सरदारांस ते आपापल्या पक्षांत ओढीत होते; अब्दाली व रोहिले मराठ्यांचा सूड घेण्यास टपले असून, शिंदे व होळकर, अंताजी व हिंगणे, एकमेकांशीं भांडत होते, अशा अत्यंत आणीबाणीच्या वेळीं तडजोडीनें सुव्यवस्था लावण्याचें काम एकटा नानासा०० करूं शकता; किंवा निश्चयाच्या धैर्यानें व जरबेनें एक सदाशिवराव करूं शकता. परंतु यांपैकीं एकही उत्तरेंत स्वतः गेला नाहीं; आणि अनभ्यस्त, अल्पवयी, व अनिश्चित रघुनाथरावाची तिकडे रवानगी झाली, या योगानें असलेला घोटाळा ज्यास्तच दुणावला हें पुढें व्यक्त होईल. 'यंदां आह्मांस चाकरी भारी पडली,' असें अंताजी लिहितो. ह्मणजे लहानावर मोठी जबाबदारी निष्कारण टाकली गेली. 'विजयादशमीनंतर स्वारीसाठीं बाहेर निघणें होईल. जिकडे कार्य विशेष दिसेल तिकडे श्रीकृपेनें जाणें होईल,' असें स. १७५४ च्या सेप्टेंबरांत पेशवा जयापास लिहितो. [ का. सं. प. या. ३५७ ]. ह्मणजे उत्तरेंतील कार्य त्यास महत्वाचें वाटलें नाहीं. जाग्यावर बसून लेखणीच्या जोरावर कारभार चालविण्याच्या घमेंडींत पेशवा स्वस्थ राहिला, त्याची अद्दल पुढें पानपतावर पडली[१].

---

१ टीप—ह्या वेळच्या घडामोडींसंबंधानें खालील कागद स. १७५३ ते १७५६ सालचे कालनुक्रमानें दर्शनीय आहेत.

रा. खं. ६ ले. २७४, २७५, २८२, २८५, २९१, २९७–२९९, ३०२, ३२०, ३२१, ३२४, ३२८, ३३४, ३३९, ३४१, ३४३, ३५८, ३६२, ४८५, ४८६, ५१०, ५१४, ५२१, ५२२, ५२४–५२६, ५४१, ५४३, ५४५, ५५७, ५५८.

स. खं. ३. ३९७, ३९८, ४१४, ४३२, ४३३, १४१, १४०, ४४६, ४५२, ४५४, १५१, १५२, १३७, १५६.

का. सं. प. या. ले. ३२, ३७६, ३८०, ३१, ३९३, ३३८, ३८२, ३५२, ३५१, ३८६ व ४५१.

५. **बादशहावजिरांचें युद्ध ( मे, जून १७५३ ).**-रोहिल्यांचा पाडाव करण्यांत आरंभीं जरी बादशहा व सफदरजंग वजीर यांचा एक विचार होता, तरी मराठ्यांच्या मदतीनें वजीर वरचढ झाला असा संशय बादशहास येऊं लागला. सफदरजंग रोहिल्यांवर गेला असतां मागें बादशहाची आई ऊधमबाई व खोजा जावेद यांनीं वजिराचा अधिकार काढून घेण्याचा प्रयत्न चालविला. त्या दोघांचें अंतःसख्य असून, त्यांच्या दुष्कृत्यांची चर्चा राजधानींत उघड होत असे. बादशहा सर्वस्वी त्यांचे तंत्रानें वागून त्यानें खोजास मोठ्या पदव्या वगैरे देऊन योग्यतेस चढविलें. या कारणानें सफदरजंग दिल्लीस आल्यावर त्याचें व बादशहाचें उघड वैर जुंपलें. त्यांत बादशहास मदत मीरशहाबुद्दीनची होती. हा मीरशहाबुद्दीन थोरल्या गाजीउद्दीनचा मुलगा व निजामुल्मुल्काचा नातू १७-१८ वर्षांचा दिल्लींत मीरबक्षीच्या कामावर होता. त्याजवर प्रथम सफ्दरजंगाचें पुत्रवत् प्रेम होतें. गाजीउद्दीनचा दक्षिणेंत खून झाला ही बातमी दिल्लीस येतांच सफदरजंगानें बादशहाकडून मीरशहाबुद्दीनास बापाच्या जागीं कायम करून त्यास गाजीउद्दीनखान अमीरुल्उमरा इमादउन्मुल्क असे किताब दिले. मयत गाजीउद्दीनचें प्रेत दिल्लीस आणण्यांत आलें, त्याबरोबर जड जवाहीर वगैरे एक कोटीची संपत्ति परत आली, ती शहाबुद्दीन यास मिळाल्यानें त्याचें सामर्थ्य वाढलें.

बादशहा सर्वस्वी खोजा जावेद व ऊधमबाई यांचे तंत्रानें वागत असल्यामुळें सफदरजंगानें खोजास मेजवानीस आणून कपटानें ठार मारिलें, (जुलई १७५२). त्यामुळें बादशहाचें व सफदरजंगाचें जोराचें वांकडे आलें. तेव्हां जाठाची मदत आणून बादशहाशीं लढण्याची त्यानें तयारी केली. माजी वजीर कमरुद्दीनखान यास दोन मुलगे होते, एक मीर मन्नू लाहोरच्या कारभारावर होता; व दुसरा इंतिजामुद्दौला खानखानान म्हणून होता, त्यास बादशहानें जवळ आणून कारभार चालविला. तेव्हां सफदरजंगानें वजिरी सोडून आपल्या अयोध्येच्या सुभ्यावर जाण्यास रजा मागितली, व ती बादशहानें आनंदानें दिली. या खबरदींत मीरशहाबुद्दीन बादशहाचे बाजूस होता, त्यामुळें अर्थात्

त्याचेंही सफदरजंगाशीं वांकडें आलें. सफदरजंग दिल्लींतून निघून जाईना, आणि बादशहास पदच्युत करून दुसरा इसम तख्तावर स्थापण्याचा विचार करूं लागला. तेव्हां उभयतांचें उघड युद्ध जुंपलें. १०·५·१७५३ पासून हें युद्ध कांहीं महिने थोडें बहुत चाललें. बादशहाचे बोलावण्यावरून नजीबखान रोहिलाही फौज घेऊन ३ जून रोजीं दिल्लीस येऊन पोंचला. पंजाबांतून मीर-मन्नूनें पांच हजार फौज पाठविली. ६ जून रोजीं बादशहा व वजीर यांची दिल्लींत लढाई झाली, पण निकाल असा लागला नाहीं. पुढें माधवसिंगाच्या मध्यस्थीनें तडजोड होऊन युद्ध थांबलें; आणि खानखानान व मीरशहाबुद्दीन यांनीं राजधानींत कांहीं दिवस शांतता केली.

या युद्धांत दोनही पक्ष मराठ्यांस आपापल्या बाजूस वळवीत होते. शिंदे होळकर दक्षिणेंत असून अंताजी माणकेश्वर दिल्लींत होता, त्याची चलबिचल झाली. तो हिंगण्यास लिहितो. ' सरदारांनीं आम्हांस पातशहाचे चाकरीस पाठविलें. फौज अडीच हजार. आम्ही ग्वाल्हेर प्रांतास आलों, तेव्हां तुमचीं पत्रें दोन चार आलीं कीं नवाब वजिरानें नवाब बहादर ( जावेद ) मारिला. पुढें पातशहाशीं दगाबाजी करणार, याजकरितां पातशहांनीं बोलवून सांगितलें कीं तुमची फौज पांच हजार सत्वर बोलावणें. कराराप्रमाणें पांच हजार फौजेनिशीं आपले सरदार चाकरीस बोलावणें. उणी फौज आली तरी कार्यास येणार नाहीं. करारांत अंतर नसावें. [ २१·३·१७५३ खं ६·२७४. ] अंताजी जवळ फक्त अडीच हजार फौज होती, त्यास आणखी अडीच हजार ठेवावी लागली. तिच्या खर्चास वेळेवर मिळाले नाहीं त्यावरून हिंगण्यांचा व त्याचा तंटा माजला. ' हरएक विशीं तुम्हां आम्हांत या उपरी प्रतरणा कामाची नाहीं. जें तुमचे बरें तें आमचें व आमचें तें तुमचे बरें. पेशव्यांकडून रकम आणून तुमचें कर्ज फेडूं ' असें अंताजीनें लिहून दिल्यावर हिंगण्यांनी त्यास कांहीं रकम दिली ( ६·२७५ ). पुनः अंताजीपंत स. १७५३ च्या एप्रिलांत लिहितो, ' आम्हांस नवाब वजिरानें दहा लाख रुपये देऊन आपणा-कडेस घेऊन जावयासी करार केलें. तुम्हीं साफ सांगितलें जे दहा लाख कामाचे

ाहींत, त्यांत श्रीमंतांचें नुकसान आहे. तरी त्याचा पैका टाकून पातशहाचे ाकरीस आमचे आज्ञेप्रमाणें एकनिष्ठ राहणें. त्यावरून आपण मान्य केलें. मतःपर वजीर आह्मांस पंचवीस लाख रुपये देईल तरी त्याजकडे जाणार नाहीं. ुह्मी पातशहाची एकनिष्ठ चाकरी सांगाल त्याप्रमाणें करूं.' अंताजी व हिंगणे यांचें वांकडे येण्याचें हें दुसरें कारण आहे. वजिराकडून लालूच घेऊन तो यास मिळण्याचे खटपटींत होता, व हिंगणे त्यास विरोध करीत होता. स्वार्थ साधेल तिकडे फुटण्याचा लहान मोठे मराठे सरदारांचा हा स्वभावच होय.

दिल्लीतील हे प्रकार पेशव्यास कळून त्यानें शिंदे होळकरांस तावडतोब तिकडे जाण्याविषयीं सांगितलें. परंतु त्यांच्यांत वैमनस्य असल्यामुळें ते लवकर निघाले नाहींत. ता. १३ जुलई १७५३ रोजीं होळकर 'आमची हिंदुस्थानास जावयाची त्वरा आहे' असें लिहितो (६.२८५) इकडे हिंगणे व अंताजीपंत यांचा बेबनाव वाढतच गेला [६.५१०, ४८६]. हिंगणे पुनः लिहितो, 'पातशहाचे मातुश्रीनें खानखानानचे विद्यमानें सलुखाचा डौल केलाच होता. त्या उपरी मीरबक्षीनें (मीर शहाबुद्दीन) खानखानास खरें करून आपले लगामीं लाविलें व सलूख करूं लागले. सफदरजंगास सुभे अयोध्येचा खिलत पोंचला. पादशहा तों शपथ वाहतात कीं आह्मीं पाठविला नाहीं. उदईक सफदरजंग कूच करून सुभ्याकडे जाणार ह्मणून वार्ता आहे. पातशहाचे मातुश्रीनें मीरबक्षीसर्वे रोहिल्यांशीं आह्मांकडून लढाईचे पक्षयावर आणून गुप्तरूपें खानखानाचे हवाला खिलत सुभ्याचा केलासा वाटतो. आह्मी लढाई करावयाचाच उद्योग करवितों. सफदरजंग मित्रभंग करून पळून जाणारसें वाटतें. सुरजमल रोहिल्यांचें पायदळ ठेवीत आहे. आपली भारी फौज सत्वर येती तर उत्तम होतें. लढाई आठ महिने थांबविली. कोठवर बुद्धिबळ चालेल.' (४.१०.१७५३, ६.५१४) 'पातशहा आह्मांस संशय येऊन ह्मणूं लागले कीं, जर तुह्मी आह्मांकडून लढाई करवितां, जर तुमचे खाविंद येऊन सलूख करवितील अथवा रुपये मागतील, तेव्हां आह्मी कोठून रुपये आणावे. यास्तव तुह्मी साफ आह्मांस लिहून द्या कीं श्री.

रघुनाथराव आल्यावर सलूख करणार नाहींत; व सख्य करणार नाहींत. मीर शहाबुद्दीनशीं सामील होऊन सफदरजंगास व जाठांस मारावें. नाहीं तर आम्ही आपल्याकडून वजिराची तकशीर माफ करून जाठासही वाटे लावूं, मुलूख सर्व तुम्हीं घेतला. आतां हा किल्ला येऊन मागाल तेव्हां आम्हीं काय करावें!' (६·५२१).[1] सप्टेंबर ता. २३ स. १७५३ च्या पत्रांत खालील मजकूर आहे. 'होळकर राघोबादादांबरोबर हिंदुस्थानास कूच करून गेले, मनसूरअलीखानाशीं व पातशहाशीं युद्ध लागलें आहे. यांस पातशहानें करोड रुपये देऊं करून मदतीस बोलाविलें व मनसूरअलीखानांहीं करोड रुपये देऊं करून बोलाविलें. त्यास पातशहाकडेच जातात. जयाजी शिंदे चांभारगोंद्यांत आहेत. सांप्रत वदंता शहरांत उठली कीं होळकरास दोन घाव लागले आहेत. कोणा पाटलाची बायको लेकानें घरांत घातली, म्हणोन त्यानें मारलें, असें बोलतात.' [३·४३२ व ३३३] 'अंताजीपंतीं अकबर-महंमुदाशीं व पातशहाशीं कलह लावून गेले. सांप्रत लढाई मोठी जाली.' [६·५४१] 'आम्हांस मीरबक्षी बोलावतो, जावें, परंतु कांहींच चव व जीव राहिला नाहीं. एकमूठ असतें (एक जुटीनें वागते) तर आपले हातीं कबज राहता. पूर्वी अंताजीपंतासाठीं अडीच तीन लाख रुपये कर्ज घेतलें, त्याजबद्दल काय आज्ञा ते घेऊन त्याचे नांवें पत्र पाठवावें. श्री. नानासाहेबीं साडेचार लाख रुपये अंताजी माणकेश्वरास द्यावयाची वरात पाठविली आहे, ती कशी आदा करावी?' खोजीम कुलीखानानें प्रस्तुत मोठा जुलूम शहरचे लोकांवर मांडला आहे. कितेक साहुकार शहरांतून गेले. दुष्टबुद्धि व हिंदूंचा द्वेष्टा आहे. आतांपासूनच याचा पाय दृढ न होई तो प्रसंग ध्यानांत असों द्यावा.' 'ऐसें न होय कीं नबाब वजीर अंताजीपंतांसीं बोलावून नेत. अगोदर आलेच नसते तर बरें होतें. आतां उठून गेले तर फौजेचा भ्रम उठतो.' [६·५२४ व ५२६]. 'नुसते कागद काळे करून नबाबानें दिल्हे आहेत. परंतु रुपये वसूल होणें कठीण आहे. आपली फौज पांच सात हजार या प्रांतीं आलिया-

[1] टीपः—ले. २९७ व २९८ स. १७५४ मेचे याच प्रकारचे आहेत.

खेरीज येथील वसूल होणें संकट आहे. आपल्या फौजेची दहशत या लोकांस आहे. जमीनदारांनीं आह्मांस रुपये द्यावे कीं नबाबास द्यावेत ? त्यांस जमीनदार दोनही गोष्टी करीत नाहींत, नबाबासही पैसा पाठवीत नाहींत आणि आह्मांसही पैसा देत नाहींत. धातुपोषणाच्या गोष्टी सांगत आहेत.' [ ६·५२१ ].

शिंदे होळकरांची इभ्रत व दहशत दिल्लीचे दरबारांत अतिशय होती. 'पातशहास सर्व प्रकारें आपल्याकडे मुतवजे जाणून, उभयतां सुभेदारांहीं च्यार दिवस वकील मुतलक करून, पठाणास आश्रेंत ठिवून, नबाबास सुभ्यास पोहोंचवावा. मग चार रुपये अधिक मिळवोत अगर कमी मिळवोत. आपला बोल वर राहून रसायनसें दिसेल. वजीर बुडाल्यावर कोण्ही तरी बरें ह्मणणार आहे! मित्रमित्र ह्मणून काम करून घ्यावें, कोठें न झुंजतां हिकमतीनेंच एक्या कामाचें, विना जोखीम, यश घेऊन, बाविसा सुभ्यांत हुकम करून दक्षिण हिंदुस्थान आपली करा; आणखी चौ दिवसां, गुंतेस कां, कुंथेस कां, ऐसें होईल. अयोध्येकडे गेल्यावर सफदरजंग लाखा स्वारांचा सरदार आहे.' [ ६·२९१ ]. या भानगडी मिटविण्यासाठीं रघुनाथरावाची रवानगी झाली.

---

# प्रकरण सत्ताविसावें.

## मराठ्यांचा बादशाहींत शिरकाव.

१. रघुनाथरावाची पहिली स्वारी. २. बादशहाची पदच्युति, शिंदेहोळकरांचा बेबनाव.
३. ग्वाल्हेर गोहदचा पाडाव.
४. हिंगण्यांचा रुसवा. ५. नागोरचा वेढा, जयाप्पाचा खून.
६. गोविंदपंत बुंदेल्याचा कारभार.

**१. रघुनाथरावाची उत्तरेंत पहिली स्वारी,** ( ३०·८·१७५३–१५·८·५५ ). रघुनाथरावाच्या या स्वारीचा उपक्रम करितांना भाउसा॰ची बखर लिहिणारा म्हणतो. 'बाळाजी प्रधान बीजेच्या चंद्राप्रमाणें चढते कळेनें

प्रेम होतें. स. १७५५ त बदनसिंग मरण पावून सुरजमल्ल गादीवर बसला. वीस वर्षे पावेतों हिंदुस्थानांतील घडामोडी व कारस्थानें सुरजमल्लास चांगली ठाऊक होतीं. जयपुरच्या ईश्वरसिंगास सुरजमल्लाचें साह्य होतें, आणि शिंदे-होळकरांनीं स. १७४९ त जयपुरावर चाल करून माधवसिंगास गादीवर बसविलें, तेव्हां अप्रत्यक्ष रीतीनें मराठ्यांस जाठांशीं लढण्याचा प्रसंग आला. मराठे चौथाई वसूल करूं लागले, त्यामुळेंही जाठांस वैषम्य वाटूं लागलें. रोहिल्यांशीं लढण्यांत सुरजमल्लाची मदत सफदरजंगास होती. पुढें बादशहा व सफदरजंग यांचें दिल्लींत स. १७५३ च्या मे पासून जें निकराचें युद्ध सहा महिनेपावेतों चाललें, त्यांत वजिरानें आपल्या मदतीस सुरजमल्ल जाठास आणिलें. जाठानें दिल्लीस वेढा घालून कांहीं काळ पावेतों बादसहास त्राहि त्राहि करून सोडिलें. अंताजीपंतही वजिरास मिळण्याचे बेतांत होता. परंतु त्यास हिंगण्यांनीं कसेंबसें थांबवून धरिलें. सहा महिनें झगडून कांहीं लभ्यांश नाहीं असें पाहून वजीर लखनौस आपल्या सुभ्यावर निघून गेला. इतउत्तर दिल्लीच्या भानगडींत लक्ष न देतां तो वस्तुतः लखनौस स्वतंत्र राज्य समजून वागूं लागला. इकडे सुरजमल्ल जाठही भरतपुरास परत आला, तेव्हां जाठाची प्रथम खोड मोडणें हें बादशहाचें व मीरशहाबुद्दीनचें निकडीचें काम होऊन, त्यासाठीं पूर्वीच्या कराराप्रमाणें मदतीस फौज पाठविण्याविषयीं बादशहाची लिहिणीं पेशव्यास सारखीं येत होतीं. तेव्हां रघुनाथराव व सरदार मोठ्या फौजांसह विजयादशमीस निघून प्रथम जाठांवर चालून आले. त्यांच्या मदतीस दिल्लीहून बादशहानें आपला तोफखाना वगैरे पाठविला. मराठ्यांच्या फौजा केव्हांही स्वारीत आल्या म्हणजे खंडण्या वसूल करीत येत. डिसेंबरांत रघुनाथराव माळव्यांत उतरला. 'माधवसिंग जयनगरास आले. सरकारची फौज जयनगरासमीप आठ दहा कोशांचे अंतरानें आहे.' [ ५·१·१७५४, १·२० ]. प्रथम रघुनाथराव, खंडेराव होळकर व दत्ताजी शिंदे यांसह अजमीर प्रांतांत गेला. तेथें रजपुतान्यांतील खंडणी वसूल करून ते सर्व कुंभेरीस जानेवारी १७५४ त आले. जाठ खंडणी भरपूर देईना, कुंभेरीच्या किल्ल्यांत राहून लढूं

लागला, त्याजला नरम करण्याविषयीं मीरशहाबुद्दीनचीही निकड होती. सबब रघुनाथरावानें कुंभेरीस वेढा घालून जाठांशीं युद्ध चालविलें. हें युद्ध जानेवारी-मासून १७ मेपावेतों चार महिने चाललें (१·३५). भाऊसाहेबांचा बखरकार ह्मणतो, (पृ. ५), 'ढोलपुरपावेतों खंडण्या घेत मराठ्यांच्या फौजा आल्याबर जाठांचा मुलूख लागला, तेव्हां सुरजमल्लाचा कारभारी रूपराम कटारे (कोठारे) चौधरी येऊन भेटला. कोड रुपये खंडणी दादासाहेब मागूं लागले. वकील चाळीस लक्षपर्यंत देण्यास कबूल झाला. तें न ऐकतां कुंभेरीच्या रोखें चालिले. सुरजमल्ल फौजबळें, द्रव्यबळें चांगला सामर्थ्यवान होता. भरतपूर, दीग, रामगड व कळवण-दुर्ग हे असाध्य, यांचा बंदोबस्त करून आपण कुंभेरींत बळ बांधोन राहिला; आणि दादासाहेबांकडे पांच गोळ्या व दारू पाठवून कळविलें कीं, चाळीस लक्ष रुपये देतों ते घेण्यांत यावे, नाहीं तर युद्धास उभें राहवें. दादांनीं विषाद वाढून कुंभेरीस मोर्चे लाविले. परस्परें मार होऊं लागला. रेतीचे रानामुळें सुरुंगास यत्न नाहीं. मोहरा इरेस पडला, आंतून कोणी सल्लयास येईना. असा दीड महिना झाला. एके दिवशीं खंडेराव होळकर (अहल्याबाईचा नवरा) केवळ बेहोष होता, तो भोजन करून मोर्चांत निशाणापीशीं आला, तों एकाएकीं जे-जालेची गोळी लागून मोर्चांत ठार झाला.' खंडेराव होळकराचा जन्म स. १७२३ च्या दसऱ्याचा असून यावेळीं तो ३० वर्षांचा होता. [ देवी अहल्याबाई, पुरुषोत्तमकृत ]. एकुलता एक मुलगा गेलेला पाहून मल्हाररावाचें देहभान सुटलें. लहानथोरांनीं येऊन समाधान केलें. उत्तरक्रियेकरितां रघुनाथरावानें दहा हजार रुपये लगेच दिले. तेरा दिवस कृत्य होऊन दानधर्मही चांगलाच झाला. मल्हाररावानें त्वेषानें प्रतिज्ञा केली कीं, 'सुरजमल्लाचा शिरच्छेद करीन व कुंभेरीची माती यमुनेंत टाकीन तरीच जन्मास आल्याचें सार्थक. नाहीं तर प्राण-त्याग करीन.' हें वर्तमान जाठास समजतांच घाबरा झाला. तीन महिने झाले, सर्व सरंजाम संपत आला. सबब रूपराम वकील व ज्येष्ठ स्त्री अनसूया यांस बोलावून मसलत विचारली. अनसूयेनें सुचविलें, जयाजी शिंद्याचेमार्फत यत्न करावा.

इकडे मीरशहाबुद्दीननें दिल्लीहून येऊन ३ मार्च रोजीं मल्हाररावाची भेट

घेऊन भरतपुरास वेढा दिला. तेव्हां दिल्लीस बादशहा व वजीर खानखानान यांनीं मीरशहाबुद्दीनचे विरुद्ध खटपट चालवून आंतून जाठाशीं पत्रव्यहार सुरू केला. हें मीरशहाबुद्दिनास कळतांच त्यानें दिल्लीचे सभोंवार लुटालूट आरंभिली. तेव्हां जाठास मदत करण्याकरितां स्वतः बादशहा फौज घेऊन येऊं लागला. परंतु त्या फौजेवर मल्हाररावानें छापा घालून तिचा फडशा उडविला. या छाप्यांत मराठी फौजेनें स्त्रियांचीही फार अब्रू घेतली, हें जयाप्पास न आवडून त्यानें लुटींत भाग घेतला नाहीं [ नातूकृत महादजी शिंदे पृ. २९ ].

सुरजमल्लानें रूपराम कटारी याचा पुत्र तेजराम यास जयाजी शिंद्याकडे पाठवून कोणत्याही प्रकारें आपला बचाव करण्याविषयीं विनंति केली, तेव्हां जयाप्पानें जाठास मदत करण्याचें वचन दिलें. हा प्रकार मल्हाररावास कळल्यावर त्याचें व जयाप्पाचें पूर्वी बनत नव्हतेंच, त्यांत आतां भयंकर वितुष्ट पडलें. अशा स्थितींत रघुनाथरावानें चार मंडळी एकत्र जमवून सल्ला घेतला. सखाराम भगवंत बोकिल हा गृहस्थ पुरंदरचा राहणारा बरेच वर्षांपासून पेशव्याजवळ काम करून हुशार म्हणून नांवाजलेला, या वेळीं मुद्दाम पेशव्यानें रघुनाथरावाबरोबर दिला होता. त्यानें निक्षून सांगितलें, 'शिंद्यांकडून सरकारच्या अहिताची गोष्ट कदापि होणार नाहीं. तेव्हां शिंद्यांचे मार्फत तूर्त साधेल तसा तह करून घ्यावा, याशिवाय दुसरा मार्ग नाहीं.' म्हणोन तोच मनसबा निश्चयांत आणिला. जयाप्पानें कचेरीस येऊन कळविलें, कीं आजचे समयीं खंडणी घेऊन पुढें मसलत फत्ते करावी. पदरीं फौज भारी, एक जागां राहिल्यास निभावणी कठीण.' तेव्हां विचाराखालीं कित्येक दिवस गेले. इतक्यांत मारवाडच्या गादीविषयीं तंटा लागून रामसिंगाचे वकील मदत मागण्यास जयाप्पा शिंद्याकडे आले. तेव्हां शिंद्यानें रघुनाथरावास कळविलें, 'सर्वांनीं एक जागां राहून मसलत बुडवावी हें ठीक नाहीं. पदरीं फौज भारी यांस काय खावें! सबब आम्हीं मारवाड प्रांतीं निघोन जातों.' असें सांगून नगारे वाजवून, मोर्चे उठवून गोटांत आणिले. हें पाहून होळकरास अति चीड आली. परंतु नाइलाजास्तव तो जाठाशीं सलूख करण्यास कबूल झाला. तेव्हां

जयाप्पाचे मार्फत जाठानें साठ लक्ष खंडणी भरून तह केला. ता. १७ मे १७५४ रोजीं तह पुरा होऊन मराठ्यांनीं दुसरे उद्योग हातीं घेतले. जाठाचा पाडाव केल्याचें वर्तमान रघुनाथरावानें सफ्दरजंगास मोठ्या डौलानें कळविलें ( १·३५ ). रूपरामानें खंडणी भरून तह घडवून आणिल्याबद्दल त्यास दर शेंकडा २ रु. देत जाण्याचा करार १७·२·१७५५ रोजीं पेशव्यानें केला. ( ना. रो. १·२२५ ).

**२. बादशहाची पदच्युति, शिंदेहोळकरांचा बेबनाव.**—शिंदे-होळकरांचें भांडण कैकवर्षें धुमसत होतें, त्याचा आतां उघड वैरभाव बनला. या दोन आधारस्तंभांचें वैर हें नुसतें पानपतच्या अरिष्टाचें नव्हे तर एकंदर मराठशाहीच्या नाशाचेंच आद्य कारण आहे. या वितुष्टाचा पूर्व रंग मागें दाखविलाच आहे. [ म. वि. पृ. २ ७१ ]. कुंभेरीपुढें तमाम फौजा, कांहीं एक प्राप्ति न करतां, होळकराचे हट्टास्तव, चार महिने घोळ घालून बसल्या, त्यांतून प्रत्यक्ष बादशहा मनांतून जाठासच अनकुळ, हा प्रकार जयापास पटला नाहीं. त्यानें जाठास शरण आणवून प्रकरण मिटविलें ही गोष्ट होळकरास आवडली नाहीं. त्यांत प्रतिज्ञाभंग झाल्याचें होळकरास दुःख झालें. होळकरास मीरशहाबुद्दीन पाहिजे तसा वळवीत असून, मूळ कराराच्या विरुद्ध मराठ्यांचें वर्तन होतें, हा प्रकारही शिंद्यास रुचत नव्हता. अशा अडचणींत कांहीं तरी तडजोडीचा मार्ग काढून, राज्यकार्य साधण्याचें कौशल्य रघुनाथरावांत नसल्या-मुळें, दोघांचे दोन मार्ग झाले. जयापानें मुख्य उद्योगांतून आपलें अंग काढून मारवाडची कामगिरी अंगावर घेतली. रघुनाथरावास पेशव्यानें दोन कामें सांगितलीं होतीं, १ काशी प्रयाग वगैरे तीर्थस्थानें मुसलमानांच्या हातून सोडवावयाचीं, आणि २ अंतर्वेदींत रोहिल्यांपासून जिंकलेल्या प्रदेशांत सुरळीत अंमल चालू करावयाचा. जयापा शिंदे फुटून गेल्यामुळें हीं दोनही कामें अपूर्ण राहिलीं. या वेळीं अंतर्वेदीचा बंदोबस्त झाला असता तर रोहिले मराठ्यांस भारी झाले नसते आणि पानपतचा प्रसंग आला नसता. रघुनाथरावाच्या पहिल्या बायकोचे भाऊ गोपाळराव व कृष्णराव गणेश बर्वे अंतर्वेदीच्या बंदो-बस्तास असून, त्यांचे हाताखालीं बाबूराव महादेव दातार होता. गोपाळराव

बर्वे पानपतानंतरही कैक वर्षे त्याच बाजूस होता ( का. सं. प. या. २९, ३०, ५०, ४५१ ). अंतर्वेदींत सफदरजंगानें मराठ्यांचा जम बसूं दिला नाहीं. बादशहाशीं झगडण्यांत मराठ्यांनीं आपणास मदत केली नाहीं म्हणून त्याचा मराठ्यांवरचा विश्वास उडाला, आणि इतउत्तर तो व त्याचा मुलगा सुजाउद्दौवला हे कधीं त्यांजवर विश्वास ठेवून वागले नाहींत. आपली वजिरी जाण्यास मराठे कारण झाले असें त्यांस नेहमीं वाटे. काशींतही बाबूराव महादेवास सफदरजंगानें पुष्कळ त्रास दिला. क्षेत्रें सोडविण्याचें काम जयाप्पानें अंगावर घेतलें होतें. परंतु बर्वे व दातार त्या कामीं मदत मागूं लागले तेव्हां मारवाडांत अडकून पडल्यामुळें, हीं तीर्थें सोडविण्याचें काम तसेंच राहिलें. ' श्री. दादासाहेबांनीं लिहिल्याप्रमाणें वर्तणूक करणें. सत्वरींच मारवाड प्रांतींचें काम विल्हेस लावून तुम्हांकडे अंतर्वेदींतून अविलंबेंच येतों. जे जे मवासी करीत आहेत त्यांचें पारिपत्य यथायुक्त करून श्रीक्षेत्रास अंमल खुलासा करणें, हे गोष्ट चित्तांत फारशी आहे.' 'दादास्वामींस लिहिणें म्ह० ताकीदपत्रें पाठवितील. येथून पत्रें पाठविलियानें काय होणें. जेव्हां त्या प्रांतें फौज येईल, तेव्हां सारेंच उत्तम होईल.' ( १. ३१, ३२, ३७, ३९, ४३. ४४.) असा हा जयाप्पाचा पत्रव्यवहार रामाजी अनंताचे हातचा आहे.

मराठ्यांच्या प्रचंड फौजा उत्तरेंत आणण्याचें मुख्य काम मीरशहाबुद्दीननेंच केलें होतें. बिचारा बादशहा नामधारी होता. दिल्लीच्या शेजारीं या फौजा मोठ्या तयारीनें आलेल्या पाहून रजपूत, जाठ वगैरे सर्व भयभीत झाले. जाठानें अंतस्थ संधान लावून बादशहास या अरिष्टाची कल्पना आणून दिली. मीरशहाबुद्दीन जेव्हां बादशाही तोफखाना घेऊन दीग, भरतपुर वगैरे किल्ल्यांस वेढे देऊन बसला, तेव्हां बादशहास पस्तावा होऊन त्यानें सफदरजंगास पुनः परत बोलाविलें. मराठ्यांना घरांत आणून हा मीर बादशाही बुडविणार अशी दरबारांत भावना झाली. रजपूत राजांनीं सुद्धां अशाच तक्रारी बादशहाकडे आणिल्या. जयपुरचा माधवसिंग व जोधपुरचा रामसिंग आणि सुरजमल जाठ हे या पक्षांत सामील झाले. खुद्द बादशहा वजीर खानखानास

घेऊन, मीरशहाबुद्दीनचे मदतीचे मिषानें, पण वस्तुतः त्याचे विरुद्ध, सिकंदऱ्यापर्यंत चालून आला. आजूबाजूचे लोक त्यांस येऊन मिळूं लागले. मीरशहाबुद्दीन व मल्हारराव होळकर, वरील वातमी समजतांच ५० हजार फौज घेऊन दिल्लीवर चालले. हे आतां दुसरा इसम बादशाही तख्तावर बसविणार अशी बातमी बादशहास पोंचते, तोंच त्यांचे गोळे बादशाही छावणीवर पडूं लागले. तेव्हां बादशहा घाबरून साहिबा जमानीसह घाईघाईनें दिल्लीकडे परतला. बादशहाचेंच पत्र मीरशहाबुद्दीनच्या हातांत पडलें, तेव्हां त्यास बादशहाचें सर्व कपट कळून आलें; आणि लगेच मीर व होळकर बादशहाच्या पाठलाग करीत दिल्लींत घुसले. बादशहाचा तोफखाना व सामान मराठ्यांच्या हातांत पडलें. मलिका अज्जमानी व साहिबा महाल व इतर बायका यांस होळकरानें पकडिलें. [ एल्यट ८. पृ. १४२ ]. बादशहाची फौज मागें राहिली होती, तिला मीरशहाबुद्दीननें आश्वासन देऊन आपल्याकडे वळविलें, आणि मलिका अज्जमानीची भेट घेऊन तिचें सांत्वन केलें. तिच्या बरोबर मल्हारराव व मीरशहाबुद्दीन कांहीं वेळपर्यंत पायीं चालत गेले. हे प्रकार मे महिन्याचे आरंभीं घडत असतां, पश्चात् जयाप्पा व सखारामपंत बोकील यांचे सल्ल्यानें रघुनाथरावानें जाठाशीं तह करून कुंभेरीचा वेढा उठविला. दिल्लींतील भानगडींचें कांहीं वृत्त ६·४७३, मे १७५४ च्या पत्रांत आहे.

**मलिका अज्जमानी** ऊर्फ बादशहाबेगम ही मोठी कारस्थानीं बाई दक्षिणेंतील ताराबाईप्रमाणेंच मोगल बादशाहींत सुप्रसिद्ध होती. ती फर्रुखसेयरची मुलगी व महंमदशहाची बायको, स. १७८८ पावेतों जिवंत असून, स. १७८७ त गुलाम कादरानें शहाआलमचे हाल केले त्यांत ती सामील होती. बादशहाची आई ऊधमबाई ही दुर्वृत्त असून मूळची नायकीण होती. तिच्या केवळ अर्ध्या वचनांत अहंमदशहा राहत असल्यामुळें, तिला दूर करावें असें मलिका अज्जमानीच्या मनांत बरेच दिवस होतें, आणि तिनेंच पुढें बादशहासही तख्तावरून काढण्यास मीरशहाबुद्दीनास मदत केली. होळकर व शहाबुद्दीन यांच्या फौजांनीं बादशहास दिल्लींत कोंडिलें. वजीर खानखानान

बादशहास सोडून गेला, तेव्हां बादशहानें मीरशहाबुद्दीनची समजूत करण्याकरितां दरवाजे उघडून त्यास आंत घेतलें. मीरनें वाड्यांत मोठा दरबार भरवून खालील भाषण केलें. ' बादशहास राज्य करण्याचें चातुर्य नाहीं. त्याच्या हातून मराठ्यांचा बंदोबस्त होत नाहीं. मित्रांशीं त्यानें विश्वासघात केला आहे. तर याला पदच्युत करून तयमूरचा दुसरा लायक वंशज तख्तावर स्थापणें हेंच योग्य आहे. ' हा बेत एकदम अमलांत आला. बादशहा व ऊधमबाई यांचे डोळे काढून त्यांस त्यानें कैदेंत टाकिलें, आणि जहांदरशहाचा मुलगा अजीजुद्दीन[१] यास आलमगीर असें नांव देऊन तख्तावर बसविलें ( ३ जून १७५४ ). याच वेळीं खानखानानची वजिरी जाऊन ती मीरशहाबुद्दीन यास मिळाली. [ मु. रि. पृ. ८४७ ]. या सर्व कृत्यांत होळकराची फौज सारखी मीरशहाबुद्दीन बरोबर होती. बादशहाचें संरक्षण करण्याऐवजीं मराठे त्यास काढून टाकतात ,हा प्रकार सर्व मुसलमानांस अत्यंत नीड येण्याजोगा झाला आणि मराठ्यांची इभ्रत नाहींशी होऊन त्यांजविरुद्ध मुसलमानांचें कारस्थान वाढत गेलें. नवीन बादशहाचें वय या वेळीं ५५ वर्षांचें असून, त्यास पांच मुलगे होते. वडील मुलगा अलीगौहर हाच शहा आलम होय. मलका अज्जमानीला होळकरानें पकडिलें, तेव्हां तिचें सर्व जडजवाहीर त्यानें हस्तगत केलें. होळकरास या मदतीबद्दल ४० लाखांची रकम ठरली असून, त्याबद्दल मीरशहाबुद्दीन जामीन होता. तूर्त मराठ्यांच्या मदतीनें तिनें आलमगीर यास गादीवर बसविल्यावर पुढें ती मराठ्यांच्या विरुद्ध वागून नजीबखानाचे मार्फत अहंमदशहा अब्दालीस सामील झाली, आणि तिनें त्याचा मुलगा तयमूरशहा यास आपली मुलगी चंदाजमानी दिली, तो प्रकार पुढें येईल. ही बाई दक्षिणेंतील ताराबाईची एक आवृत्तिच होय एवढें तूर्त ध्यानांत ठेविलें पाहिजे.

---

१ टीप.—बादशाहींतील भानगडी समजण्यास सोबतचा उत्तर कालीन मोगलवंश दृष्टीसमोर पाहिजे. ( From Irvine's Later Mughuls ). वंशावळींत बादशहा झालेल्या पुरुषांस आंकडे घातले आहेत.


औरंगजेब.
१ बहादूरशाहा.
अजीम.
अकबर.
२ जहांदरशाहा.
अजीमुश्शान.
रफीउश्शान.
खुजिस्ताअख्तर ऊ. जहानशहा.
अलातबार.
बेदरबख्त.
महंमदअश्गार.
नेकूसियार अल्पकाल बादशाहा.
महंमद करीम.
३ फर्रुखसेयर
हुमायून-बख्त
इब्राहीम बादशहा अल्पकाल
रफीउद्दौला ऊ. शहाजहान सानी १७५९
रफीउद्दराजत बादशहा अल्पकाल
४ रोशन-अख्तरऊ.महंमदशहा. सन १७१९–४८ बा. १ मलिका अज्जमानी. बा. २ ऊधमबाई.
बेदारदील.
ज. ११९·१·६८३ मृ. २८·४·१७१९ पदच्युत २८·३·१७१९
चंदाजमानी ल. तयमूरशहा अब्दाली.
५ अहंमदशहा १७४८–’५४
फर्खुंदासियार. जहांगीरशहा ज. १७·१२·१७११.
जहान मुरादशहा. ज. २१·१०·१७१७ मृ.२२·५·१७१८
बादशहा बेगम ऊ. मलिका-अजमानी मृ. १७८८–८९ लग्न महंमदशहा.
मुलगी
राबी बेगम.
६ अजीजुद्दीन ऊ. आलमगीर-२ रा, आई अनूप बाई.
इज्जुदीन.
अज्जुदीन याचा मुलगी ल. अब्दाली.
७ शहाआलम¹ वगैरे पांच मुलगे आलमगीरचे.
१ मीर्झा अब्दुल्ला अलीगौहर ऊ. शहाआलम ज. १४·६·१७२८ मृ. १८·११·१८०६.

**रघुनाथरावाचा पोकळ कारभार.**—रघुनाथरावानें प्रथमच १४ मे रोजीं फौजमहंमदखान रोहिल्याच्या मुलुखाची वांटणी केली ( ना. रो. १. ७५). पुढें ३०·५·१७५४ रोजीं रघुनाथरावास हिंगण्यानें कळविलें, 'सार्वभौम व वजीर दुसरा करावा हा भाव सर्वांचा आहे' ( ६·२९९ ) ता. १ जून रोजीं रघुनाथराव, हिंगणे वगैरेनीं एकत्र विचार केला ( ६·३०२ ). पावसाळ्यांत फौजेची छावणी दिल्लीस झाली, त्या वेळीं छपरांस सामान पुरविण्यासंबंधीं ले. ३०५–३०६ चे कागद आहेत. हिशेबासंबंधानें रघुनाथरावानें ले. ३१० त हिंगण्यास झाडलें आहे. ले. ३११ त्याच संबंधाचा आहे. दिल्लीचें कार्य आटोपल्यावर पुढें लाहोरपर्यंत जाऊन अब्दालीचा अंमल उठवावा, अशी मीरशहाबुद्दीनची टोंचणी मराठ्यांस होती. परंतु या प्रसंगीं रघुनाथरावानें पुढें पंजाबाकडे जाण्याचें कबूल केलें नाहीं (६–३२०). मराठे दिल्लींतच ठाणें देऊन बसले आणि खर्च मोठा चालू राहिला ही गोष्ट मीरशहाबुद्दीन वगैरेंस आवडली नाहीं. 'वजिराचा आमचा करारमदार ठरला आहे तो आहेच, त्यांत त्यांनीं अंतराय न करावा. खानखानास घेऊन आम्ही गंगास्नान करून अयनगरावरून देशास जाऊं. एतद्विषयीं वजिरांनीं चित्तांत वसवास न धरावा. आम्हीं त्याचा स्नेहच हा काळपर्यंत राखिला. पुढें चित्तापासून राखणार. खानखाना आम्हां समागमें राहिल्या, वजिरांनीं वसवसा किमपि न धरावा. आम्ही स्नेह धरतों त्याप्रमाणें त्यांनीं धरावा. मग लाहोरास जावयाची तजवीज. खिलत पाठवून द्यावा, म्हणजे फौज देऊन खानखानान व समशामुद्दौला यांस कुरुक्षेत्रीं पावते करूं.' (६ ३२०,३२१). या दोघांना मराठ्यांचा आश्रय होता, त्यांस वजीर आपल्या ताब्यांत मागत असतां वरील बोलाचाली झाली. शेवटीं खानखानास व बादशहास वजिरानें ताब्यांत घेऊन दोघांसही मारून टाकलेंच. या भानगडी वर्षअखेर चालू होत्या. ( ६·३२५ ). एकंदरींत जूनपासून डिसेंबरपावेतों सहा सात महिने मराठ्यांच्या फौजा दिल्लींतच तळ देऊन होत्या. हा जो दिल्लींत मराठ्यांनीं आपला जम बसविला, तेणें करून त्यांची दहशत बहुधा सर्वत्र चांगली बसली खरी, परंतु त्याबरोबर त्यांजविषयीं द्वेषभावही उत्पन्न झाला.

तसेंच सर्व ठिकाणचे बुभुक्षित सरदार, भटभिक्षुक, शेटसावकार वगैरे आपापले अर्थ साधून घेण्यांत दंग झाले. पेशव्यांच्या फौजा जातील तिकडे जय हा ठेवलेलाच, त्यांस देवच साह्य आहे अशी समजूत बाहेर झाली. एक गृहस्थ दीक्षितांस लिहितो, ' दिल्लीचा पैका वसूल होत आहे. सार्वभौम नवे जुने झाले हें वर्तमान तुह्मांस कळलेंच असेल. बाळकृष्ण दीक्षित येथें आले आहेत. श्रीमंतांची भेट झाली. आपले आज्ञेप्रमाणें श्रीमंतांस विनंति व मल्हारबा, गंगोबा यांस सांगोन जें होईल तें करून घेऊं. शिंदे मारवाडांत गेले तेही कार्यसिद्धि करतील. ' ( १·८·१७५४, का. सं. प. या. ३२ ). एकंदरींत मराठ्यांच्या उमेदी या वेळीं उच्च शिखरास पोंचल्याचा भास त्या वेळच्या कागदपत्रांवरून होतो. ऑक्टोबर अखेरीस बाळकृष्ण दीक्षित लिहितो, ' काशींतून स्वार होऊन श्री. दादांचे भेटीस गेलों. सर्वांशीं ओळखी भेटी झाल्या. चाळीस दिवस दिल्लींत होतों. श्रीमंतांनीं बहुत स्नेह कृपा केली. कांहीं मेळवावें ह्मणोन गेलों नाहीं. दिल्ली शहर पाहवें निमित्य गेलों. रघुनाथपंत दादांनीं आह्मांस पालखी, मोत्यांचा चौकडा व तीन हजार रुपयांचा गांव दिल्हा; बादशहाकडून पंधरा हजार रुपयांचे गांव काशी अलीकडे नेमून घेतले. काशीच्या राजानें हें आधीं मान्य केलें आहे. ' ( का. सं. प. या. ३१ व ११·८९ ). दिल्लीस बसून अंतर्वेदींत व काशी प्रयागकडे आपला अंमल बसविण्याचें काम रघुनाथराव करीत होता. सफदरजंगासही पत्रें जात येत होतीं ( १·३४–३६ ). दिल्लीच्या या भानगडींत जयाप्पा यत्किंचित् लक्ष घालीत नव्हता ( १·३९ ); मात्र मारवाडचें काम आटोपतांच काशीप्रयाग बंगालकडे अंमल बसविण्यास तो जाणार होता. इतक्यांत इकडे १७ ऑक्टोबर १७५४ रोजीं सफ्दरजंग वारला [ खं. १ टीप ९७ पृ. ७८ ], तेव्हां त्याचा मुलगा सुजाउदौला यास सलामालकीचीं पत्रें पाठवून रघुनाथरावानें त्याचा गौरव केला ( १·४१, ४३, ४४ ). दिल्ली येथील कामकाजाचा निर्गम जाहला असें १० नोव्हेंबरास रघुनाथराव कळवितो ( १·४२ ). काशीकडील उद्योगाचा निभाव होईना आणि सुजाकडून तिकडे उपद्रव होऊं

लागला, तेव्हां ' तूर्त तुह्मीं श्रीक्षेत्रास असणें, पेस्तर तिकडील बंदोबस्त होणें तो मनोदयानुरूप होईल ' असें १७५५ च्या २० जानेवारीस रघुनाथरावानें बाबूराव महादेवास कळविलें ( १·४५, ४६ ). ह्मणजे पुढील उन्हाळ्यांत शिंदे मुद्दां आपण सर्व फौज घेऊन काशीकडील भाग उरकावा असा त्याचा बेत होता. या स्वारींत दिल्लीकडील रिवाज पाहून चहा घेण्याची इच्छा रघुनाथरावास झाली. ' चहा घ्यावयासी प्याले, सगी उत्तम, लवकर न तापेत असे दोन पाठवून द्यावे ' ( ६·३१८ ), असें तो हिंगण्यास लिहितो.

सन १७५४ च्या अखेरीस अंतर्वेदींत मराठ्यांचा अंमल बसला. ' रोहिलियांची मामलत झाली. वसूल आला त्याची वांटणी होऊन, जयाप्पांचे वांटणीचा ऐवज हुंडीनें पाठविला आहे. प्रस्तुत ग्वाल्हेरच्या कामासाठीं यमुनातीरास आलों. सत्वरच तिकडे ( म्ह० जयप्पाचे मदतीस मारवाडांत ) येत असों. सुभेदार सांभरच्या सुमारें आहेत. ' असें होळकराचा गंगाधर यशवंत जयाप्पाचा कारभारी रामाजी अनंत यास स. १७५५ च्या जानेवारींत लिहितो. गोहदच्या राण्याचें प्रकरण वाढलें नसतें तर रघुनाथराव मारवाडांत जाणार होता. पुढें फेब्रुवारींत रघुनाथरावानें गया व कुरुक्षेत्र पानशहापासून सरकारांत घेतली. त्यांची कमावीस त्यानें दामोदर महादेव हिंगण्यास सांगून हरद् ठिकाणीं आपले तर्फेनें कमावीसदार पाठवून ऐवज सरकारांत पावता करण्याची ताकीद दिली ( ६·३२८ व ना. रो. १. ७९ ). मथुरा, वृंदावन, गढमुक्तेश्वर,[1] पुष्पावर्तावर, पुष्कर इत्यादि हिंदूंचीं तमाम पवित्र स्थळें रघुनाथरावानें हस्तगत करून तेथें आपला अंमल चालू केला. ( ६·५५७ ). स. १७५५ च्या जानेवारीपासून जूनपावेतों रघुनाथराव या सर्व क्षेत्रांच्या ठिकाणीं फिरत होता. ( राजवाडे २ पृ. १३५ व भा. व. शकावल्या ). क्षेत्रें हस्तगत होण्यासंबंधानें कर्मठ ब्राह्मणांचे तोंडास पाणी कसें सुटत होतें हें रघुनाथरावानें दीक्षितास लिहिलेल्या खालील पत्रावरून दिसतें.

' कै. बाजीरावांनीं दिक्षितांस प्रांत मथुरा देऊं केले ह्मणोन तुह्मीं विदित

---

१ गढमुक्तेश्वर दिल्ली मुरादाबाद रेल्वेवर स्टेशन दिल्लीचे पूर्वेस ५४ मैल.

केलें, त्यास प्रांत मथुरा हस्तगत झाल्यावर दहा गांव नेमून देऊं. श्रीकृष्ण द्वारका क्षेत्र आपणाकडे हस्तगत झालें आहे, तेथें शंभर ब्राह्मण-भोजन नित्य घालावें ऐसें चित्तांत असून त्या प्रांतीं गांव नेमून द्यावे म्हणोन तुह्मीं विदित केलें, त्यास पुण्यास गेल्यावर पांच हजारांचे गांव सरकारांतून नेमून देऊं.' ( २०·३·१७५४. का. सं. प. या. २७ ). हिंदुपद पातशाहीच्या उभारणीचें हें एक विशिष्ट अंग असून, पानपतावर सुद्धां कुरुक्षेत्राकडे जाण्याचें सदाशिवरावाचें प्रयोजन हेंच होतें.

दौलतीचें कर्ज वारावें, हा या रघुनाथरावाच्या स्वारीचा मुख्य उद्देश पेशव्यानें ठरविला होता. 'गुदस्तां तुह्मी निरोप घेऊन गेलां, तेव्हां कर्ज वारावयाचा निश्चय होता. जाठाचा मनसबा भारी पडून शेवटीं पैका न मिळाला. दिल्लींत मातबर ऐवज मिळावा, ऐसें असतां घराऊ पेचांपाचांमुळें ( आपसांतील चुरशीमुळें ) तेंही नीट न जालें. मनांत होतें कीं हिंदुस्तानांतून एकदां चाळीस पन्नास लक्ष रुपये यावे. येतांच कर्ज वारावें. परंतु अर्थ न घडला. तुह्मींही अंगीकृत प्रतिज्ञात पक्षासाठीं चिरंजीवांजवळून गेलां. यापर लहानमोठे सरदारांवर पंचविसां लक्षांची बेरीज करून सांगितलें. ते बेरीज सर्वांहीं उत्साहें कबूल केली. एवढा क्षयरोगासमान कर्जरोग दूर जालिया उत्तम आहे. बहुतांनीं अवलंबिलें स्वामिकार्य सहजांत सिद्धीस जाऊन न करी तोच मात्र दोषस्थान होईल.' [ का. सं. प. या. ३८० ] हें पत्र पेशव्यानें ३ सेप्टेंबर १७५४ रोजीं जयाजीस लिहिलेलें असून, त्याच मजकुराची आवृत्ति अनेकवार झालेली आहे.

एकंदरींत दिल्लीच्या राज्यक्रान्तीपलीकडे रघुनाथरावाचे हातून या स्वारींत विशेष कांहीं घडलें नाहीं. त्या राज्यक्रान्तींतही आठ महिने, पंनास हजार फौज, मोठा खजिना, हिंगण्यांचें, शिंदे होळकरांचें व बादशाही उमरावांचें वांकडें, इतक्या गोष्टी खर्ची पडल्या. पुढें जानेवारीपासून जून पावेतों कांहीं क्षेत्रें ताब्यांत आली, परंतु जयाप्पा मारवाडांत अडकून पडला, शेवटीं जून महिन्यांत त्याचा खून झाला, त्याची मदत किंवा विचारपूस रघुनाथरावानें

होळकराचे संगतीस लागून केली नाहीं. शेवटीं हा सर्व बोजा पेशव्यावर येऊन पडला आणि शिंद्यास सोडवून आणण्यांत वर्ष सहा महिने फौजा गुंतून राहिल्यामुळें, दिल्लीच्या उमरावांस अब्दालीशीं कारस्थान करण्यास फावलें. अब्दालीनें फिरून स. १७५७ त दिल्ली मथुरापावेतों येऊन रघुनाथरावानें दीड वर्षांत केलेलें सर्व काम तीन महिन्यांत उखडून टाकिलें, अर्थात् हिंदूंच्या पवित्र क्षेत्रांची रड पेशव्यांचे हातून कधींच मिटली नाहीं. सरदार आवरत ना, व हातून कामही कांहीं घडेना, तेव्हां पेशव्याचें निकडीचें बोलावणें आल्याचें निमित्त करून (६·३४३) रघुनाथराव परत निघाला. दुसरा पावसाळा दिल्लीस काढण्याचें त्याच्या जिवावर आलें, आणि विठ्ठल शिवदेवाकडे दिल्लीचा कारभार सोंपून आपण १०·८·१७५५ रोजीं पुण्यास दाखल झाला. नानासाहेब पुढें लगेच सावनूरचे स्वारीस निघाला, त्याजबरोबर आपल्या कामाचा झाडा देण्याकरितां रघुनाथराव कर्नाटकांत गेला. 'दादास्वामी जाठवर आले परंतु मन कोणी घालून, मेहनत करून त्याजला जेर न केलें. सुरजमल्ल स्वामीस ठावका आहे. आपसांत चित्त शुद्ध नाहीं याजकरितां तो शेर जाला. श्रीमंत स्वामींचा बदनक्ष झाला. चार हजार घोडे, दोन हजार उंट, चार हजार बैल ( मराठयांकडील ) वाणियांचा सुरजमल्लानें नेला. असा बदनक्ष कधींही न जाला. जर श्रीमंत यजमान स्वामी, श्री. भाऊस्वामी येतात तर नक्ष राहतो. श्रीमंत आलियावर पातशहा वजीर समागमें दोन हजार तोफ घेऊन येतील. दोन महिन्यांत जाठ फडशा होईल. करोड रुपयांचा मुलुख सुटेल. आम्हीच देशास येतों. भेटीनंतर सांयंत विदित करूं.' (३·१५१). ही रघुनाथरावाच्या स्वारीची फलश्रुति गोविंद बल्लाळानें ता. ४·९·१७५५ रोजीं पुण्यास लिहून कळविलेली मार्मिक आहे. रघुनाथरावानें काम कसें बिघडविलें हें त्यावरून दिसतें. इतकें कळल्यावरही पेशव्यानें उत्तरेकडे लक्ष न देतां सावनूरची वाट धरिली. 'जिकडे कार्य बहुत तिकडे जाणें होईल' ( का. सं. प. या. ३५७ ) हा स्वतःचा नियम त्यानें भंगिला. एकदम सर्व दिशांस उद्योग सुरू झाल्यानें फौजेची जरूर सर्वत्र भासूं लागली,

तिचा पुरवठा करणें जड पडूं लागलें. सुजाउदौला मराठ्यांचे नाशाविषयीं उद्युक्त झाला. 'काशींत आपली फौज राहील तोंपावेतों भय नाहीं. फौज दूर गेली कीं सुजाबाचा चणारडी (चुनारगड) काशीच्या उरावर आहे. मोठें भय आहे. काशीच्या राजानें श्रीमंतांस व वडिलांस लिहिलें आहे. ब्राह्मणांस वांचवून आपलें होईल तर उत्तम आहे. काशी लुटूं पाहतो. राजा आहे ह्मणून वांचलों आहों. अयोध्येकडे श्रीमंतांच्या फौजा उतरल्यानें सर्वही कामें होतील. या कामास अंतर तरी लक्ष ब्राह्मण मरतील. यशही मोठें होईल.' ता. १७·१०·१७५५. (३·३९८).

**३. ग्वाल्हेर व गोहद किल्ल्यांचा पडाव**—सन १७५५ च्या आरंभीं रघुनाथराव मारवाडांत जयाप्पाचे मदतीस जाणार होता. मे महिन्यांत तो ग्वाल्हेरीस होता (३·४५२ व ४५४). परंतु जाठ, रोहिले, सुजाउद्दौला, इत्यादि मंडळींनीं त्यास बिलकूल चैन पडूं दिलें नाहीं; आणि सर्वच कामें अर्धवट टाकून त्या सालच्या उन्हाळ्यानंतर रघुनाथराव परत देशीं आला. आपण हिंदूंचीं पवित्र स्थानें सोडवून घेतलीं, एवढी सुद्धां प्रौढी मारण्यास सुजानें त्यास जागा ठेविली नाहीं. सुजा बापापेक्षां ज्यास्त खोल व मराठ्यांचा थोडा ज्यास्त द्वेष करणारा होता. मराठ्यांस आपला अंत लागूं न देतां साराच कपटाचा खेळ त्यानें आरंभिला. अनेक प्रकारें काहूर उठवून रघुनाथरावानें केलेलें काम त्यानें हस्तें परहस्तें विसकटून टाकिलें. जाठांनींही त्याच संधींस उचल घेतली. ग्वाल्हेर व त्याच्या ईशान्येस सुमारें तीस मैलांवर असलेला गोहद हे दोन किल्ले जाठांचे असून गोहदच्या राण्याच्या ताब्यांत होते. 'गोहदकर राणा बळावला आहे, त्याचें पारिपत्य जरूर करावें. शत्रु लहान आहे सा न म्हणावा,' [का. सं. प. या. ३९३] असें १५·११·१७५४ रोजीं पेशवा शिंद्यास लिहितो. या वेळीं शिंदे मारवाडांत नागोराकडे होता. 'विठ्ठलशिवदेवांनीं ग्वाल्हेरीस मोर्चे लाविले होते, त्याजवर किल्लेदारानें गोहदवाला राणा भीमसिंग जाठ याजकडे अनुसंधान करून किल्ला त्यास द्यावासा केला. भीमसिंग येऊन मराठ्यांचे मोर्चे उधळून देऊन आपण

किल्ल्यांत दाखल जाला. किल्ला भीमसिंगानें घेतला. विठ्ठलराव दो कोशांवर आहेत. भीमसिंगानें ग्वाल्हेरच्या किल्ल्यांत दंगा करावयाचा विचार केला आहे, त्याचें पारिपत्य होईल तरीच बंदोबस्त उत्तम आहे. सारांश, जाठावर दादास्वामी आले, परंतु मन घालून, मेहनत करून, त्याजला जेर न केलें.' [ ३·१५१ ]. 'विठ्ठल शिवदेव कुंभेरीचे वेढ्याचे समयीं रघुनाथरावाबरोबर होते. पुढें कांहीं दिवसांनीं त्यांची बायको वारली. तेव्हां काल्पीस जाऊन दुसरें लग्न करून परत दिल्लीस स्वारीनिशीं जातांना ग्वाल्हेरीस मुकाम पडला. त्यांचे स्वार दाणावैरणीसाठीं हिंडत असतां जाठांची गांठ पडली. त्यांनीं ते लोक कैद करून ठेविले. ते सोडविण्याकरितां विठ्ठल शिवदेवानें आपला वकील राजाकडे पाठविला. त्याचा जाठाचे कारभाऱ्यांनीं उपमर्द केला कीं आह्मां शूर जाठांचे मुलखांत शिरून उपद्रव करितां, हें तुमच्या नाशास कारण आहे. माफी मागाल तर ब्राह्मण ह्मणून सोडवून देऊं. त्यावरून दिल्लीहून फौज व तोफखाना आणवून लढाईस आरंभ झाला. निकराचें युद्ध चालून महादजी शितोळे याणें जाठ राजास घोड्यावरून खालीं पाडिलें, आणि विठ्ठल शिवदेवानें त्याचा शिरच्छेद केला. मग किल्ला सर करून त्याजवर पेशव्यांचें निशाण चढविलें. भीमसिंग जाठाचा पुत्र राजा गिरिधर शरण आला, त्यास गोहद येथें जागा देऊन ग्वाल्हेर व त्याखालील मुलूख पेशव्यांचे ताब्यांत घेण्यांत आला.' त्याची सनद ७·६·१७५५ ची आहे ( ना. रो. १·८३ व ८४ ). किल्ला सर केल्याची बातमी १६·८·१७५५ रोजीं पेशव्यास आली. विठ्ठल शिवदेव दिल्लीस जाऊन तेथून रघुनाथरावाबरोबर दक्षिणेंत येऊन सावनूरच्या स्वारींत सामील झाला [ २·१३५ ]. एकंदरींत रघुनाथरावानें या स्वारींत दिल्ली, लाहोर, रजपुताना, लखनी, काशी पावेतों सर्व प्रदेशांत वैर मात्र जोडून ठेविलें.

**४. हिंगण्यांचा रुसवा.**—महादेवभट हिंगण्याचा स. १७४४ त खून झाल्यावर त्याचे चार मुलगे दामोदर, बापूजी, पुरुषोत्तम व देवराव दिल्ली व इतर ठिकाणीं वकिलातीच्या कामावर होते. वरील स्वारींत या हिंगण्यांचा रघुनाथरावाशीं बेबनाव झाला, त्याचें कारण समजत नाहीं. हिंगण्यांनीं रघुनाथरावास

मेजवानी दिली, त्या वेळीं ' दादासा० कोणते ? ' असें विचारीत ते पंक्तीतून फिरले, ह्मणजे त्यांच्या डोळ्यांवर द्रव्याचा धूर आला होता, अशी आख्यायिका आहे. यावरून त्यांच्या द्रव्यावर रघुनाथरावाचा डोळा असावा असें अनुमान होतें. तीस वर्षांच्या पिढीजाद अनुभवानें हिंगण्यांची इभ्रत व ऐपत दिल्लींत फार मोठी असून, शत्रुमित्रांवर छाप बसवून मराठशाहीचा पुरस्कार करण्यांत ते दक्ष होते. राजधानींतील पक्ष, घडामोडी, निरनिराळ्या व्यक्तींचे स्वभाव-विशेष व क़ावे इत्यादिकांचा योग्य विचार करून चौकसपणानें ते आपला मार्ग ठरवीत असत. फौजेच्या खर्चास अंताजीपंत पैसा मागूं लागला, तो हिंग-ण्यांनीं दिला नाहीं तेव्हां अंताजीनेंच रघुनाथरावाचें मन बिघडविलें असावें. हिंगण्यांचीं कित्येक पत्रें मोठीं त्वेषाचीं आहेत. ( ६·५४५ ). होळकरहिंगण्यांच्या हिशेबाचे कागद १७५२ ऑक्टोबरचे आहेत. ( ६·२५८, २६९ व २७३ ). सखाराम भगवंत लिहितो ' अंतर्वेदीचे महाल तुम्हांकडे आहेत, तेथील हिशेबाविशीं दोन चार पत्रें पाठविलीं, त्यांचें उत्तर आलें नाहीं. तुम्हांसही एकदां रुबरू सांगितलेंच होतें. तीन सालें हिशेब नाहीं, तरी पत्र पावतांच आजतागाईत हिशेब लवकर येत तें करणें. दोचौ रोजांत पाठविणें. तुम्ही कदाचित् म्हणाल, वसुलाचे दिवस आहेत, तरी मागील हिशेब मागेंच व्हावे, दोन दोन तीन तीन वर्षें कोठें हिशेबाचा गुंत राहिला आहे कीं काय ! हे गोष्टी फटकाळ आहे. पत्रदर्शनीं हिशेब येत तें करणें. या उपरीही तपसील लिहिला तरी उत्तमच आहे !' [ स. १७५४ ची अखेर, ६·३३४ व ४७१ ]. यानंतर भांडण विकोपास जाऊन ता. २० मे १७५५ रोजीं रघुनाथरावानें चार कलमें हिंगण्यांच्या कसुरीचीं त्यांस लिहून कळविलीं ( ६·३३९ ), त्यांत हिशेब न देणें व वर्तनाची मगरुरी अशा दोन बाबतीं दाखल आहेत. अशाच मतलबाचें पत्र महिपतराव चिटणीस रघुनाथरावाबरोबर होता त्यानेंही जून १७५५ त हिंगण्यास लिहिलेलें आहे. (६·५४५,५५६). हिंगण्यांचे सवाल जबाब एकत्र पाहण्यास मिळत नाहींत, परंतु ले. ४९९ आर्जवाचाच असून त्यांत हिंगण्यांची मागणी दाखल आहे. ले. ३८३ चें पत्र जरी स. १७५८ सालचें

आहे, तरी त्यावरून रघुनाथरावाचा हिंगण्यांवरील राग चांगला व्यक्त होतो. हें खरमरीत पत्र सदाशिवरावानें दामोदर महादेवास लिहिलेलें येणें प्रमाणें:—
"तुम्हीं विनंतिपत्र पाठविलें तें प्रविष्ट जालें. कारभारी यांणीं पेचपाच केल्यावरून दादासाहेबीं इतराजी केली. दबऊन मागती करार केल्याचा विस्तार लिहिला तो कळला. ऐशास येविशीचें उत्तर तीर्थरूपांनीं लिहिलें आहे त्यावरून कळेल. सारांश, तुम्हांकडे अंतरें आहेत ऐसें सरदारांनीं व बहुतांनीं सांगितलें, तथापि तितकीही क्षमाच जाली. अलीकडे तों बापूजी-महादेवांनीं पेचपाच वकिली रीतीनें बहुत केले. आम्ही दूर आहों, लिहिणार आपलें मतलबानुरूप लिहितात म्हणावें, तर प्रत्यक्ष चि० रा० दादाखावंद तिकडे गेले, त्यांचे प्रत्ययास आलें. त्यांनीं लिहिलें व बहुतांनीं लिहिलें असतां, तुम्ही आपलेकडे अंतर नाहीं म्हणतां? थोरथोरांनीं खावंदाशीं पेच-पाच केले त्यांचा परिणाम कधींच लागला नाहीं, तेथें तुमचा विषय बुनियाद किती? तुमच्या बापांनीं निष्ठापूर्वक चाकरी केली, यास्तव तुम्हांस तुमच्या बंधूंस वकिलात सोंपिली असतां, बापूजी महादेवांनीं पाया सोडून बेपायाच वर्तणूक केली. त्यांत तुमचें कल्याण नाहीं. अतःपर तीर्थरूपांच्या आज्ञेप्रमाणें व चिरंजिवांचे मर्जीनुरूप वर्तलियास कल्याण असे. अन्यथा तुम्हांस न कळेसें काय? तद्विषयीं बापूजी महादेवास उत्तम प्रकारें सांगून, ज्यांत खावंदाची सेवा घडे, तुमच्या सेवेचा मुजरा होय, चिरंजीव तुम्हां उभयतांची तारीफ करीत तें केलीयास सर्वही गोष्टीनें तुमचें बरें येथून व परमेश्वरापासून आहे. हें पुरतें समजोन पाया धरून निष्ठापूर्वक वर्तणूक करणें. चिरंजिवांनीं बोलाविलें असून बापूजी मनास येईल ते वलगना करून न आले. असो, पुढें आज्ञे-प्रमाणें सेवा करून दाखविणें. यांतच तुमचें कल्याण आहे."

एकंदरींत मनुष्य जोडण्याची अष्टपैलू हातोटी जी नानासाहेबांत होती व जिच्या योगानें सर्व प्रकृतींच्या माणसांकडून त्यानें योग्य तीं कामें करून घेतलीं, ती रघुनाथरावांत नसून या वेळे पासूनच दीर्घसूत्री सखाराम बापूची त्यास जोड मिळाली, हें एक पुढील अवनतीचें बीज होय.

हिंगण्यांबरोबरील तंट्यास मूळ कारण अंताजी माणकेश्वर असून, पेशावरून अंताजीशीं हिंगण्यांचा तंटा स. १७५० पासूनच वाढत गेला (६·४७९). कुंभेरीहून दिल्लीवर चाल करण्याचे प्रसंगीं हा तंटा कळसास पोंचला होता. दामोदर महादेव पेशव्यास लिहितो, 'पातशाही तोफखाना (कुंभेरीवर) आणावयाची आज्ञा श्रीमंतीं केली, त्यास येथून तेथें लिहावें, अर्ज करावा, तो वकील पदरचा करितात ऐसें अंताजीनीं सांगावें, तेणेंकरून काम होणेस दिरंग पडावी. अंताजीपंताचे सांगितल्यावरी हा मजकूर व्हावास नाहीं. परंतु अंताजीपंत सखारामपंत व्याही; सखारामपंत श्रीमंतांचे दिवाण, श्रीमंत वज्यास्वामीच ! असा प्रकार तेथें दर्शवून अंताजीपंत बोलतील तें आसचें बोलणें समजावें, ऐसें सखारामपंतीं त्यांचे निदर्शनास आणून दिल्हें. याजकारितां आतां आम्हांस आज्ञा न करावी. 'तीर्थरूपांनीं जीवच स्वामिसेवेवरी खर्च केला आहे व आम्हांसही स्वामीच्या कल्याणावांचून दुसरें करणें नाहीं. हे निष्ठाच स्वामींचे चित्तांत येऊन सेवकाचा मजुरा दिसेल. अन्यथा दुसऱ्यानें सांगावें ऐसें नाहीं. सर्व निदर्शनास येईल.' असें पत्र आल्यावर पेशव्यानें त्यांस परत लिहिलें, 'तुमचे वडिलानें स्वामिकार्य करून या पदवीस आले; व तुम्ही त्याच गोष्टीवर चित्तापासून राहोन, उमदीं कामें उत्तम प्रकारें करून चिरंजीवाची मर्जी राखोन राहिल्यानें सर्व प्रकारें तुमचे ठायीं दुसरा कार्यविचार नाहीं, तरी कळतच आहे' (६.४८५). हें पत्र पुण्याचें २१ मे १७५४ रोजीं दिल्लीस पोंचलें. म्हणजे तोफखान्याच्या भानगडी कुंभेरच्या वेढ्याच्याच होत. सखाराम बापू व अंताजीपंत व्याही आणि रघुनाथराव भोळा, सखारामबापूच्या मुठींत, हा प्रकार पुष्कळांस जाचक झाला. ह्या संबंधाचा अश्लील लेख बापूजी महादेवानें आपल्या भावास लिहिलेल्या एका पत्रांत वाचण्यास मिळेल. (६·५४५, नोव्हें० १७५४).

होळकर हिंगण्यांचे तंत्रानें वागत असून (६·५५७), शिंदे दूर होतांच रघुनाथरावास वाटेल तसा नाचवून त्यानें दिल्लींत आपली तात्पुरती छाप बसविली. 'मुख्य गोष्ट सुभेदार यशस्वी. खाविंदाच्या प्रतापें अमित्र हस्तगत

करोन, कार्यभाग संपादून बहुत यश मिळविलें. रजपूत बहुत मत्त होते, परंतु थंडे झाले, त्यांमध्यें हुरूप राहिला नाहीं,' असें होळकराचा कारभारी गंगाधर यशवंत हिंगण्यास लिहितो. ( ११·६·१७५५, ६·३४१ ). प्रत्येक सरदाराजवळच्या कारभाऱ्यांची नांवें लक्षांत ठेवून पत्रें वाचलीं असतां, अंतस्थ भानगडींचा उलगडा होतो. सदाशिवराव, नानासाहेब, शिंदे वगैरे कित्येक थोडे पुरुष मात्र दुसऱ्याचे तंत्रानें वागणारे नव्हते.

५. **नागोरचा वेढा,** (मार्च १७५४–फे०१७५६), **जयाप्पाचा खून** ( ३०·६·१७५५ ).–मारवाडच्या राज्यांत जोधपुरच्या पूर्वेस अजमीर व मेडता, आणि उत्तरेस नागोर हीं मोठीं शहरें होतीं. तेथील राजा अजितसिंग यास दोन मुलगे, अभयसिंग व बखतसिंग. अभयसिंगास ढोकळसिंग ह्मणजे 'विनाशकर्ता' असें टोपणनांव होतें. अभयसिंग १७५० त मरण पावल्यावर त्याचा मुलगा रामसिंग यास बाजूस सारून बखतसिंगानें राज्य घेतलें, [ ३०·८·१७५१, ६·२३० ]. तेव्हांपासून रामसिंग जयाप्पा शिंद्याची मदत आणून राज्य परत मिळविण्याच्या खटपटीस लागला. परंतु तीन वर्षेंपावेतों जयाप्पास रामसिंगाचे मदतीस जातां आलें नाहीं. ' जाठ व रजपूत यांणीं एकी करून बखतसिंगाचे कुमकेस फौज पांच सात हजार पाठविली आहे. रामसिंगाचें नेस्तनाबूद करून, दक्षिणीयांचाही पुढें जाठ शेखीच्या गोष्टी सांगतो, तो अडचां हजारांच्या अंताजी पंतास काय मोजणार !' असें हिंगणे लिहितो (६·४८६,१२·७·१७५३ ). ह्मणजे स. १७५३ त मराठे जाठावर चालून येणार त्यापूर्वीच वरील कारस्थानें घाटत होतीं. रामसिंगाचा पक्ष घेऊन त्यास मदत करावी अशी हिंगण्याचीही खटपट होती. ता. २३ ऑक्टोबर रोजीं हिंगणे शिंदे होळकरांस लिहितो, ' महाराजे रामसिंग यांजकडून जगंनाथ पुरोहित व राजा सामंतसिंग आपल्या ( तुमच्या ) समीप आले आहेत. कित्येक कामकाजानिमित्य विनंति करतील ती मान्य करावी. थोड्या गोष्टीनें व शिष्टाचारानें काम होत असलिया कां चुकावें ? व आपण केव्हां चुकवाल ! पांच सातशें स्वार व एखादा नामी सरदार यांच्या समागमें यावा. हेच

आपलें काम बजावून घेतीलें. तमाम रजपूत बखतसिंगाकडोन फुटोन आले व येतात. आपणांस सहजांस यश येतें, याजकरितां लिहिलें असे. करणार आपण समर्थ आहेत.' [ ६·४६२ ]. यावरून ही मसलत मूळ हिंगण्यानेंच सुचविली, मात्र तिची पूर्ण माहिती त्यास नव्हती. या प्रस्तावावरून पुढें जयाप्पास मारवाडांत पाठविल्याबदल रघुनाथरावासच सर्व दोष देतां येत नाहीं. ' बापूजी महादेवानें रामसिंगानिमित्य बहुत कांहीं जोर मारिला, परंतु बखतसिंगासीं टिका सरदारांनीं पाठविलाच. सारांश, सरदार ज्यासी टिका देतील तोच टिकेल. आजचे समयास जें सरदार चाहतील तेंच होऊन येईल. जगु पुरोहित येथें सरदारांसमीप पावले. त्यांनीं सन्मान केला. त्यावरूनच बखतसिंगाचे रजपूत तुहिले जाहले. सरदारांचा रोख मारवाडाकडे जालिया, तमाम रजपूत उठोन रामसिंगास सामील जाहल्याविरहित राहणार नाहींत, ऐसा रंग दिसतो.' ( ६·३२४ ). मारवाडची कारणापुरती वंशावळ. ( पहा मु० रि० पृ. ८८६ ) अजितसिंग.

| अभयसिंग ऊ. | ढोकळसिंग मृ. १७५० | बख्तसिंग मृ. १७५३. | ईडरचा राजा |
|---|---|---|---|
| रामसिंग [जयपूरच्या ईश्वरसिंगाचा जांवई]. | | विजयसिंग | मुलगी=ईश्वर० |

रामसिंग हा जयपूरच्या ईश्वरसिंगाचा जांवई. उलट पक्षीं बखतसिंगाचा एक भाऊ ईडर येथें राज्य करीत होता त्याची मुलगी ईश्वरसिंगास दिलेली होती. स. १७५३ त रामसिंग व बखतसिंग अजमीर येथें असतां ईश्वरसिंगाच्या बायकोनें चुलता बखतसिंग याची भेट घेऊन, त्याजला विषप्रयोग करून ठार मारिलें. टॉड ह्मणतो, 'बखतसिंग शूर व शहाणा होता. जगला असता तर मराठ्यांचें प्राबल्य त्यानें राजस्थानांत होऊं दिलें नसतें.' येणेंकरून रामसिंगास गादी मिळण्याची आशा होती, परंतु तो केवळ अमली बेहोष असें जाणोन बखतसिंगाचा मुलगा बिजेसिंग २० वर्षांचा होता त्यानें राज्यलोभें त्यास धुडावून, नागूर, बिकानेर, मेडतें व झालूर अशीं भारी संस्थानें हस्तगत केलीं. फक्त अजमीर मात्र रामसिंगाकडे राहिलें, तेथेंही उपद्रव

मारी. तेव्हां चेतराम वकिलास आणून विचार केला. वकिलानें त्यास हिंमत दिली. प्रस्तुत गनिमाची फौज कुंभेरीस आहे. होळकराचे हातून कार्य करून घ्यावें, तरी ते बिजेसिंगाचे स्नेही. नेकनाद एक जयाजी शिंदे आहेत त्यांस पगडीभाई करून कार्य करावें. ह्मणोन चेतरामास मशुद्ध येथें शिंद्यांकडे पाठविलें. 'दुर्बळ ह्मणोन तुह्मांस शरण आलों, आतां अभिमानाचे धणी तुह्मी आहां.' असें चेतरामानें जयाप्पास कळविलें. तों जयप्पानें सुरजमल्लास होळकराचे तडाक्यांतून बचावण्याचा असाध्य अंगीकार आधींच केला होता, त्यांत हें दुसरें बोलणें आलें. म्हणोच जयाप्पानें रघुनाथरावाची गांठ घेऊन आपला हेतु कळविला; आणि संवत्सर प्रतिपदेस ह्मणजे २४·३·१७५४ रोजीं कूच केलें. त्या वेळीं रामसिंगानें जयाप्पाकडून बलपत्र ह्मणजे मदत करण्याचा लेखी करार करून घेतला, त्यावर शिंद्याकडील १६ प्रमुख सरदारांच्या सह्या होत्या. [टॉड पु. २ पृ. १०७ व भा. सा. व.].

जयाप्पा मारवाडावर चालून आला असें पाहून बिजेसिंग नागूर सोडून चार कोस राहिला, आणि फौजेची तयारी जंगी करून लढाईस सिद्ध झाला. तेव्हां त्यांजपुढें आपला निभाव कसा लागतो याची जयाप्पास मोठी चिंता उत्पन्न झाली. जन्मादारभ्य मल्हाररावाचे छुगांतून निघालों; आतां अपेश आली तर तोंड काय दाखवावें! तेव्हां दत्ताजी शिंदे भीम बहादर व लहान थोर सरदार यांणीं हिंमत दिली; आणि युद्धच करण्याचा निश्चय केला. त्यांनीं आपल्या फौजेचे दोन भाग करून दत्ताजी व जयाप्पा यांणीं दोन बाजूंनीं बिजेसिंगावर चाल केली. तेव्हां मोठ्या प्रळयाचें युद्ध झालें. मार खात खात रजपूत दोन कोस मागें हटले; परंतु आपला जय झाला ह्मणोन परम खुशाली केली; मराठे थकल्यामुळें रजपुतांस वेढाक्यास अवसान राहिलें नाहीं.' (भाऊसाहेब ब०). जयाप्पा ऑगस्टांत मेडत्यावर आला. 'तेथून बिजेसिंगावर संताजी वाघळे, शेख्याजी खराडे, भोईटे, पागा मिळोन पंधरा हजारांनिशीं चाल केली. बिजेसिंगाची फौज ५०।६० हजार व भारी सामान असतां आह्मां-कडील फौजेनें टक्कर दिली. तेव्हां इकडील मोड होऊन निघाले. पालख्या,

नगारे, निशाणें, चवऱ्या, अब्दागीर, झरझऱ्या आदिकरून त्यांनीं नेलें. यांस अवसान होईना. बेअबरू मागें लष्करांत आले. त्यावरी फौजेचें कूच करून दोन तीन मजला मेडत्याकडे जयाप्पांनीं चालोन घेतलें. राठोडांनींही चालोन घेतलें. प्रातःकाळपासून तृतीय प्रहर पर्यंत लढाई जाली, परंतु हत्यार लागेना. तेव्हां सारी फौज जयाप्पाजवळ ठेवून जनकोजी शिंदे यानें दोन हजार निवडक धारकरी घेऊन चालोन घेतलें, आणि फौज दुभागून पार निघोन गेले. त्यावर जयप्पांनीं हत्यार लावतांच राठोडांची फौज मोडून बाराज केली. जनकोजीस तीन जखमा तिराच्या व सांगेच्या लागल्या. महत्तर यश आलें. बिजेसिंग एक दिवसांत चाळीस कोस नागोरास पळोन गेला. सलतनत सर्व हस्तगत जाली. मग कूच करून नागोरास मोर्चे देऊन शिकस्त केला. इकडे बिजेसिंगानें आपला सासरा जयपुरचा माधोसिंग याची मदत मागितली. [ का. सं. प. या. ले. ४५१ ].

जयाप्याच्या या नवीन उपक्रमानें पेशव्याचे बेत ढांसळले. बरेच दिवस झाले तरी जयाप्पाकडील कांहींच वर्तमान त्यास कळेना. त्यासंबंधीं नाना प्रकारचे प्रश्न विचारून पेशवा लिहितो, ' सर्व अर्थ विस्तारें निरंतर लिहीत जाणें. मोठा मनसबा, मारवाडी रजपूत अद्याप गर्विष्ठ, त्यांसीं प्रसंग एकाएकीं तुह्मांवर प्राप्त झाला आहे. त्यास तजाविजेनें दमवून, युक्तीनें समय पाहून जरब देऊन स्वकार्यसिद्धि करावी. श्रीकृपेनें सरदारी व शिपाई-गिरी व दाव उपाय जाणणें सर्व गुण तुह्मांस आहेत. तदनुरूप साध्य असाध्य विचार करून कार्य करणें. जोधपूर निंमे राज्य घ्यावेंसें विचार जाहलिया उत्तम आहे. दाटून सर्वच घ्यावयासाठीं कलह-वृद्धि न करावी. हा थोरांचा संप्रदाय आहे. युद्धावांचून साम न होयसेंच असलिया, सावधतेनें आपले रीतीनें त्यास आयास आणून नम्र करून कार्य संपादावें. विलंबावर पडलें तरी निरंतर सविस्तार अर्थ लिहीत जाणें.' [३.९.१७५४, का. सं. प. या. ३७६].

वर सांगितलेल्या एक दोन लढाया बहुधा स. १७५४ च्या सेप्टेंबर ऑक्टोबरांत झाल्या असाव्या; आणि त्यानंतर जयाप्पानें नागोरास वेढा देऊन

बिजेसिंगास कोंडून धरिलें. कालक्रमानुसार या वेळच्या व्यवहारांचा तपशील ठरविण्यास साधन नाहीं. वेढ्याची मोर्चेबंदी करण्यांत बराच वेळ गेला. रेतीचा प्रदेश, ह्मणून सुरुंगाचा यत्न चालेना. परस्पर तोफांचा भडिमार होऊं लागला. सात आठ महिने झाले, तरी दुर्ग साध्य नाहीं. ह्मणोन रामसिंग व जनकोजी यांस समागमें दहा हजार फौज देऊन मेडत्यास मोर्चे लाविले. बारा महिने झाले. मोहरा इरेस पडला. तिकडे पुण्यास पेशव्यास चिंता उत्पन्न झाली. मल्हाररावाच्या तेढीनें हें प्रकरण अंगावर आलें असें त्यास वाटलें. ' हरप्रकारें मल्हारबास आपले मायेंत राखून तहरह करून मोकळे होणें. तुमचे विशीं येथें तिळमात्र दुसरा अर्थ नाहीं. सर्व प्रकारें समाधान असों देणें. ' असें पत्र ३१·७·१७५५ चें पेशव्यानें जयाप्पास पाठविलें. [ का. सं. प. या. ३८२ ]. या पत्रापूर्वीच ३०·६·५५ रोजीं जयाप्पा मारला गेला होता.

इकडे बिजेसिंगानें मल्हाररावाचे बळावर हा युद्धप्रसंग अंगीकारला होता. परंतु एक वर्ष झालें तरी मल्हाररावाकडून मदत येईना, तेव्हां त्यानें आपले वकील मदत मागण्यासाठीं मल्हाररावाकडे पाठविले. मल्हाररावानें उत्तर केलें, ' आम्ही एका खावंदाचे चाकर. उघड तुमची कुमक करतां येत नाहीं. परस्परें रजवाडयांस पत्रें देऊन कुमक करतों. ' त्याप्रमाणें माधवसिंग जयनगरकर वगैरे मंडळीस पत्रें पाठविलीं; आणि सांगितलें कीं तुम्हास कोणी मदत न करी तरी, कांहीं मोगलाई मसलत करून तुम्हीं यश संपादावें." असें सांगोन बिजेसिंगाचे वकील मल्हाररावानें परत पाठविले. 'चवदा महिने झाले. परंतु जयाप्पा केवळ कुबेर, रोजमुरा व अजबाब पाहून सर्वांस खर्ची पावती केली. लोक आराम राखिले. तमाम एकदील. अवधियांची ओढ कीं बिजेसिंगाचें पारिपत्य करावें. तिकडे नागुरांत बिजेसिंगास धीर निघेना. सवावर्ष झालें. आतां कोंडून कोठवर राहवें, मोगलाई मसलतीनें होईल तें करावें, ह्मणोन तीन मारेकरी सिद्ध केले, आणि चार घटका रात्रीस बाहेर लावून दिले. चार घटका दिवसास ते जयाप्पाच्या लष्करांत पोहोंचले. देवाचे

डेऱ्यापुढें जयाप्पाचें स्नान चाललें होतें. नजीक घोड्यांची पागा होती. मारेकरी भिकारियांचा कंगाल वेष घेऊन घोड्यांपुढें दाणे वेंचीत होते. स्नान आटपून चौरंगावर उभे राहून मुखावर धोतर घेऊन क्षणभर डोळे चोळीत असतां मारेकऱ्यांनीं एका टाकींच दोहींकडून कुशीस सुऱ्यांचा मार केला. लगेच जमिनीवर आले. नजीक अबदागिऱ्या होता त्यानें कव घालून एक धरिला, तों डेरियापुढें व पागेंत गडबड जाहली. ससेहोलपट होऊन एक ठार जाहला; आणि एक प्राण घेऊन नागुरांत परत गेला. त्यानें बातमी कळवितांच बिजेसिंग एकदम मराठ्यांवर चालून आला. दत्ताजी धावत बंधूजवळ येऊन धाय मोकलून रडत असतां जयाप्पा त्यास बोलला, हें क्षात्रधर्मास उचित नाहीं. मला कांहीं होत नाहीं, तूं शत्रूचा समाचार घे. त्याबरोबर दत्ताजीनें निकराचा हल्ला करून मारवाडी मागें सारोन गांवांत घातले. परत येतो तों जयाजीचा प्राण गेला. दत्ताजीचा शोक आवरेना. तेव्हां रामाजीपंत भाऊ दिवाण व लहान थोर सरदारांनीं सांत्वन करून जयाजीच्या देहाचें सार्थक केलें. जनकोजी जवळ नव्हता. त्यानें त्याच दिवशीं मेडतें सर केलें होतें. तोही लगेच येऊन पोहोंचला. मग चुलतेपुतण्यांचा शोक किती वर्णावा! तेरा दिवस उत्तरक्रिया व दानधर्म बहुत केला. ज्येष्ठ वद्य ७, ता. ३०-६-१७५५ रोजीं जयाप्पाचा खून झाला. ताउस सरोवर म्ह० मोराचें सरोवर येथें त्याची छत्री आहे.[१]

हें वर्तमान लोकांस कळलें. मल्हाररावास करून वाह्यार्थ श्रमी झालें कीं 'आमचें जूग विसकळीत झालें.' पुण्यास वर्तमान समजून 'बहुत श्रमी झाले कीं एक बाजू खचली. बरें जनकोजी शिंदे आहेत, त्यांस सवाई जयाजी करून दाखवूं, चिंता नाहीं.' म्हणोन समाधानीचीं पत्रें दत्ताजी व जनकोजी यांस पाठविलीं. मल्हारराव दक्षिणेंत वाफगांवास निघून गेले. जयाप्पाच्या मृत्यूचें पत्र रामाजी अनंतानें २५ जुलईस पेशव्यास लिहिलें, तें २६ ऑगस्टला

---

१ **टीप**—या खुनास प्रोत्साहन होळकरानें दिलें, असा जो हा उल्लेख आहे, तो जनकोजीनें अंताजीपंतास लिहिलेल्या पत्रांत का. सं. प. या. ४५१ यांत बिलकूल नाहीं, हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे.

त्यास पोंचलें. लगेच चार दिवसांनीं पेशव्यानें जबाब लिहिला. 'जयाजी शिंदे यांस दगा होऊन निधन पावल्याचा मजकूर लिहिला तो कळोन बहुत श्रम जाले. ईश्वरें मोठी अनुचित गोष्ट केली. उपाय नाहीं. जयाप्पासारखा उमदा सरदार दग्यानें मृत्यु पावावा ऐसें नव्हतें. असो. दत्ताजी शिंदे मर्द खबरदार आहेत. तुह्मी व सर्व सरदार शाबूद आहां. जनकोजीचें समाधान करून उपस्थित मनसुबा सिद्धीस पाववून, शत्रूचें पारिपत्य, तहरह उत्तम प्रकारें होय तें करणें. दत्ताजीचा स्वभाव शिपाईगिरीचा आहे, यास्तव रागें करून असमयीं अस्थानीं निकडीस प्रवर्ततील, त्यास समजावून गोड बोलूनच सांगत जाणें. आपा असतां बोलत होते, त्याप्रमाणें झालें तर तह करणें. परंतु ते सांप्रत चढीं लागले असतील, यास्तव हर तर्जावर्जानें संभाळून राहणें. दोन चार मिळून जमा होऊन आले तर तीन महिने पावेतों गनिमी तऱ्हेनें सांभाळणें. फौजा तिकडे आलियावर श्रीकृपेनें उत्तमच होईल. तिळमात्र उदास नसतां सेवा करणें.' [ का. सं. प. या. ३५२ ]. नंतर दुसरें पत्र ता. १८ सेप्टेंबरास लिहिलेलें पेशव्याचें दत्ताजीस आलें तें असें. 'विजेसिंगास उत्तम प्रकारें तंग केलें आहे, वरकड कोणाच्यानें त्याची कुमक करवत नाहीं, स्वामींनीं त्याचे वकिलास साफ सांगोन निरोप द्यावा, कै. आपांचा अभिमान शेवटास नेल्यानें, लौकिक व स्वामिकार्य सर्वांस नय, म्हणोन लिहिलें, त्यास आपणांस जें अवलंबिलें तें आह्मांस सर्व प्रकारें करणें. परंतु हा राजकार्य प्रसंग आहे. आपांसही येथून बुद्धिवाद चार पांच महिने मागें लिहीत गेलों, तीं पत्रें तुह्मीं पाहिलींच असतील. दूरपथ, दोन वर्षांनीं हिंदुस्थानांतून फौज ( परत ) आली, एकाएकीं तयारी करण्यास उशीर लागतो, त्यास लाइलाज. श्रीकृपें दिडा महिन्यांत पांच सहा हजार फौज देऊन पाठवूं. मागाहून खासाही वीस हजार फौजेनिशीं येतच आहे. तुह्मी अवलंबिलें कार्य तें अगत्य आह्मांस करणें. परंतु होणारानुरूप आपांनीं हातेर बांधिलें. शिपाईगिरीची रीत केली. सरदारगिरीचा प्रकार न केला. तेव्हां प्रथम भारथी लढाई मारिली. त्या उपरी नव्या दयावांत तूट सोसून, सलूख हर प्रकारें, पुढील संकट दूरंदेशीनें जाणून, करून मोकळे जाले असते तर

आज प्रयाग अंतर्वेद व अलीकडील खेचींचा मुलूख सोडविणें वगैरे कामें सरकार किफायतींचीं होऊन गेलीं असतीं. परंतु होणारास इलाज नाहीं. तुम्हींही आज पावेतों शिपाइगिरी केली. आतां सरदारीची रीत धरून तजविजीनेंच कांहीं कामें करावीं. जरूर संकट पडेल तेथेंच नेटून शिपाइगिरी करावी. तुमचा अभिमान ईश्वरास आहे; आणि मजवर ईश्वरी कृपा आहे तोंवर साहित्यास कधीं चुकणार नाहीं. तीं पिढ्यांचे एकनिष्ठ सेवक, कामाचे असतां, तुमचा अभिमान नसावा हें कधींही या घरांत घडणार नाहीं. सर्व प्रकारें समाधान चित्तास करून अष्टपैलूचे रीतीनें जसा जे समयीं प्रसंग पाहाल तसा मनसबा करीत जाणें. बिजेसिंगाचा वकील पंनास लक्ष रुपये द्यावे, रामसिंगास पोटापुरती जागा द्यावी, ऐसें बोलत होता. आम्ही ते गोष्ट मान्य केलीच नव्हती. सांप्रत हा प्रसंग जाहला, याजमुळें आम्हीं साफच त्यास जाब दिला कीं आम्हांस याउपर तह करितां अनुकूल पडत नाहीं. तुम्हीं जाणें, म्हणोन निरोप दिला. तेथें ते आतां चढीं लागले असतील. मध्यस्थ मारले गेले, सबब मध्यस्थांसही कोणी शिरत नसेल. अद्याप त्यांनीं रामसिंगास पंधरा विसांची जागा दिल्ही, व तुमचा खर्च फिरोन दहा लाख जाजतीं दिले, तर घेऊन सल्ला करून या संकटांतून सुटावें, हें राज्यभार अष्टपैलूपणास उचित आहे. तेथील प्रसंगारूप करणें.' हें पत्र नानासाहेबाच्या राज्यकारभारनैपुण्यास शोभेसें आहे. (का. सं. प. या. ३५१). विजेसिंगाचा वकील वर्षभर तरी पुण्यास बसून होता (वरील ३६१). जयापानें मल्हाररावाच्या चुरशीनें हें मारवाड प्रकरण उगाच अंगावर घेतलें, अशा कागाळ्या पेशव्याकडे गेल्या होत्या, असें यांत ध्वनित आहे. पेशव्यानें याजबद्दल यत्किंचित् हयगय न करितां शिंद्यांच्या मदतीची सिद्धता करून दिली. 'जयाप्पांनीं मारवाडच्या मनसुबियाचा अंगेज केला, त्यास आयुष्य असतें तरी, त्यांचे तेच सिद्धीस नेते. तथापि त्यांच्यामागें दत्ताजींनीं आव घातला तो प्रकार सिद्धीस पावावाच पावावा, यापेक्षां दुसरें अधिक न जाणतों, अंताजी माणकेश्वर ग्वाल्हेरीहून रवाना केले ते अविलंबेंच देऊन पावतील, खासा स्वारीची तयारी होत आहे. दसरा झाल्यावर चाळीस पंनास हजार फौजेनिशीं येणें होईल.

रजपुतांमध्यें जाठाशीं राजकारण राखून, एकाशीं स्नेह तर एकाशीं बिघाड, एकदांच सर्वांशीं कज्जिया करूं नये, तूर्त तोंडानें वरकडांशीं फारच गोड बोलून राजकाण राखावें, जें समयोचित दिसेल तें करणें.' [ २०·९·१७५५, का. सं. प. या. ३८६ ]. यांत उल्लेख केल्याप्रमाणें पेशवा स्वतः जर उत्तरेंत जाता तर सर्व कारस्थानांचें पुढील स्वरूप बहुतांशीं बदललें असतें, यांत संशय नाहीं. परंतु पेशव्यास एकदां कोणीकडून तरी पुष्कळशी द्रव्यप्राप्ति पाहिजे होती. जयापाचे मारवाडांतील स्वारीनें दौलतीचें कर्ज एकदांचें वारेल अशी पेशव्यास मोठी आशा होती, ती त्याच्या मृत्यूनें निष्फळ झाल्यावर, पेशव्यानें स्वतः स.१७५५ चे दसऱ्यानंतर उत्तर हिंदुस्थानांत जाण्याचा बेत रहित करून, केवळ द्रव्याच्याच इच्छेनें पुनरपि कर्नाटकांत सावनूरची वाट धरिली. होळकरानें व रघुनाथरावानेंही त्यास बहुधा अशीच सल्ला दिली असावी; आणि हें खरें असेल तर हिंदुस्थानांत शिंद्याचा उत्कर्ष नसावा, अशी कांहीं तरी भावना होळकराची असावी, असें मनांत येऊं लागतें. खरें म्हटलें तर सर्वांआधीं होळकरानें धावून जाऊन शिंद्याचा पाठपुरावा केला पाहिजे होता. स. १७५५ त होळकरानें कांहीं एक महत्वाची कामगिरी केलेली आढळत नाहीं. उत्तरेंत शिंद्यांस कुचंबत टाकून दक्षिणेंत होळकर सावनूरचे स्वारीस गेला. या सर्व बनावावरून पुढील अरिष्टाचा दोष बराचसा मल्हाररावाचे माथीं येतो.

स. १७५५ च्या एप्रिलांत रघुनाथराव हिंदुस्थानांत असतां पेशवा व अंताजी माणकेश्वर यांची भेट नाशीक येथें झाली, त्या वेळीं अंताजीस पेशव्यानें हिंदुस्थानांत रवाना केलें आणि रघुनाथराव सांगेल ती कामगिरी करण्याचा हुकूम केला. त्याप्रमाणें अंताजी तिकडे जात असतां, फौज न ठेवतां खोटी गणती दाखवून अंताजी पैसे उपटतो, असा संशय येऊन, रस्त्यांत पेशव्याचे हुकमानें दोन वेळां फौजेची झडती मुद्दाम खात्रीच्या माणसांकडून करण्यांत आली, ती कमी न भरतां बरोबर सात हजार भरली, असें अंताजी लिहितो. रघुनाथराव परत येत असतां माळव्यांत अंताजीची व त्याची भेट झाली. रघुनाथरावानें अंताजीस अंतर्वेदांत गोपाळराव गणेशाच्या मदतीस जाण्याचा हुकूम केला. शिंदे

वर्षभर मारवडांत पेंचांत सांपडले असतां, त्यांचे मदतीस अंताजीस न पाठवितां, आपल्या मेव्हण्याकडे जाण्याचा हुकूम केला, यावरून शिंद्याचें व रघुनाथरावाचें बरेंच बिनसलें होतें असें दिसतें. जुलई ऑगस्टांत अंताजीचा मुक्काम काल्पी-जवळ यमुनातीरीं होता. त्यापूर्वीच जून महिन्यांत जयाप्पाचा खून झाला होता. सेप्टेंबरांत दत्ताजी व जनकोजी यांस पेशव्याचीं पत्रें पोंचल्यावर, त्यांनीं अंताजीस पत्र पाठवून मारवाडांत आपल्या मदतीस बोलाविलें. पेशव्यासही तसें कळविण्याबदल त्यांनीं अंताजीस लिहिलें. या पत्रांत मारवाड स्वारीचा साद्यन्त वत्तान्त शिंद्यांनीं अंताजीस कळविला. तेव्हां रघुनाथरावाचा हुकूम मानावा कीं शिंद्यांचें ऐकावें, असें द्विधाचित्त अंताजीचें झालें. इतक्यांत मारवाडांत जाण्याविषयीं पेशव्याचा निकडीचा हुकूम अंताजीस आला. 'मातबर सरंजामानिशीं मारवाडांत जाऊन, साम दाम दंड भेद युक्तीस पडेल तसें करून, शिंदे यांस काढून घेऊन येणें.' तेव्हां गोविंदपंत बुंदेल्याकडून वीस लाख कर्ज घेऊन विजयादशमीचे मुहूर्तानें (१४·१०·१७५५) अंताजी फौजेची जमवाजमव करीत मारवाडांत गेला. रस्त्यांत किरवली व बुंदीकोटा येथील फौजा राठोडांच्या मदतीस येत होत्या. त्यांस पैका भरून अंताजीनें मागें वळविलें. जयनगरचा माधोसिंग बिजेसिंगाचें साह्य हरप्रकारें करीत होता. सबब अंताजीनें जयपूरचा मुलूख लुटून त्यास तंबी पोंचविली. जयपुरचा सरदार अनिरुद्धसिंग याची व शिंद्यांच्या फौजेची लढाई होत होती, त्यांत ऐन वेळीं अंताजीची मदत आल्यांमुळें शिंद्याचे फौजेस मोठा धीर आला. मोठ्या शिकस्तीनें लढाई करून अनिरुद्धसिंगास मराठ्यांनीं अडविलें, तेव्हां माधोसिंगानें घाबरून त्यास परत बोलाविलें, आणि अनिरुद्धसिंग अंताजीचे छावणींत तहासाठीं गेला. नंतर जयपूरची फौज परत पाठवून अंताजी व अनिरुद्धसिंग शिंद्यांचे भेटीस नागोरास आले. भेटी झाल्यावर सर्व फौजांनीं नागोरावर मारा सुरू करतांच बिजेसिंग मोठ्या हिंमतीनें पुनः चालून आला. त्यांत त्याचा पूर्ण पराभव होऊन त्यानें तहाची बोली लाविली. परंतु बिजेसिंगास काढून रामसिंगास संपूर्ण राज्य दिल्याशिवाय दत्ताजी तह करीना,

त्याबरोबर जरब बसून बिजेसिंग मराठे सांगतील त्याप्रमाणें तह करण्यास कबूल झाला. अंताजीपंताच्या मार्फत तह ठरला. फार ओढून धरूं नये, असें अंताजीनें दत्ताजीस सुचविलें. राज्याच्या तीन वांटण्या झाल्या. एक सरकारची, एक बिजेसिंगाची व एक रामसिंगाची. सरकारची नजर दोन क्रोड दरबार खर्च व कांहीं अंताजीचे, मिळोन पांच कोट ऐवजाची निशा घेतली. मारोठास रामसिंगानें व झालवार येथें बिजेसिंगानें राज्य करावें, जोधपूर किल्ला सरकारांत ठेवावा, याप्रमाणें करारांत आणून बिजेसिंगाची व शिंद्याची भेट करविली. परस्परें बहुमान जाला. रामसिंग व बिजेसिंग यांची भेट होऊन किमाफ तोडिला. रामसिंग हाडे बुंदीकोटकर, गोपाळसिंग करोलीकर व अनिरुद्धसिंग वगैरेंच्या भेटी शिंद्यांशीं झाल्या. जयपुराकडून दोन कोट गुन्हेगारी घेतली. [ का. सं. प. या. ४५१ ]. ह्या उत्कृष्ट लेखावर मिति नाहीं हें त्यास मोठें वैगुण्य आहे. फेब्रुआरी १७५६ च्या सुमाराचें हें पत्र असावें. अंताजीच्या या लेखांत आत्मश्लाघेची झांक ठिकठिकाणीं मारते, हें त्या लेखावरून दिसून येईल. होळकरासंबंधानें एक अक्षरही यांत नाहीं; कदाचित् होळकर व रघुनाथराव एक विचाराचे असल्यामुळें अंताजीनें त्याजबद्दल कांहींच उल्लेख केला नसावा असें वाटतें. ' एक कोट रुपये खंडणी घेऊन, नागुरापासून अलीकडे मुलूख अजमेर, मेडतें, बिकानेर हीं ठाणीं रामसिंगास दिलीं. खंडणी व मुलूख हस्तगत झाला, त्यांपैकीं निमा रामसिंगास देऊन निमा शिंद्यांनीं आपणाकडे ठेविला. ठाण्यांचा बंदोबस्त करून मजल दरमजल उज्जनीस आले. [भा. सा. ब.] अजमीर कायमचें घेऊन मराठ्यांनीं तह केला. ( टॉड. ) शेवटीं रामसिंगास गादी मिळाली नाहीं. तो स. १७७३ त जयपूर येथें मरण पावला.

रामसिंग अत्यंत दुर्दैवी होता. राज्य मिळविण्याकरितां त्यानें २१ लढाया मारल्या. आरंभींचा त्याचा दुष्ट स्वभाव विपन्नावस्थेनें शेवटीं पुष्कळ नरम झाला. त्याची हुशारीच पाहिली तर अप्रतिम होती, परंतु लहर आली म्हणजे तो काय करील याचा नेम नसे. जिवास जीव देणारे त्याचे कित्येक साथीदार होते, म्हणूनच त्यानें पुष्कळ वर्षे टिकाव धरला. विजयसिंह

गादीवर आला तेव्हां तो अल्पवयी व अज्ञानी होता. मराठ्यांबरोबर लढण्यांत राज्य व त्याचे खजिने भिकेस लागले. फार वर्षांच्या युद्धांत शेतकी, व्यापार व उद्योग सर्व बसले आणि रामसिंह पुष्कळ वर्षे जिवंत राहिल्यामुळें त्याची धास्ती मनावर राहून विजयसिंहास कांहीं एक उपयुक्त काम करतां आलें नाहीं.

स्वारीस एकंदर खर्च तीन कोट रुपये आला. परंतु हाताखालच्या लोकांचें नुकसान शिंद्यांनीं होऊं दिलें नाहीं. उज्जनीस येतांच बुंदीचा राजा मरण पावला आणि त्याचे भार्येनें आपल्या अल्पवयी मुलास गादीवर बसविण्यासाठीं शिंद्यांची मदत मागितली. ती मदत केल्याबद्दल अल्पावकाशांत ४० लाख रुपये दक्षिणेस मिळाले. तेणेंकरून नागोरच्या स्वारीचें कांहीं कर्ज फिटलें. 'संस्थान कोटें येथून चाळीस लाख खंडणी केल्याचा मजकूर लिहिला, त्यांत सरकारचा नजराणा पंधरा लक्ष रुपये, पैकीं साल मजकुरीं दहा लक्ष व पांच लक्ष पेस्तरसालीं द्यावे. याप्रमाणें करार केला आहे म्हणोन लिहिलें, ऐशास सांप्रत सरकारांत ऐवजाची निकड बहुतच आहे. दहा लक्ष रु. सत्वर पाठविल्यास फारच उपयोगास पडतील. वरकड मारवाड प्रांतें ऐवज जमा जाला असेल तो देशास येतेसमयीं समागमें घेऊन यावा. यंदां पैक्याची आंच फार' [ का. सं. प. या. ३५० ], असें पेशवा जनकोजी शिंद्यास १७-८-५६स लिहितो. म्हणजे या वेळीं शिंदे दक्षिणेंत दाखल झाले नव्हते. पुढें लवकरच आले ( का. सं. पत्रे. ३४९ ). बरसातींत शिंदे उभयतां दक्षिणेंत चांभारगोंद्यास आले. तेथें नानासाहेब व सदाशिवराव यांनीं मुद्दाम जाऊन त्यांच्या भेटी घेऊन समाधान केलें. मारवाडांत जिंकलेला सर्व मुलूख शिंद्यांकडेच पेशव्यानें ठेविला. पुढें तीस वर्षांनीं रजपुतान्यावर मोहिमा करतांना हा पूर्व इतिहास महादजीचे मनांत जागत होता हें सांगणें नकोच. मल्हारराव होळकर शिंद्यांचे भेटीस चांभारगोंद्यास जाणार होता, परंतु शिंद्यांनीं त्याची भेट घेण्याचें साफ नाकारिलें. 'आतां त्यांची भेट स्वर्गीं' असा जबाब दिला. ह्या दोन मोठ्या सरदारांचें हाडवैर जुंपलें हें भावी विनाशाचें पूर्व चिन्ह होय; आणि पेशव्यास हें वैर मिटवितां आलें नाहीं, हें त्याच्याही राज्यकारभारास

वैगुण्यच समजलें पाहिजे. एकंदर स्वारीत प्रत्येकानें आपली शिकस्त केली. सर्व लोक अत्यंत जुटीनें व एक विचारानें जिवाची पर्वा न धरितां लढले. रजपूत लोकांचा अभाव भारी, व इतर सरदारांकडून तांबडतोब मदत आली नाहीं, म्हणून दोन वर्षें कुचंबणा झाली; आणि हाच प्रकार पुढें तीन चार वर्षें हळूहळू बळावत गेला, त्यामुळें बाजू मराठ्यांच्या अंगावर आली. फौजा, पैसा, सामुग्री इत्यादि गोष्टी वेळेवर व भरपूर मिळाल्या नाहींत, म्हणून त्यांचा मोड होत गेला, बाकी कुचराई अशी कोणींही केलेली नाहीं, ही गोष्ट त्यांच्या शौर्यास नेहमींच भूषणावह आहे.

रजपूत लोक म्हणजे धर्मानें व जन्मानें मराठ्यांचे जातभाईच होते. विशेष जरूर नसतां पेशव्याचें कर्ज वारण्यासाठीं पैसे मिळविण्याच्या हेतूनें दुसरीं उपयुक्त कामें सोडून जयाप्पानें रजपुतान्यावरची वरील स्वारी हातीं घेतली. यांत त्याचा तर फायदा झाला नाहींच, उलट रजपूत जातभाई मराठ्यांचे कायमचे वैरी बनले; आणि स्वधर्मीयांवर शस्त्र धरल्यानें मराठ्यांच्या मूळच्या उच्च हेतूंचा विपर्यास झाला. होळकराच्या चढाओढीनें जयाप्पा शिंद्यानें हें प्रकरण उगीच अंगावर घेतलें. रघुनाथरावास राज्यकारस्थान किंवा मुत्सद्देगिरी ठाऊक असती तर त्यानें असा प्रकार होऊं दिला नसता. यासाठींच नाना-साहेब उत्तरेंत येता तर तिकडील कारस्थानांस योग्य वळण लागून कदाचित् पानपतचा परिणामही भिन्न झाला असता असें वाटूं लागतें. रजपुतान्याच्या ऐवजीं प्रयाग काशी वगैरे हिंदूंचीं पवित्र स्थळें सोडविण्याचा उद्योग जयाप्पानें अंगीकारिला असता तर मराठ्यांचें ब्रीद लोकांच्या निदर्शनास आलें असतें. एकंदरींत शिंदे होळकर या दोन मुख्य सरदारांचे भांडणांत पुढील नाशाचें बीज आहे, ही गोष्ट येथें प्रत्ययास येते.

या स्वारीनें रजपूत मराठ्यांचें वैर मात्र कायमचेंच जुंपलें. पानपतावर मराठ्यांची वाताहत होत असतां, रजपूत मजा पाहत तटस्थ राहिले, नुसती धान्यसामुग्री सुद्धां त्यांनीं मराठ्यांस पोंचविली नाहीं, यावरून बाजीरावाचे वेळचा रजपूतमराठ्यांचा स्नेह लयास जाऊन, अलीकडे त्याचा किती विपर्यास

झाला. हेंही या मारवाडच्या स्वारीवरून उघड होतें. शौर्य व हिंमत हे शिंदे घराण्याचे उज्वल गुण वरील प्रकरणांत अत्यंत निदर्शनास आले, आणि त्याबद्दल केवळ त्यांच्याच वंशजांना नव्हे तर अखिल मराठी राष्ट्रास सदैव अभिमान वाटेल यांत संशय नाहीं. मारवाडांत शिंद्यांची कुचंबणा होऊं लागल्यामें उत्तरेंतील मराठ्यांच्या एकंदर उद्योगाची बरीच हानि होऊं लागली. 'जयाजीस दगा झाला हें वर्तमान जमीनदारांस कळतांच मन मानेल त्याप्रमाणें ते लबाडया करूं लागले. (३·१३७) जयनगरास माधोसिंगानें गोविंद तिमाजीस जिवें मारिलें. घरदार लुटलें, आणीकही मारिले. तमाम राजेरजवाडे लबाडीस आले,' (३·१५२), असें गोविंदपंत बुंदेले लिहितो. पुढील उपक्रम समजण्यासाठीं गोविंद बल्लाळाच्या हालचाली काय होत्या हें आधीं येथें पाहिलें पाहिजे.

६. **गोविंदपंत बुंदेल्याचा कारभार.**—रा. राजवाड्यांनीं या गृहस्थाच्या कर्तृत्वाचा भाग अत्यंत हिडिस दाखविला असून, त्यामुळें त्यांचें पानपतचें विवरणही विपर्यस्त व सदोष झालें आहे. गोविंदपंत कदाचित् आपमतलबी असेल, पण तेवढ्यावरून पानपतच्या अपयशाचा बराच मोठा वांटा राजवाडे त्याच्याच माथीं मारतात तें बरोबर नाहीं. त्याच्याही पेक्षां ज्यास्त मतलब मल्हारराव वगैरे दुसऱ्या अनेक व्यक्तींच्या ठिकाणीं होता; आणि बुंदेलच्या ठिकाणीं तो नसता तरी तेवढ्यावरून पानपतचा परिणाम निराळा झाला असता असें म्हणतां येत नाहीं. याकरितां या गृहस्थाचा उद्योग यथातथ्य दाखविणें जरूर आहे. 'स. १७३३ त गोविंदपंतास बुंदेलखंडाचा सुभेदार केलें म्हणून कोठेंकोठें लिहिलेलें आढळतें, ती निवळ गप्प होय' हें राजवाड्यांचे विधान [ १ प्र. पृ. ५४ ] साफ चूक आहे. त्याच सालीं पंताचा उद्योग उत्तरेंत सुरू होऊन, तिकडेच त्याचीं पुढील अठ्ठावीस वर्षें सारखीं खर्च झाल्यामुळें, त्याच्या इतका तिकडील माहीतगार दुसरा इसम नव्हता. तो मूळचा कारकुनी पेशाचा असून प्रसंगानें शिपाईगिरीचें काम शक्तीबाहेर त्याजवर पडल्यामुळें त्यास यश आलें नाहीं. राजवाड्यांचा पहिला खंड प्रसिद्ध झाल्यावर, तिसरा व सहावा हे खंड बाहेर आले, त्यांत पंताचीं शेंकडों नवीन पत्रें छापलेलीं

पाहतां त्याजबद्दल अनुकूल ग्रह उत्पन्न होतो. पोरी, विजा, उंची कपड वगैरे हिंदुस्थानांतून पेशव्यांस गोविंदपंत पुरवीत असे. गोविंदपंताचा धाकटा भाऊ पुण्यास कारभार पाहत असे.[1] उत्तरेकडील कमाईचा पुष्कळसा पैसा गोविंदपंत दक्षिणेंत पाठवी. स. १७४० च्या सुमारास त्यास चांगली कमाई झाली. दोन लाखांपासून चौदा लाखांपर्यंत सालाची रसद गोविंदपंत पेशव्यांकडे भरीत असे. ही रसद नियमितपणें भरण्याबद्दल त्याचा मोठा लौकिक होता. स. १७४९-५० सालीं पेशव्यांनीं त्यास पालखी व अब्दागीर अशी नेमणूक करून दिली. [ १·१३२ व टीप १८२ ]. रोहिल्यांचे युद्धापासून गोविंदपंताने कमाविशींत दंगे उत्पन्न होऊन वसुलास अडचण पडूं लागली; आणि हा घोटाळा उत्तरोत्तर वाढून त्याचा पानपतावर कळस झाला. अर्थात यांत मुद्दाम लबाडी केल्याचा आरोप सिद्ध होत नाहीं. तो आपल्या अडचणी भावास वारंवार लिहितो. ( ३·१५५ ). दक्षिणेंतील घडामोडींचा तपास ठेवण्याचा गोविंदपंतास मोठा हव्यास होता, त्यावरून प्रसंग येईल तशी पाठ फिरविण्याचा त्याचा हेतु बहुधा असावा असें दिसतें. सर्व कारस्थानांची माहिती ठेवून, कोणाशींही विकोपास न जातां सावधगिरीनें वागून, आपला मार्ग सुधारावा असा त्याचा परिपाठ व स्वभाव दिसतो. थोडा बहुत संशयी व कपटीही असावा असें भासतें. 'पैसा कोठीलही वसूल होत नाहीं, जान विकत नाहीं, असें परम संकट आहे. ताराबाईनीं संभाजी राजांशीं पैगाम केला आहे कीं काय तें लिहिणें. ताराबाईजवळ फितुरांत कोण कोण आहेत, श्रीमंत कोणाकडे जाणार, काय मनसुबा तो लिहिणें. ( ३·१६३ ). सवंगाईमुळें पैसा वसूल होत नाहीं. रयत बटाई द्या म्हणते, नाहीं तर पळोन जातात, पैसा उगवत नाहीं. बुंदेलखंडी चार लाख रुपये कर्ज देणें तें अद्याप वारत नाहीं. शहरीं देणें तें तसेंच. थोडक्यांत हुंडी केली, तेथें ऐवज तूर्त न मिळे, म्हणून कर्ज तेथें घेणें लागलें. ऐसा प्रसंग ईश्वरें आणिला. भरणीं चारणीं सावकाराचीं

१. वंशावळ पहा, मराठी रियासत, म. वि. १ पृ. ३८८.

होऊं लागली. अशी गत कधीं न जाली ' ( ३·१६५, १२·१·१७५१ ). श्रीमंतांस वगैरे गौरवून पत्रें लिहून तो त्यांची मर्जी सांभाळण्यांत मोठा कुशल होता. 'श्रीमंतांचें पुण्य समर्थ, ह्मणून गायकवाड, दाभाडे, ताराबाई विल्हेस लागले. नासिरजंग मेला.' हिंदुस्थानच्या व्यवस्थेस फौज किती व कशी पाहिजे याचा स्पष्ट इशारा बुंदेल्यानें सदाशिवरावास २४·२·५५ च्या खालील पत्रांत दिला आहे. 'हिंदुस्थान प्रांतीं हंमेशा मातबर फौज पाहिजे, तरच बंदोबस्त राहील. बुंदेलखंडापासून अंतर्वेदीपावेतों रखवाली पाहिजे. मातबर जागा, रांगडे लोक हरामजादे, तेव्हांच फिसाद करतात. दिल्लींत बंदोबस्त नाहीं. तेथें गडबड जाली ह्मणजे सर्व रजवाड्यांची नजर फिरते. दादास्वामीही देशीं जाणार. सरदारही समागमें जातील. आह्मांजवळ फौज नाहीं. हंमेशा वीस हजार इकडे छावणी असावी. फौज येईल तेव्हांच बंदोवस्त करून आह्मी देशास येऊं. सबब मातबर फौज अविलंबें सत्वर रवाना करावी. कैदेनें राहत, सरकार कामावर· चित्त देत, जागजागां गांव न लुटीत असे लोक पाठवावे. नाहीं तर नित्य लूट करितां हैराण करितात ऐसे न पाठविणें. हिंदुस्थान प्रांतीं फौज नसलिया बंदोबस्त राहणार नाहीं, पैसा वसूल होणार नाहीं, हयगय जालिया फजिती आहे,' [ इ. सं. ऐ. टि. २·४५ ]. यापेक्षां जास्त स्पष्ट व जोराचा इशारा कोणता द्यावयाचा. दिल्लींतील कारभार आपसांतील चुरशीनें बिघडला. रघुनाथरावाचे स्वारीनें बदनक्ष झाला. स्वतः नानासा०अगर भाऊसाहेब यांपैकीं कोणी तरी येऊन व्यवस्था न केल्यास सर्व उद्योग फसेल, असें पंतानें सदाशिवरावास निक्षून लिहिलें (४·९·१७५५, खं. ३·१५१). पुनः स. १७५६ त बुंदेले सदाशिवरावास लिहितो. ' उभयतां सरदारांत पेंच दिसतो. सुरळीतपणें वर्तणूक होणार नाहीं. आपसांत कटाक्ष वाढेलसें दिसतें. या प्रांतीं स्वामी आलियाविना बंदोबस्त व सरकारी कार्य होणार नाहीं. याजमध्यें सर्व आहे. स्वामी सर्वज्ञ आहेत. ज्याची फिकीर त्याजला असते. सरदारांत आपसांत चित्त शुद्ध नाहीं, याजमुळें मनसुबा सिद्धीस जाणार नाहीं. एकानीं एक ह्मणावें,

दुसऱ्यांनी दुसरेंच म्हणावें. यांत मनसबा कसा सिद्धीस जाणार! याजकरितां स्वामींनीं श्री. नानास्वामी सुद्धां विल्लीस यावें, आपलें कार्य मातबर, पातशहांत व वजिरांत अनावासें ( कलागत ) लागली आहे. त्याजमुळें सरकारी कार्य जें म्हणावें तें होणार. द्रव्य मुलूख घ्यावे. असा समय कधीं येणार नाहीं; आणि स्वामीखेरीज सरकारी कार्य मातबर होणें नाहीं. जालें तर, बंदोबस्त होणार नाहीं. असे पेंच आहेत. श्री. नानास्वामी व आपण येऊन बंदोबस्त करून जाल तरीच सरकारी कार्य होईल, आणि स्वामीचा हुकूम राहील असें आहे. कितेक वर्तमान पत्रीं लिहितां नये. भेटीस येतों, सांप्रत विदित करीन. स्वामी सर्वजाण आहेत ' [ ३·१४९ ]. इतकें स्पष्ट व कळकळीचें, इतकें निष्ठेचें व राष्ट्रकार्याचें पत्र फार वर्षांच्या अनुभवी सरदाराकडून आलें असतां, उभयतांपैकीं एकासही उत्तरेंत आण्याची बुद्धि झाली नाहीं, हें भावी अनर्थाचें लक्षण समजलें पाहिजे. नानासाहेब व सदाशिवराव या दोघांच्याही कर्तृत्वाबद्दल गोविंदपंतास खात्री होती; आणि रघुनाथरावास उत्तरेंत पाठवूं नये, असाही बुंदेल्याचे लिहिण्याचा रोंख होता ( ३ पृ. ३८ ). रघुनाथरावाचा मेहुणा गोपाळ गणेश बुंदेल्याचे कारभारांत ढवळाढवळ करूं लागला, त्यावरूनही त्या उभयतांचें वांकडें आलें असावें असें दिसतें. ' मी चाकर वारगीर स्वामीचा आहें. कराकुडा येथें मेहनत केली, जिवाकडे न पाहिलें, आणि मोगलांशीं झुंजलों. मातबर जागा स्वामीचे घरीं आली. जर जागा गोपाळराव यास देणें होती, तर मजला बोलावून हजर ठेवून जे आज्ञा करणें ते करावी होती. मी हुकमी स्वामीचा. आम्हांस उजूर काय! परंतु कराकड्यांत आमची प्रतिष्ठा स्वामींनींच बसविली. स्वामीचे जोरानें वजीर रजवाडे यांजला मी खातरेस आणीत नाहीं. अवरूनें आलियास स्वामींचाच नक्ष राहतो. श्री. दादास्वामींची आज्ञा ती आम्हांस प्राणादाखल आहे. त्यांत उजूर करीत नाहीं. आम्ही चाकर स्वामीचे कमाऊ आहों. स्वामीचे चार पैसे खराब करावयाचे नाहीं. मजला मोठी उमेद आहे, स्वामींची चाकरी उमदेपणें करावी, आणीक जागा मुलूख स्वामीचे घरीं आणून चालवा हे आहे. माझी नालीस

नाना प्रकारें स्वामीस लिहिणार लिहितात. आम्हांस एक स्वामीची कृपा, वशीला वगैरे म्हणावा तर स्वामीखेरीज नाहीं. अफुखान पातशाहीत नामी सरदार होता, त्याजला परम संकटें, परम उपायें, जिवाकडे न पाहतां, बुडविला. त्यास मराठा सरदार हें कर्म करिता तर जमिनीवर न माता. आम्ही स्वामींचे ब्राह्मण आमची शिफारस कोण करणार! आज दोन लक्ष रुपयांचा तोफखाना स्वामींस मिळवून दिला. कुरा व कडा अठरा परगणे, लहान थोर स्वामींचे घरीं आले. पातशहा कोठील, वजीर कोठील, जे जागा घेतली ते स्वामींनीं कोणास दिली! कांहीं नादानी आम्हांपासून न जाली. आम्ही कानधरली शेळी आहों. हुकमी आहों. खावंदांची अहर्निशीं सेवा एकनिष्ठपणें करावी हें जाणतों. सेवेशीं येऊन तपशीलवार वर्तमान विदित करीन, तेव्हां स्वामी ऐकोन संतोषी होतील. आमचे श्रमाचें सार्थक होईल.' (३·१३७, १३·९·१७५५). या पत्रावरून रघुनाथरावानें उत्तरेच्या स्वारींत केवढी अव्यवस्था केली हें दिसून येतें. शिंदे होळकरांचें भांडण विकोपास गेलें. बुंदेले, अंताजी माणकेश्वर, हिंगणे वगैरे म्हाडून सारे जुने फार वर्षे उद्योग केलेले सरदार नाराज झाले. पातशहा, वजीर, सुजाउद्दौला वगैरे नरम न होतां मराठ्यांचे विरुद्ध जोराचीं कारस्थानें करूं लागले. रजपूत व जाठ मराठ्यांचे वैरी बनले. हिंदूंचीं पवित्र स्थळें उपद्रव पावलीं, असे एकना दोन किती तरी घोटाळे रघुनाथरावानें माजविले. उलट दक्षिणेंत नाना व भाऊ या दोघांनीं दमाजी, रघूजी, निजाम, बुसी, ताराबाई, संभाजी व कर्नाटकांतील तमाम लोक जे भारी उपद्रव करीत होते त्या सर्वांस नरम करून आपल्या लगामीं लाविलें. म्हणूनच गोविंदपंत हळहळे, कीं या दोघांनीं अगर एकानें तरी एकवार तिकडे जाऊन सर्व भानगडी मिटवाव्या. रघुनाथरावाची अव्यवस्था पेशव्याचे कानीं घालण्यासाठीं बुंदेले स्वतःच पुण्यास जाणार होता (३·१५६). त्याजविरुद्धही पुष्कळशा कागाळ्या पेशव्यांकडे गेल्या असून, समक्ष भेटींत आपण स्वामींस सर्वथैव राजी करूं अशी त्यास खात्री होती. परंतु स. १७५६ च्या श्रावणापर्यंत त्यास निघतां आलें नाहीं ( ३·१५० ).

१७५६ च्या आरंभीं त्यास रजपूत बुंदेल्यांवर जावें लागलें त्याचा प्रकार असा.

मराठ्यांनीं रोहिलखंड जिंकल्यावर त्या प्रांतास अयोध्येचा वजीर व रोहिले दोघेही त्रास देऊं लागले. गोपाळराव बर्व्यांचे हातून त्यांचा बंदोबस्त होईना, तेव्हां गोविंदपंतास तें काम सांगण्यांत आलें. यमुनेच्या अलीकडचा प्रदेश त्याच्याच ताब्यांत होता, आणि त्यास लागूनच पलीकडे करा, कुडा, इटावा, सकुराबाद वगैरे परगणे जिंकण्याचें काम रघुनाथरावाच्या हुकुमानें पंतानें स्वीकारिलें. पुढें पानपतावरही अंतर्वेदींतील कामगिरीच पंतास जाचक झाली. ता. ११·१·१७५६ रोजीं पंत रघुनाथरावास लिहितो. ‘ अंतर्वेद प्रांतीं वजिरांनीं फिसाद करून, तमाम दक्षणी अंमल उठवावा, म्हणून सय्यद अलीअस्कर याजला पाठविलें. सकुराबाद परगण्याच्या सनदा शिरपाव देऊन रवानगी केली. जमीनदार सर्व जाऊन त्यास मिळाले. यामुळें तमाम अंतर्वेदींत दंगा आला. गवार जात जागजागां लुटूं लागले, पैसा कोणी देईना. सर्वांस वारें लागलें. आम्ही जेतपुरास बुंदेल्यांकडील कार्य करावें, तों अंतर्वेदींत दंगा झाला म्हणोन वर्तमान आलें, तेव्हां कूच करून यमुना उतरून इटावेस आलों. पौष शु. ८ भृगुवारीं ( ९ जानेवारी ) मोगलांवरी गेलों. मोगल भारी झाला. निदानची गोष्ट येऊन पडली, मरावें कीं मारावें, दुसरा विचार नाहीं. स्वामींचे चरणांचें चित्तांत स्मरण करून दोन घटका शर्थ केली. अस्करअली व त्याचा पुत्र हौद्यांतच जिवें मारले. दुसरे ५०।६० सरदार मारले. दोन हजारपावेतों माणूस कापलें. सामान सर्व लुटलें. आमचे जीव या समयीं वांचावेसे नव्हते. पण स्वामीच्या प्रतापेंकरून शत्रूचा नाश जाला. जाल फौज आलियाखेरीज आम्हीं काय करावें. सलूख जालियाविना रयत पैसा न देई. याजकरितां दोन लाख रुपये इजारा कुराबाबत आणीक देऊन सलूख केला. पुढें आपली जबरदस्ती जालियावर पंतास लक्षांची जागा सोडवून घ्यावी. जालें वर्तमान सेवेसीं लिहिलें आहे. [१]’

१. टीपः—हें पत्र रा. श्री वि. आठल्ये यांजकडून रिंगणगांव दप्तरपैकीं मिळालें. शेवटच्यांत गोषवारा येथें दिला आहे.

अंतर्वेदींतील कामगिरीमुळें पंतास इच्छेप्रमाणें रघुनाथरावाचे पाठोपाठ पुण्यास जातां आलें नाहीं. सेप्टेंबर ५६ त तो लिहितो, आतां लवकरच निघतों [ ३·१४४ ]. पुढें डिसेंबरांत तो देशीं गेला, असें अंताजी माण० २१·५·५७ स लिहितो. [ इ. सं. ऐ. टि. २·३१ ]. स १७५७ चे आरंभीं तो पुण्यास आला, तेव्हां रघुनाथराव पुनरपि उत्तरेचे स्वारीस गेला होता. मिळून उत्तरेंतील भानगडींची समक्ष वाटाघाट स. १७६० पर्यंत झालीच नाहीं.

स. १७५५–५६ पर्यंत गोविंद बल्लाळाचे कामाबद्दल पेशव्याकडे यत्किंचित् तक्रार गेलेली नव्हती. उलट शिंदे होळकरांचे बरोबरीनेंच त्याचाही तिकडील अनुभव असल्यामुळें, त्याची लोकांत व मराठे मंडळांत मोठी मान्यता होती. गोपाळ गणेशानें व हरि विठ्ठलानें मात्र रघुनाथरावाच्या स्वारीनंतर पेशव्याकडे कांहीं कागाळ्या नेल्या (खं. ३·१५०, १५२, १५५), त्याही निव्वळ आपमतलबाच्या होत्या. तेव्हांपासून पुढें त्याची पैशाची तारांबळ उडाली; आणि पैसा वेळेवर पाठवीत नाहीं, असा त्याजवर पेशव्यांचा आरोप आला. परंतु वसूल येत नव्हता, जिकडे तिकडे दंगेधोपे माजले, अब्दालीच्या स्वाऱ्यांनीं लोक फार हवालदील जाले, अशा स्थितींत शिंदेहोळकरां-सारख्यांची सुद्धां जर पैशाची ओढ नेहमीं असे, तर गोविंदपंताचीही तशीच असल्यास नवल नाहीं. असेच जबाब गोविंदपंतानें वारंवार दिले आहेत.

जनार्दनपंताची बायको सगुणाबाई काशीयात्रेस गेली असतां तिच्या खर्चास नव्वद हजार रुपये देण्याविषयीं पेशव्यानें गोविंदपंताकडे वरात केली. गोविंदपंत दक्षिणेंत गेला असून त्याचा मुलगा बाळाजी गोविंद कामावर होता, त्यानें ही वरात स्वीकारली नाहीं. सबब रघुनाथरावानें त्यास खालील खरमरीत पत्र ता. १३·३·५७ चें स्वारींतूनच लिहिलें [ खं. १·६० ]. 'ऐवज आह्मांकडे नाहीं, आह्मांस अनुकूळ न पडे, आह्मी सरकारचे चाकर नाहीं, गोविंद-पंताचे चाकर, याप्रमाणें नाना प्रकारच्या बयादा सांगितल्या. पंचवीस हजार रुपये दिले, बाकीचा ऐवज नाहीं ह्मणोन जाबसाल केला. ऐशास तुह्मीं ऐवज न दिला ही गोष्ट उत्तम न केली. तुह्मी मातबर मामलेदार,

हरप्रयत्न करून ऐवज यावा; न दिला ही फार वाईट गोष्ट केली. तर पत्र पावतांच बाकीचा पांसष्ट हजार ऐवज झांशीस बाईकडे पावता करणें. अंतर केल्यास खावंदाची परिछिन्न अवकृपा तुह्मांवर होईल.' उत्तर हिंदुस्थानांत धामधुमीमुळें वसूल होत नव्हता, ही गोष्ट पेशवे लक्षांत घेईनात, त्यामुळें सरदारांचें व त्यांचें बिनसत गेलें, याचा मासला वरील पत्रांत दिसतो.

गोविंदपंत दक्षिणेंत आला असतां, वाईनजीक कृष्णातीरीं सहस्रधारातीर्था-समीप श्रीवाकेश्वराचें प्राचीन स्थान होतें, त्याचा जीर्णोद्धार त्यानें करून बावधन गावांत देवासाठीं कांहीं इनाम जमीन करून घेतली ( ३·१४२ ). पेशव्यास भेटून दुसरीं काय काय कामें त्यानें केलीं, त्याचा उल्लेख सांपडत नाहीं. परंतु उत्तर हिंदुस्थानांतील एकंदर परिस्थिति पेशव्याचे कानावर घालून, तिकडील व्यवहारांची व्यवस्था लावण्यास काय केलें पाहिजे, हें त्यानें पेशव्यास स्पष्टपणें सांगितलें असावें. निदान अंताजी माणकेश्वर, हिंगणे व नारोशंकर वगैरे मंडळींना कैद करून आणण्यापर्यंत पेशव्याला पाळी आली, तसा कांहीं एक प्रकार गोविंदपंताचा झाला नाहीं, उलट त्याचा योग्य गौरव करून पेशव्यानें त्यास लवकरच परत आपल्या कामावर पाठविलें, आणि पानपत अखेरपर्यंत पेशव्याची व सदाशिवरावाची गोविंदपंतावर मोठी भिस्त होती, यावरून त्याचा कारभार त्यांस चांगला पसंत होता, असें ह्मणतां येतें. गोविंदपंत स. १७५७ च्या आरंभीं दक्षिणेंत आला, त्यापूर्वीच रघुनाथराव पुण्याहून निघून हिंदुस्थानांत माळव्याकडे गेला होता, तेव्हां रघुनाथरावाच्या नाकर्तेपणाबद्दल त्यानें विशेष तक्रारी पेशव्याजवळ केल्या नसाव्या. कारण तशी खात्री पेशव्याची पटती तर या वेळींच सदाशिवराव हिंदुस्थानांत आला असता. रघुनाथरावाच्या या लाहोरच्या स्वारींत मराठ्यांच्या बाजूनें अव्यवस्थेची व धांदलीची अगदीं कमाल झाली, हा प्रकार पुढें व्यक्त होईल. गोविंदपंताला हे प्रकार आवरण्याचें बिलकूल साधन नव्हतें आणि रघुनाथरावानेंही त्याला लगेच हिंदुस्थानांत बोलावून घेतलें.

# प्रकरण २८ वें.

## अब्दालीचा पाठलाग.

१ अब्दालीची तिसरी स्वारी.
२ रघुनाथरावाची लाहोरची स्वारी.
३ रघुनाथरावाचा दिल्लींत मुक्काम.
४ हिशेबाच्या भानगडी, शिंदे, हिंगणे, व अंताजी माणकेश्वर.
५ अटकेवरील झेंडे.

**१. अब्दालीची तिसरी स्वारी** ( १७५६ नोव्हें०—५७ एप्रिल ). स. १७५५ च्या पावसाळ्यांत, रघुनाथराव होळकरासह दक्षिणेंत आला. मागाहून शिंदे बदनक्ष होऊन १७५६ च्या अखेरीस आले, तेव्हां लगेच दिल्लींत मराठ्यांचे विरुद्ध प्रचंड कारस्थानें चालू झालीं. अंताजीपंत दिल्लीचे बंदोबस्तास होता. ता. ५:३·५६ रोजीं दीक्षित लिहितो. ' वजीर सुजाउद्दौला फरुखाबादेस आले. बरोबर हरिभक्त, पठाण, रोहिले सर्व आहेत. रोहिल्यांपासून साठ लाख घेऊन त्यांचा मुलूख निंमे हरिभक्तांस व निंमे पठाणास दिल्हा. काशीची सनद वजिरानें दिल्ही, तेथें गोपाळराव बर्वे दोन हजार फौज घेऊन जात आहेत. दामोदरपंत हिंगणे यांनीं काशींत तुला केली ' [ ३·४७१ ]. स. १७५६ च्या पावसाळ्यांत मराठ्यांच्या फौजा दिल्लींत नाहींतसे पाहून, विरुद्ध पक्षानें हिंवाळ्याच्या आरंभींच अब्दालीस हिंदुस्थानांत आणिलें. ही खटपट करणारा मुख्य इसम नजीबखान रोहिला होय. हा प्रथम मीरशहाबुद्दीनचे वशिल्यानें पुढें आला. मराठ्यांच्या साह्यानें शहाबुद्दीनानें बादशहास कबजांत घेऊन सर्व आटोप केला, हा प्रकार बादशहास व मलिकाजमानी वगैरे बायांस दुःसह होऊन, त्यांनीं नजीबखानास हाताशीं धरून शहाबुद्दीनचा पाडाव आरंभिला. नजीबखानाची जहागीर दुआबांत सहारणपुरचे समोंवार गंगानदीस लागून होती.

पंजाबचे कारभारावर मागील स्वारींत अब्दालीनें मीरमन्नूस नेमिलें होतें. स. १७५४ च्या जानेवारींत अब्दाली मुलतानपर्यंत येऊन परत गेला ( Tate ). स. १७५४ च्या अखेरीस मीरमन्नू लाहोरास एकाएकीं घोड्यावरून पडून मरण पावला. लगेच अब्दालीनें मीरमन्नूच्या अल्पवयी मुलाचे नांवानें लाहोर व मुलतान या दोन सुभ्यांचा अंमल नेमून कच्चा कारभार मुलाच्या विधवा आईकडे सांगितला; आणि तिच्या मदतीस अदिनाबेगची नेमणूक केली. परंतु तो अल्पवयी मुलगा मरण पावला आणि बाईवर तिचेच अधिकारी उठले. पंजाबांत गडबड होऊन शीख लोक एकएक प्रांत बळकावूं लागले. पंजाब जिंकून परत घेण्यास ही संधि चांगली आहे असें वाटून मीरशहाबुद्दीननें स. १७५६ च्या आरंभीं लाहोरकडे स्वारी केली. मीरमन्नूच्या मुलीशीं लग्न करण्याचें ठरवून त्यासंबंधांत त्यानें सासूशीं पत्रव्यवहार सुरू केला, आणि लग्नाचें निमित्त करून बाहेर पडला. बरोबर शहाजादा अलीगौहर होता. लुधियाना येथें अदिनाबेग पुढें येऊन या मंडळीस भेटला. त्याच्या साह्यानें मीरशहाबुद्दीननें लाहोरसमीप आल्यावर सय्यद जलालुद्दीनखान यास लग्नाच्या निमित्तानें पाठवून त्याजकडून मीरमन्नूची स्त्री व मुलगी यांस रात्रीं निजल्या ठिकाणींच पकडून आपल्याजवळ आणिलें. मीरशहाबुद्दीनचा हा विश्वासघात पाहून मीरमन्नूच्या विधवेस अत्यंत त्वेष आला. तिनें त्यास मनमुराद शिव्या दिल्या, आणि अशा कृत्यांनीं अब्दाली चिडून जाऊन तो हिंदुस्थानचा संहार करील असा शाप सुद्धां दिला. पुढें अलीगौहर यानें मध्यें पडून उभयतांची गोडी करून दिली; आणि मग मीरशहाबुद्दीननें मीरमन्नूच्या मुलीशीं लग्न लाविलें. पुढें तीस लाख रुपये घेण्याचें ठरवून पंजाबचा सुभा मीरशहाबुद्दीननें अदिनाबेगच्या हवालीं केला, आणि सर्व मंडळी परत दिल्लीस आली. मीरशहाबुद्दीन यास धाकटा गाजीउद्दीन असें म्हणतात, त्याच नांवानें पुढें या शहाबुद्दीनचा उल्लेख करण्यांत येईल.

इकडे या सर्व गोष्टींची खबर अब्दालीस आतच होती, त्यांत नजीबखान व मल्लिकाजमानी यांनीं भर घालून अब्दालीस हिंदुस्थानांत घेण्याचें पाचारण

केलें. पंजाबप्रांत हातचा गेला व आपण केलेली व्यवस्था मोडली, या गोष्टींनीं चिडून जाऊन अहमंदशहा अब्दाली स. १७५६ च्या नोव्हेंबरांत काबुलहून निघून डिसेंबरांत लाहोर हस्तगत करून स. १७५७ च्या जानेवारींत दिल्लीवर आला. तेथून पुढें आगऱ्यापावेतों येऊन व मथुरा लुटून, फौजेंत महामारीचा उपद्रव झाल्यामुळें एप्रिल महिन्यांत परत स्वदेशीं गेला.

भाऊसाहेबांच्या बखरींत मलिकाजमानी व गाजीउद्दीन यांचें कारस्थान नाटकी आविर्भावानें वर्णिलें आहे. दिल्लीजवळ यमुनानदीचे बेटांत सालीमगडच्या किल्ल्यांत मलिकाजमानी व चंदाजमानी वगैरे स्त्रिया जनानखान्यांत राहत होत्या. गाजीउद्दीन वजिराकडून ह्या स्त्रियांस खर्चास वगैरे भरपुर न मिळाल्यामुळें त्यांनीं नजीबखानास भेटीस बोलाविलें, आणि मराठ्यांचे हातीं सर्व सत्ता जाऊन, बादशाही बुडते, याचा विचार मोठ्या काकुळतीनें त्यास विचारितां त्यांनीं आणभाक करून, पूर्वी निजामुल्मुल्कनें ज्याप्रमाणें नादीरशहास आणिलें, त्याप्रमाणें अहंमदशहा अब्दालीस आणून त्याचे हातून मराठ्यांचा बंदोबस्त करावा, असा घाट रचिला. लखनौचा सुजाउदौला व मारवाडचा बिजेसिंग राठोड, यांजकडेही त्यानें संधान रचिलें. ' जयनगरचा माधवसिंग याचा दोंही डगरीवर हात असून, सुरजमल्ल जाठ तों आपला नव्हे. अब्दालीचा पुत्र तयमूरशहा ह्यास चंदाजमानी द्यावी, वजिरी सुजास देऊन बक्षीगिरी मजला द्यावी ' असें नजीबानें सुचविलें; आणि त्याप्रमाणें अंमलांत आणण्याचें ठरून, नजीबानें सर्व मंडळीकडे आपले हेर पाठविले; आणि आपला भाऊ सुलतानखान ह्यास अब्दालीकडे रवाना केलें. ह्या सर्व गोष्टी इतक्या गुप्त रीतीनें झाल्या कीं, गाजीउद्दीनास त्यांची वार्ताही कळली नाहीं. त्याप्रमाणें अब्दाली ऐशीं हजार फौजेनिशीं दिल्लीवर चालून आला. हिंगणे बंधु होळकरास लिहितात. 'स. १७५५ च्या नोव्हेंबरांत अब्दाली अटक उतरून मातबर फौजेसहित (ता. २० डिसेंबरास) लाहोरास दाखल होऊन, जलूस बहुतसा करून, जागजागीं आपले नायब रवाना केले, व करीत जातो. जमीदारही जाऊन भेटतात. अदिनाबेग, सदिलबेग, जमालुद्दीनखान हे त्रिवर्ग आधींच

सरकोम लाखीजंगकडे गेले. सन्मुख देखील न आले. सरहिंदेस बहादुरखां बेलाचांचा नायब लक्ष्मीनारायण होता, तोही माघारा आला. जंमूच्या राजानें झुंजाची तयारी केली आहे हें पठाणांनीं ऐकोन, त्याजवर दहा हजार फौज रवाना केली. जलालाबाद, अदिनानगर, नूरसाहाल, जालंधर या स्थळीं अब्दालियाचा अंमल जाला. जागाजागां सरदारांच्या नेमणुकी होत जातात. ब्यास व सतलज यांजमधला प्रदेश खोजे अब्दुल्ला यास दिधला. येथें कोणीं मर्द माणूस नाहीं, हेंही त्यास कळून चुकलें. मनुष्यमात्र आपले स्थळीं चिंताक्रान्त. त्यास एक धास्ती आपल्याकडील कीं मातबर फौजेनिशीं सुभेदार आल्याखेरीज राहणार नाहींत. दिल्लीवाले कितेक सरदार त्यासीं भेटले आहेत. अंताजी माणकेश्वर ता. ३१ डिसेंबरास येथें येऊन दाखल जाले. ३ जानेवारीस त्यांची मुलजमत झाली. विना आपली स्वारी या प्रांतीं येत नाहीं तों कालपर्यंत, हिंदुस्थानचा बंदोबस्त होत नाहीं व अबरू व सल्तनत राहत नाहीं. वजिरांनीं वस्त्रें भूषणें पाठवून त्याचा शिष्टाचार चालविला आहे. हिंदुस्थानावर फिरोन न यावें ऐसे करार मदार झाले असतां, बदमामली करून हिंदुस्थानची मोहीम करूं इच्छितां, हें तुम्हांस विहित नाहीं, अतःपर माघारें फिरोन जावें, ऐसा बोध त्याचा वजीर शहावलीस बोलावून केला. समशेरबहादरास पाचारिलें आहे. मातबर दक्षणी फौज आलियानंतर बाहेर निघणार.' ( २०·१·३७५७, ६·३६५ ).[1] यानंतर दुसरे दिवशीं अंताजी माणकेश्वर पेशव्यास लिहितो. 'अब्दाली लाहोर घेऊन दिल्लीस दाखल झाला. दिल्लींतील फौज, नजीबखान वगैरे सरदार, बापूजी महादेव वकील वगैरे मिळोन, अगोदर सहा कोस दिल्ली राहतां, जाऊन भेटले. आम्ही पुढें सडे-स्वारीनिशीं गेलों. दोन लढाई मातबर जाहल्या. परंतु फौज त्याची भारी, तीस कोस नित्य घोडा धावतो. दिल्लींतील फौज त्यास सामील. पातशहा वजिरापाशीं चार हजार स्वार राहिले नाहींत. एक आमची फौज बारा हजार मात्र. त्यापैकीं हिंदुस्तानची चार हजार ती दळाची शोभा. वरकड आठ हजार

१. टीपः—पत्रांतील तारखा सुगम समजुतीकरितां इंग्रजी दिल्या आहेत.

देशची. सारा पेंच आह्मावरी पडला, तेंव्हां आम्ही कूच करून फरिदाबादेस आलों. बारा कोस फौजेनें आमचा पाठलाग केला. वजीर त्यांस भेटले. त्यानीं नजरबंद केलें. दिल्लीस द्वाही त्याची फिरली. पातशहा किल्यांत स्वाधीन आहेत. हिंदूंचे पूर्ण द्वेषी. दिल्लींतील फितुऱ्यांसुद्धां लाख स्वार त्याजकडे जमा जाला. सुरजमल्लाकडे वरचेवरी पत्र पाठवितो. पातशहा रात्रंदिवस ह्मणे कीं, हे पातशहात बाळाजी रायाची आहे. त्याचे सरदारांस सत्वर बोलावून हें काम सिद्धीस नेणें. आमचे घरांत कवडी नाहीं. आह्मांजवळ राहिला मुलूख आहे तोही घेणें. त्यास आह्मी आपले प्रयत्न बहुत केले. समशेरबहादरांस नारोशंकर हरोळ जाले आहेत. वकिलांकडे निराळा जाबसाल लाविला, आणि समशेरबहादरांस ग्वालेरीसच गोवून, आमचे सरंजाम लुट्टून सत्यानाश करविला. इकडे येऊं दिल्हें नाहीं. आपण आला नाहीं. नारोशंकरांनीं नामर्दीकरून जो घात केला, तो त्याची शिरच्छेदच करावासा केला. हे बापू वकील मात्रागमनी. दिल्लींतून दामोदर महादेव तिघे भाऊ कबिले, पैका, हत्ती, खजाना, भारी घेऊन पळून गेले. एक बापू व त्याची कलावंतीण सडी दिल्लींत आहे. आतां मोठी आशा आह्मांस दोन. नादीरशहाप्रमाणें मागती हेच पातशहा व वजीर स्थापून माघारा गेला, तरी महाल पाया कायम होईल. याजकरितां मरत फिरतों. नाहीं तरी पातशहा वजिराचेंच वाईट जालें तरी आमची सरकारची मुलुखाची अंमल झाडून उठेल. त्याची कांहीं तजवीज जाठ व आपण मिळोन करावी, ह्या दोहों कामासाठीं दिल्ली भोंवतीं फिरतों. नाहीं तर तमाम राजे अमीर शंभर कोस पळाले, धरणीकंप जाला, तेथें आमची कथा काय? अब्दालीशीं तीन झुंजें आमचीं मात्र जालीं. राजे माधोसिंग व बिजेसिंग परिच्छिन्न अब्दालीच्या पक्षांत, दक्षिणीयांपासून मुलूख सोडविणार त्याच संमतांत बापू वकील. बुदस्तां कर्जे घेऊन आह्मीं काम केलें. सालमजकुरीं गोविंद बल्लाळ देशीं गेले. त्यांच्या पुत्रांनीं कवडी न दिली. याउपरी श्रीमंतांनीं माझे श्रमावरी कांहीं तरी दृष्टि द्यावी. बापू वकील सर्वथा लबाड आहे. सुरजमल्लाचें अवसान

ठिकाणीं नाहीं. नारोशंकर परम दुष्ट, सारे मिळोन अंतर्वेद राखावयासी येतील तऱ्ही उत्तम, नाहीं तर कांहीं बरें नाहीं ' ( इ. सं. ऐ. टि. २·३१ ). ता. २८ जानेवारीस दिल्ली हस्तगत करून अब्दालीनें बादशाहीपद धारण केलें. ( Imp. Gaz. )

अब्दाली दिल्लीवर येऊं लागला, तेव्हां वजीर गाजीउद्दीनास मोठी चिंता उत्पन्न झाली. नजीबखान व अंताजी हे दोघेच काय ते थोडीं बहुत फौज बाळगून त्याजपाशीं होते. त्यांस सल्ला विचारतां नजीबखान अब्दालीवर म्हणून चालून गेला, तो लबाडी करून तिकडे अब्दालीसच जाऊन मिळाला. आपला एवढा भरंवशाचा हस्तक शत्रूस मिळालेला पाहून, गाजी फार घाबरून गेला आणि अंताजीपंतास बोलावून त्याजकरवीं त्यानें दिल्लीचा थोडा बहुत बंदोबस्त करविला. इतक्यांत अब्दाली येऊन पोंचला. ता. २८ जानेवारी रोजीं त्यानें आलमगीर पातशहाची भेट घेतली. अंताजी पराभव पावून पळून गेला. पुढें शहरांत कांहीं गडबड झालेली ऐकून अब्दालीनें कत्तल करण्याचा हुकूम दिला. साडेतीन घटकांत अठरा हजार मनुष्यांची कत्तल झाली. शहराचा चिंधीचोळा करून दोचौं रोजांत त्यानें दिल्लीचा किल्लाही हस्तगत केला. मलिकाजमानी अब्दालीस सामील होती. बादशहाचा भाऊ अज्जुद्दीन याची मुलगी होती, तिचें लग्न अब्दालीनें आपला मुलगा तयमूरशहा याजबरोबर केलें [ एल्यट पृ. ८·२६७ ], आणि आलमगीर यास किल्ल्यांतच कैद करून ठेविलें. तसेंच मीरशहाबुद्दीन यासही कैद करून आपल्याबरोबर घेऊन, एक महिना दिल्लींत काढल्यावर, तो दक्षिणेस जाटाचा मुलूख लुटण्यासाठीं निघाला. मीरशहाबुद्दीनचा शिरच्छेद करावा म्हणून नजीबखानानें पुष्कळच आग्रह केला, परंतु अब्दालीनें ती गोष्ट मानली नाहीं. रस्त्यांत जाटाचा बाल्लमगड किल्ला हस्तगत करून प्रांतांतील फौजेची कत्तल उडविली. नंतर पुढें जातांना हिंदूंचें पवित्र स्थान मथुरा आलें, त्याजवर त्यानें जहानखानाचे हाताखालीं मोठी फौज रवाना केली. हें ठिकाण मराठ्यांनीं नुकतेंच हस्तगत केल्यामुळें त्यांचा अंमल उठवून देण्याचा अब्दालीचा मुख्य उद्देश होता.

दिल्लीहून कृष्ण जोशी लिहितो. 'पठाण दिल्लींत येऊन अमिरांचे घरावर चौक्या बसवून कुल द्रव्य घेऊन रयतीस उपद्रव फार दिला. तीस कोट वित्त जमा करून पुत्रासमागमें लाहोरावरून आपल्या देशास रवाना केलें. पुढें दिल्लींतून बाहेर निघून बाल्लभगडाजवळ आले. तेथून कुच केलें ते मथुरेजवळ गेले. आंत पांच हजार जाठ होते त्यांनीं युद्ध उत्तम प्रकारें घेतलें. परंतु पठाण भारी, कटून मेले; आणि दोन हजार जाठ पळून गेले. मथुरेंत दीड प्रहर लूट झाली. पंचवीस लक्ष वित्त घेऊन मथुरेहून फौज गोकुळ वृंदावनास आली. तेथें बैरागी दोन चार हजार नागे जमा होऊन युद्ध घेतलें. दोन हजार बैरागी व दोन हजार पठाण लढून मेले. गोकुळनाथ बचावले. तेथून पठाण कूच करून आगरियाजळ आला. किल्ल्यास मोर्चे लावून किल्ला हस्तगत केला. गाजुद्दीनखान किल्ल्यावर जाऊन किल्ला घेतला. शहरांत द्वाही पातशहाची फिरविली. तेथून पठाण आठ कोस पुढें आला. सर्व रैयत पळून नारो शंकर व समशेर बहाद्दर यांचे लष्करांत आले. पठाण आगऱ्यास आल्याचें समजतांच या मराठे फौजा कूच करून झांशीच्या रोखें आल्या. समागमें रयत आली होती ती याच उभयतांनीं लुटून घेतली. मोठा विश्वासघात केला. पंचवीस लक्षांचें वित्त घेतलें. पठाणाचा नायब दिल्लींत आहे. माळव्यांत दक्षिणेंत येणार. जाठ आपल्या गर्डांत भयभीत आहे. दादासा० व होळकर जावदे[1] जवळ आहेत. लाख रुपये खंडणी घेतली. जावद परगणा व राणीखेडा लुटून फस्त केले. दहा बारांचें वित्त मिळालें. तेथेंच मुक्काम करून आहेत. समागमें फौज चाळीस हजार आहे. जर पठाण झांशीस आला तर कठीण आहे. त्याजवर प्रस्तुत कोणीं जावें असें दिसत नाहीं. अंताजी माणकेश्वरानें लढाई चांगली घेतली; आपलीशी करून पळून आले. अंताजीपुत्र पडला, परंतु पठाणास हात चांगला दाखविला. बापूजीपंत वकील दिल्लीहून मथुरेस व तेथोन नारोशंकरचे लष्करांत आले. त्यांचे बंधु दामोदर महादेव झांशीस होते. कांहीं भ्रम झाला होता, त्यांचा काळ जाहला. श्रीमंत नानासाहेब आऊन पठाणाचें

१. टीपः—जावद उदेपूरच्या पूर्वेस सुमारें ७५ मैल.

वारपत्य करतील तर उत्तम आहे, नाहीं तर पठाण माळव्यांत आला तर बहुत खराबी आहे. पुढें जें श्रीस कर्तव्य असेल तें होईल.' ( ३·४·१७५७, १·६२ ). गाजीउद्दीन अब्दालीचे कैदेंतून मथुरा येथून यमुनेंत उडी टाकून पोहत पळून आग्र्यास गेला अशी हकीगत सांपडते. म्हणूनच अब्दाली आगऱ्यावर आला. आगऱ्याचा किल्ला मजबूद व समृद्ध होता. तेथील किल्लेदारानें वजिरास आंत घेतलें. वजीर पळाल्याची बातमी कळतांच अब्दाली आगऱ्यावर आला. परंतु किल्लेदारानें तोफा व बंदुका यांचा विलक्षण मारा करून त्यास परत फिरविलें. तों मार्च महिना संपत येऊन, रघुनाथराव व मल्हारराव होळकर दक्षिणेंतून चालून येतात, अशी बातमी येतांच अब्दाली परत फिरला. प्रथम जाठावर हल्ला करण्याकरितां तो कुंभेरीकडे चालला. तेव्हां सुरजमल्ल जाठानें दहा लक्ष खंडणी भरून त्याची समजूत केली. पुढें उष्णतेनें व महामारीनें त्याच्या लोकांचे हाल होऊं लागल्यामुळें त्यानें परत फिरण्याचा निश्चय केला. मिळालेली लूट देशीं पोंचविण्यास त्याचे लोक अत्यंत उतावीळ झाल्यानें त्यास परत फिरणें भाग पडलें. ता. १६·३·५७ रोजीं पेशवा लिहितो, ' समशेर बहादर, नारोशंकर, अंताजी माणकेश्वर, जाट वगैरे एक करून अब्दालीस ठांसून राखणें. पैसे घेऊं न देणें. दादा व मल्हारबा मातबर फौजेनें तिकडे येतच आहेत. (६·३६७-६८). परंतु हे दोघे त्वरेनें पुढें चालून आले नाहींत. अब्दाली जरा एकाएकींच परत स्वदेशीं गेला. मग महामारीनें त्याचे लोक अस्वस्थ झाले म्हणून तो गेला असो, अथवा मराठे चालून येतात, त्यांजबरोबर सामना टाळण्यासाठीं गेला असो. चैत्रपर्यंत म्हणजे ता. १८ एप्रिल पावेतों अब्दाली मथुरेवर होता. [ १·७० ]. फेब्रुवारींत रघुनाथराव इंदुरास आला, आणि तसाच जोर करून होळकरासह तो लगेच पुढें आला असता तर मार्च एप्रिलांत अब्दालीस गांठून त्यांनीं त्यास साफ बुडविलें असतें. या वेळीं सदाशिवराव किंवा दत्ताजी शिंदे असता तर ही गोष्ट त्यांनीं तात्काळ केली असती; परंतु रजपुतांकडील नसतीं लफडीं अंगावर घेऊन चार महिने रघुनाथरावानें फुकट घालविले, आणि

अब्दाली निघून गेल्यावर वरातीमागून हें राघोबाहोळकरांचें घोडें दिल्लींत मिरवत आलें. ‘ राघो भरारी ’ व ‘ होळकराची पोळ्यात्रा ’ या शब्दांचा अर्थ एकच असून, त्यांनींच कित्येक राष्ट्रसेवेचे प्रसंग फुकट घालविले आहेत.

परत जातेवेळीं जवळजवळ एक महिना अब्दाली दिल्लींत होता. मलिका-जमानीच्या आग्रहास्तव त्यानें तिची मुलगी चंदा-जमानी हिच्याशीं स्वतःचें लग्न केलें. [ एल्यट पु. ८ ]. ह्या लग्नाच्या योगानें मराठ्यांचे विरुद्ध लढून अब्दाली बादशाहीचें संरक्षण करील अशी या मंडळीची अटकळ होती. गाजीउद्दीन आगऱ्याहून अंतर्वेदींत फर्रुखाबादेस जाऊन अब्दालीच्या प्रतीकाराचा थोडा बहुत यत्न करीत होता, ( एल्यट पु. ८ ). त्यास अब्दालीनें आश्वासन देऊन भेटीस बोलाविलें. कारण नजीबाचे भरंवशावर राहिल्यास आपला सर्वस्वी घात होईल अशी त्याची खात्री झाली. पुढें दिल्लीस जसा तसा तात्पुरता बंदोबस्त त्यानें केला. म्हणजे गाजीउद्दीन यास वजिरी दिली, नजीबखाना-जवळ पांच हजार फौज ठेवून, व अमीर-उल्-उमराव असा किताब देऊन त्याजकडे बादशहाचे बंदोबस्ताचें काम नेमिलें. अशा रीतीनें ह्या दोघांच्या ओढाताणींत आपलें वजन कायम राहील अशी अब्दालीची योग्य अटकळ होती. ता.२७ मार्चला दिल्ली सोडल्यावर अब्दुस्समदखानास त्यानें सरहिंद येथें दहा हजार फौजेनिशीं ठेवून, लाहोरास तयमूरशहा व जहानखान यांची स्थापना केली. अदिनाबेगास त्यानें प्रथम घालवून दिलें, परंतु पुढें त्यानेंही त्यांची मदत करण्याचें कबूल केलें. अशी व्यवस्था करून अब्दाली आपले राज्यांत निघून गेला.

सुजाउद्दौल्यास वजिरात द्यावी, आणि तयमूरशहास तख्तावर बसवावें, ह्या दोन गोष्टी अब्दालीच्या पूर्व उद्देशांपैकीं राहिल्या, त्या त्यानें जाण्यापूर्वी पूर्ण कराव्या, असें नजीबाचे मनांत होतें; परंतु मोगल पातशाही मोडून ही पठाण पातशाही व्हावी या संबंधानें अब्दालीचा निश्चय होईना. त्यास नजीबखा-नाचा विश्वास पटेना आणि हीं राहिलेलीं कामें पुढाल वर्षी पुनः येऊन पुरीं करूं, असें सांगून तूर्त त्यानें वेळ मारून नेली.

**२. रघुनाथरावाची लाहोरची स्वारी**(नोव्हें० १७५६–आक्टो०५७).– सन १७५६ सालच्या नोव्हेंबरांत अब्दाली काबुलाहून इकडे येण्यास निघाला, त्याच वेळीं रघुनाथराव व होळकर दक्षिणेंतून दिल्लीवर जाण्यास निघाले. त्यांजबरोबर कारभारी सखारामपंत बोकील व जनार्दन बल्लाळ ऊ० बाबा फडणीस हे होते. ह्या फडणिसाचा काळ स्वारींत झाला. [ का. सं. श. पृ. १६ ]. त्याचा पुत्र बाळाजी ऊर्फ नाना फडणीस यास फडणिशीचीं वस्त्रें २९·११·१७५६ रोजीं मिळालीं; म्हणजे बहुधा त्याच दिवशीं रघुनाथराव स्वारीस निघाला असावा. [ रा. श. पृ. १४२ ]. चिंतो विठ्ठल रायरीकर व महिपतराव चिटणीस, हेही स्वारी बरोबर होते. फौज फारशी मोठी नव्हती. शिंद्यांचें व होळकरांचें पटत नव्हतें. दत्ताजी व जनकोजी नुकतेच रजपुतान्यांतून भागून आलेले असल्यामुळें त्यांस लगेच पुनः पेशव्यानें स्वारीस पाठविलें नाहीं. शिवाय त्या स्वारीचे हिशेबाची भानगडही पेशवे शिंद्यांमध्यें तुटत होती, त्याचा उल्लेख पुढें येणार आहे. सारांश, एप्रिल पावेतों दिल्लीचे बाजूस राहून आणि अलीकडच्या प्रदेशांत धुमाकूळ उडवून अब्दाली परत गेला, तरी मे अखेरपावेतों रघुनाथराव दिल्लीस पोंचला नाहीं. यास कारणें काय असतील तीं असोत. रघुनाथरावाजवळ फौज फारशी नव्हती. फौजेची जमवाजमव करीत त्यास जावयाचें होतें. शिवाय त्याजवळ पैसाही नव्हता. मराठ्यांची नेहमींचीच चाल कीं बाहेरचा पैसा बाहेर काढावयाचा. ही एक अडचण खरीच, परंतु त्यांतूनही रघुनाथरावाचे अंगीं तडफ असती तर त्यानें अब्दालीला तेव्हांच गांठलें असतें, परंतु मल्हाररावास अब्दाली पुढें जाण्याचें धैर्य नव्हतें किंवा इच्छा नव्हती, म्हणून हजार लचांडें काढून त्यानें रस्त्यांत उशीर लाविला. मल्हाररावाचा हा नेहमींचाच खेळ असून, रघुनाथराव कधींच स्वयंप्रकाश नसल्यामुळें दोन वर्षांच्या ह्या मोठ्या स्वारींत कांहींच लभ्यांश झाला नाहीं. परंतु आश्चर्याची गोष्ट अशी कीं, उत्तरेंतील गोंधळ दृष्टीसमोर असतां, पैशाशिवाय व फौजेशिवाय भावासच अब्दालीवर रवाना करून स्वतः पेशवा स. १७५७ चे आरंभीं श्रीरंगपट्टणचे स्वारीस निघून गेला.

सदाशिवराव व इतर मुख्य सरदारही तिकडेच गेले.

चाळीस वर्षे उद्योग करणारे मराठे, काबुलाहून चालून येणाऱ्या अब्दालीस इतके भितात, याचा अर्थच समजत नाहीं. आपल्या घरापासून तो इतका दूर व मराठे आपल्या घरांत, व्यवस्थेनें व एक जुटीनें ते वागते तर अब्दालीची पुढें येण्याची प्राज्ञा नव्हती. याच धारणेनें पुढें सदाशिवराव त्याजवर चालून गेला आणि 'अब्दालीचें कांपरें तुह्मांस इतकें कां भरलें" असें टोंचून मल्हाररावास बोलला. दामोदर महादेव स. १७५७ चे फेब्रुवारांत मरण पावला; आणि पुढें रघुनाथराव व मल्हारराव अब्दालीचा रोख सोडून पश्चिमेस रजपुतान्यांत शिरले. अडचणीच्या प्रसंगांत मराठ्यांस प्रथम लूट सुचे, यावरून पळपुटे ह्मणून त्यांस नांव मिळालें तें खोटें नाहीं असें वाटूं लागतें. सर्व मिळून अब्दालीवर एकदम चालून जाते तर दिल्ली कायमची सुटली असती, पण त्यास तशाच निश्चयाचा सेनापति पाहिजे होता. रघुनाथराव किंवा मल्हारराव यांचे हातून हें काम होणारें नव्हतें.

ता. १६-२-१७५७ रोजीं रघुनाथराव इंदुरास पोंचला. होळकर अगोदरच पुढें गेला होता. 'आजी इंदुरास आलों. होळकरांची भेट जाली. पुढें दरमजल दिल्लीस जात असों. अब्दाली दिल्लीस आला यास्तव चहूंकडून राजे व जमीनदार व गांवडे लोकांच्या नजरा फिरल्या. सांप्रत एखादा मनसुबा करून मुलख अथवा रुपये मिळवावयाची सोय दिसत नाहीं. अब्दालीचें पारिपत्य होईल तेव्हांच वरकड दबतील. त्याचें पारिपत्य करावें तरी फौज अद्यापि जमा जाहली नाहीं. आह्मी, विठ्ठल शिवदेव, मल्हारबा, समशेरबहादर, अंताजी माणकेश्वर, नारोशंकर मिळोन पंधरा सतरा हजार फौज आहे. ज्यास्त फौज न आलिया जातां येत नाहीं. रुपये पावावयास दिवस लागले. महिना दीड महिन्यांत पोंहचतील. जर अब्दाली दिल्लीस राहिला अथवा अलीकडे आला, तर गांठ पडेल. तमाम राजे व सुजाउद्दौला वगैरे सर्वांचीं राजकारणें त्याजपाशीं आहेत. जाठ तर झुंजूं लागला. सांप्रत मनसुबा भारी आहे. फौजही त्याची भारी आहे. करार शिपाई आहे. पारसनाम

मागें सामान असावें. यास्तव जर दतबाची रवानगी इकडे लवकर जाहली तरी अमाव लवकर पडेल' [ १·५२ ]. म्हणजे शिंदे आल्याशिवाय पुढें पाऊल घालण्यास मल्हारराव कितीं तयार होता, हें यावरून दिसतें. शिंद्यांनीं मात्र मल्हाररावाच्या मदतीची अपेक्षा कोणत्याही प्रसंगांत ठेवलेली नाहीं. 'बिजेसिंग माधोसिंग यांचे वकील नेहमींच त्याजपाशीं आहेत. फौजा जमा व्हावयास फाल्गुन अखेर लागेल. तूर्त जयनगरचे रोखें जात आहों. तिकडे होऊन गांठ घालावी हा विचार आहे. ● गोष्ट तूर्त सर्व प्रकारें भारीच आहे. आपली फौज बेदील हें आपणास विदितच आहे.' हें दीर्घसूत्री मल्हारराव याचें त्याच तारखेचें पत्र रडत राऊत घोड्यावर बसविल्याप्रमाणें भासतें. मराठे व अब्दालीचे पठाण यांचा सामना कोणत्या स्वरूपांत होणार हें यावरून सहज अनुमानितां येतें. मराठ्यांस हिंदुपद पातशाहीचा हा एक खेळच वाटत असावा. ता.१६ फेब्रुवारीस पुनः रघुनाथराव तेंच रडगाणें सदाशिवरावास लिहितो. 'ईश्वरी दया व स्वामीचा प्रताप' एवढ्यावरच त्याची भिस्त होती. 'फौज आमची फार करून आली नाहीं, मल्हारबाची मुदलीच थोडी आहे. दत्ताजी शिंदे, जानोजी व मुधोजी भोसले व गोविंद बल्लाळ वगैरे लहान थोरांची रवानगी सत्वर करावी. होळकर व शिंदे उत्तरेत बरोबरीचे सरदार असतां, होळकराची फौज एवढी थोडी कां! याचें उत्तर इतकेंच कीं, होळकर आंतल्या गांठीचा व दोरंजड होता, पैसा राखून होता. त्यास जाब विचारण्याची शक्ति पेशव्याचे अंगीं या वेळीं नव्हती. पुढें माधव-राव पेशव्यानें हा जाब त्यास विचारला. 'आपल्या मुलखांतील चौकशीचा मजकूर मनांत आहे. परंतु हा मनसुबा शेवटास नेल्याखेरीज आमचे विचारें कोणास दुखवूं नये. अब्दालीचें पारपत्य झाल्यावर नारोशंकरची चौकशी करूं' ( १·५४ ). 'लक्ष्मण शंकर पुरते लबाड ठरले. सबब त्यांची जप्ती करून जें सांपडेल तें बांधणें, म्हणोन आज्ञा, त्याप्रमाणें नर्मदेचे तळावरूनच जप्ती केली. परंतु त्यांचें सामान व घोडीं नारोशंकरपाशीं आहेत' [ १·५९ ]. नागपूरकर भोसले, नारोशंकर वगैरे सरदार पेशव्याशीं अनुरक्त नसून स्वतंत्र

पंथ पत्करात होते; आणि त्यांस एका लगामीं ठेवणें पेशव्यास अवघड पडूं लागलें होतें. ता. ११ जूनचे सुमारास रघुनाथराव दिल्लीचे बाजूस पोंचला असें १·६६ वरून दिसतें. तेथें बिजेसिंगाचे वकील येऊन भेटले आणि शिंद्यांची व आपली गोडी करून द्यावी, रामसिंगास राज्य देऊं नये, असें पुनः त्यांनीं बोलणें लाविलें; आणि मल्हाररावाचे मध्यस्थीनें रघुनाथरावानें त्यांत मन घातलें. म्हणजे दोन वर्षे शिंद्यांनीं विलक्षण खटाटोप करून मिळविलेलें यश नाहींसें करून टाकण्याचा प्रसंग या दोघांनीं आणिला. 'आम्हीं सांगूं तें बिजेसिंग ऐकणार व दत्तबानींही ऐकावें. लटका कज्जा कशास करावा? दत्तबानीं मात्र ओढून धरूं नये. ओढून धरल्यास पुनः खर्चाखालीं येतील. दोघांचा सलूख व्हावा हें उत्तम,' असें रघुनाथरावानें पेशव्यास कळविलें. होळकराचा विघातक भाव खालील पत्रांत व्यक्त होतो. 'अब्दाली दिल्लीहून माघारा गेला, तेव्हांच आम्ही मल्हारबास म्हणत गेलों कीं, माधव-सिंगाची मामलत कशीबशीं विल्हेस लावून दिल्ली व लाहोर दोनही सुभे जप्त करा. परंतु यांणीं लटकींच लचांडें काढून तीन महिने लांबविले. आम्हांस भक्षावयास नाहीं, कर्जही न मिळे ऐसें झालें. संप्रत मल्हारबाशिवाय मामलत माधवसिंगाशीं जी साधेल ती करून पुढें जाणार. येथील कारभार ओढला: लटकींच लचांडें फार काढावीं. तपशील फारच आहेत. स्वभाव ( मल्हारबाचा ) स्वामींस वाकीफ आहेच. स्वामींनीं फिकीर न करावी' [१·६७]. म्हणजे बिजेसिंग व माधवसिंग यांच्यासंबंधानें नसतीं लचांडें उपस्थित करून व पूर्वी झालेले निकाल पुनरपि जरूर नसतां उकरून काढून, मल्हाररावानें राज्यघात सुरू केला; आणि रघुनाथरावाबरोबर न जातां तीन महिने फुकट घालविले. यावरून होळकराचा भाव व्यक्त होतो. रघुनाथरावानें पुढें केलेला उद्योग असा. 'आमची फौज चैत्र वैशाखांत आली व चैत्रपर्यंत अब्दाली मथुरेवर होता, यामुळें आम्हांस एखादा मनसुबा करावयास न फावलें. अंतर्वेदींतील उठलेला अंमल बसविण्याकरितां सखाराम भगवंत, विठ्ठल शिवदेव, अंताजीपंत, व गंगाधर यशवंत ऐसे वीस हजार फौजेसह

अंतर्वेदींत पाठवून बंदोबस्त केला. वैशाख व ज्येष्ठ दोन महिने आह्मांस रिकामे सांपडले. त्यांमध्यें पहिली गडबड वारली; जयपुरचे ११ लक्ष घेतले. आह्मांस रुपयांची ओढ भारी आहे. स्वामींनीं ऐवज देववावा.' [१·७०, १२·७·१७५७]. 'अब्दाली मार्गशीर्ष पौषांत आला, तरी मनसुबा भारीच आहे. दत्ताजी शिंद्यांची रवानगी करावी; कारण अब्दाली न आला तरी काशी बंगाला ये प्रांतीं स्वारी केलियास चार रुपये आकारतील. कपाळ स्वामींचें थोर आहे, प्रबल आमचा आहे, वरकड हिंदुस्थानांत कोठें जीव दिमत नाहीं. जाठांत जीव आहे, पण मोठा काबूकार आहे. दोन महिने माधवसिंगाचें प्रकरण चाललें आहे. मल्हारबा न ऐकत. लटके आपले घराऊ हिशेब काढून मामलत न करीत. आह्मांस कर्ज देखील भक्षावयास न मिळे. राज गांव मारून खावे, मुंजल्याखेरीज दाणा नाहीं, रुपया नाहीं, कर्जही न मिळे. तेव्हां आह्मीं मल्हारबास टाकून मामलत रगडून केली. कष्टी जाले. अकरांपैकीं सहा लक्ष आले, त्यांपैकीं त्याची वांटणी दोन लक्ष देणें पडली. सारांश, मल्हारबा ज्या त्या कारभारांत ओढतात. आह्मी सोसितों. पुढें समजावीसही करूं. दत्तबा आलियानें परस्पर वर्म असतें, यामुळें ओढणार नाहीं. **आपल्यांत दुही पडते, तेव्हां शत्रूंचें बळ फावतें.** ऐसे हजारों पेंच होतात, ते कोठवर लिह्यावे. संक्षिप्त लिहिले आहेत, [१२·७·१७५७, १·७१]. या प्रत्यक्ष रघुनाथरावाच्या लिहिण्यावरून मल्हारराव होळकराच्या वर्तनाची कल्पना चांगली होते. प्रसिद्ध झालेले हे सर्व लेख योग्य संदर्भानें वाचले म्हणजे प्रत्येक इसमाच्या कर्तृत्वाचा अंदाज होऊन जातो. मल्हाररावाप्रमाणेंच, हिंगणे, अंताजी, नारोशंकर वगैरे कित्येक गृहस्थ मनलबी व थोडें बहुत राज्य विघातक वर्तन करीत होते, त्यांचा बंदोबस्त अल्पवयस्क रघुनाथरावाचे हातून होणें शक्य नव्हतें. तें काम पेशवा स्वतःच करूं शकला. जून व जुलई हे दोन महिने रघुनाथरावाचे माधवसिंगाचे प्रकरणांत गेले. 'तूर्त आम्ही दिल्लीस श्रीमंतांचे लष्करीं आहों. दादास्वामी जयनगरास होते तेही एक दोन रोजां दिल्लीस येतील,' [१·७२].

एकंदरींत पैसा व अव्यवस्था ह्या दोन मुख्य अडचणी मराठ्यांच्या होत्या. वर जो प्रकार वर्णिला आहे, तोच बहुतेक पानपतअखेर म्हणजे पुढें चार वर्षें चालला.

३. **रघुनाथरावाचा दिल्लींत मुक्काम** (जुलई१७५७-मार्च ५८).- स. १७५७ च्या ३० एप्रिलचें व २ मेचें वर्तमान. 'अब्दाली दिल्लीपलीकडे गेला. गाजुद्दीन अंतर्वेदींत रोहिल्यांसीं मिळोन आहे. दोन शहाजादे समागमें आहेत. नजीबखान दिल्लीस आहे,' असें वर्तमान होळकरास हिंगण्यानें कळविलें, त्यावर होळकर लिहितो, 'जयपुरचे मामलतीमुळें गुंता जाला आहे. येथील निर्गम करून सत्वरीच त्या प्रांतें येत असों' (६·५७७). 'अब्दाली दरमजल लाहोराकडे गेला. गाजुद्दीन व अहंमदखान बंगश मैनपुरीवर एकत्र होते. तेथून पत्रें आलीं कीं सांप्रत एक जण सत्वर येणें. त्याप्रमाणें येतों. पातशहाशीं व वजिराशीं चित्तशुद्धि नाहीं. पातशहानीं नजीबखानाकडून फौज ठेविली आहे, त्यांजकडून वजिरास शिक्षा करणार असा रंग दिसतो. जयपुरचा गुंता उरकून जलदीनेंच येत असों,' असें मल्हारराव हिंगण्यांस लिहितो, (३०·४·१७५७, ६·५७८). या वेळीं नजीबखान दिल्लींत प्रबळ होऊन, त्याचा पाडाव करण्याचा उद्योग मीरशहाबुद्दीन करीत होता; आणि त्यासाठीं होळकर व रघुनाथराव यांस वारंवार पत्रें पाठवून, तुह्मीं त्वरा करून आमचे साह्यास यावें असें तो लिहित होता. ते येऊन दाखल होतांच त्यांनीं मीरशहाबुद्दीनास अंतर्वेदींतून काढून आपल्याबरोबर घेतलें आणि नंतर दिल्लीवर चाल करून एक महिन्यांत किल्ला आपल्या ताब्यांत घेतला. मीरशहाबुद्दीननें नजिबाची वकीलगिरी काढून ती लगेच अहंमदखान बंगश यास दिली. बादशहा व नजीबखान मराठ्यांचे हातांत सांपडले. शहाजादा अलीगोहर यास मात्र बादशहानें युक्तीनें दूर ठिकाणीं बचावासाठीं पाठवून दिलें. हे प्रकार स. १७५७ च्या जुलई ऑगस्टांत झाले. अब्दाली गेल्यावर दिल्लीचा बंदोबस्त नजीबखान करीत होता. इतक्यांत रघुनाथरावानें मीरशहाबुद्दीनचे संमतीनें विठ्ठल शिवदेवास दिल्ली कारभार करण्याकरितां

पाठविलें. पंधरा दिवस नजीबखान झुंजला. शेवटीं विठ्ठल शिवदेवानें सर्वांस पकडून दिल्लीचा कबजा घेतला. त्यानंतर तेथेंच मराठ्यांच्या फौजा कित्येक महिने तळ देऊन राहिल्या. विठ्ठल शिवदेवास बादशहाकडून पोषाख, जवाहीर व उमदेतुल्मुल्क हा किताब आणि चांदवड तालुक्यांत जहागीर मिळाली. या वेळीं नजीबखान रघुनाथरावाचे कबजांत सांपडला असतां, यास मारून टाकावा, जिवंत ठेविल्यास नाहीं नाहीं त्या उलाढाली करून हा आपला नाश करील, अशी पुष्कळांनीं त्यास सल्ला दिली. आतां आपण जिवंत सुटत नाहीं आणि आपला वाली अब्दाली जवळ नाहीं असें पाहून 'कसेंही करून आपला बचाव करावा,' म्हणून अंतस्थ रीतीनें त्यानें आपला वकील मल्हाररावाकडे पाठविला, कीं, 'मी तुमचा धर्मपुत्र आहें, शरण आले-ल्याचा बचाव करणें आपणास उचित होय.' ही विनंति मल्हाररावानें मान्यकरून स्वतः रघुनाथरावाकडे जाऊन, भीड खर्चून, पदर पसरून मागणें मागितलें कीं, 'याचा बचाव करा.' रघुनाथरावाचे मनांत त्यास जिवंत सोडावेंसें नव्हतें. परंतु मल्हाररावाची भीड उलगडेना, तेव्हां मान्य करणें प्राप्त झालें. नजीबखानास किल्ल्यांतून काढून मल्हाररावानें आपणा जवळ ठेविला.' [ भा. सा. ब. पृ. ३५ ]. वरील प्रकार केवळ बखरकाराची गप्प नव्हे आहे. 'नजीबखान रोहिला गंगाकिनाऱ्यानें शुक्रतालावरती उतरला आहे. राव मल्हारजीला आपले बाप म्हणून म्हणतात व स्नेहाचा राबता दृढ करीत आहेत. त्यांनीं आपला मामला अंतस्थ रीतीनें फैसल करून बहुतेक घेतल्यासारखाच आहे. श्री. दादासा॰चें लक्ष खानाच्या दुष्ट वर्तनाकडे गेलें आहे. मल्हारजीचा मुलाखात झाल्यावर सुवेळीं यासंबंधीं खबर होणार आहे [१·४८–१·२·१७५८]. पुनः आलमगीरास तख्तीं बैसवून, वजिरी गाजुद्दिनास देऊन, पूर्ववत्प्रमाणें बंदोबस्त करून कुरुक्षेत्रास येऊन पोंचले. ऑगस्ट १७५७ पासून मार्च १७५८ पावेतों आठ महिने तरी रघुनाथरावाचा मुक्काम दिल्लींत होता. या अवधींत त्यानें काय कामें केली याची स्पष्टता होण्यास साधन नाहीं. हिंगणे, अंताजी माणकेश्वर, नारोशंकर वगैरे सरदार गैरकाबू झाले होते, त्यांस

बठणीस आणणें व अब्दालीचा पाडाव करणें हीं दोन मुख्य कामें करण्याची त्यास पेशव्याची आज्ञा होती. पैकीं अब्दाली तर मराठ्यांचें नांव ऐकूनच परत गेला, अशा समजुतीनें सरदारांच्या बंदोबस्ताशिवाय दुसरें काम त्यास राहिलें नाहीं. अब्दालीच्या मनांत मुद्दाम होऊन मराठ्यांशीं सामना करावा असें नव्हतें. मुख्य काम भागतांच आपला शह ठेवून तो परत गेला. हिंदुस्थानचें राज्य त्यास हवें होतें असें दिसत नाहीं, आणि दिल्लीदरबाराची व हिंदुस्थानच्या परिस्थितीची जी माहिती त्यास आढळली, त्यावरून अफगाणिस्थानांतून हिंदुस्थानावर राज्य करणें त्यास शक्य वाटलें नाहीं. तो स्वतः कडक शिस्त राखणारा व कसलेला सेनापति होता; आणि सर्व गोष्टी चौकसपणानें अजमावून पाहत होता. सन १७४७ च्या पहिल्या स्वारींत तो पराभव पावून परत गेला. १७५१ च्या दुसऱ्या स्वारींत, लाहोर व मुलतान हे दोन प्रांत जिंकून परत गेला. १७५७ च्या तिसऱ्या स्वारींत आग्र्यापर्यंत प्रदेश लुटून व बादशहावर शह बसवून तो परत गेला; रघुनाथरावाशीं सामना करण्यास तो थांबला नाहीं. स. १७६० चे आरंभीं दत्ताजीशीं सामना करून त्यानें मराठ्यांचें पाणी पूर्णपणें जोखलें; आणि मुसलमानांचें राज्य हिंदुस्थानांतून नष्ट होऊं द्यावयाचें नाहीं, परंतु स्वतः मोकळें राहून साधेल तितका स्वतःचा फायदा करावयाचा, आणि विशेषतः पंजाबप्रांत सतलजपावेतों आपल्या सत्तेखालीं ठेवावयाचा, एवढीच त्याची हाव होती. कायमच्या निकालासाठीच तो तरी खटपट करीत होता. जयाची त्यास खात्री होती, मुसलमानांचें त्यास पाठबळ होतें, परंतु हिंदुस्थानचें राज्य घेण्याची त्यास हाव नव्हती. शेवटच्या स्वारींत दीड वर्ष हिंदुस्थानांत राहून पानपतावर पुष्कळ वाताहत झाल्यामुळें, हिंदुस्थानचा नाद त्यानें कायमचा सोडिला.

दिल्लींत राहून रोहिल्यांचा कारभार व्यवस्थित करण्याचा प्रयत्न रघुनाथरावानें केला. पुरुषोत्तम महादेवास त्यानें त्या कामावर पाठविलें. ऑक्टोबरांत हिंगणे लिहितो, 'हाफीज रहमतखानाचा तोफखाना श्रीगंगापार गेला. फरुखाबादेंतही फौज तादृश नाहीं: दहा पंधरा हजार फौजेनें सर्व

मुलख तूर्त हस्तगत होईल व एक करोडींची मालमत्ता मिळेल. कर्तव्य असेल तर मजवर आज्ञा करणें' [ ६-३७२ ]. कमरुद्दीनखानाचा मुलगा ' खानखानास लाहोरास घेऊन जावें म्हणून सुभेदारांनीं आण वाहून घेतली आहे. लाहोरास रा. बापूजी महादेवांनीं खानखानास बरोबर घेऊन जाण्याची तयारी करावी. खानखानास बाहेर येऊं न द्यावा. वजिराच्या चौक्या खबरदारीनें वाटेस बसवाव्या, ' असें रघुनाथराव लिहितो [ ६-३७४, २३. ११. १७५७ ]. स. १७५८ च्या जानेवारींत मल्हारराव हिंगण्यास लिहितो. ' याउपरी आम्हांस दिवसगतीवर टाकावयासी अनुकूल पडत नाहीं. श्रीमंतांचीही चिठी आली आहे. याउपरी विलंब न लावितां कामकाजाचा गुंता उकलून जलद येणें. जे याद ठरावून मोकरर करून दिली, त्यापैकीं एक मोष्ट उणी अधिक केली कार्यास येणार नाहीं. तसेंच असेल तर तुम्ही साफ उठोन येणें. विलंबाखालें घालून न राहणें ' [ ६-३७५ ]. याप्रमाणें कांहीं तरी वाटाघाटी पातशाहीच्या चालू होत्या. मल्हारजी होळकरानें नजीबखानाचें अगत्य धरून त्यास आपल्यातर्फे अंतर्वेद प्रांतांत कुरुक्षेत्रापासून कुंजपुरादेखील चाळीस लक्षांची मामलत देऊन त्याचे स्वाधीन केली [ २. पृ. १४६ ].

**४. हिशेबाच्या भानगडी** ( स. १७५७-५९ ). शिंदे.-बंडखोर सरदारांचें पारपत्य करण्याचें काम रघुनाथरावानें थोडें बहुत केलें. पण त्यांतही मुख्य दुसमन जो होळकर त्याच्या वाटेस जाण्याचें त्यास धैर्य झालें नाहीं. आठ महिने सर्व सरदारांसह एका ठिकाणीं बसून म्हणण्याजोगें काम त्यानें कांहींच केलें नाहीं. उलट वजिरास हा मराठ्यांचा हस्तक दिल्लींत अवजड वाटून त्यानें पंजाबप्रांत सोडविण्याची त्यांस भर दिली, तेव्हां स.१७५८च्या एप्रिल व मे महिन्यांत अटकेपावेतों जाऊन, पुढील बंदोबस्त पक्का न करतांच रघुनाथराव परत निघाला तो स. १७५८ सालच्या दसऱ्यास पुण्यास दाखल झाला. या प्रकरणाचा कच्चा तपशील आत्तां सांगावयाचा आहे.

रघुनाथरावाच्या पहिल्या स्वारींतील अव्यवस्थेनें व मारवाडांतील अनर्थामुळें पेशव्यास पैशाचा पेंच पुष्कळच पडला. शिंदे दुःखी कष्टी, म्हणून

त्यांसही दुखविण्याची सोय राहिली नाहीं. ता. ७·९·१७५६ रोजीं दत्ताजी आपला कारभारी रामाजी अनंत यास लिहितो, ' श्री. पंतप्रधानांनीं आज्ञा केली होती कीं, घरास आल्यावर शिल्लक किती, लोकांचें कर्ज काय जालें, त्याचा खर्च कैसा केला, याचा ताळेबंद लिहून पाठविणें, त्यावरून ताळेबंद तयार करून पाठविला आहे. तो श्रीमंतांस दाखवून जाब घेऊन आज्ञा मागोन येणें ' [ का. सं. प. या. ३४९ ]. ' ताळेबंद दाखवून झाल्यावर आज्ञा घेऊन सत्वरच येणें. आह्मी गुंजाळचा घाट उतरून गंगातीरास जातों, ' असें पुनः आठ दिवसांनीं दत्ताजी लिहितो [ सदर ३४७ ]. पुढें हा ताळेबंद पेशव्यास पोंचला, पण बिलकूल पसंत पडला नाहीं. पेशवा लिहितो, ' हिशेबाची याद पाठविली ते पावली. हिशेब ऐसा असत नाहीं. सात सालां वेगळी झडती असावी. कारकून तैनात खाऊन हिशेब नीट करीत नाहींत. यास्तव परिच्छिन्न कारकुनांस ताकीद करून वेगळ्या झडत्या तयार करविणें. ' असें पत्र आल्यावर दत्ताजी लिहितो. ' स. १७५१ पासून तीन सालां झडत्या तयार होत्याच; पुढील तीन सालांच्या झडत्या नाहींत, निमित्य कीं आमची छावणी तीन सालें मारवाडप्रांतीं झाली. तेथें महालचे हिशेब आले नव्हते. सिलेदार वगैरे लोकांची तीनसाली समजाविशी होणें होती, ती स्वामीची भेट सिद्धटेकावर झाली तोंपावेतों होतच होती. सबब झडत्या तयार करावयास आणखी सहा सात महिने पाहिजेत. श्रीगोंद्यास आल्यावर जे शिल्लक होती व कर्ज लोकांचीं घेतलीं होतीं, ते जमा धरून खर्च जाला तो अखेर सालपावेतों लिहून पाठविला. तो कांहीं हिशेब नव्हे हें तर यथार्थच आहे. आह्मी चाकर लोक आहों. वावगी वर्तणूक करूं अगर न करूं हें सर्व स्वामी जाणतच आहेत. झडत्या तयार झाल्यावर सेवेशीं पाठवूं. कारकुनास बेमुलाहिजा आज्ञा केली आहे. ' [ २१·९·१७५६, का. सं. प. या. ३७१ ]. आमच्या घरांत शिल्लक काय आहे अथवा नाहीं. हें तुह्मी पुरतेपणीं जाणतच आहां, लोकांचीं देणीं तशीच राहिलीं आहेत. श्रीमंतांपासून खर्चास मागितलें, परंतु यानगाचा अनमान करितात, ह्मणोन

पेन्शन केलें त्यास दिल्हें तर फारच उत्तम जालें. नच देत तर आह्मी चाकर लोक आहों. खावंदांशीं बळ कोठवर करावें ! कर्जवाम झालें तर ते गोष्टीची चिंता खावंदासच आहे. कर्ज होईल तें तेच वारतील ' [ सदर ३४८ ]. हिशेबाची अशाच प्रकारची तक्रार नागपुरकर भोसल्यांशींही याच वेळेस चालली होती [ ३४६ ]. वास्तविक अनेक कामें पेशव्यानें एकदम अंगावर घेतल्यानें कर्ज अतोनात झालें. ही अव्यवस्था त्यानें वेळींच मोडली नाहीं किंवा त्यास मोडतां आली नाहीं हें भावी संकटाचें एक कारण होय. पैठणच्या ब्राह्मणांस शिंद्यांकडून कांहीं प्राप्ति होती, ती वेळेवर पोंचली नाहीं, ह्मणून ते उपास करूं लागले, तेव्हां ब्राह्मणांची समजूत कशी तरी करावी असें पेशव्यानें दत्ताजीस लिहिलें [ का. सं. प. या. ३६१ ].

**हिंगणे.**-इकडे शिंद्यांचे हिशेबाची भानगड चालत असतां हिंगणें, अंताजी माणकेश्वर, नारोशंकर इत्यादि सरदारांना शिरजोरपणा उत्तरविण्याचा पेशव्याचा प्रयत्न चालूच होता. ता. १२·७·१७५७ रोजीं रघुनाथराव पेशव्यास लिहितो. 'बापूजी महादेव व दामोदर महादेव वगैरे वकिलांचें पारपत्य करावें, जप्ती करावी, कां कीं ते हुजूर येत नाहींत व चाकरी यथास्थित करीत नाहींत ह्मणोन आज्ञा. त्यास यांचें पारपत्य करणें अगाध नाहीं. हुजूर न येण्यास एक सबब होता, धोंडीबा नाईक नवाळे यांजपासून मागील स्वारींत आम्हीं कर्ज दहा लक्षपर्यंत घेतलें, त्यास परगणे तोडून वसूल करून धोंडीबा नाईक यास देणें, ह्मणोन चाकरी त्यांस सांगितली होती. ते वसूल करीत होते. मध्यें वजिरांनीं लबाडी करून थोडे बहुत रुपये परगण्यापैकीं घेतले, त्या बखेड्यांत हिंगणे होते. सारांश, लबाड तर आहेतच, परंतु हरामखोरी अंगीं लवीन ह्मटल्यास नाहीं. त्यांस पकडण्याचें कांहीं मोठें संकट नाहीं. शंभर राऊत दिल्लीहून धरून आणितील. सांप्रत दामोदर तर मेल्के. थोडे बहुत अन्याय आहेत, त्याप्रमाणें पारपत्य करावेंच लागेल. [१·६९]. त्यानंतर ता. ४ ऑगस्ट रोजीं बापूजी हिंगणे दंगे केलेल्या दंग्याची व्यवस्था सांगून आपल्या भावास लिहितो. ' मी श्री. दादासाहेबांसमागमें

आहे. त्याहीं आज्ञा केली कीं पुण्यास गेल्यावरही आह्मी श्री. स्वामींचे भेटीस येणें. सहा लक्ष रुपये सावकाराचे काढून भरले. दीक्षितांनीं घरें, वस्तभाव सर्व लिहून घेतलीं. स्वामींचें ओझें डोईवरी आहे तोंवरी सर्व बहुत विचारानें करणें. जोंपर्यंत त्यांची कृपा होऊन कामकाजाचा बंदोबस्त होय तोंपर्यंत प्राप्ति नाहीं व सावकाराचा पैसा देणें असें संकट आहे', [ ६·३८८ ] रघुनाथरावानें हिंगण्यास बहुतेक लुटल्याचाच हा प्रकार दिसतो. एक लाख अंताजी माणकेश्वराकडून घेऊन हिंगण्यांनीं भरले; व वस्तभाव विकून मोठ्या संकटानें इतर रकमेची कशी तरी भरती केली. (६·३८९–३९०, ३९१). हिंगणे पुण्यास येऊन आपल्या तक्रारी कळविणार होता, परंतु तुह्मी हुजूर यावयाची उतावळी नकरणें, असें रघुनाथरावानें त्यास पुण्याहून कळविलें [ ६·३९२ ]. वर्ष सहा महिने असेच हिंगण्यांचे अत्यंत चिंतेंत गेले. स. १७५९ पासून शिंदे उत्तरेंत येऊन पूर्वीच्या व्यवस्थेंत फरक होऊं लागला. जनकोजी शिंदे मोठ्या आस्थेनें सर्व मंडळींचा परामर्ष घेऊन राज्याचें काम दक्षतेनें चालवूं लागला. पुरुषोत्तम महादेव बहुधा जनकोजीपाशींच असे. ता. १९·३·१७५९ रोजीं हिंगणे धाकट्या भावास लिहितो. 'श्रीकृपा फार समर्थ आहे. चिंता न करणें' [ ६·३९९ ]. हा धाकटा बंधु दिवाकर महादेव पुण्यास होता तो नारोशंकराबरोबर श्रीमंत स्वामींचा निरोप घेऊन हिंदुस्थान प्रांतीं स. १७६० चे आरंभीं येणार होता [६·४००]. पुण्यास जाऊन त्यानें आपलें मागणें पेशव्यास लेखीं दिलें तेंच बहुधा खं. ६ ले.४९९ त दाखल आहे.

**अंताजी माणकेश्वर.**—हिंगण्याचा बंदोबस्त राघोबानें केला, तसाच अंताजी माणकेश्वराचाही स. १७५८तच केला. त्या सालचे आरंभीं जनकोजी शिंदे हिंदुस्थान प्रांतीं गेल्यावर त्यांस खालील पत्र पेशव्यानें लिहिलें. 'अंताजी माणकेश्वर परिछिन्न दादांनीं मनापासून येथील आज्ञेप्रमाणें बोलाविलें असें असतां हरप्रकारें उशीर लावून राहतात. आम्हांस लिहितात कीं, दस्तबांनीं राहविलें. सांप्रत तुमच्या लिहिल्यावरून दिसोन आलें कीं लबाडी करून राहतात. हरप्रकारें ऐवज हाताखालीं घालून हात उगवणार. अवरूचा,

प्रामाणिकतेचा दरकार त्यांनी टाकिलामें दिसतें. यास्तव पत्रदर्शनीं तिळमात्र मुलाहिजा न धरितां हुजूर यावयाविशीं सख्त ताकीद करावी. न येत तर परिछिन्न बोलावून आणून कैद करून त्यांस हुजूर पाठवावें. तिळमात्र मुलाहिजा करूं नये. मागे हवाले घेतलेला सर्व ऐवज ताकीद करून उगवावा. या मालचा वजिराकडील किंवा कोणताही ऐवज अंताजीचे होतीं न जाय तें करावें. तो ऐवज जमा करून हुजूर पाठवून द्यावा. पत्रदर्शनी न येत तर अंताजीस कैद करून पाठवावे' [ २१-३-१७५९, का. सं. प. या. ३३७ ]. पुढें अंताजीस पकडून दक्षिणेत पाठविलें की काय तें समजत नाहीं. स. १७५९ चे अखेरीस तो पुण्यांत असून सदाशिवराव त्याचे हिशेब तपासीत होता ( ३-२३३ ). 'अंताजीस वारंवार हुजूर बोलाविले असतां येत नाहींत. वजिराकडे पंनास लाखांचे हिशेब काढून तेथेच गुंतले. कित्येक लवाड्या करतात. त्या तुमचे प्रत्ययास येऊन त्यास ठेवून घेतां. मेरट वगैरे परगणे मध्येंच खातात. वजिराजवळ बारा हजार फौजेची हजिरी लटकीच देतात, ही चौकशी तुम्ही करीत नाहीं, अपूर्व आहे. याउपर त्यास पत्र पावतांच हुजूर पाठविणे. सुप्रयुक्त आले तर बरें, न आले तर धरावे, लुटावे. माल सर्व सरकारांत घ्यावा. एक पैसा त्यास न द्यावा. हुजूर आला तर त्याचा एक लेक हजार राउतानिशीं ठेवावा. वजिराजवळ चाकरीस फौज पाहिजे ती दुसरी नेमून द्यावी, परंतु अंताजीस ठेवूं नये. कांहीं एक मुलाहिजा न धरितां कैद करून पाठविणे. तुम्ही कारभारी, भिडेस न पडणे जाणिजे [ २-५-५९, का. सं. प. या. ३८७ ]. मेरट वगैरे महाल अंताजीकडे होते ते दूर करून सात लक्ष रुपये सरकारांत देण्याच्या करारावर डिसेंबर १७५८ त ते बापूजी महादेवाकडे देण्यांत आले [ ६-४७१ ]. हिंगण्यांची बसलेली तीस वर्षांची घडी या वेळी इतकी बिघडली, की 'येथील वकिलातीचे ऐसें स्वरूप जमादिलें की वकिलातीचे स्वरूपच न राहिले. येथे ते ऐसे असतात कीं पेशव्यांच्या वकिलातीचा म्हणून दहा दहा वीस वीस रुपये मागत फिरतो. जो कोणी शंभर रुपये दरमहा चाहेतो येथे मिळणार नाहीं. दिल्लीचा रंग

आपणास ठाउका आहे ' [ ६·५१३ ]. एकंदरींत अव्यवस्थेची कमाल झाली होती, ती सर्व सदाशिवरावानें तोडिली. त्यानें हिंगणे व अंताजी माणकेश्वर यांच्या प्रकरणांचा तपास करून निकाल लावून दिला [ ३·२३३ ]; आणि लगेच पुढें स. १७६० चे आरंभीं अंताजीपंत आपल्या कामावर रुजू झाला. सदाशिवराव दिल्लीस असतां हे सर्व सरदार रेशमासारखे मऊ येऊन त्याच्या केवळ भजनीं होते, हें पुढें दिसून येईल.

गोविंदपंत बुंदेल्यावरही पेशव्याचा रोष होता. परंतु पंतानें विशेष वर्दळीस न येतां १७५७ त पुण्यास जाऊन समक्ष समजूत घातली. पश्चात् रघुनाथरावानें दिल्लींत असतां, प्रीतिसिंग, हिंदुपत व खेतसिंग बुंदेले यांचे लढे बाळाजी गोविंदाचे मार्फत तोडिले [ ३·१६४; १·७२, १२९, १३०, २५१, २५६, २५७; का. सं. प. या. ११०, ना. रो. १·८९, २३०, २३७).

५. अटकेवरील झेंडे, ( स. १७५८ एप्रिल, मे ).–सटरफटर प्रकरणें हातीं घेऊन आठ नऊ महिने रघुनाथराव मोठ्या फौजेनिशीं दिल्लींत ठोक घालून बसला, यामुळें नानाप्रकारचे तोटे झाले. फौजेच्या खर्चास पैसा खर्च होऊन, त्याचा बोजा दिल्लीच्या व आसपासच्या लोकांवर व पातशाहीवर बसून ते सर्व मराठ्यांकडून त्रस्त होऊन गेले. मराठ्यांची ब्याद एकदा कशी निघून जाते असें त्यांस झालें. व्यक्तिविषयक भानगडींचा तपास रघुनाथरावानें चालविल्या-मुळें रिकामपणांत चहाडखोरांचें मात्र फावलें. होळकर नजीबखानास बचाव-ण्याचे नादास लागून, राज्याचा मुख्य उद्योग बाजूस राहिला. ज्या द्रव्यनदीचा ओघ दक्षिणेकडे वळविण्याकरितां पेशव्याची धडपड चालू होती, तिचाच अभिलाष सर्व लहान मोठ्या सरदारांस सुटून, जो तो स्वतः चा लाग साधण्यास प्रवृत्त झाला. सर्वस्व खर्ची घालून राष्ट्रकार्य करण्याची खरी प्रवृत्ति त्या वेळीं एकट्या शिंद्यांशिवाय दुसऱ्या कोणाही सरदाराचे ठिकाणीं राहिलेली दिसत नाहीं. म्हणूनच पुढाल दोन वर्षांत सर्व उद्योगाचा भार एकट्या शिंद्यांवर पडला; आणि महादजीसारखा पराक्रमी पुरुष पानिपतच्या

संकटांतून ईशदयेनें वांचला नसता तर शिंद्यांचे या उद्योगाचा व त्यांच्या घराण्यांचा, इतर कित्येक शूर घराण्यांप्रमाणें, आज मागमूसही राहिला नसता. रघुनाथराव व होळकर यांचे हातून हिंदुस्थानांतील कार्यभाग बिघडत चालले, याची जाणीव पेशव्यास होती, म्हणूनच त्यानें शिंद्यांस निकड लावून स. १७५७ तच उत्तरेंत पाठविलें. रघुनाथराव कर्जांत बुडाल्यामुळें, त्यास कांहींच करतां येईना. वास्तविक कर्ज वारण्याकरितां म्हणून जी स्वारी त्यानें आरंभिली, ती अनेक पट कर्ज वाढवून व दोन वर्षे फुकट घालवून त्यास भाट पावी लागली. पेशव्यानें हा घोटाळा असा कां चालू दिला तें कळत नाहीं. उत्तरेंतील अव्यवस्थेची जाणीव बहुधा सदाशिवरावास त्या वेळीं नव्हती, असें दिसतें. त्यास पेशव्यानें सर्वस्वी कर्नाटकाकडेच ठेविलें होतें. कदाचित् रघुनाथरावास पराक्रमाची चांगली संधि मिळावी या हेतूनें सदाशिवरावास पेशव्यानें दूर ठेविलें असेल. कारण शिंदखेडची मोहीम उकरून काढून कालाहार करण्याऐवजीं याच वेळीं म्हणजे स. १७५७ चे पावसाळ्यांत शिंदे व सदाशिवराव हिंदुस्थानांत आले असते तर त्यांनीं पुढील कार्यभाग ताब्यतोब उरकला असता. या सर्व अव्यवस्थेच्या मुळाशीं मल्हारराव काका असून तो रघुनाथरावास खेळवीत होता. इतर लहान सरदारांस वळणीस आणण्याचें वगैरे बहुत काम रघुनाथरावानें केलें; पण मल्हाररावासारखें बोईजड पांखरूं ताब्यावर आणण्याची धमक त्यास नव्हती. मल्हाररावाचे हे कावे रघुनाथरावास किंवा पेशव्यास कळले नव्हते असें नाहीं; पुढें पानपतच्या मोहिमेंत सदाशिवराव पदोपदीं मल्हाररावाचा पाणउतारा करून त्याच्या सूचनांचा अव्हेर करी, त्याचें बीज या वेळेपासून रुजत होतें; आणि हिंदुस्थानांतील हरएक काम बिघडत जाण्याचें आद्य कारण मल्हारराव होय अशी समजूत पेशव्यांची असल्यामुळें, त्यास बाजूस ठेवून स्वतःच्या हिंमतीवर एकंदर व्यवस्था लावून देण्याच्या इर्षेनें सदाशिवराव पुढें पानपतावर आला. पाठीमागचे हे प्रकार डोळ्यांसमोर असल्याशिवाय पुढील व्यवहार समजणार नाहींत.

स. १७५८ च्या फेब्रुवारीपर्यंत रघुनाथराव दिल्लींत होता. १०४८ त्रें

बातमीपत्र[१] रा. राजवाडे ह्मणतात त्याप्रमाणें फेब्रुवारीतलेंच असून, तें बहुधा हिंगण्यांस लिहिलेलें आहे. रघुनाथरावानें निरनिराळ्या ठिकाणची बातमी मिळविण्याकरितां एक हिंदी मुनशी दरसाल चारशें रुपये पगारावर १७५८च्या माघ मासांत नेमिला, त्यानें हें पत्र लिहिलेलें आहे. हा पगार माघ व आषाढ ह्या दोन हप्त्यांनीं द्यावयाचा करार होता. या पत्रावरून फेब्रुवारी १७५८ ची वस्तुस्थिति बरीच कळते. 'पातशहा किल्ल्यांत आहेत. त्यांस वजीर कधीं कधीं भेटतात. वाजिराच्या तैनातीस अंताजी पंडित आहे. त्याजबरोवर कृष्णराव बल्लाळ काळे ( प्रसिद्ध गोविंदराव काळ्याचा बाप ) आहे. रघुनाथरावाचे डेरे यमुनेच्या कांठीं आहेत. सादुल्लाखान, दुंदेखान, हाफीज रहमतखान यांचा मामला पंधरा लाखांस फैसल झाला. कुंजपुऱ्याचा मामला पांच लाख रुपयांस फैसल झाल्यावर मल्हारराव जाऊन रघुनाथरावास भेटतील. नजीबखान रोहिला दुष्मनगिरी करीत असून मल्हारराव त्यास बचावीत आहे. लाहोरास तयमूरशहा व जहानखान असून त्यांस शीखांनीं वेढा घालला आहे. अब्दाली इराणाकडे आहे, त्याचे वकील मात्र दिल्लीस आले आहेत. मारवाडांत बिजेसिंग मराठ्यांचा अंमल उठवीत आहे.' शत्रूंपासून बादशहाचें संरक्षण करण्याची जबाबदारी मराठ्यांनीं स्वीकारिली असून, बादशाहीवर घाला घालणारा मुख्य शत्रु अब्दाली होता. अब्दालीला दूर ठेवणें रघुनाथरावाचें पहिलें कर्तव्य असून त्यासाठीं वायव्य सरहद्दीचा बंदोबस्त भरपूर करणें हें आजच्याप्रमाणेंच, त्या वेळींही विशेष जरूर होतें. त्यासाठीं अब्दाली इराणाकडे गुंतला होता ही अवधि साधून तावडतोब रघुनाथरावानें पंजाबांत जाऊन तेथील बंदोबस्त स्वतः चार दोन महिने राहून केला असता, ह्मणजे अंतर्गत प्रदेशाची स्वस्थता उत्तम [illegible] असती. धरण फुटून पाणी [illegible] येऊं लागतें, तेव्हां मुख्य द्वार बंद केलें असतां, अंतर्गत लहान प्रवाह आपोआप बंद होतात, तद्वत् वायव्य सरहद्दीकडून अब्दालीचा

१ टीपः—या पत्रावरील रा. राजवाड्यांची टीप १०५, तर्क काढण्याच्या त्यांच्या हातोटीचें एक उदाहरण आहे.

बंदोबस्त झाला म्हणजे रोहिल्यांच्या अंतर्गत चळवळी जागच्या जागींच दबल्या असत्या. परंतु मुख्य द्वार उघडें ठेविल्यामुळें अंतर्वेदींत कितीही व्यवस्था केली तरी ती अपुरीच होती. ही उघड गोष्ट मल्हाररावासही सुचली नसेल असें नाहीं, परंतु त्यास नजीबखानानें अगदीं मारून टाकिलें होतें. सर्व पक्षांकडून भरपूर द्रव्य मिळवून मल्हारराव स्वतःच्या मतलबांत सावध होता. अर्थात् दिल्लीतील लोकांचें अब्दालीशीं कारस्थानें जोरानें चालू राहिलीं. हा प्रकार लाहोर येथें अदिनाबेगास कळून चुकला. अब्दालीनें अदिनाबेगास घालवून दिलें होतें. परंतु अब्दाली निघून जातांच तो परत आला आणि पंजावप्रांत स्वतः परत घेण्याच्या उद्योगास लागला. त्यासाठीं प्रथम त्यानें शीखांस तयमूरशहावर उठवून त्यांजकरवीं लाहोरास वेढा घातला; आणि दिल्लींत खटपट करून रघुनाथरावास लाहोरावर आणलें. तिकडे अब्दालीशीं व इकडे मराठ्यांशीं वेळ पडेल त्याप्रमाणें संधान ठेवणें, हाच अदिनाबेगाचा नेहमींचा उद्योग होता.

तयमूरच्या मदतीस ठेवलेला जहानखान धूर्त होता. अदिनाबेगाचीं संधानें ओळखून, आरंभीं त्याच्याशीं जहानखानानें गोडी दाखवून त्याचा सन्मान केला आणि प्रांताचा कच्चा कारभार त्याजकडेस सोंपिला. परंतु हें सख्य फार दिवस टिकलें नाहीं. अदिनाबेगाचा व जहानखानाचा बेबनाव होऊन बेग उत्तरेकडील पहाडी प्रदेशांत पळून गेला; आणि तेथून शीखांची मदत मिळवून त्यानें जहानखानाच्या हस्तकांशीं लढाई केली, एक सरबुलंदखान मारला गेला; आणि दुसरे दोघे मुरादखान व सर्फराजखान पळून लाहोरास गेले. शीखांनीं सर्व प्रदेश बेचिराख करून टाकिला [ एल्फ्ट ]. या घडामोडींवर अब्दालीची नजर होती. 'अब्दाली काबुलेस आहे. त्याचा वर्षी जहानखान बारकचे पातशहावर गेला होता, तो शिकस्त खाऊन आला. आणखी पातशहाचा खानही शिकस्त खाऊन आला. कांहीं फौज अटक उतरोन दा तीरास आली होती. शीखांशीं लढाई जाली. शीखांनीं मारून घाटेस लाविलें' [मार्च १७५८, ६·३७८ ]. ता. २० एप्रिल रोजीं बापूजी महादेव

सरहिंदहून लिहितो. 'हालीं शहा अब्दाली लाहोराहून कूच करून सडेस्वारीनिशीं सरहिंदेनजीक शीखांशीं लढाई मारून कंदाहारास गेला ह्मणोन वृत्त आलें. नजीबखानानें शतद्रूचे मुक्कामीं जाऊन मुलाजमत करून माघारा दिल्लीस आला,' ( ६·३८२ ). हें लिहिणें बिनचूक असेल तर अब्दाली पुनः एकदां या साली सरहिंदपर्यंत येऊन परत गेला असें होतें. शीखांच्या लढाईची हकीकत ले. ३८४ तही आहे. शीखांच्या मदतीनें आपला कार्यभाग होत नाहीं असें पाहून अदिनाबेगानें रघुनाथरावास पंजाबांत आणिलें.

रघुनाथराव मल्हाररावास बरोबर घेऊन एप्रिलांत लाहोरावर आला. बापूजी महादेव बरोबर होता [ ६·४९९, १·१२३ ]. नजीबखान वगैरेंच्या मार्फत मल्हाररावानें अब्दालीशीं कांहीं तोडजोडीचें बोलणें चालविलें असावें असा कित्येक कागदांवरून अजमास दिसतो. 'शहा पिसोरास आला. दरकूच लाहोरास येणार आहे. त्यास आजवर शहावलीखानाची मर्जी या गोष्टीवर राखली होती कीं श्रीमंतांशिवाय शहाशीं एकोपा करावा; आणि येथील लहान मोठे यांस एकीकडे करावें. फिरूनही शहावलीखानांनीं याकूबअली-खानास ताकीद लिहिली कीं, तुह्मीं सुभेदारांपाशीं जाऊन, ज्यांत त्यांची खुषी व जगताचें बरें होय ते गोष्ट करणें. परस्परें मित्रत्व होय कीं त्याचे मुलखास आपली फौज कार्य पडलिया बोलावीत, व आपल्यास पाहिजे तर त्याची बोलावून घ्यावी. लहान मोठे हिंदुस्थानचे अमीर, सरदार, पातशहा-सुद्धां, यांस कळलें कीं, उभय पक्षीं एकोपा पुरता झाला ह्मणजे हेही सर्व दबतील; व मुलूख यांचे हाताखालें दबला आहे तो सुटेल. मग इकडे एक-एकाचें निरनिराळें पारपत्य करावें' [ ६·४९८ ]. अशी वाटाघाट अब्दालीशीं त्याचा वजीर शहावलीखान याचेमार्फत चालू असल्यामुळें लाहोरवर चालून जाण्यास रघुनाथरावानें विलंब केला असें दिसतें. अशा आडमार्गांनीं जाऊन मुख्य कार्य बाजूस टाकण्यांत मल्हाररावाचें नैपुण्य व्यक्त होतें.

अदिनाबेगाशीं संगनमत करून रघुनाथराव लाहोरावर गेला. सरहिंद येथें अब्दालीच्या तर्फेच्या अब्दुस्समदखान रोहिल्याबरोबर लढून त्यास

रघुनाथरावानें पकडिलें. पुढें लाहोर येथें मराठ्यांशीं लढण्याचें आपणांस सामर्थ्य नाहीं असें पाहून, जहानखान तय्मूरशहास घेऊन पळून स्वदेशीं गेला. रघुनाथरावानें अटकेपर्यंत त्यांचा पाठलाग करून सर्व शहाजहानाबाद, संपत्ति व सिंधुनदीपर्यंतचा प्रदेश हस्तगत केला; आणि पाऊण कोट रक्कम घेण्याच्या करारानें पंजाब प्रांत अदिनाबेगाच्या स्वाधीन करून पर्जन्य सुरू झाल्यामुळें रघुनाथराव तावडतोब परत स्वदेशीं आला. ' लाहोर फत्ते जाली, जहानखान पळून गेला, त्यामागें फौजा गेल्या आहेत, ' अशी बातमी राघोबानें सर्व मोठमोठ्या स्वकीय व परकीय सरदारांस स. १७५८ चे एप्रिलांत लिहून पाठविली (का. सं. प. या. ३७७). अदिनाबेग पुढें १५-९-१७५८ रोजीं मरण पावला आणि पंजाबांत पुनः गडबड उडाली. ( एल्यट, व. का. सं. प. या. ३८८ ). ' कुरुक्षेत्रास तीर्थविधि उरकून, तुळादानें करून, सरहिंदेस पोंचले. श्रीमंतांचा काळ उत्कर्ष. अब्दुस्समदखान कत्तलबाज लाहोराकडे पळून जाऊं लागला, त्यास ( होळकराच्या ) पेंढाऱ्यांनींच लुटून टाकिला. मजल दरमजल शतद्रु, व्यासगंगा, चिनाब उतरून लाहुरास पोंचले. तेथील सुभा संदीपबेग होता तो दुराणीनें मारून त्याची स्त्री, मूल कैदेंत ठेविलीं होतीं, त्यांस सोडवून पांच हजार फौजेनिशीं त्यास चाकरीस ठेवून, त्याचा दिवाण लक्ष्मीनारायण कायस्थ बरा कर्ता मनुष्य होता, त्याचे स्वाधीन लाहूर, पंजाब, मुलतान अटकेपर्यंत मुलूख करून हाला भाषाच्या दिल्या. पेंढारी व लष्कर कुबेर झाले. रघुनाथराव व मल्हारराव यांणीं मोठें यश संपादिलें,'[ भा. सा. म. पृ. ३६ ]. ता. ४-५-१७५८ रोजीं रघुनाथराव पेशव्यास लिहितो. 'लाहोर, मुलतान, काश्मीर वगैरे अटके अलीकडील सुभ्यांचा बंदोबस्त करून अंमल बसवावा, त्यास, कांहीं जाला, कांहीं होणें तोही लवकरच करितों. तय्मूर सुलतान व जहानखान यांचा पाठलाग करून फौज लुटून घेतली. थोडीशी झडत पडत अटकेपार पिशावरास ते पोंचले. अब्दाली इराणावर चालून गेला, त्याची फौज इराणच्या पातशहानें लुटून घेतली. अब्दाली कंदाहारास आला. इराण्याची फौज पाठलाग करीत आली आहे. जबरदस्तखान व मुकर्रबखान या प्रांतींचे

सरदार व अमिनदार अब्दालीचे बदवर्तणुकीमुळें त्यास रद्द झोते, तेही सदरहू हंगामा करितात. हलीं एकीक होऊन, सेवा करून दावावें, अब्दालीस तंबी करूं, ऐसा त्यांच्या अर्जी आल्या आहेत. अब्दालीचा धर सुटला आहे. सारांश, त्याचा जोर तिकडून होतो ऐसें नाहीं. तिकडून इराणचे शहानें जेरदस्त केलें, इकडून जोरा पोंचवून सरकारचा अंमल अटकेपार करावा. त्याचा पुतण्या व दौलतेचा वारस स्वामीपाशीं देशास आला, तो स्वामींनीं आम्हांकडे पाठविला होता. त्यास अटकेअलीकडे थोडीशी जागा बसावयास देऊन अटकेपार काबूल पिशावरचा सुभा देऊं. अब्दालीच्या फौजेवर अब्दुल–समदखान सरहिंदेंत होता, तो सरकारांत पाडाव आहे, तो व आणखी या प्रांतींची फौज, इराणी, मोगल देऊन मशारनिल्हेची रवानगी करितों. हे तिकडील पैरवी करितील, स्वामीचे पुण्यप्रतापें अब्दालीस जोरा पोंचवून तंबी करितील, पारिपत्य उत्तम प्रकारें करून अटकेपार अंमल बसावितील. लाहोर प्रांतीं रेणको अनाजी व रामजी सखदेव ऐसे ठेविले. गोपाळराव गणेश यांचाही पैगाम आहे, तेही राहतील. इराणचे पातशहाचे स्वदस्तुरचे कागदही आम्हांस व मल्हारबास आले होते, कीं लौकर कंदाहारेस यावें, आणि याचें पारिपत्य करून अटकेची हद्द करावी. परंतु आम्ही तरी काबूलचा सुभा अब्दुल रहीमखान स्वामींनीं पाठविला, त्यास देतों. फौज वगैरे थोडें बहुत साहित्यही करितों. काबूल व कंधार हे अटकेपारचे सुभे हिंदुस्थानाकडे अकबरापासून आलमगीरपावेतों होते, ते आम्ही विलायतेंत कां द्यावे? यास्तव तूर्त येथें सुभे देतों. त्यांसही ( इराणचे शहास ) या सुभ्यांची दरकार नसेल. तो इराणचा अंमल करील. आम्ही कंधारपावेतों अंमल बसवून, तूर्त त्यास गोडच जाब पाठविणार आहों. जंबू काश्मीर वगैरे तमाम वकील आले आहेत. मामलत थोडी बहुत अटके अलीकडील करीत आहों. पलीकडील तूर्त होत नाहीं. खटपट मात्र होईल. तूर्त तांतडीमुळें जें होईल तें करितों. पुढील स्वारीस जो कोणी सरदार मातबर येईल तो बंदोबस्त करील. मुलूख दोचौं करोडींचा

बहुधी, परंतु जमीनदार त्यास मोठमोठे आहेत. आम्ही नांवास मात्र खंडणी करितों. जेथें पंचवीस लक्षांचा मुलूख तेथें एक दोन लक्ष येणेंच कठीण आहेत. सूर्त मापारे फिरावयाचा डौल स्वामीचे आज्ञेवरून धरिला आहे, त्यामुळें जें होतें तेंच करितों, तटीं लावीत नाहीं. सूर्त अदिनाबेगावरच सारा मखातियार दिल्हा आहे; त्यासच कमाविसीनें लाहोर मुलतान दिल्हें आहे. यंदा तर सारें शिबंदीखालींच जाईल, शिबंदी वारतांच कठीण पडेल. दोन तीन वर्षांनीं कांहीं सोईस लागेल. स्वामींस कळावें ' ( इ. सं. ऐ. स्फु. ले. ११ स. १९१६ ]. रघुनाथरावानें सरहद्दीचा बंदोबस्त कसा केला, याचें हें थोडक्यांत चांगलें वर्णन आहे. पेशव्यानें तावडतोब परत बोलावल्यावरून त्यास पंजाबचा बंदोबस्त अपुरा टाकून दक्षिणेंत जावें लागलें. नानासाहेबास या बाजूची परिस्थिति बिलकूल माहीत नव्हती. परत न आतां मराठे सरदार ठांसून पंजाबांत बसले असते तर अब्दाली वाढला नसता. इराणी व मराठे या शत्रूंच्या मध्यें तो चिरडून जाण्याच्या अगदीं बेतांत होता. हल्लींच्या इंग्रजांप्रमाणें त्या वेळींही मराठ्यांची बादशाही हाव सिंधूपलीकडे कशी गेली हें ध्यानांत ठेवण्याजोगें असून, या संधीस मल्हारराव होळकरानें तरी परत जाण्याचें कांहीं एक कारण नव्हतें. अंताजी मा० लिहितो, 'सेवकास स्वामींनीं कृपा करून पत्र ( १८ एप्रिलचें ) पाठविलें तें पावलें. वर्तमान लाहोरच्या फत्तेचें, शत्रूचे पारिपत्याचें व तिकडील मुलूख काबीज केल्याचें लिहिलें तें सविस्तर वाचून परम आनंद झाला. तो पत्रीं कोठवरी लिहावा. हिंदुस्थानांत कीर्ति लौकिक मातबर आली. कुल राजे, उमराव, सुभे यांस दहशत पडली. सारे हिंदुस्थानचा सूड अब्दालीपासून एक स्वामींनीं घेतला. तेणें करून यशाचे पर्वत आले. स्वामी यशस्वीच आहेत. याचा विस्तार सेवकास लेखन करावयास सामर्थ्य कैचें! हें वर्तमान वजिरांनीं ऐकोन बहुतच हर्ष मानिला. स्वामी अवतारी पुरुष आहेत. त्यांची स्तुत मनुष्यांनीं काय करावी! सेवकास आधार स्वामीचे पायांखेरीज दुसरा कोठेंही नाहीं. जरी स्वामींची जपती लाहोर प्रांतीं आली, तरी वजीर पातशहास घेऊन

छावणीस आपल्याजवळ घेऊन येतो. वजीर व लहान मोठे सर्व म्हणतात कीं, खासा छावणी न जाली तर पठाण मागतीं लाहोर प्रांतीं पावसाळा येतील. ऐसेच लोक म्हणतात तें सेवेशीं लिहिलें. करणें न करणें यख्त्यार खावंदांचा. वजीर व पातशहा यावयाचा निश्चय कोणे प्रकारचा तो निवडून सेवकास आज्ञा लिहावी, त्याप्रमाणें त्यांस घेऊन विठ्ठल शिवदेव सेवेशीं येतील. त्याप्रमाणें कृष्णराव (काळे) ही येतील. सर्व विनंति करतील (५·५·१७५८. का. सं. प. या. ३४१). यावरून रघुनाथरावानें घाईघाईनें पंजाबांतून परत न जातां, तेथेंच छावणीस राहणें किती जरूर होतें हें चांगलें दिसून येतें. दक्षिणच्या घोड्यांस अटकेवर सिंधूचें पाणी पाजून तेथें मराठ्यांचा भगवा झेंडा त्यानें रोविला, येणें करून त्यास 'राघो भरारी' हें भपकेदार नांव मिळून, त्या विशाळ घमेंडींत अखिल महाराष्ट्र कांहीं काळ दंग झालें, आणि हिंदुपद पातशाहीचें शिवछत्रपतींचें ध्येय सिद्धीस गेलेंसें वाटून धन्यवाद सुरू झाला. मराठे हिंदुस्थान सगळें पादाक्रान्त करणार अशी भावना लोकांत पसरली. परंतु यांतील पोकळ-पणा लवकरच निदर्शनास आला.

## प्रकरण २९ वें.

### अब्दालीकडून शिंदेहोळकरांचा पाडाव.

१ शिंदेहोळकरांचें जूग फुटलें. २ शुक्रतालच्या पुलाची भूलथाप.
३ दत्ताजीचा अजब पराक्रम. ४ शिंदेहोळकरांची पोळजत्रा.

**१ शिंदेहोळकरांचें जूग फुटलें.**—जयापा शिंद्याचा खून झाला तेव्हां आमचें जूग फुटलें ' असे उद्गार मल्हाररावानें काढिले ते यथार्थ होते. रघुनाथरावाच्या स्वाऱ्यांत शिंदेहोळकर कुंभेरीच्या प्रसंगाशिवाय बरोबर असे कधीं नव्हते. स. १७५६ त दत्ताजी व जनकोजी शिंदे दक्षिणेंत आले ते स. १७५८ च्या आरंभारीत शिंदखेडची मोहीम आटपल्यावर उत्तरेंत निघाले.

त्या सालच्या उन्हाळ्यांत दत्ताजी स्वतःच्या कमासाठीं श्रीनाथास होता, तो पुढें चार पांच महिन्यांनीं मागाहून जनकोजीस मिळाला. जनकोजी प्रथम उज्जनीस आऊन तेथून जमवाजमव करून बुंदीवाड्यांत गेला. तेथें हरगडावर गुमानसिंग गिराशियाचा पाडाव करून, खेचीवाडा, राजगड, पाटण व बुंदीकोटा येथलि खंडण्या घेऊन जयनगरच्या राज्यांत आला. माधवसिंगाकडून वीस लाख खंडणी घेऊन पुढें बरसातीच्या छावणीचा विचार करणार तों उदेपुरच्या राण्यानें शिवपुरची गडी काबीज करण्याकरितां जनकोजीचें साह्य मागितलें. सबब 'पावसाळ्याचे दोन तीन महिने शिवपुरापुढें जनकोजी राहिले. मारवाडांतील गुंता विशेष केला नाहीं. श्रम बहुत, फळादेश स्वल्प. डोंगर कोरून उंदीर काढावा. असत्य भाषण करणें हें तीं त्या लोकांचा स्वभावधर्म परंपरागत आहे. विजेसिंगाकडील पैका घेणें बहुत. त्यांजमध्यें त्याजला संशय पूर्व दोषांचा बहुत. मग कांहीं थाट केली, त्यामुळें त्यांचा दिल खुलासा आला; आणि पुढें आणखी कामावरी दृष्टी देऊन, त्या प्रांताच्या आग्रहास न गुंतोन दिल्लीकडे येणें झालें,' (इ. सं. ऐ. टि. २·४१). पावसाळ्यांत रघुनाथराव लाहोरचे स्वारीहून परत येत असतां जनकोजीनें सामोरा जाऊन रस्त्यांत त्याची भेट घेतली. मल्हाररावाचे मध्यस्थीनें नजीबखानानें कार्यभाग बिघडविला, सबब कसेंही करून प्रथम तुम्ही नजीबखानाचें पारिपत्य करा, असें या भेटींत रघुनाथरावानें जनकोजीस विनवून सांगितलें. 'क्रोड रुपये शिबंदी वाढली तरी पुरवेल. एवढी जोड आम्हांस द्यावी, आम्हींच पारपत्य केलें असतें, परंतु मल्हाररावांनीं धर्मपुत्र म्हणून अगत्य धरून आपले तर्फेनें अंतर्वेद प्रांत कुरुक्षेत्रापासून कुंजपुरा देखील चोवीस लक्षांची मामलत त्याचे स्वाधीन केली. माधवसिंग जयनगरकर, विजेसिंग मारवाडी वगैरे बहुत धर्मपुत्र मल्हाररावास आहेत. या धर्मपुत्रांचा फलादेशही भोगीत आले.' असें सांगून रघुनाथराव स्वदेशीं आला. मागून मल्हाररावही इंदुरास येतांना जनकोजीस रजपुतान्यांत भेटला. रघुनाथरावाचे व जनकोजीचे भेटींत घडलेला विचार पुसून काढावा एवढाच मल्हाररावाचा

सरेस होता. प्रथम जनकोजी भेटच देईना तेव्हां मल्हारराव आपण होऊन एकदम जनकोजीकडे आला. पुढें उभयतांचा समागम ८-१५ दिवस झाला. त्यांत एकंदर कारस्थानांचा उभयतांनीं विचार केला. मल्हाररावानें आग्रहानें सांगितलें कीं, नजीबखानाचे साह्यानें भागीरथीस पूल बांधून अयोध्येचें राज्य जिंकावें. नजीबखानास राखावा. त्याचें पारिपत्य केलीया पेशवे अटकेपासून रामेश्वरपर्यंत असुदां हातीं पैसा आणवून एकछत्री राज्य करतील.'[१] असा कानमंत्र देऊन आणि पालकपुत्र तुकोजी होळकर यास दोन हजार फौजेनिशीं जनकोजीजवळ ठेवून मल्हारराव परत आला. पेशव्यांनीं स्वतः येऊन आपला शह उत्तरहिंदुस्थानांत बसविला, ही गोष्ट होळकरास रुचली नाहीं. उत्तरहिंदुस्थानांतील कारभारांत आपण म्हणजे शिंदेहोळकरांनींच मुखत्यार असावें, त्यांत पेशव्यांनीं दखलगिरी करूं नये, असा मल्हाररावाचा कटाक्ष होता. पुढें दत्ताजी शिंदे आपली नवी स्त्री भागीरथीबाई व जनकोजीची काशीबाई यांसह उत्तरेंत येतांना रघुनाथरावास भेटला. दत्ताजीबरोबर नारोशंकर होता. त्यांसही रघुनाथरावानें जनकोजीसारखाच उद्योग सांगितला. थोड्या वेळानें मल्हाररावाची व दत्ताजीची उज्जनीस भेट झाली, तेव्हांही पूर्वींचाच बुद्धिवाद त्यानें दत्ताजीस शिकविला. जनकोजीस हा बुद्धिवाद पटला नव्हता, परंतु दत्ताजीस पटला. मागाहून विठ्ठल शिवदेव विंचुरकर रघुनाथरावाचे स्वारींतून दक्षिणेंत येतांना दत्ताजीस भेटला. विठ्ठल शिवदेवाचें मत होळकरासारखेंच होतें. एकंदरींत रघुनाथरावाच्या स्वारींत सरदारांचीं मनें अनेक विकल्पांनीं बिघडून कोणताही मनसुबा निर्वेध चालणें अशक्य झालें. रेवाडीनजीक जनकोजी व दत्ताजी यांच्या भेटी होऊन ते दिल्लीस पोंचतात त्यापूर्वींच पंजाबांत अदिनाबेग मृत्यु पावून तिकडे गडबड उडालेली शिंद्यांस कळली. जनकोजीचा कल रघुनाथरावाचे सांगीप्रमाणें नजीबखानाचें पारिपत्य करण्याचा होता, परंतु दत्ताजीस तो विचार मानवला नाहीं. स. १७५८ च्या डिसेंबरांत उभयतां शिंद्यांचा मुक्काम दिल्लीस यमुना-

१ टीप—या प्रवादास बखरींशिवाय अस्सल कागदांचा आधार उपलब्ध नाहीं.

तीरीं मज्मूच्या टिळ्यावर होता. फेब्रुवारी सं. १७५८ पावेतों निरनिराळ्या वाटाघाटी चालल्या; आणि पेशव्यास लिहून पुढील उद्योगाची दिशा शिंद्यांनीं ठरविली [ का. सं. प. या. ३८८, ३७३, ३६२ ]. मार्चांत दिल्ली सोडून सरहिंदवरून शिंदे एप्रिलांत लाहोरास गेले [ सदर ३८७ ], आणि तिकडील कार्यभाग विल्हेस लावून ता. १३·५·५९ रोजीं यमुनातीरावर रामघ्याचे घांटीं आले. 'गंगापार होऊन बंगाल पटणें प्रांतीं जाण्याचा उद्देश धरून मजल दरमजल गडमुक्तेश्वरास जातात' ( इ. सं. ऐ. टि. २·४१ ). या कार्यक्रमाचा थोडा ज्यास्त खुलासा केला पाहिजे.

स. १७५८ चे आरंभीं पेशवा हिंगण्यास लिहितो. ' दिल्लींतील व पठाणांकडील बारीक मोठें वर्तमान लिहिलें तें कळलें. येथील कूल अर्थ व कर्तव्य पदार्थांचा भाव लिहिणें तो लिहिला आहे. तदनुरूप पैरवी गुप्त मंत्र राखोन करावी. पठाणांकडील मुलूख आम्हांकडे किती आला, त्याचा तनखा काय, सूर्त वसूल काय, यंदा नक्त ऐवज हातास किती येईल तो अजमास लिहिणें. वजिरांनीं आजपावेतों ऐवज किती दिला, बाकी त्यांजकडे किती राहिला, ते कधीं येणार हाही अर्थ सर्व लिहिणें. दिल्लींत लबाड्या फार आहेत; वजिराशीं, गाजुद्दीनखानाशीं सोय पडे, जावेतखान इकडील आहेत त्यांचे साहित्यांत आहेत, ते त्यांचे साहित्यास लगत ऐसें गुप्त रीतीनें करून, वजनदार मनसबा होऊन येई तें करणें. तुम्हांकडे साताआठांचे परगणे फारच चांगले आहेत. त्यांपैकीं जरूर तर्तूद करून पांचसहा ऐवज वैशाखअखेर येऊन पावे तें करणें. नाहीं तर दुसऱ्यांकडे सनद होईल. येथें ओढ फार आहे ( ६·४९७ ). हिंदुस्थानांतील स्वारीनें दौलतीचें कर्ज वारणें हाच पेशव्याचा मुख्य हेतु असून तोच तो सर्व सरदारांस वारंवार लिहीत होता. स. १७५८ च्या ऑक्टोबरांत रघुनाथराव हिंगण्यास लिहितो. ' गाजुद्दीनखानाचे सांगण्यावरून चार पांच प्रकारचे मनसबे लिहिले ते कळले. रोहिले पठाणाचा मजकूर अवगत जाहला' [ ६·३७९ ]. हे मनसबे ता. ५·१२·५८ रोजीं पेशव्यानें शिंद्यास कळविले. ' दत्ताजी व जनकोजी शिंदे कोठें आहेत, खाव मनसुबा करितात तें वस्त्यावर

कळवावें. वजिराचा अगत्यवाद चि०दादांस आहे. त्याचा पक्ष घरून ( १ ) नजीबखानाचें पारिपत्य करावें; ( २ ) लाहोरचा नवा मुलूख सोडविला तेथें अदिनाबेग मृत्यु पावला, तेथील बंदोबस्त दत्ताजींनीं जाऊन अगत्य करावा; ( ३ ) बंगाल्याकडील काम मातबर असून पैका मेळवावयाची जागा आहे. लाहोरचा बंदोबस्त झाल्यावर सुजाउद्दौला सोबती करून भारी फौजेनिशीं जाऊन पटण्याकडील व बंगाल्याचा मुलूख सोडवावा. ठीक पडल्यास वजिरास समागमें न्यावें. दत्तबा चित्तावर घरतील तें करतील. तसेंच ( ४ ) सुजापासून काशी प्रयागची नजर व आणखी कित्येक बाबती त्याजकडे लावून पैका साघेल तरी साधावा; एक लाहोरचा बंदोबस्त असल्यास हें करावें. सारांश, सरकारच्या कर्जास पैसा मातबर मिळे तें करावें ( का. सं. प. या. ३८८ ). एकूण नजीबखानाचा बंदोबस्त, लाहोरचा बंदोबस्त, बंगाल प्रांत सोडाविणें आणि तीर्थस्थळें कबजांत घेणें, असे हे चार मनसबे होते. रघूजी भोसल्याचे पश्चात् बंगाल प्रांत हातचा गेल्यासारखा होता, इंग्रजांनीं प्लासी जिंकून तिकडे आपला प्रवेश केला होता, परंतु त्या प्रांतावरील आपला शह गमावूं नये अशी हिंदुपद पातशाहीच्या हेतूच्या सांगतेची पेशव्याची भावना होती. अटकपासून बंगाल समुद्रापावेतोंचा प्रदेश ताब्यांत राखण्याची ताकद एकट्या शिंद्यांची बिलकूल नव्हती. तशांत तिकडील पैसा दक्षिणेंत आणून कर्ज वारण्याची पेशव्याची मनीषा व्यर्थ होती. शत्रूंचा पाडाव होऊन स्थिरता झाल्याशिवाय पैसा वसूल होत नसतो. तशांत होळकर, विठ्ठल शिवदेव वगैरे सरदार मनांतून या उद्देशास विरोधी होते. होळकराचे बुद्धिवादानें शिंद्यांचे मनाची चलबिचल झाली. हे सर्व प्रकार पेशव्यास माहीत होते, प्रत्यक्ष रघुनाथराव सर्व पाहून गेला होता. पेशवा या वेळीं पुण्यांत स्वस्थचित्त होता; आणि स्वतः एकवार शिंद्यांबरोबर उत्तरेंत आला असता तर, निदान पानिपतचें अरिष्ट तरी बऱ्याच अंशीं टळलें असतें असें वाटूं लागतें.

स. १७५८ चे अखेरीस दिल्लीस पोंचल्याबरोबर दत्ताजी व गाजीउद्दीन यांचें तोफांचे प्रकरणावरून सडकून भांडण झालें. अटक, फतेलष्कर, डिंडे-कुशाद

अशा तीन नामांकित तोफा दिल्लीस बादशहाच्या होत्या, त्या दत्ताजीनें अवस्था-साठीं मागितल्या. वास्तविक या तोफा उपयोगापेक्षां वैभवाची खूण म्हणून दिल्लीसून हालवूं नयेत अशी गाजीउद्दीनची इच्छा होती. या तोफा नेऊन विजेसिंगमध्यें नागोर साफ उडवून द्यावें असा दत्ताजीचा मनोदय होता. शेवटीं एक तोफ समागमें घेऊन दत्ताजी स. १७५९ च्या मार्चांत पंजाबांत गेला. अटक तोफ उज्जनीस पाठवीत असतां चंबळ नदींत अडकून राहिली, आणि तिसरी मुळीं आग्र्याबाहेर हाललीच नाहीं (भा. सा. ब.). दत्ताजीनें कुरु-क्षेत्रास आठ मुक्काम केले. तेथें तुलादानें वगैरे करून तो सतलजवर आला. अदिनाबेगाचा हस्तक सदीपबेग म्हणून होता, त्यास दत्ताजीनें सरहिंदच्या बंदो-बस्तास ठेविलें. सदीपचा मुलगा व लक्ष्मीनारायण येऊन भेटले. त्यांच्याशीं बाटाघाट करून साबाजी शिंदे व त्र्यंबक बापूजी या सरदारांस त्यानें अटकेपर्यंतच्या मुलखांत ठेविलें. पंजाबांतील दुआबाचा कारभार अदिनाबेगाच्या विधवेकडे सोंपिला; आणि आपण परत फिरून एप्रिल महिन्यांत कुंजपुऱ्यानजीक मुक्काम केला. चित्तांत योजना कीं नजीबखानाचे साह्यानें भागीरथीस पूल बांधून सुजावर चाल करावी. जनकोजी, नारोशंकर व अंताजी माणकेश्वर यांस दत्ताजीचा विचार पसंत पडला नाहीं. त्यांचे मनांत पेशव्याचे लिहिल्याप्रमाणें प्रथम नजीबखानाचें पारिपत्य करावें असें होतें. दत्ताजी आपले मनसुबे बिघड-वितो असें मनांत येऊन ता. २३-२-१७५९ रोजीं पेशवा लिहितो, ' दत्ताजी शिंद्यांचा मारवाडचा पैका उगवावयाचा विचार काय केला तो लिहिणें. लाहोर, बंगाल, पटणें हे तीन मनसुबे शिंद्यांस मातबर आहेत. अदिनाबेग मृत्यु पावला आहे, तर लाहूरचा बंदोबस्त यथायोग्य करावा. बंगाल्यास क्रोड दोन क्रोडी पैका मिळे अशी जागा आहे. भारी पैका मिळवून कर्जाचा परिहार करून फौज ताजी करावी असा विचार झाला पाहिजे. मातबर फौजेनिशीं उभयतांनीं जाऊन पटणें हस्तगत करून तेथें छावणी करून राहवें. तेथून बंगाल्याचा मनसुबा करावा. चिरंजीव दादा बाजतबरसाद हिंदुस्थानास येतील. तदोत्तर त्यांनीं बंगालची स्वारी करावी. बंगालची मामलत मुक्कावयास वकील

सुजाकडे आला तर पंनाससाठ लक्षांखालीं चुकवूं नये. प्रस्तुत पटणें कायम करावें. सुजाकडून काशी, अयोध्या, प्रयाग घ्यावें. चिरंजिवा-जवळ काशी, अयोध्या द्यावयाचा करार सुजानें केलाच आहे. प्रयागचा मनसुबा सोहलतीनें होईल तरी करावा. दिल्ली प्रांतीं नारोशंकर अथवा आणखी कोणी दोन तीन हजार फौज ठेवावी. अंताजी माणकेश्वरास परिच्छिन्न हुजूर पाठवावा. त्यांची भीड न धरणें. मोघम चौकसी करूं नये. चौकसी करणें तर पांरचें सक्तीनें खावंदगिरीनें करावी. मळमळीत कांहीं न करणें. येथें कर्ज सत्तर लाख देणें आहे. पंनास लाख कर्ज तुह्मीं फेडावें. कोणी किती फेडावयाचें त्याची वांटणी वगैरे ध्यानांत न आणतां खामखा कर्ज फेडावें. जाते समयीं दतवा बोलोन गेले', ( का. सं. प. या. ३७३ ). पुनः ता. २१·३·१७५९ ला पेशवा लिहितो. 'वजीर मीरशहाबुद्दीनचा विचार सुधा नाहीं. सुजास वजिरी दिल्यास पंनास लाख रुपये देतो. आज्ञा जालिया लाहोराहून आल्यावर करूं व सरकारचें कर्ज फेडूं.' ह्मणून लिहिलें तें कळलें. ऐशास कर्ज फेडावें हें आपणांसच योग्य आहे. परंतु मरिशहाबुद्दिनास आपणच स्थापिलें. त्यापासून करारांत अंतर पडल्यास मुलाहिजा धरण्याचें प्रयोजन नाहीं. करारांत अंतर नसेल तर काढूं नये, सुजास वजिरी देणें तर काशी प्रयाग हीं दोन स्थळें घ्यावीं; रोख रुपये घ्यावे, तरच सुजास वजिरी द्यावी. रुपये द्यावयास दोनतीन वर्षे लावील तर न द्यावी. कारण तो पैकेकरी जबरदस्त, फौज तोफखाना मोठा, जाठाशीं त्याचा स्नेह, यामुळें सत्वरच भारी होतील. मोगल लोक फावले मार्गानीं आह्मांशीं वांकडे वर्तावयास अंतर करणार नाहींत. तथापि पंनास लाख रोख हातास येत. काशी प्रयाग येत, तरी करावें. परंतु त्याची रीत संस्थानिकपणाची दिसते. गंगे-पलीकडील संभाळून असावें, दिल्लीचे खटपटींत जीव राहिला नाहीं, निरंतर तुमचे आज्ञेत चालावें, अब्दालीचा शह फावले मार्गीं दिल्लीवर आहेच. पहिला दिल्लींत ऐवज मातबर होता, मुलूख फार होता, पातशहाचा दबाव होता, यास्तव मनसूरअली वजिरीसाठीं झटत होता, आतां पातशाही

बेदबकरीची, खजिना नाहीं, मुलूख नाहीं, यास्तव सुजाचें राजकारण खरें लटकें याचा पुरता शोध जाठाचे मार्फतीनें करून, आपणाकडील इतबारी शहाणा सुजाकडे पाठवून, रागरंग पाहून पंनास लाख रोख व प्रयाग हातास येत असेल तर वजिरी द्यावी. नजीबखानास बक्षीगिरी दिल्यास तीस लाख रुपये देतो ह्मणोन लिहिलें. ऐशास, नजीबखान पुरा हरामखोर बाट आहे. गुदस्तां दादाशीं त्याशीं कांहीं मजा राहिली नाहीं. तो दिल्लींत प्रविष्ट जालीया, अब्दालीचें ठाणें बसलेंसें जाणावें. बेइमान हरामखोर आहे. त्यास वाढविणें सर्पास दूध पाजण्याप्रमाणें आहे. फावले मानीं त्याचें पारिपत्यच करावें. सुजा प्रयाग न देई, बेरीज मात्र बोलावी, रुपये द्यावयास तीन वर्षे लावावीं, असें करूं लागला तर गाजुद्दिनाशीं जे जे करार चिरंजिवांनीं केले, ते कायम करून, ते आपण एक होऊन असावें. बाजतबरसाद वजीर पातशहास घेऊन नीट बंगालच्या सुमारें जावें. रोहिले जमीदार बहुत करून सामील होतील. वजीर तुह्मी एकदील होऊन बंगालचा रोख धरावा, तों इकडून चिरंजीव प्रयागाजवळ बुंदेलखंडच्या मार्गे येतील, तुह्मी वजिरासह अंतर्वेदींतून यावें. असा भारी शह पडल्यावर भारी नजर व काशी प्रयाग दिल्यास, बादशहा व वजीर यांस समजावून सुजास बक्षीगिरी द्यावी हा दुसरा प्रकार. वजीर न येई तो तुह्मींच सुजास मेळवून घेऊन काशी प्रयाग घेऊन बंगाला पटणें निमें देऊं करून दोघांनीं मिळून सोडवावा हा तिसरा प्रकार. या तीनही मनसब्यांत जो पक्का बनेल तो करावा. दिल्लींत लहान वकील लबाड फार बोलत असतात. उगीच गोष्ट फुगवून राजकारण अडकवून पाडावें, निशेस ठिकाण नाहीं, तुमचा सरळ कारभार, यास्तव हरएक राजकारण पक्के निशेचें कोणतें, शोध पुरता घ्यावा. तूर्त तुह्मी लाहोर प्रांतीं गेलां, तिकडेही काम फार आहे. यामुळें उशीर लागेल, छावणीही त्या प्रांतें होईल. तेव्हां हा मनसबा बाजतबरसाद जाईलसें वाटतें. तथापि लाहोरकडील बंदोबस्त सत्वर होऊन तुह्मी छावणीस, दिल्ली आसपास आलां तर हीं कारणें स्वकार घडून येतील ' ( का. सं. प. या. ३६२ ). परंतु हे बेत सिद्धीस गेले नाहींत, त्याचीं कारणें पुढें दिसून येतील.

२. **शुक्रतालच्या पुलाची भूलथाप** (मे–नोव्हेंबर १७५९). पेशव्याचे हे मनसुबे कागदावरच राहिले. गाजीउद्दीनानें मराठ्यांची मदत घेऊन नजीबखानास उखडण्याचा चालविलेला प्रयत्न बादशहास रुचला नाहीं. दोन बलाढ्य उमरावांस एकमेकांविरुद्ध लढवून तो आपला निभाव कसा बसा लावीत होता. बादशहाचा वडील पुत्र मीर्झा अब्दुल्ला अलीगौहर याजवर बादशहाची मोठी भिस्त होती. उत्तर मोगलशाही डोळ्यांनीं भरपूर पाहिलेला हाच शहाजादा पुढील शहाआलम बादशहा होय. याचा जन्म ता. १४·६·१७२८ व मृत्यु १८·११·१८०६. बादशहा वृद्ध व पैशाच्या अडचणींनीं गांजलेला होता. मराठ्यांनीं व ठिकठिकाणच्या अंमलदारांनीं सर्व राज्य ग्रासून टाकिल्यामुळें वसूल बंद पडला. गाजीउद्दीनानें सर्व राजकुटुंबावर सक्त पेहरवी ठेविली होती. ता. १९·५·१७५८ रोजीं त्यानें अलीगौहर यास त्याचे राहते वाड्यांतच प्रतिबंधांत ठेविलें; पण बादशहानें त्यास युक्तीनें त्याच दिवशीं सोडवून बाहेर पाठविलें. तो ठिकठिकाणीं हिंडत गेला. रोहिल्यांनीं त्यास मदत केली नाहीं, तेव्हां बरेली, फैजाबादवरून प्रथम अलाहबादेस व तेथून पुढें बहार प्रांतांत गेला. (Imp. Gaz. II. 410). नंतर बादशहानें त्याची नेमणूक बंगालच्या सुभ्यावर केली. सुजाउद्दौला व काशीचे बळवंतसिंग यांची मदत त्यास नजीबखानाचे मार्फत मिळाली. शहाजाद्याची ही चलती पाहून गाजीउद्दीन घाबरला आणि दत्ताजीच्या मदतीनें आपला बंदोबस्त करूं लागला. दत्ताजीला बंगाल्यावर स्वारी करण्यास पेशव्यानें सांगण्याचें हें आणखी एक कारण होतें. पण दत्ताजीस बंगाल्याकडे जाण्याची सवड होण्यापूर्वीच अलीगौहर व सुजा यांनीं स. १७५९ चे मार्चांत पाटणावर चाल केली. फ्रेंच सेनापति जीन लॉ हाही त्यांचे मदतीत आला. परंतु पटणाचा कारभारी रामनारायण यानें क्लाइव्हची मदत घेऊन शहाजाद्यास पराभव करून परत फिरविलें (जानेवारी–एप्रिल), तेव्हां पुढें तो अलाहबादेकडे सुजाचे आश्रयास राहिला. प्रयाग, काशी वगैरे ठिकाणें कबजांत घेण्यास मराठे उत्सुक होते, तितकाच सुजा तीं सोडण्यास नाखुष होता. कारण मुसलमानी अंमल नाहींसा झाल्याची ही एक खूणच होती. हीं ठिकाणें मराठ्यांचे कबज्यांत कधींच आलीं नाहींत.

दत्ताजी शिंदे लाहोरचा बंदोबस्त करून परत आला, तेव्हां मराठ्यांचा अंमल दिल्लींत कायम होणार अशी वेळ आली, म्हणून नजीबानें व बादशहानें अब्दालीस निकडीचीं पत्रें लिहून त्यास त्वरेनें हिंदुस्थानांत बोलाविलें; आणि इकडे दत्ताजीस गंगेवर पूल बांधून देण्याच्या गुळचट थापा देऊन स्वस्थ बसविलें. नजीबखानाचा बंदोबस्त करण्याविषयीं दत्ताजीस पेशवा लिहून लिहून थकला. पण दत्ताजीस केवळ भुरळ पडल्यासारखें झालें. ( १ ) पंनास लाख घेऊन सुजास वजिरी देणें; ( २ ) अंताजी माणकेश्वरास दिल्लींतून काढणें; ( ३ ) तीस लाख घेऊन नजीबखानास स्वस्थळीं स्थापणें, ( ४ ) किंवा आपण होऊनच पातशाहीचा बंदोबस्त करणें; यांपैकीं कोणते प्रकार कसे करावे तें शिंद्यांनीं विचारिल्यावरून पेशवा लिहितो. 'वजीर मीरशहाबुद्दीन सर्व आपल्या लक्षांत आहेत, त्यांजकडून करारांत अंतर नाहीं, सबब सुजास वजिरी देऊं नये. वजिराकडून अंतर पडेल व सुजाकडून पंनास लाख मिळतील तर सुजास वजिरी देण्यास हरकत नाहीं; नजीबखान बाट, अर्धा, अब्दाली, त्याचें राजकारण न करावें. सुजाउद्दौला व जाठ एक झाल्यास भारी होईल, सबब आहेत वजीर तेच फार उपयोगी. अंताजीपंतास जरूर हुजूर पाठविणें. कर्जाची चिंता दत्तबांस असेलच.' रामराव नीळकंठ म्हणून पेशव्याचा कोणी हस्तक होता, त्यानें ता. १३ मे रोजीं दिल्लीहून एकंदर हकीकतीचें विस्तृत पत्र पेशव्यास लिहिलें तें वाचण्यालायक आहे (इ. सं. ऐ. टि. २·४१). 'लाहूर प्रांताकडील ऐवजाचा कांहीं वसूल आला. दहा लक्षांच्या हुंड्या सेवेसीं पाठविल्या त्या पावल्याच असतील. बाकी ऐवज देणें तो श्रावण-अखेर येईल, तो वरचेवर आपणाकडे येत जाईल. तुर्की घोडे कांहीं मिळविले आहेत ते खजाना समागमें पाठवितील. अंताजीपंतासंबंधानें दरबारांत स्वभावगुणाकरितां विश्वास पडत नाहीं. सबब हुजूरच पाठवितात. तेथें आल्यानंतर जें कर्तव्य तें करतील. दत्तबांचा एक हेतु हाच कीं खावंदांस ऐवज पाठवावा. यांत आपली अभिलाषबुद्धि नाहीं. त्यांचें चित्त स्वामी-चरणीं एकनिष्ठ, कायिक, वाचिक, मानसिक सर्व प्रकारें आहे. लाहोर

प्रांतीं आलिया उपर अदिनाबेग मृत्यु पावला, त्याची स्त्री व दत्तपुत्र घेतला आहे तो भेटीस यजमानांच्या आले. त्यांच्या माथां चौदा लक्ष ठराविले. त्यांस तालुका लाहोर व जालंधर दादासाहेबांनीं दिल्हा तोच कसर केला. परंतु लाहोर प्रांतीचा मुलूख बहुत, पलीकडे अटक कंदाहारपर्यंत मोकळा पडला. पठाणाचा मार्ग. जंबूचे राजे पहाडी आहेत त्यांस अंगीं लावून येऊन कामकाज घ्यावें. शिखांचा दंगा या प्रांतीं बहुत. फौजेचें बळ पाहिजे. नेहमीं पंधरा हजार फौज, एक मातबर सरदार मर्द माणूस, तिकडे पाहिजे. सांप्रत साबाजी पाटील शिंदे त्या प्रांतीं आहेत. त्यांचे मदतीस नारो शंकर यास ठेवण्याची आज्ञा. त्याप्रमाणें त्यांस सांगितलें. साहेबांच्या हुकमाचें खातरजमेचें पत्र यावें. आज्ञेप्रमाणें वर्तणूक करतील. सांप्रत लाहोर प्रांताचा बंदोबस्त चरितार्थ मात्र केला आणि यथास्थित करणें तो सेवेसीं विनंति लेखन केली. हल्लीं शिंदे गंगापार होऊन, बंगाल पटणें या प्रांतीं जावें हाच उद्योग धरून गडमुक्तेश्वरास जातात. मातबर पैका आज्ञे-प्रमाणें कर्जाच्या उपयोगी पडे ऐसें कार्य योजोन जात आहेत. उभयतांच्या चित्तांत रात्रंदिवस निदिध्यास हाच कीं मातबर काम करून खावंदांचा संतोष करावा. हेच चित्तीं रात्रंदिवस जपमाळ आहे. तो सुदिवस इच्छितात. वजिरास समागमें घ्यावयाकरितां अंताजीपंत त्यांजकडे गेले आहेत. सर्व सिद्धिप्रद कार्य करणार महाराजांचा पुण्यप्रताप समर्थ आहे. श्रुत होय ही विज्ञप्ति.' शिंद्यांची ही राजनिष्ठा अत्यंत स्मरणीय आहे.

स. १७५९ त अंताजीपंत एकदांचा पुण्यास गेला. या सालच्या डिसेंबरांत सदाशिवराव त्याच्या कारभाराची झडती घेत होता ( ३·२३३ ). अर्थात् दत्ताजीबरोबर तो रोहिलखंडांत नसावा. परंतु अंताजी व त्याचा पुत्र तात्या आक्टोबरांत दत्ताजीबरोबर रोहिलखंडांत असल्याचा उल्लेख भा. सा. ब. त आहे.

एप्रिलांत दत्ताजीचा मुक्काम कुंजपुऱ्यावर असतां नजीबखान त्यास येऊन, भेटला. त्या भेटींत त्या कपटी खानानें शुक्रतालावर गंगेस पूल बांधून देण्याचें कबूल करून उभयतांनीं मिळून सुजावर स्वारी करण्यास सुचविलें. जनकोजीस

ही सूचना आवडली नाहीं, पण दत्ताजीनें ती अंमलांत आणण्याचें ठरविलें. गोविंदपंत बुंदेल्यानेंही दत्ताजीस दुजोरा दिला. या वेळीं खानाकडून लांच घेऊन फंतानें त्याचा बचाव केला असें बखरकार म्हणतो ( भा. ब. ). नजीबखान आयता हातांत आला आहे त्याचा आतां पक्का बंदोबस्त करावा असा जनकोजीचा आग्रह होता, त्याचा दत्ताजीनें अव्हेर केला. नजीबखानानें दत्ताजीस आशेस गुंतवून सहा महिनेपावेतों त्यास कांहीं करूं दिलें नाहीं, आणि आंतून सर्व मुसलमानांशीं जोरावीं कारस्थानें करून नोव्हेंबरांत अब्दालीस दत्ताजीवर आणून त्यास कैचींत पकडिलें. गंगानदी हरद्वारावरून दाक्षिणेस वाहत येते; तेथून सुमारें साठ मैलांवर मिरापुराजवळ पालखीच्या दांडीसारखें नदीस मोठें वांकण असून त्या वांकणावर शुक्रताल गांव आहे. या ठिकाणीं नदींत मोठमोठे उंचवटे असून नांवांचा पूल बांधण्याची सोय होती. कुंजपुऱ्यावर यमुना उतरून जून महिन्यांत दत्ताजी गडमुक्तेश्वरास आला. तेथें महिना पंधरा दिवस मुक्काम करून सर्वांनीं तीर्थविधि केले. 'शिंदे जसे रणशूर तसेच दानशूर, ईश्वरें अनुकूल दिलें तसे दानधर्म केले.' एक महिन्यांत पूल तयार होतांच शुक्रताल येथें जावयाचें असा दत्ताजी व नजीबखान यांचा करार होता. बरसाद असल्यामुळें पूल तयार होऊं शकत नाहीं असा जबाब नजीबाकडून दत्ताजीस गडमुक्तेश्वरीं आला. तेव्हां दत्ताजीनें त्यास उलट कळविलें कीं, पूल तयार होत नसेल तर तुह्मीच आह्मांस येऊन सामील व्हावें. ही गोष्ट नजीबानें साफ नाकारिली; आणि पुलाचा कबजा घेऊन तो गंगेपलीकडे बंदोबस्तानें राहिला आहे, असें दत्ताजीस कळतांच, त्याचें कपट उमजून दत्ताजी लगोलग जुलईत शुक्रतालावर आला. नजीकच हस्तनापूर हें ओसाड गांव भारतीय काळचें होतें. शुकाचार्यांनीं परिक्षितीस भागवत ऐकविलें म्हणून गांवाचें नांव शुकताल पडलें अशी दंतकथा आहे. हल्लीं तेथें एक वृक्ष व तीर्थकूप मात्र साक्षीस आहेत. त्या ठिकाणीं नजीबखानाचा वकील चेतराम येऊन त्यानें साफ दांडगाईचें उत्तर दत्ताजीस कळविलें. तेव्हां ज्यास्त काल हरण करितां दत्ताजी स्वतः नजीबावर चालून आला. तीन चार महिने शुक्रतालच्या

पुलावर मराठे व रोहिल्यांची मोठी झटापट चालून राहिली. उभयतांनीं तोफखान्याची व हातघाईची शिकस्त केली. चढते घोड्यांनिशीं चालोन जाणें तों केवळ असाध्य. कोसपर्यंत उभे राहूं देईनात. खळ्यांचा आश्रय करून तोफांचा व बाणांचा मार देऊं लागले. मागें सरून मिरापुरास डेरे केले. रोहिल्यांचीं अंतर्वेदींतील तमाम ठाणीं घेतलीं. तेव्हां लोक पळून उत्तरेस तराईत जाऊन राहिले. शुक्रतालच्या गढींत भाद्रपद मासपर्यंत गोळागोळी होत गेली. एके दिवशीं गढींतून रोहिले चालून आल्यामुळें जनकोजी व दत्ताजी साथीदारांसह आवेशानें रोहिल्यांत घुसले. जनकोजीची घोडी ठार झाली. हातावर तलवारीची व कानास भाल्याची जखम लागली. दत्ताजीस-ही भाल्याची जखम व गोळी कातरती लागली. लोकांनीं दोघांसही उखळून बळें ओढून नेलें. शिंद्यांचे साडेसहाशें खासे मनुष्य कामास आले. बारारीं घोडे ठार पडले, दोन अडीच हजार जखमी झाले. एक सरदार जिवाजी शिंदे व त्याचा मुलगा हणमंतराव ठार पडले. लष्करांत जिकडे तिकडे प्रलय, परंतु नजीबखानास चैन पडूं दिलें नाहीं. तों दसरा आला [ १·१०·१७५९, भा. सा. व. पृ. ५० ]. ‘ नजीबखानाची फौज पुलावरून पलीकडे गेली व यानें पूल राखिला ’ [ २·१५३ ].

चार महिने मेहनत करून नजीबखान जेरीस येईना, तेव्हां गंगेस वर उतार पाहून पलीकडे फौज नेऊन मागून त्यास चेपण्याचा विचार शिंद्यानें केला. सुजाउद्दौला आपणास आडवा येणार नाहीं असें दत्ताजीस वाटत होतें; परंतु हा त्याचा अदमास चुकला. ता. २१·१० रोजीं दत्ताजी हरद्वारास आला. मिरापुरच्या सय्यदांस वश करून त्यांचे साह्यानें जेतागुजर राजकडून हरद्वारास उतार काढून गोविंदपंत, अंताजीपंत व पुत्र तात्या, जिवाजी व नाईकजी भोईटे, व तुकोजी होळकर यांस वीस हजार फौजेसह ता. २२ आक्टोबर रोजीं दत्ताजीनें गंगापार केलें. ही फौज जलालाबादपावेतों आली तों सुजाची फौज व रोहिले सरदार सामन्यास आल्यामुळें, ते सर्व परत फिरून ता. ७ नोव्हेंबरच्या पूर्वीच गंगे अलीकडे आले (१·१४१). दत्ताजी बहुधा

रद्वारासच होता. 'परम कष्टें गंगापार झालों. पार येऊन जलालाबादेजवळ नजीबखानाचा लेक जाबेताखान, दुंदेखान, सादुल्लाखान व हाफीज रहमत दहा हजार फौजेसह जमा झाले आहेत. एक दोन लढाया जाल्या. रोहिल्यांच्या पंनास तोफा हिरोन घेतल्या. नजीबखानाच्या पुलापावेतों गांव जाळिले. चार रोजांत नजीब तेथून निघेल. हाफीजाकडून रात्रौ पत्रें आलीं. नरम जाले, सलूक करतील ( १·१३८ ). हाफीज रहमतकडून पैगाम आला तों अगोदरच रोहिल्यांचें व सुजाचें सूत जालें होतें. रामगंगेस पूल बांधून सुजानें लखनौहून दहा बारा हजार फौज उमरावगीर गोसावी याचे हाताखालीं मराठ्यांवर रवाना केली. मल्हारबा पंधरा दिवसांत आले तर उत्तमच आहे. नाहीं तर कठीण काम. दंगा व्हावयासी उशीर नाहीं ' ( १·१३९ ). उमरावगीरानें अंताजी व गोविंदपंत वगैरेंस भेदून सलुखाच्या नादीं लाविलें, आणि आंतून नजीबखानानें अब्दाली व रजपूत यांजकडे सर्वत्र जोराचीं कारस्थानें चालविलीं. इकडे तहाच्या वाटाघाटीकरितां शुक्रतालच्या पुलावर नजीबखान व दत्ताजी यांच्या खासगी भेटी व्हाव्या, आणि त्या भेटींत दत्ताजीस मारून टाकावें, असा रोहिल्यांचा घाट होता. परंतु जनकोजी, नारोशंकर, व स्त्रिया भागीरथीबाई व काशीबाई यांनीं जोरानें निषेध करून दत्ताजीस नजीबाचे भेटीस जाऊं दिलें नाहीं. मात्र या वाटाघाटींत महिना पंधरा दिवस फुकट गेले. गोविंदपंत कशी खटपट करीत होता हें ६·५८० वरून दिसतें, म्हणून लांच घेऊन तो नजीबखानास सामील झाला होता, हें बखरकाराचें विधान विश्वसनीय वाटत नाहीं. ' नबाब सुजाउद्दौले रोहिल्यांचे कुमकेस आले, त्यावरून आवई खाऊन सर्व फौजा माघाऱ्या गंगे अलीकडे आल्या.' इतक्यांत अब्दाली पंजाबांत आल्याची खबर मिळाली. ' त्याची फौज कुरुक्षेत्रास पोंचली. स्वतः लाहोरास व जहानखान सतलज नदीवर आहे ( ४·११·१७५९, १·१४० ). ' आमचे लोक कित्येक गंगेमध्यें वाहले, कित्येक मारले गेले. दहशत भारी पडली आहे. अब्दाली आल्यानें गडबड उडाली आहे. दिल्ली अगदीं पळोन गेली,' [ ७ नोव्हेंबर १·१४१ ]. ' अब्दाली लाहोरास आला. झीजांची

ाठीं लढाई झाली. अब्दालीची दोन हजार फौज मारली गेली. हानखानाची फौज मारली गेली. जहानखान जखमी झाला. अब्दालीचे ाक लाहोराकडेच आहेत. दुआबांत गवार मिळोन गळाठा केला. शतद्रु तरतां, पलीकडे कांहीं राहिले, कांहीं अलीकडे आले. तेथें दगा जाला. ाहोर रुपये लुटले गेले. कांहीं उघडीं माणसें पायउतारां पाचशें आलीं. जार घोडे लहान थोर आले, बरकड मारले गेले. मोठी बदनक्षी झाली. ब्दालीचा शह भारी येऊन पडला. रोहिले सुजाउद्दौले एक झाले. दोन ह पडले आहेत. मुलखांत गडबड फार जाली' [ १·१४६ ]. हें ता. २४ व्हेंबरचें बुंदेल्याचें लिहिणें आहे. ६·४६५–४८० व ५०९ हे कागद र्मिक वर्णनाचे असून बहुधा या हालचालींसच अनुलक्षून असावे.[१] सेप्टें- ांत अब्दाली शिकारपुरच्या वाटेनें हिंदुस्थानांत येऊन नदीस उतार नसल्या- ळें सिंधूच्या पश्चिम तीरानें अटकपावेतों वर जाऊन ऑक्टोबरांत अलीकडे ाला. त्याचा सेनापति जहानखान बरोबर होता. त्याच्या मुकाबल्यास ाबाजी शिंदे गेला असतां, त्याचा पराभव करून अब्दाली नोव्हेंबरांत लाहो- वर आला आणि आघाडी सतलजवर येऊन पोंचली. पुढें डिसेंबरांत तो रुक्षेत्रावर येऊन धडकला. हरद्वारावरून दत्ताजी खालीं पुनः शुक्रतालावर येत ासतां वाटेंत ता. ८ नोव्हेंबर रोजीं साबाजी शिंदे मार खाऊन परत आलेला त्ताजीस भेटला, आणि घाईघाईनें नजीबाचा पाडाव करून व सलुखानें सुजास ळवून घेऊन, मागून अब्दालीच्या समाचारास जाण्याचा विचार ठरवून, ुक्रतालावर पुनः त्यानें शिकस्त करून पाहिली. पुढें अब्दाली कुरुक्षेत्रावर ाल्याची खबर येतांच ता. १३ डिसेंबरास दत्ताजी कुरुक्षेत्राकडे त्याचे सामन्यास ंघाला असतां, ता. २२ डिसेंबरास त्याची व अब्दालीची झटापट सुरू झाली.

---

१. टीपः—या प्रकरणाचें उद्घाटन रा. राजवाड्यांनीं १. टीप २४५ त केलेलें ार्मिक आहे. मात्र ले० १४२–१४४ च्या तारखा ठरविण्यांत ता.११ नोव्हेंबर ाखल आहे, त्याऐवजीं डिसेंबर ७, १०, १२ अशा तारखा अनुक्रमें पाहिजेत.

रोहिले सरदार व सुजाउद्दौला यांजबरोबर चाललेल्या सलुखाच्या वाटाघाटी केवळ वेळ मारून नेण्यापुरत्या कपटाच्या होत्या. अब्दाली आल्याबरोबर पूर्वीचें सर्व मान एकदम फिरलें. नोव्हेंबर ७ पासून एक महिना पुनः शुक्रतालावर दत्ताजीनें नजीबाचा पाडाव करण्याची शिकस्त करून पाहिली. गंगेपार गेलेल्या फौजा परत आल्या. गंगेचें पाणी उतरल्यामुळें त्या कदाचित् पुनः हरद्वाराकडेच परत उतरल्या नसतील. उमरावगीर गोसाव्यामार्फत सुजास वळविण्याचीही दत्ताजीनें शिकस्त केली. एक कोट रुपये मिळवून पेशव्याचें कर्ज फेडावयाचें याशिवाय दुसरा ध्यास दत्ताजीस नव्हता. सुजानें त्यास आशेस गुंतवून एक महिना शुक्रतालपुढेंच अडकवून ठेविलें. यामुळें दत्ताजीचा सर्वस्वी घात झाला. पाठीमागून अब्दाली व पुढें रोहिले यांच्या कचाटींत तो अचूक सांपडला. या वेळीं प्रसंग पाहून मागें सरकून त्यानें तावडतोब दक्षिणेस जयपुरकडे निघून यावयास पाहिजे होतें. परंतु शत्रूस भिऊन पळाल्याचा दुलौकिक पदरीं घेण्यापेक्षां मृत्यु पत्करण्याचा निश्चय करून, दत्ताजी दोनही शत्रूंशीं टक्कर देण्याच्या इरादानें, सर्व लहान थोर मंडळींच्या सल्ल्याचा अव्हेर करून, दिल्लीच्या बाजूसच चिकटून राहिला. 'दिल्ली उजाड झाली. साबाजी शिंदे व अब्दाली यांची लढाई होऊन हे दरमजलींनीं येथे लष्करीं दाखल झाले. सर्व हिंदुस्थान गडबडलें आहे. काल सुरजमल्ल जाटाकडील फौज पांच हजार आली. मल्हारबाकडे सांडणी स्वार व काशीद गेले. तेही सत्वरच येतील. सुजातउद्दौले व रोहिले एक झाले. परंतु गंगापार होऊन त्यांजला येववत नाहीं'. [ता. १० डिसेंबर १७५९, १·१४२-१४३]. एक दोन दिवसांतच शुक्रताल सोडून दत्ताजीस मागें अब्दालीचे मुकाबल्यास वळणें भाग पडलें. 'आह्मी येथून बिदा जालों,' असें ता. १२ डिसेंबरास बुंदेले लिहितो. 'येथे फौज फार जमा जाहली. लाहोराकडून तमाम फौज आली. पातशाहा वजिराचे कबिले आघ्यास गेले. पातशहा वजीर येथें येतात. मार्गीं दंगा झाला. माणूस निभावत नाहीं. कजिया फार झाला' (१·१४४). ता. ११ डिसेंबरास दत्ताजीनें शुक्रताल सोडून अब्दालीकडे मोर्चा वळविला. कुंज-

पुन्यानजीक यमुना उतरून फौजा अलीकडे आल्या. तेथें गिलचा कुरुक्षेत्रावर आल्याची खबर पोंचली, तेव्हां मुलें, माणसें व जनकोजी शिंदे यांस दिल्लीस पाठवून सडे होऊन अब्दालीस गांठावें ह्मणोन पानपताकडे चालले. हाताखालच्या सरदारांस जोर देऊन लढण्याची शिकस्त करण्यास सांगितलें. ता. २१ डिसेंबर रोजीं बुंदेले लिहितो, 'आह्मी यमुनापार उतरलों. अब्दाली कुरुक्षेत्राहून पंधरा कोसांवर आला. दत्ताजी सडी फौज घेऊन त्याजवर गेले. जनकोजी शिंदे, गाजुद्दीन वजीर व आह्मी राहिलों. अब्दाली न रेटे, तर बुनगे घेऊन आह्मी व रूपराम कटारे दिल्लीवरून चमेलपार करून देऊं. अब्दाली व पाटील बावा यांची लढाई आज अगर प्रातःकाळीं होईल. ईश्वर ज्यास यश देई, त्यास सुखें देऊं[1] (१·१४७). नजीबखानास इकडे असाच गुंतवून अब्दालीची व त्याची गांठ पडूं देऊं नये आणि अब्दालीला एकटाच गांठून त्याचा फडशा उडवावा असा विचार दत्ताजीनें तारांबळींतच केला, पण तो सिद्धीस गेला नाहीं.

३. **दत्ताजीचा अजब पराक्रम व वध,** (१०·१·१७६०).–पावसाळ्यांत दत्ताजी रोहिलखंडांत लढत असतां बादशहानें व नजीबखानानें निकडीचीं पत्रें अब्दालीस लिहून त्यास त्वरेनें मदतीस बोलाविलें. अशीं बादशहाचीं स्वदस्तुरचीं पत्रें वजिराचे हातांत पडलीं, तेव्हां अब्दाली आल्यावर पुढें आपला निभाव लागणार नाहीं असें पाहून ता. २८ नोव्हेंबर १७५९ रोजीं वजिरानें बादशहास साधूचे दर्शनासाठीं म्हणून वाड्याचे बाहेर आणून त्याचा शिरच्छेद करविला आणि मुहि–उल्–मिलात् नांवाचा कामबक्षचा पुत्र होता त्यास शहाजहान सानी[2] असें नांव देऊन तख्तावर बसविलें. परंतु त्या

---

१ टीप.–शेवटच्या वाक्याचा सरळ अर्थ, 'ईश्वर कोणास यश देतो पहावें' असा असतां, गोविंदपंताला दत्ताजीच्या पराजयाची पर्वा नव्हती, असा अर्थ राजवाड्यांनीं काढिला आहे [१ टीप २१२], तो बरोबर दिसत नाहीं.

२ बहादुरशहाचा मुलगा रफीउश्शान होता, त्याचा मुलगा रफीउद्दौला ह्यास शहाजहान सानी असें अर्विन सांगतो. एल्फिन्स्टन सांगतो, कामबक्षाचा मुलगा.

बादशहाचा अखत्यार चालला नाहीं. पुढील जानेवारींत अब्दालीनें दिल्ली हस्तगत केली तेव्हां त्यानें त्यास काढून लाविलें. इकडे अलीगौहरला बापाच्या मृत्यूचें वर्तमान समजतांच त्यानें ता. २२ डिसेंबर रोजीं ( अलाहाबाद येथें ? ) शहाआलम नांवानें बादशाहीपद धारण केलें. त्यालाच अब्दालीनेंही मान्यता दिली. स.१७७१त त्यास महादजी शिंद्यानें दिल्लीस आणून मसनदीवर बसविलें.

दत्ताजीनें भोईटे बाप लेक, बुंदेले व अंताजीपंताचा पुत्र असे अब्दालीवर पुढें रवाना केले. त्यांनीं सोळा कोसांवर तुराणीची अघाडी गांठली. मराठ्यांस पाहून गिलच्यांनीं पळण्याचें सोंग करून पूर्णपणें अंगावर घेतल्यावर उलट खाऊन यमुनेच्या अडचणींत त्यांस जोरानें रेटलें. त्या वेळीं कुणबी जोंधळ्याचीं कणसें कापितो तसे त्यांनीं मराठे कापून काढिले. मागून दत्ताजी स्वतः त्यांचे मदतीस निघाला असतां पंजाब प्रांतीं शिवक बापूजीचें पथक होतें, त्याचे लोक उघडे बोडके गिलच्यांनीं नागविलेले रस्त्यांत दत्ताजीस भेटले. या लोकांनीं पंजाबांत लूट करून अपार संपत्ति पैदा केली होती. ती सर्व अफगाणांनीं हिरावून घेतली. हा देखावा पाहून दत्ताजीस अतिशय दुःख झालें. तरी तो शूर गडी डगमगला नाहीं. कुंजपुऱ्यावर यमुना उतरून अब्दाली अलीकडे येत असतां, ' ता. २४ डिसेंबर रोजीं गांठ पडली. युद्ध झालें. अब्दालीची फौज भारी तथापि त्यांस बरें वजेनें नरम केलें; आणि नजीबखानास सामील करून दिल्लीवर यावें असा विचार केला,' [ १·१५७ ]. पण तो सिद्धीस गेला नाहीं. कुंजपुऱ्याचे उत्तरेस पूर्वी जेथें दत्ताजी यमुना उतरला, त्याच उतारावरून अब्दाली अलीकडे येऊन शुक्रतालावर नजीबखानास मिळाला. तेथें सुजाउद्दौला व अहंमदखान बंगश लंगडा पठाण हेही त्यास मिळाले. याप्रमाणें मुसलमानांचा जमाव मोठा होऊन त्यांजबरोबर झगडण्याचें सर्व काम एकट्या शिंद्यावर येऊन पडलें. मल्हारराव होळकरास दत्ताजीचे मदतीस तातडतोब जाण्याविषयीं पेशव्याकडून व शिंद्यांकडून निकडीचीं बोलावणीं जात होतीं, परंतु तो पुढें न येतां जयपुरचे हद्दींतच रेंगाळत राहिला.

अब्दाली अंत आलेला पाहून दत्ताजी परत फिरला. रस्त्यांत दुराणीचे

तळावरून येत असतां, त्यानें आपल्या लोकांच्या शिरांचा गंज पाहिला. डोळ्यांस पाणी आलें. पंधरा हजार निवडक मनुष्यें अल्पावकाशांत जायां झालीं. ओळखावयास सुद्धां कोणी नाहीं. शिरांचीं नाकें कापून डेऱ्यांपुढें कलवड्याप्रमाणें चवुत्रा घातला होता. मोठा प्रलय, फौजेंत रडारोय सुरू झाली. उभयतां भोईटे व अंताजीचा मुलगा तात्या हेही मरण पावले होते. अग्निप्रसाद देऊन दत्ताजी परत फिरला, तो दिल्लीच्या वायव्येस सुमारें वीस मैलांवर जनकोजीस मिळाला. तेथून सर्वांनीं दिल्लीजवळ येऊन मुज्मूचे टिळ्यानजीक मुक्काम केला. गोविंदपंत बुंदेले बहादुरगडाहून लिहितो, ' पाटीलबुवा फौजसुद्धां दिल्लीस जाणार. अब्दाली व रोहिले शुक्रतालींच आहेत. आह्मी दिल्लीपावेतों पाटीलबुवांचे बरोबर येऊन पुढें बुंदेलखंडांत येतों. आज येऊन दिल्लीस दाखल जाले. बुनगे जाठाचे मुलखांत रवाना केले. याच वेळीं वजीरही जाठाकडे गेला, तो फिरून परत आला नाहीं [१·१५०]. 'आपण सडे होऊन यमुनापार शामली मेरठ्यारोखें जातात, मल्हारराव होळकर दरमजलींनीं येतात. तें व हें एक झाल्यावर बंदोबस्त उत्तमच होईल.' यावरून होळकर आल्यावर उभयतांनीं मिळून यमुनेच्या पलीकडे जाऊन अब्दालीचा पाडाव करावयाचा, असा शिंद्यांचा विचार ता. ३ जानेवारीस होता. परंतु मल्हारराव होळकर आलाच नाहीं; आणि अब्दालीनें मराठ्यांस आपल्या अंगावर यमुनेपार येऊं दिलें नाहीं.

ता. ३ जानेवारी १७६० रोजीं दत्ताजी दिल्लीस दाखल झाला. स्वतःचें शौर्य व फौजेचा दम यांजवर भिस्त ठेवून आपण अब्दालीस जेर करूं अशी त्यास हिंमत होती, ' दुराणी नामर्द, त्याच्यानें काय होणें आहे! आह्मी गनिमी काव्यानें राहतों, तोंपावेतों एक दों रोजांत येऊन पोंचतों, असें मल्हाररावांचेंही पत्र आलें आहे,' असें दत्ताजीनें घाबरलेल्या वजिरास कळविलें; आणि त्यास दिल्लीच्या किल्ल्यांतच स्वस्थ राहण्यास सांगितलें. दत्ताजी हट्टास पेटून मागें सरकत नाहीं असें पाहून त्याची बायको भागीरथीबाई इनें नारोशंकर, आनराव वाघळे, गोविंदपंत बुंदेले व प्रत्यक्ष जनकोजी यांस भीड

पाहून दत्ताजीचे समजुतीस पाठविलें. त्यांनीं जाऊन मागें हटण्याविषयीं किंवा निदान कबिले तरी चमेलीपार लावून देण्याची भांड घातली. बरीच भवति न भवति झाली. अपयश घेऊन नानासा०स व भाऊसा०स तोंड काय दाखवावें, हें एकच त्याचें उत्तर. शेवटीं भागीरथीबाईची प्रसूति नजीक आलेली पाहून, दत्ताजीनें जनकोजीस सांगितलें, ' तुह्मी बाया घेऊन मागें जा. आह्मी येथेंच राहतों.' परंतु जनकोजीनें जाण्याचें साफ नाकारिलें. तेव्हां रूपराम कटारी यासमागमें बायकांस देऊन वाटेस लाविलें. दत्ताजी व जनकोजी यमुनेच्या घांटीं अब्दालीवर चालून जाण्याच्या इरायानें राहिले. तेव्हां यमुना उतरून मराठ्यांनीं आपल्यावर चालून येऊं नये, ह्मणून अब्दालीनें कांहीं फौज यमुनेवर मराठ्यांचे समोर पाठविली. उभय फौजा एकमेकांचे पुरतेपणीं दृष्टीस पडल्या. गिलच्यांनीं पलीकडच्या कांठचे अनेक भाग उद्ध्वस्त केले. दत्ताजीनें घांटावरून नदींत हत्ती घालून ठाव पाहिला, परंतु ठाव लागेना. उलट अब्दालीचे लोक नदी उतरून अलीकडे येऊं लागले. तेव्हां जानराव वाबळे व मालोजी शिंदे यांस घांट राखण्यास दत्ताजीनें नेमिलें. पुढें दत्ताजीचें मन दुराणीस पाहून भडकल्यासारखें झालें. नामी नामी हत्ती त्याजपाशीं होते. त्यांस अंदू घालून एकदम अब्दालीशीं लढण्याचा त्यानें हुकूम सोडिला. वजिरानें अशी घाई न करण्याविषयीं पुष्कळ सांगितलें, पण तें त्यानें मानलें नाहीं. हत्तीवर घटका वाजत होती. तीन घटका दिवस आला. तेव्हां संक्रांतीचा तिळगूळ वांटून, सामानसुमान सिद्ध करून अब्दालीवर चालून गेले. हा संक्रान्तीचा दिवस ता. १०·१·१७६० होय.

स. १७४८ पासून दिल्लीसंबंधानें मराठे अब्दालीची झोंबाझोंबी कसकशी रंगत गेली, हें आपल्या डोळ्यांसमोर आहे. गाजीउद्दीननें मराठ्यांची मदत आणावी आणि विरुद्ध पक्षानें अब्दालीस आणावें, हा खेळ कैक वर्षें चालला होता. उभयतांचा जबर व समरासमोर सामना होण्याचा योग हा पहिलाच होय. ता. १०-१-१७६० रोजीं रघुनाथराव बुंदेल्यास लिहितो, ' मल्हारबा व तुम्ही ([illegible]) एकदा अबदालीचा पठाणांचें पारिपत्य उत्तम रीतीनें होईल. पठाणांत

कांहीं बल नाहीं. त्यांनीं मागील वर्षी दहशतही खादली आहे. तुम्ही तेथें शहाणे आहां. हरकसे चार दिवस रंग राखालच ' ( १. १५२ ). अटकेच्या स्वारींत रघुनाथरावानें पंजाबांत असलेल्या अब्दालीच्या फौजेची अनायासें तिरपिट उडविली, त्यावरून आपण त्याचें अवसान जोखलें असें रघुनाथरावास वाटलें. पण हा त्याचा अदमास साफ चुकला. स्वतः अब्दाली कसलेला सेनापति असून युद्धाचे डावपेंच मराठ्यांहून ज्यास्त जाणत होता. स. १७५८ च्या उन्हाळ्यांत इराण्यांनीं त्यास हैराण केलें होतें, पण या सालीं त्याच्या सर्व अडचणी मिटून हिंदी मुसलमानांचें उत्कृष्ट साह्य मिळाल्यानें त्यास जोर आला होता. रघुनाथरावाच्या चुकीच्या अंदाजामुळेंच पेशवा, होळकर व प्रत्यक्ष दत्ताजी थोडे बहुत निर्धास्त राहिले. होळकर तर दत्ताजीचे मदतीस आलाच नाहीं, आणि बुंदेलेही युद्धकर्मांत असला नसला सारखाच. स्वतः दत्ताजी व त्याचे सरदार कसलेले व जिवास जीव देणारे होते.

डिसेंबरच्या अखेरीस बुंदेले लिहितो, ' अब्दाली भारी आहे. त्यास स्वामींनीं मल्हारबास पत्रें पाठवून ते लौकर येत तें करावें, व एक साळसूद सरदार दहा हजार फौजेसह, मुलूख कौलीं न लुटी ऐसा ग्वाल्हेरसमीप पाठवावा. जमीनदारांनीं हरामजादगी केली. ऐन हंगामींच बखेडा झाला, ' ( १.१५७ ). मुसलमानांचा जोर पाहून बुंदेलेसुद्धां मराठ्यांवर उठले. वसूल येईनासा झाला. रसद पोंचविणें मुष्किलीचें झालें. माधवसिंगानें मल्हाररावास गुंतवून ठेविलें. बिजेसिंग उघडपणें मुसलमानांस साह्य करूं लागला. गोविंदपंताचे कुचराईसंबंधीं राजवाडे अवास्तव बनाव दाखवितात. परंतु पेशव्यास त्याजबद्दल बिलकूल संशय नव्हता. ता. २९-१-६० रोजीं पेशवा पंतास लिहितो, ' अब्दाली आल्यामुळें उभयतां शिंदे रोहिल्यांचा कारभार ठेवून गेले. तेच समयीं मल्हारजी होळकरास सामील करून जावयाचें होतें. तें न केलें. मल्हारबांनीं आधीं काम कोणतें करावें, मग कोणतें करावें. माधोसिंगाचा मजकूर काय ! जेव्हां म्हटलें तेव्हां त्याचें पारिपत्य करतां येईल. तो विचार मल्हारबांनीं न केला. दत्तबा तों ईश्वराच्या घरचे

शिपाई. त्यास अब्दालीची तमा काय! आऊन गांठ घालतील. ते त्यास सोडतील ऐसें नाहीं. मल्हारबास वारंवार जावयाविशीं पत्रें पाठविलीं. बहुत करून सामील आलेच असतील. प्रस्तुत पत्रें त्यांस व दत्तबांस पाठविलीं आहेत हीं त्यांस देणें. अब्दालीचे पारिपत्याविषयीं तुह्मी सर्व प्रकारें मनःपूर्वक मेहनत करीत असाल्च. इकडे निजामाचा गुंता लवकरच वाढून चि० दादास अविलंबें रवाना करतों. चार दिवस अधिक लागले तरी फौज दहा हजार त्वरेनेंच पाठवितों. तुम्हीं आपले कमावसिदारांची व जमीदारांची खबरदारी ठेवणें' [ १·१५७ ]. दत्ताजीच्या पराक्रमाविषयीं पेशव्यास मोठी खात्री असल्यामुळेंच तो थोडासा निश्चित राहिला असें दिसतें. ' अब्दालीच्या फौजेचें बलाबल कसें आहे? तुमची फौज कशी आहे? सरदार परम धैर्यवान, मर्द, पराक्रमी आहेत. अब्दालीस हतप्रभ करावयाच्या प्रयत्नांतच असतील [ १·१५५ ]. अब्दालीजवळ आला. दत्तबा सडे होऊन गेले. यंदां अब्दाली भारी आहे. बहुत तिकडे मिळाले आहेत. सत्वर फौज दहा हजार रवाना करावी. जमीदार सर्व फिसातीवर आहेत,' अशा आशयाचीं पत्रें अत्यंत विस्ताराचीं पेशव्यास जात येत होतीं. 'मल्हारबास वारंवार पत्रें रवाना केलीं आहेत. परंतु त्यांचे प्रकृतीस तुम्ही जाणतां. श्रीकृपेनें फाल्गुनअखेर येथील काम होईल. तदुत्तर बहुत फौज हिंदुस्थानांत रवाना होईल. सांप्रत आमची शरीरप्रकृति उत्तम आहे,' असे जबाब पेशवा पाठवीत होता [ १·१५८ ]. म्हणून दत्ताजीनें घाई न करितां जरा मागें सरकून दोन महिने सावधगिरीनें निभावून नेले पाहिजे होते. ' तजविजीनें सांभाळून काम करावें. जातीनिशीं जायां होऊं नये. सरदारीनें काम करावें' [ १·१५९ ]. हें तत्त्व पेशव्यानें दत्ताजीस वारंवार लिहिलें, परंतु तें त्यानें मानिलें नाहीं. मल्हाररावासही पेशव्यानें अशींच निकडीचीं पत्रें लिहिलीं, परंतु तो जयनगरच्या पुढें गेलाच नाहीं. हीं पत्रें लिहिण्यापूर्वीच दत्ताजीचा शेवट झाला होता.

गिलच्या यमुना उतरून अलीकडे आले. त्यांस दोआबिच्याचा जानराव

बावळ्यानें फसून प्रयत्न केला; त्यास दम निघेनासा झाला. त्याचे दीडशें मनुष्य तोफांनीं जायां झालें. लोंच साबाजी शिंद्याचा पुत्र बयाजी शिंदे मोठा शूर व दमदार होता, त्यास दत्ताजीनें बावळ्याचे मदतीस घांटावर पाठविलें. बयाजीनें हल्ला करतांच तो गोळी लागून ठार पडला. दुराणी व रोहिले यांनीं घाट काबीज केला. दुसऱ्या बाजूस गोविदपंत बुंदेले लढत होता त्यासही दुराणींनीं अडवून धरिलें. हें ऐकतांच स्वतः दत्ताजी व जनकोजी स्वार होऊन बाहेर पडले. तेव्हांही त्याचा उद्देश फौज कशीबशी सोडवून मल्हारराव येईपर्यंत माघार घ्यावी असा होता. परंतु शत्रूंनीं एकदम चाल निशाणावर केली; आणि तोफांचा व बंदुकांचा मार मराठी फौजेवर जोराचा चालू केला. नदीच्या तीरावर अडचण भारी; शेरणीचीं बेटें असल्यामुळें पळून जाण्यास सोय पडेना. एका बाजूस मालोजी शिंदे लढत होता, तो पडला. उभयतां शिंदे निशाण बचावण्यासाठीं झोंबूं लागले. हत्तीवरील घटका वाजली; आठ घटका पूर्ण होतांच पांचशें मनुष्य ठार झाले. तरी दत्ताजी व जनकोजी यांस पळून जातां आलें असतें, परंतु तसें न करितां निशाणापाशींच ते लढत राहिले. तों जनकोजीचे दंडास गोळी लागून तो बेशुद्ध होऊन खालीं पडला. हें वर्तमान दत्ताजीस समजतांच, त्यानें जोरानें शत्रूंवर घोडे घातले. त्या गर्दींत यशवंतराव जगदळे गोळी लागून पडला. त्याचें प्रेत काढावयास दत्ताजी पुढें गेला, तों त्यास उजवे बरगडींत गोळी लागून तोही तात्काळ गतप्राण झाला. तेव्हां सर्वांचीं अवसानें गेलीं. घांट सोडून लोक मागें मैदानांत आले. जनकोजी बाबा घायाळ होता, येसाजी भोईटे व जानराव वाबळे यांनीं त्यास घोड्यावर घालून ज्यास जसें सुचलें तसे पळत सुटले. कोणी कोणास पुसेना. पाठीवर गिलचे डोचकीं कापीत चालिले. संदीपबेगाचीं मुलें व कारभारी लक्ष्मीनारायण मागें तळावर होते, ते व अम्बेरगज व दुसरे हत्ती सामान वगैरे सर्व दुराणींनीं हस्तगत केलें. या लढाईस बराडीच्या घांटाची लढाई ह्मणतात. या घांटावर लहान थोर सात आठ हजार मनुष्य जायां झालें. दत्ताजीचा नोकर राजाराम चोपदार यानें

यमुनेच्या कांठीं दत्ताजीचें शव दहन केलें. तीन हजार रुपये दानधर्म खैरात वांटली. जनकोजीचा पाठलाग कांहीं वेळ शत्रूंनीं केला, परंतु तो हस्तगत झाला नाहीं, कारण पुढील सालच्या संक्रांतीच्या आहुतीसाठीं त्यास आणखी एक वर्ष इहलोकीं कंठावयाचें होतें. पळत असतां त्यास वेदना अत्यंत होत होत्या. दत्ताजी पडल्याची खबर त्यास नव्हती. बायका वगैरे अगोदरच पुढें चोवीस कोसांवर गेल्या होत्या त्यांस येऊन जनकोजी मिळाला. त्या वेळीं बायका माणसांच्या भेटींत केवढा कल्लोळ व आकांत उडाला असेल, याची कल्पनाच केली पाहिजे. दिवाण रामाजी अनंत दाभोळकर व रूपराम कटारी यांनीं सर्वांची समजूत केली, आणि शत्रूच्या भीतीस्तव रेवाडीचे रोखें चालले. धरण फुटल्यासारखें झालें. भागीरथीबाईस महिने भरल्यामुळें पळवेना. तेव्हां कुसाजी शिंदे यास तिच्याबरोबर मागें ठेवून, बाकीची मंडळी दिल्लीहून ऐशीं कोस कोटपुतळी[1] येथें आली. नारोशंकर, माधाजी शिंदे वगैरे मागाहून हळूहळू येऊन सामील झाले. इकडून मल्हारराव होळकरही त्याच ठिकाणीं येऊन शिंद्यांचे मंडळींस भेटला.

अशी ही दत्ताजीच्या वधाची थोडक्यांत हकीकत आहे. नाटकें व कादंबऱ्या लिहिणारांस ह्या प्रसंगांत मुबलक साहित्य सांपडेल. भा. सा. ब.तील वर्णन अत्यंत हृदयद्रावक आहे, परंतु त्यांत अतिशयोक्तीचा कांहीं भाग आहे. 'ता. २० जमादिलावल (१० जानेवारी) बदाऊंच्या[2] घांटीं युद्ध झालें. पाटिलबावांस मानेवर गोळी लागली म्हणून पत्रें २५ जमा दिलावलचीं पुरुषोत्तमपंताचीं आलीं. सावकारी पत्रांतही पाटील युद्धांत गोळी लागून राहिले, असा मजकूर गोविंद विश्वासरावाचे पत्रांत आहे. पाटीलबुवा राहिले, आपले फौजेचा भणाण झाला. जनकोजीबाबा कोटपुतळीनजीक सांवर धरून राहिले. तों मल्हारजी होळकर त्या मुक्कामीं फौजेसुद्धां आले. उदईक भेटी होतील. अब्दालीनें तयमूरशहा पातशहा बसविला. त्याची द्वाही फिरविली. गाजुद्दीनखान लष्करीं आले, याप्रमाणें वर्तमानें आलीं. बाबावरून बजमान फार श्रमी' [ १·१६५ ]. दत्ताजी रणांत पडल्यावर

१. अलवारच्या वायव्येस ३० मैल, दिल्लीच्या नैर्ऋत्येस ८० मैल पाटणाजवळ.

२. शहाजहानाबाद येथें यमुनेच्या मैदानावर.—Dr. Burgess.

'बचेंगे तो औरभी लडेंगे', अशा प्रकारचा कुत्बशहा व दत्ताजी यांचा संवाद होऊन, त्याचें शीर कुत्बशहानें कापून नेलें, वगैरे बखरींतील भाग काल्पनिक दिसतो. मोठमोठ्यांचे युद्ध प्रसंगांत असे प्रवाद नाना प्रकारें प्रचलित होतात; आणि या दोन वर्षांच्या पानपतच्या संग्रामांत जो प्रचंड संहार झाला, त्यांत असे प्रकार किती उठले याची गणतिच नाहीं. [रा. खं. १ टीप २३९]. गोविंदपंत बुंदेले बदाऊंच्या घांटावर लढत होता. 'आह्मी बुनगे पावावयास आलों,' असें तो लिहितो [ १·१६२ ]. त्यावरून दत्ताजीस सोडून तो आपल्या जहागिरीवर गेला, असें राजवाडे ह्मणतात तें खरें नाहीं. 'होणार बलवत्तर तें जालें. मल्हारबाही आज आले. हे दिल्लीकडे जातील व आह्मी रेवाडीपासून इटाव्याकडे येऊं.' असें १२ जानेवारीस गोविंदपंत बुणगे घेऊन पळत असतां लिहितो. (१·१५३). कोटपुतळीहून मंडळी चमेल उतरून सबळगडास आली, त्यांस पोंचविण्यास गोविंदपंत होता. 'सबळगडाजवळ चमेल उतरून बुनगे पाठविले. काल मध्यरात्रीं भागीरथीबाई प्रसूत होऊन पुत्र जाला. सबब मुक्काम केला. उदईक पंचमीस कूच करून दर मजलीं येतों, फार श्रम जाले, असें गोविंदपंत ४·३·६० ला जनार्दनपंत एरंड्यास लिहितो. [ १·१६२ ].[१] ह्मणजे सबंध वर्ष पंत मोहिमेवर होता, ह्मणून हिशेब समजून देण्यास जाण्याची त्यास फुरसतच झाली नाहीं. कुचराई करून हिशेब समजून देण्यास गेला नाहीं, असें राजवाडे ह्मणतात तें बरोबर नाहीं.

चंबळ नदीवर दशपिंड करून नदी उतरून मंडळी सबळगडास[२] आली. नदीवर तेरावा दिवस केला.' ( भा. सा. ब. ) दत्ताजीची उत्तरक्रिया कोटपुतळीसच झाली असावी. उत्तरक्रिया व भागीरथीबाईची प्रसूति भा. सा. बखरकारानें वाचकांचे मनावर परिणाम करण्यासाठीं एकत्र आणिली आहे. भागीरथीबाई ४ मार्चला प्रसूत झाली. मुलगा फार दिवस जगला नाहीं.

१. या लेखाची ता. ४ मार्च आहे, ४ फेब्रुवारी नव्हे.

२. सबळगड कुवारी नदी जवळ ग्वालेरशिवपुर रेल्वेवर स्टेशन ग्वालेरपासून ३२ मैलांवर आहे.

या मंडळी बरोबर गोविंदपंत बुंदेले होता. नारोशंकर मात्र तावडतोब पेशव्याचे भेटीस गेला असावा. ११·२·६० रोजीं दिवाकर हिंगणे पुण्याजवळून भावास लिहितो, 'आम्हीं रा. नारोशंकर यांसमागमें आठ दहा रोजांनीं स्वामींचा निरोप घेऊन हिंदुस्थान प्रांतीं येतों.' ( ६·४०० ).

ता. ६·१२·१७५९ रोजीं लवकरच येतों म्हणून होळकरानें हिंगण्यास लिहिलें असतां [ ६·५६३ ] एक महिनापावेतों तो कां दत्ताजीचे मदतीस गेला नाहीं तें कळत नाहीं. दत्ताजीच्या संकटाची त्यास कल्पना नसेल, किंवा कदाचित् कुचराई असेल. नोव्हेंबर पासून जानेवारी पावेतों शिंद्याच्या मदतीस तो धावून गेला नाहीं हें अत्यंत गैर होय. कोटपुतळीस जनकोजीची व त्याची भेट झाली. आपण सर्वांनीं मागें चमेलीपार येऊन शिंद्यांचा रामाजी अनंत व होळकराचा गंगाधर यशवंत यांनीं सड्या फौजेनिशीं दिल्लीच्या बाजूस अब्दालीचे टेहळणीवर असावें, असा मल्हाररावाचा उपदेश होता, परंतु तो जनकोजीस पसंत पडला नाहीं. बायका मागें चमेलीपार करून जनकोजी मल्हाररावास घेऊन फौजेंतच राहिला. कोटपुतळीच्या आग्नेयीस ८० मैलांवर व भरतपुरचे दक्षिणेस ५० मैलांवर केरोली संस्थान असून तेथील राजाचा व मल्हाररावाचा स्नेह होता. त्याजकडे जनानखाना रवाना केला.

ता. ११ मार्चला बापूजी महादेव लिहितो. 'हस्तनापुरास (गंगेच्या कांठीं) गिलची पठाण व अब्दाली आले. हरिभक्तांच्या फौजा पंधरा सोळा कोशांवर सड्या आहेत. दत्ताजी शिंदे दिल्लीवर युद्धीं पडले. बाकी पळोन गेले, बुणगे लुटले गेले. मल्हारराव सुभेदार वृद्ध[1] झाले. घोड्यावर बसून युद्ध करावयासी सामर्थ्य नाहीं. जनकोजी शिंदे जखमी. जखम भरेल तेव्हां खरी. युद्ध कोणी करावे. हरिभक्तांचें सत्व गेलें. काळ फिरलासें दिसतें. परंतु अब्दाली गर्मीचे दिवसांत राहत नाहीं. रोहिल्यानें तीन कोट रुपये देऊं करून अब्दालीस आणिलें, ते रुपये तो मागतो. रोहिले म्हणतो, मजपाशीं

---

१. मल्हारराव होळकराचा जन्म शके १६१५ तला असून या वेळीं त्याचें वय ६६ वर्षांचें होतें.

कांहीं नाहीं. तुह्मी गेलेत कीं मी मेला जातों. अयोध्येस वजिरापासून एक करोड, जाठापासून एक करोड व माधवसिंगापासून एक करोड, असे घेणें.' अब्दालीस कवडीही मिळाली नाहीं [ ३·५,१६ ].

मराठ्यांच्या इतिहासांत जे कित्येक हृदयद्रावक प्रसंग आहेत, त्यांत दत्ताजी-च्या वरील पराक्रमाची गणना झाली पाहिजे. पानपतच्या प्रचंड संहारानें दत्ताजीचें अचाट कृत्य लोपून गेलें आहे. धन्याची कामगारी पार पाडण्या-करितांच त्यानें आपल्या प्राणांची आहुति दिली. कोट रुपये मिळवून राज्याचें कर्ज वारावयाच्या नादांत, आशेस लागून त्यानें सहा महिने व्यर्थ गमाविले. पुढें अब्दाली अंगावर आल्याचें समजतांच मागें सरकून नीट बंदोबस्तानें त्याजशीं सामना घालावा तें न करितां, शत्रूपुढें पळून जाऊन धन्यास तोंड काय दाखवावें, या भावनेनें घाईघाईनें त्यानें त्याजशीं गांठ घातली. त्यांत जनानखान्याचें लटांबर बरोबर ठेविल्यानें त्याची कुचंबणा झाली. होळकर धावून मदतीस येईल अशी खात्री असल्यामुळें, त्यानें माघार घेतली नाहीं. शेवटच्या दिवशीं तरी एकाएकीं निशाण सोडविण्याकरितां म्हणून मुद्दाम झोंबाझोंबींत तो शिरला म्हणून प्राणांस मुकला. होळकर मदतीस गेला असता तर दोघांनीं मिळून याच वेळीं अब्दालीचा फन्ना उडविला असता. होळकराची भिस्त सलुखाच्या बोलाचालीवर व गनिमी संग्रामावर होती, त्याचे उलट शिंदे घराण्याचा स्वभाव शत्रूवर समोर घाव घालण्याचा होता. या वेळीं पेशवा स्वतः इकडे हजर असता तर मराठ्यांची बाजू अशी पडली नसती. मात्र अब्दाली असा एकाएकीं चालून येईल अशी कोणाचीच कल्पना नव्हती. आपल्यावर मराठे येणार म्हणून सुजा नाखूष; पंजाब प्रांत हातचा गेल्यानें अब्दाली चिडलेला; बादशाहचा खून झाल्यानें धनी कोणी दिल्लीस ठिकाणावर नाहीं. पंजाबांतील मराठी फौजा मार खाऊन परत आलेल्या. हें पाहून दत्ताजीच्या फौजेचा दम सुटला होता. अशा विसकळीत स्थितींत जिवावर उदार होऊन काम भागत नसतें, युक्तीनें व शांत विचारानें प्रसंग निभ-वावा लागतो. धन्याच अंशीं पानपतावरही पुढील सालीं याच चुकांची

पुनरावृत्ति झाली. दत्ताजीस मदत न केल्यामुळें होळकराची एका अर्थी पत जाऊन पानपताच्या अरिष्टाचें कारणही पुढें त्याच्याच माथीं मारलें गेलें. असें हें दत्ताजीच्या मोहिमेचें तात्पर्य आहे.

गोविंदपंत बुंदेल्याच्या उद्योगाचाही रा. राजवाड्यांनीं निष्कारण विपर्यास केला आहे. स. १७५८ त पेशव्याची रजा घेऊन तो बहुतेक शिंद्यांचे बरोबरच उत्तरेंत गेला, तेव्हांपासून १७६० चे अखेरीस मारला जाईपर्यंत तो सारखा सरकारी मोहिमांत खपत होता. तो मूळचा कमाविसदार असून लढवय्या नव्हता, हें सदैव ध्यानांत ठेविलें पाहिजे. स. १७५७ त पुण्यास असतां सदाशिवरावानें हिशेबाबद्दल त्यास पुष्कळ ताणिलें. तो स्वतः पैसे कमावतो व धन्यास कांहीं देत नाहीं, असा त्याजवर आरोप होता. दंग्या-धोप्यांमुळें वसूल होत नाहीं अशी त्याची रड होती. सर्व हिशेब चोख दाखवून आपला खरेपणा सिद्ध करण्यास तयार आहों, असें त्यानें पेशव्यास कळविल्या-वर त्यांनीं हिशेब तपासण्याकरितां त्रिंबक कृष्ण कानिटकर व जनार्दन आपाजी एरंडे हे दोन आपल्या भरंवशाचे इसम त्याजबरोबर हिशेब घेण्यास हिंदु-स्थानांत पाठविले. ६.५७९ चें ता. २९.८.५८ चें पत्र पंतानें माळव्यांतून लिहिलें, त्यांत या हिशेबाच्याच बाबती आहेत. पुढें ठिकाणीं गेल्यावर शत्रूचा शह वाढत गेला; आणि अंतर्वेदींतील दत्ताजीची व्यवस्था त्यास लावावी लागल्यामुळें हिशेब देण्याचें काम नाइलाजानें लांबणीवर पडलें. ता. २५.७.५९ रोजीं तो लिहितो, 'ऐथील वर्तमान तर लोकांनीं हद्द केली आहे. महंमदखान पांच हजार अर्जबाब मागतात, तेव्हां पार उतरून येणार. त्याचप्रमाणें पराशर दादाजीही अडोन बसले. लोकांनीं गवगवा केला आहे. लाख रुपये आज येथें द्या तेव्हां पुढें पाय घालूं, असे नाना प्रकारें पेच देऊन घेऊन आह्मी दिक झालों. सेंगर नदीपार जालों, तेव्हां मागून आले. आज तीन रोज झाले, पाराजीपंतांनीं मोठा अडथळा केला. सर्वांचें एक चित्त असतें तेव्हां कार्य होतें. रुसव्याखालींच दिवस गेले. पुढें काम कधीं व्हावें. मी उमरगडीं[१]

१ टीपः—अंतर्वेदींतून यमुनेला मिळणारी एक नदी. इच्या कांठीं मथुरेच्या पूर्वेस उमरगड व त्या पलीकडे फर्रुखाबाद ऊ० फरीदगड.

येतांच हिशेबाचें काम चालेल ( १·१३३ ). पुनः ता. १८·९·५९ रोजीं पंतानें आपल्या मुलास कळविलें, ‘ जनार्दनपंत आपले विशीं संशय मानून रुमाल ठेवून गेले हें कळलें. त्यास आह्मी त्यांसीं दुसरा विचार धरीत नाहीं. कायदेकानूंन त्यांची काडी इतकी तफावत करीत नाहीं. ते आपले कारकून ठेवणार, सुखरूप ठेवोत, आह्मांस त्याचें वाईट काय! ज्यामध्यें त्यांचें समाधान तें आह्मास करणें. एक दोन रोजांत आह्मी उमरगडीं येतों’ (१·१३४). रोहिल्यांची मोहीम संपली नाहीं, व गोविंदपंत मोकळा झाला नाहीं. तेव्हां एरंडे व कानिटकर त्रासून पुण्यास जाऊं लागले [ १·१३७ ], म्हणून पंतानें त्यांचीं आर्जवें करून त्यांस ठेवून घेतलें [ १·१३८ ]. ‘ मजला साफ पैशास तफावत करणें नाहीं. दरबारांत नानाप्रकारें नालिशी चुगली करितात. येथून येतांच पैसान पैसा ठिकाणीं लावीन. दरबारचा रंग पाहिला. खावंद चौकशी करूं लागला. आतां पैशाचा लोभ धरून मिळविली अब्रू कां गमवावी. आह्मीं भवसमुद्रीं पडलों आहों. पार करणार ईश्वर आहे. तूर्त जावयाची उतावळी सर्वथा न करणें ’ [ १·१३८–१३९ ]. गोविंदपंताचे विरुद्ध काढलेले मुद्दे ले. १४१ त नमूद आहेत. ले. १४२ व १४३ त पंतानें आपली सर्व परिस्थिति मोकळ्या मनानें लिहिली असून, तिजवरून त्याच्या ओढाताणीबद्दल कळवळा उत्पन्न होतो. पुढें अब्दाली अकस्मात् आला, आणि गोविंदपंताचें येणें लांबलें. त्यानंतर दत्ताजी शिंदे मारला जाऊन वाताहत झाली, त्या भानगडींत पंताचे हिशेब तसेच राहिले. स. १७६० च्या मार्चांत जनार्दनपंत एरंड्यास पेशव्यानें ताबडतोब पुण्यास बोलवून घेतलें. एप्रिलांत सदाशिवराव पानपतचे स्वारीस निघाला आणि पुढें त्यास गोविंदपंताचा उपयोग घटकोघटकीं पडूं लागला आणि अखेरपर्यंत हिशेब देण्यास त्यास सवड आली नाहीं. गोविंदपंतावर काढिलेलीं कलमें इतर पुष्कळ सरदारांस लागू होतीं; आणि सवड झाली त्यांस पेशव्यांनीं जाब विचारिले. राजवाड्यांनीं एकट्या गोविंदपंतावर आग पाखडून, त्याचें अक्षर वाईट, त्यास शुद्ध लिहितां येत नव्हतें, असले अप्रयोजक आरोपही त्याजवर केले आहेत [ खं. १ टीप ३११ ].

**४. शिंदे होळकरांची पोळजत्रा** ( मार्च–जून १७६० ).—पुढें दक्षिणेंतून फौजा येईपर्यंत गनिमी काव्यानें अब्दालीस जेर करण्याचा उपक्रम शिंदेहोळकरांनीं आरंभिला. ते मारवाड प्रांताकडे गेले, तिकडे गिलच्यांनीं पाठलाग करतांच हे पानिपत कर्नूलकडे गेले. तिकडे दुराणी येतांच हे दिल्लीस आले. मागोमाग दिल्लीस दुराणी येतांच हे आगऱ्यास आले. अविंध आगऱ्यावर येतांच हे जयनगर प्रांतीं आले. गनीम केवळ सडे, कावा करून गिलचा जेरीस आणावा म्हणोन उपाय केले. परंतु दुराणीची हिंमत भारी. गनीमच दमास आले. त्या वर्षी सुबत्ता फार होती. हरभरे, गहूं, व गाजरें पुष्कळ, ह्मणून अन्नाची परवा नव्हती. फाल्गुन शुद्ध १५ मेस [१ मार्च] सिकंदऱ्यावर यमुना उतरून तें शहर लुटलें. लष्करांत सामानाची इतकी चंगळ झाली कीं, सर्वांनीं हुताशनी-पूजन करून अन्नपाणी चापून केलें. पुढें अब्दाली आपणांवर चालून आल्याची खबर जाठांकडून लागतांच, सर्वांनीं मिळून त्याजबरोबर सामना करावा असें होळकराचें म्हणणें होतें. परंतु जनकोजीनें सांगितलें, 'आमच्या फौजेनें दहशत खाल्ली आहे. सबब तुम्हीच युद्ध करा, आम्ही निघून जातों.' तेव्हां गंगाधर यशवंतास लढाईवर पाठवून स्वतः होळकर व शिंदे आगऱ्याजवळ यमुना उतरून तेथील किल्ल्याच्या आश्रयास आले. ता. ८ मार्च रोजीं होळकर लिहितो, 'सांप्रत बलबल्लास आलों. एक दों रोजांत कूच करून दिल्लीच्या सुमारें जात असों. अमित्राचें उत्तम रीतीनें पारपत्य होईल. चिंता नाहीं' [ ६·४०१ ]. त्यानंतर ता. १ एप्रिलास खालील मजकूर दक्षिणेंतून लिहिलेला आढळतो. 'महादजी सिकंदरा मारून चौकोसांवरी राहिले असतां अब्दालीची फौज आल्याची आवई आली. हे खबरदार होऊन, गंगाधरपंत, आनंदराव राम व सटवाजी खराडे यांस फौज देऊन पाठविलें. आपण एकीकडे दहा कोस आले. गंगाधरपंत यमुना उतरून आगऱ्यापाशीं फतियाबाद येथें राहिले. मागाहून मल्हारबाही आले. अब्दाली मथुरेवर आहे. आगऱ्यास येणार. गोष्ट शिंद्यांस व होळकरांस तोलेशी दिसत नाहीं. श्रीमंतांचें प्राक्तन थोर. प्रसंग विलक्षण दिसतो. [६·४०३].

शिंद्यांचा अभिमान पाहून होळकरासही शहास गुंतणें प्राप्त आलें. एरवीं होळकर मतलबी, ते इतके खराब न होते (भा. व.). गंगाधर यशवंत व अब्दाली यांच्या फौजेची पळापळीची लढाई एप्रिल व मे या दोन महिन्यांत खूपच झाली. सटवाजी खराडे, संताजी वाबळे, महिपतराव दिवाण वगैरे सरदार गंगाधर यशवंताचे हाताखालीं अंतर्वेदींत अब्दालीचे मुकाबल्यास राहिले. त्यांना दुराणीनें गांठून चकमक सुरू केली. सुमारें हजार पांचशें मनुष्य पडल्यावर, होळकरी फौजेचा धीर सुटून पळण्यास सुरवात झाली. मराठे पळतात हें गिलच्यांस पक्कें ठाऊक होतें. म्हणून अगोदरच त्यांच्या पळण्याच्या वाटेवर त्यांनीं फौज ठेविली होती. तिनें या पळत आलेल्या शिपायांची रांगोळी उडविली, व शेंकडों लोक मारिले. पळ आगऱ्यास पोंचतांच मल्हाररावानें व शिंद्यानें पुन्हां आगरा सोडून जयपूरचा रस्ता धरिला. पाठीमागें दुराणी लोक होतेच. याप्रमाणें एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं मल्हाररावाच्या फौजेची दोन महिने चांगली पोळजत्रा होऊन लोक आगऱ्यास आले. एक लेखक म्हणतो, अब्दालीचा भला मोठा खजिना व रसद अफगाणिस्तानांतून येत होती ती अडविण्यास होळकर गेला असतां, शिकंदरा येथें अब्दालीच्या १५ हजार स्वारांनीं त्याजवर एकाएकीं छापा घातला. तेव्हां होळकर तीनशें लोकांनिशीं जीव घेऊन पळून गेला, आणि त्याचें सामान अब्दालीस मिळालें. पुढें जूनचे आरंभीं यमुनेस पाणी चढून उतार बंद झाला, तेव्हां अब्दालीनें अंतर्वेदींत यमुनेच्या पलीकडे दिल्लीहून सुमारें तीस मैलांवर अनुपशहर येथें पावसाळ्याची छावणी केली. मराठी पत्रांत या छावणीचें नांव कोळजळेश्वर असें आहे. इकडे शिंदेहोळकरांनीं त्याच वेळीं केरोलीच्या बाजूस तळ दिला. वरील लढाईत होळकराचे सटवाजी खराडे व महिपतराव दिवाण पडले. सटवाजीचा मुलगा शिवाजी मोठा दंड भरून सुटून आला. 'मराठ्यांचा हर्ष उडून गेला. बहुत फिकिरींत पडले, काळ फिरला, जेरीस आले. अब्दालीचा शह सोडून दक्षिणेंत येतां येईना. जाठ मात्र जयाजी शिंद्याचा कुंभेरीवरील उपकार स्मरून बरोबर साह्य करीत होते.' बाकी सर्व रजपूतसुद्धां मराठ्यांवर चढून त्यांचा बदलौकिक झाल्याबद्दल आनंद मानूं लागले.

वजीर गाजीउद्दीन दत्ताजी पडल्यावर जाठाचे आश्रयास गेला. परंतु तेथें निभाव न लागल्यामुळें दक्षिणेंत येऊन निजामशाहींत व इतर ठिकाणीं कैक वर्षे रानोमाळ गरीब स्थितींत भटकत राहून स. १७९० त सुरत येथें मरण पावला.

---

# प्रकरण तिसावें.



## पानपतचा घनघोर संग्राम.



**१. पटदूरची वाटाघाट, सदाशि०ची नेमणूक**(७ ते १४ मार्च १७६०).— उत्तरेंतील मराठ्यांचा सगळा उद्योग अब्दालीनें झपाट्यासरशीं उखडून दिला, या अनर्थाच्या बातम्या पेशव्यास उदगीर येथील संग्रामाच्या ऐनभरांत जानेवारी फेब्रुवारींत पोंचल्या. शिंदे, होळकर दोघे मिळून अब्दालीस नरम करतील, निदान दक्षिणच्या फौजा येईपर्यंत त्यास अडवून तरी धरितील, अशा अटकळीवर पेशवे निश्चित होते. रघुनाथरावासच तिकडे पाठविण्याचा बेत नोव्हेंबरपासूनच नक्की झाला होता. इतक्यांत निजामाचें प्रकरण एकाएकीं हातघाईवर येऊन, आठ पंधरा दिवसांत तें उरकून पुढील विचार करावयाचा, तों त्या प्रकरणांत नोव्हें०पासून दोन तीन महिने गेले. तेवढ्या अवधींत दत्ताजीच्या वधाची हृदयद्रावक बातमी येऊन पुष्कळांच्या तोंडचें पाणी पळालें. जयाजी व दत्ताजी हे दोन पुरुषव्याघ्र राष्ट्रकार्यांत कामास आले याबद्दल अभिमान व उद्वेग वाटून, अब्दालीचा सूड घेण्याची प्रवृत्तिही कित्येकांच्या

मनांत उचंबळली. पेशवा अहंमदनगरास असून सदाशिवराव, विश्वासराव व व फौजा उदगिरावर होत्या. त्यांस त्वरेनें पेशव्यानें परत बोलाविलें; आणि हिंदुस्थानचे वाटेवर पटदूर येथें शके १६८१ च्या रंगपंचमीचे दिवशीं ( ७ मार्च १७६० ) सर्वांच्या गांठी पडल्या. नगर, उदगीर व पटदूर यांचा जवळ जवळ त्रिकोण होतो. नगराहून जालनाचे उत्तरेस जाधवांचें सिंदखेड असून तेथून जवळच पूर्णानदीचे कांठीं पटदूर आहे. या ठिकाणीं एक आठवडा अहोरात्र कडाक्याची वाटाघाट होऊन सदाशिवरावास उत्तरेंत पाठविण्याचा निश्चय पेशव्यानें केला. ता. १४ मार्च रोजीं सदाशिवराव पटदुराहून शिवा-लिखिताच्या मुहूर्तानें निघाला, तो बरोबर दहा महिन्यांनीं ता. १४ जानेवारीस पानपतावर गारद झाला.

सदाशिवरावाच्या रवानगीसंबंधानें खालील उल्लेख आढळतात, 'उदगीरहून पुण्यास जावें त्यास, अब्दाली दिल्लीवर चढाई करून आला, त्याजकरितां पातशहाचा फर्मान नानासा० स फौजेविशीं आला, त्याजवरून भाऊ सा० व विश्वासराव यांची रवानगी फौजसुद्धां केली ' [ खं. ४ पे. ब. ५३ ]. रघुनाथ यादवानें चिटणिसांच्या दफात्यांवरून गोपिकाबाईसाठीं मुद्दाम तयार केलेली पानपतची बखर ता. १०·१·१७६३ रोजीं सुरू होऊन १८·२·६३ रोजीं पुरी झाली, अर्थात् ती विशेष ग्राह्य दिसते. तींत असा मजकूर आहे, ' नानासा०स बुद्धि जाहली कीं भाऊसाहेबांस हिंदुस्थानांत रवाना करावें. ते समयीं महा-दाजीपंत पुरंदऱ्यांनीं विनंति केली कीं, भाऊसाहेबांस एकंदर पाठवूं नये. भाऊसाहेबांचे कारभाराचा हावभाव दुसरे कोणास येणार नाहीं. सर्व राज्याचा भार त्यांजवर आहे. ते समयीं नानासाहेबांनीं उत्तर केलें. ' भाऊसाहेबांचे चित्तांत स्वारीस जाणेचें आहे. याजकरितां त्यांस पाठवितों. त्यांचाही मानस फार दिवस आहे.' तेव्हां पुरंदरे बोलले, ' चिमाजीआपांनीं पराक्रम बहुत केला, त्यांचे चिरंजीव भाऊसाहेब लढाईस मागें हटणार नाहींत. शत्रूस पराभवितील किंवा आपण कैलासवासी होतील, त्यांत सहसा अन्यथा नाहीं. याजकरितां, त्यांस पाठवूं नये. त्या समयीं गोपिकाबाईनीं अनुमोदन दिलें

की त्यांस रवाना केलें पाहिजे. सबब दृढ निश्चय करून मागील पराक्रम मनांत आणून, अब्दालीस अटकेपार घालवावा हा भाऊसाहेबांचे मनांतील निदिध्यास पाहून, त्यांस व विश्वासरावांस पाठविलें पाहिजे, अशी मसलत करून समागमें प्रमुख नामांकित सरदार देऊन रवानगी केली.' नानाफडणीस या वेळीं अशक्त व लहान होता, तो यात्रेच्या निमित्तानें बायको व मातुश्रीसह स्वारी-बरोबर गेला. भाऊसाहेबांची त्याजवर विशेष ममता होती [का. सं. प. या. ५३]. ता. १६ मार्च रोजीं बाबूराव खेर शिंदखेड्याहून गोविंदपंतास लिहितो. 'श्रीमंत अहंमदनगराहून पटदुरास आले. तेथें मोगलांचा उपमर्द करून भाऊसाहेब आले. उभयतां श्रीमंतांच्या भेटी फाल्गुन वद्य ५ स झाल्या. दूर स्वारीस जावयाचें म्हणून या रंगपंचमीच्या दिवशीं तमाम सरदारांसह पटदुरास रंग खेळण्याचा मोठा समारंभ करण्यांत आला. पुढें आठ रोजपर्यंत खलबत होऊन हिंदुस्थानचे रवानगीचा प्रकार जाहला. श्री. भाऊसाहेबांनीं जावें असा सिद्धान्त होऊन पटदुराहून वा. ११ स कूच करून शिंदखेड्यास आले. तेथून फाल्गुन वा. १३ स डेरे दाखल जाले. नंतर दोन चार रोज मुक्काम करून, हिसेब अजमास मनास आणून, दरमजलीनें येऊन पोंचतात. पाऊण लाखपर्यंत फौज जमा जाली आहे. पन्नास हजार फौज बरोबर येत आहे, पंचवीस हजार देशीं राहिली. त्रिवर्ग निजामबंधू लबाडी करावयास चुकणार नाहींत म्हणून दादासाहेब पंचवीस हजार फौजेनिशीं ज्येष्ठ मासपर्यंत गंगा तीरीं राहणार. नानासाहेब दरमजल पुण्यास जाणार. कर्नाटकांत विसाजी कृष्ण बिनीवाले यांची रवानगी झाली. भाऊसाहेबांची सलाबत पुण्यप्रताप भारी आहे. अब्दालीचें पारिपत्य होतें, कांहीं चिंता नाहीं. समागमें मुत्सद्दी बळवंतराव गणपत, नाना पुरंदरे, महिपतराव चिटणीस, लक्ष्मणराव खासगीवाले, भवानीशंकर, ऐसे येत आहेत. थोरले श्रीमंतांपाशीं सखारामपंत व कृष्णराव पारसनीस ऐसे राहिले' [१.१६८.१६९]. यशवंतराव पवार, आपाजीराव थाटोळे, अंताजी माणकेश्वर, समशेर बहादर, नारोशंकर, विठ्ठल शिवदेव वगैरे पुढें येऊन सामील झाले. इब्राहीमखान गारदी बरोबरच होता (खं. २ पृ. ११५).

पानपतच्या भयंकर परिणामाची मीमांसा पुढें कैक वर्षे व अद्यापपावेतों चालू राहून अनेक आख्यायिका, प्रवाद, व कल्पना यांची भर पडून मूळचें सत्य पुष्कळसें लोपून गेलें आहे. रघुनाथराव कर्ज करून आल्याबद्दल त्याचें व सदाशिवरावाचें कडाक्याचें भांडण होऊन, पेशव्यानें सदाशिवरावास मुद्दाम या स्वारीस पाठविलें आणि गोपिकाबाईनें नवऱ्याचें मन वळवून त्याचे जोडीस विश्वासरावास दिलें, असे अनेक प्रवाद आहेत. वास्तविक प्रकार विशिष्ट आधारांनीं सिद्ध होईल तेवढाच जमेस धरून बाकीचा मनांतून सर्वथैव काढून टाकिला पाहिजे. पेशव्यांनीं सर्व साधक बाधक गोष्टींची शांतपणें निरनिराळ्या इसमांशीं वाटाघाट करूनच सदाशिवरावास या स्वारीवर मुख्य नेमिलें. रघुनाथराव कर्ज करून आला एवढ्याचमुळें तो नालायक ठरला असें नाहीं, तर गेल्या सात आठ वर्षांत उत्तरेंत जी अव्यवस्था माजली तीस मुख्य कारण रघुनाथरावाचा नाकर्तेपणा हें या वाटाघाटींत आजपर्यंतच्या कागाळ्यांवरून पूर्ण सिद्ध झालें. मात्र त्याची उघड चिकित्सा या प्रसंगीं सदाशिवरावानें केली. सर्वांस धाकांत ठेवून अनेक भानगडी मिटविण्याचा उरक सदाशिवरावासच होता. युद्धकला, हिशेब, लेखनचातुर्य, धाक इत्यादि बाबतींनीं असलें मोठें काम अंगावर घेण्यास त्याच्या इतका लायक इसम महाराष्ट्रांत दुसरा नव्हता. पेशव्यानें त्यास खर्चासाठीं एक कोट रुपये व मुबलक साहित्य दिलें, यावरून नुसत्या कर्जावरून रघुनाथरावास बाजूस सारिलें हें संभवत नाहीं. पेशव्याचें वैभव या वेळीं उच्च प्रतीचें असून त्यास पैशाची अडचण नव्हती. स्वारीस निघाल्याबरोबर एक एक प्रकरण सदाशिवराव किती नेटानें उरकूं लागला आणि हरएक कामाची व्यवस्था लावण्यांत त्यानें किती श्रम घेतले हें पाहिलें म्हणजे त्याच्या उद्योगाची हद्द वाटते. उलट पक्षीं रघुनाथरावासंबंधीं खालील उल्लेख उपलब्ध आहे. 'दमाजी गायकवाड छावणीस गेले. प्रस्तुत दरबारी कारभार दादासाहेबांकडे आहे. दोन प्रहर-पावेतों स्नानसंध्या. तृतीय प्रहरीं कारभार करणार. लोकांचा परिणाम कसा लागतो! भाऊसाहेब सर्वज्ञ होते' [२०·३·१७६०; ऐ. ले. सं. १·१४].

सदाशिवराव स्वारीस निघाल्यावरचें हें पत्र आहे. ' रघुनाथरावाच्या नाकर्तेपणाबद्दल नानासाहेबास व भाऊसाहेबास वीट आला व कोणत्याही महत्त्वाच्या कामगिरीवर त्यास पाठविण्यांत अर्थ नाहीं अशी त्यांची खात्री झाली. ही खात्रीपूर्वी अनेकांच्या मनांत होती, ती पटदूरच्या वाटाघाटींत उघड झाली ' [ १. प्र. पृ. ५९ व टीप २५४ ]. ज्याच्यापुढें शिंदे होळकरांचा निभाव लागला नाहीं, त्या अब्दालीचा पाडाव करण्यास तशाच निग्रहाचा व रुआबदार इसम पाहिजे होता. अब्दालीसमोर जाण्याचें रघुनाथरावानें आजपर्यंत युक्तीनें टाळिलेंच होतें, आणि पटदुरास त्यानेंही बहुधा हातपाय गाळले असावे. तूर्त कांहीं दिवस पडतें घेऊन मागें सरून राहवें, आणि अब्दाली निघून गेल्यावर मग पुढें जाऊन पुनः आपला जम बसवावा, असा एक विचार होता, तो सदाशिवरावासारख्या मानी व शूर पुरुषास बिलकूल पसंत पडला नाहीं. अब्दाली आपल्या हद्दींत चालून आला आहे, अशा संधीस त्याजवर एकदम चाल करून त्यास साफ बुडवावा, आणि कैक वर्षें रेंगाळत राहिलेला मराठशाहीचा उद्योग तडकाफडकी पुरा करावा, अशी योजना होती. शेवटीं उलट परिणाम झाला एवढ्यावरून ती अविचाराची होती असें म्हणतां येत नाहीं. दोनही पक्षांस लहान मोठे गृहस्थ पटदूरच्या वाटाघाटींत होते. सखाराम बापूचा पाठिंबा रघुनाथरावास होता, तर महिपतराव चिटणीस, नाना पुरंदरे, बळवंतराव मेहेंदळे वगैरे सदाशिवरावाच्या बाजूस होते. मात्र उत्तरेंत प्रत्यक्ष मोहिमा केलेले मोठे अनुभवी सरदार तेथें कोणीच नव्हते. सदाशिवरावांत वैगुण्य होतें तें हें कीं, तो रागीट व आग्रही स्वभावाचा असून, तडजोडीनें वागण्याचा त्याचा कल नसे. तसेंच त्यास उत्तर हिंदुस्थानांतील माणसांची व व्यवहारांची बिलकूल वाकबगारी नव्हती. त्याचा कर्नाटकांतील व निजामाकडील मृदु, वातावरणाचा अनुभव उत्तरेच्या पठाणांशीं वागतांना उपयोगी पडणारा नव्हता. यासाठीं स्वतः पेशवा त्याजबरोबर माळव्यापर्यंत गेला असता तर ज्यास्त उपयोग झाला असता असें वाटतें. विश्वासरावास पाठविण्याचें प्रयोजन केवळ त्यास नवीन अनुभव

देण्याचें पेशव्यांचे रिवाजास अनुसरूनच होतें. नुकताच त्यानें उदगीरच्या मोहिमेंत चांगला विजय संपादिला असून, सदाशिवरावाबरोबर राहून त्यानें पुढें राज्यकारभारांत सर्व ठिकाणचा अनुभव मिळवावा, अशी अपेक्षा होती.

मराठमंडळास अब्दालीची दहशत एवढी मोठी पडली होती कीं, त्याजपुढें सामना करण्यास कोणाचाच पाय जोरानें निघेना. प्रत्यक्ष सदाशिवरावाची भावना मात्र अगदीं निराळी होती. सरदार कुचराई करितात, हूल उठल्या-बरोबर पळत सुटतात, आपमतलबाकडे मन ठेवून राष्ट्रकार्य बुडवितात, तर हिंगणे, बुंदेले, अंताजी माणकेश्वर, नारोशंकर, होळकर इत्यादि मंडळींस वठणीस आणून हातीं घेतलेला उद्योग निकरानें तडीस नेण्याची हिंमत धरून सदाशिवराव बाहेर पडला. हें काम करण्यास तोच तेवढा समर्थ असून सर्वानु-मतें त्याचीच नेमणूक झाली. मात्र अंगावर बाजू आली असतां, थोडी माघार घेऊन वेळ निभावून नेण्याचें कसब त्यास नसल्यामुळें, हट्टास पेटून हा घातही करून घेण्यास चुकणार नाहीं, याजबद्दल मात्र पेशव्यास मोठी चिंता होती. याच कारणास्तव प्रयाणसमयीं निरोप घेतांना पेशव्यास व छावणीं-तील तमाम लोकांस मोठें दुःख झालें. 'निघते समयीं गोपिकाबाईनीं विश्वास-रावास भाऊसाहेबांचे हातीं दिलें. उभयतांस असें झालें कीं, आजच आपण यांस अंतरलों. तमाम लष्कर निरवानिरव करून, एकमेकांचे गळां पडोन निघाले. चांगली फौज, चांगले हत्ती, सरस घोडीं, उंची वस्त्रें, व खजिना घेऊन निघाले. नानासाहेब पुण्यास जाते जाले' ( भा. सा. ब. ). एवढी मोठी स्वारी पूर्वी कधीं झाली नव्हती.

स्वारीस निघतांना सरदारांचे रुसवे काढून त्यांचें समाधान करण्यांत आलें. दमाजी गायकवाड अर्धी गुजराथ गेल्यापासून डाव्या हातानें मुजरा करीत असे. पानपताहून आल्यावर सगळी गुजराथ देण्याचें अभिवचन सदाशिव-रावानें त्यास दिलें, तेव्हां दमाजी पूर्ववत् उजव्या हातानें मुजरा करूं लागला. दमाजीची निष्ठा या वेळीं पेशव्यावर फारच चांगली बसली होती (इ. सं. ऐ. टि. २ ले. ३६ ). गनिमी काव्यानें पळत सुटल्यास आपल्या तोफखान्याचा

निभाव लागणार नाहीं, अशी हरकत इब्राहीमखानानें दाखविल्यावरून, 'निदानीचा प्रसंग पडला तरी तुम्हांस सोडून निघणार नाहीं, तुम्हीं गाडून उभे राहल तेथें मीही उभा राहीन, म्हणोन त्यास बेलभंडार देऊन त्याजपासून साजकरोटी घेतली. सदाशिवरावाच्या पुढील वागणुकीची मीमांसा करितांना वरील सर्व प्रकार ध्यानांत ठेविले पाहिजेत. एकंदरींत स० रा० स पाठविण्याचा निश्चय पेशव्यानें आवेशाच्या भरांत किंवा बायकोच्या शिकवणीवरून केलेला नाहीं· अशा प्रकारच्या अनेक बाबतींचा निरास रा. राजवाड्यांनीं पहिल्या खंडांत केला असून त्यांतील महत्त्वाचे मुद्दे सर्व येथें स्वीकारिले आहेत. स्वारींत ब्राह्मण, प्रभु, मराठे वगैरे सर्व जातींचे लोक एक दिलानें सामील झाले होते, यावरून जातिभेदामुळें पानपतचा प्रसंग बुडाला हें म्हणणें खरें नाहीं. निघाल्याबरोबर स०रा०नें ता.१५·३·६० रोजीं बुंदेल्यास लिहिलें, 'अब्दालीची गरबड झाली, यास्तव लवकर फौजा याव्या, त्यास मोगलांवर जरब बसून कारभार निर्गमांत आला. जहागिरींत अंमल बसला. कोठें कोठें बसणें त्याचा गुंता नाहीं. बऱ्हाणपुरांत अंमल जाहला. शहर हवालीं जहालें. एक दोन स्थळें हवालीं होणें तीं होतील. इकडील मोगलांची गरमी राहिली नाहींच, भागानगराकडे जातील. त्यास चिरंजीव रा. दादांनीं यावें, परंतु तीर्थरूपांची आज्ञा आम्हींच जावें ही जाहली. त्यावरून फाल्गुन वद्य ११ ता. २५ रजबीं हिंदुस्तानास यावयास निराळे आहलों. चिरंजीव विश्वासराव बरोबर आहेत. त्यास अब्दालीकडील खबर वरचेवर कळली पाहिजे. तुमच्या तालुक्याचा बंदोबस्त कसा आहे तें सर्व लिहिणें. मल्हारबा, जनकोजी शिंदे यांजकडील बातमी जलदीनें येत नाहीं तरी तेथें कोणी ठेवून पाठवीत जाणें. सुजाउद्दौला सर्व प्रकारें स्नेह राखितात. सरदारांनीं व चिरंजिवांनीं त्यांचे ठायीं ममतेंत अंतर केलें नाहीं. या दिवसांत त्यांणीं सरदारांचे विचारें अब्दालीचें पारिपत्य करावें, हेंच त्यांस उचित आहे. त्यांणीं अब्दालीस सामील होणें; अब्दालीची नड हिंदुस्थानचे पातशाहींत रुतों देणें हें अयोग्य. याचा विचार काय केला असे ! पुढें मातबर फौजेनिशीं खासा स्वारी जलदीनें येऊन पोंचेल, तरी याचा विचार लिहिणें.

त्यांजकडील कोणी इतबारी मातबर वकील हुजूर याचा हें जरूर व्हावें. लिहिल्या-अन्वयें तर्तूदही व्हावी. तुम्हांकडील दोन तीन सालांचे हिशेबाचे झाडे तयार असावे; व यंदा अब्दालीचे गडबडीमुळें रुपया प्रथम मिळणें लांब आहे, त्यास खर्चास रुपयांची तर्तूद जहाली पाहिजे. बाकी किंवा साल मजकूरचा ऐवज कांहीं पुढील ऐवजापैकीं, याप्रमाणें वीस लक्ष रुपयांपर्यंत तर्तूद करून माळव्यांत पोंचतांच ऐवज कांहीं येई, कांहीं पुढें येऊन पोहोंचे हें जरूर करणें. रजवाडे व रजपूत उपयोगी असे फौजेनिशीं सामील व्हावे असें करावें. मुख्य गोष्ट बातमी फार जलद चांगली पोंचाविणें. तिकडील राजकारणें चार असतील तींही राखून ठेवणें. फार फार कामें करून दाखवावीं हे तुमची उमेद. याप्रमाणें करणें व कराल हा भरंवसा आहे' (१·१६७). या पत्रावरून स० रा० ची तडफ व काम करण्याची शैली व्यक्त होते. या वेळीं सदाशिवराव व अब्दाली यांचें वय अनुक्रमें ३० व ३६ वर्षांचें होतें.

**पानपत मोहिमेतील मुक्काम व प्रसंग,** [१४·३·६०—२३·६·६१]—

| | | | |
|---|---|---|---|
| १४·३·६० | गुरुवार प्रयाण; | ४·४·६० | ब्रह्मणपुरास दाखल. |
| १०·४·६० | हंडिया येथें नर्मदेवर; | २८·४·६० | सिहोर, भोपाळ, सिरोंज, ओर्च्छा. |
| १४·५·६० | अरुण, मालन, पहारी; अरुण येथें अहिरांचें बंड. | २२·५ | कालेधार, खेचीवाडा, नरवर, ग्वालेर. |
| ३०·५ | ग्वालेर मुक्काम २ जून प० | ४·६ | चंबळवर मुक्काम. |
| ८·६ | चंबळ पलीकडे. गंभीर नदीस पूर, व | | १५ दिवस तेथें कुचंबणा. |
| ३०·६—४·७ | गंभीर नदीचा उतार; | ६·७ | रविवारीं शिंदे होळकरांच्या भेटी, |
| १६·७ | मथुरा, ३०·७ दिल्ली. | | मुचकंद तीर्थावर. |
| १·८ | दिल्ली काबीज, मुक्काम १५·१० पा०. | १०·१० | जवानबख्ताची स्थापना. |
| १५·१० | कुंजपुऱ्यावर चाल; | १७·१० | कुंजपुरा काबीज. |
| १९·१० | विजयादशमी कुंजपुऱ्यास. | २५·१० | अब्दाली बागपतावर यमुना उतरून अलीकडे आला. |
| २८·१० | कुंजपुऱ्याहून परत गणोर; | | |
| १·११ | पानपतावर तळ; | २·११ | अब्दालीचा एक पराजय; |

१५ नोव्हें.–१५ डिसें. अब्दालीवर चढाई करण्याची संधि मराठ्यांनीं घालविली.
२३·११ खिनकोजीकडून अब्दालीचा मोड. ७·१२ बळवंतराव मेहेंदळे. कडून पराभव.
२२·१२ गोविंदपंत बुंदेले मृत्यु. २७·१२ पेशव्याचें पैठणास दुसरें लग्न.
१५·१२ ते १४·१ मराठ्यांची उपासमार. ४·१२ पराशर दादाजीचा मृत्यु.
१४·१·१७६१ पानपतचा शेवटचा संग्राम; २४·१ भेलशास पेशव्यास खबर.
४·३·६१ पावेतों सदाशिवरावाचा नक्की शोध पेशव्यास लागला नव्हता.
२१·३ पेशवा परत निघाला. ३·६·६१ पेशवा पुण्यास दाखल.
१८·६ पर्वतीवर मुक्काम. २३·६·६१ पर्वतीवर पेशव्याचा मृत्यु.
पुढील हकीकत समजण्यास हें टांचण उपयोगी पडेल.

गोविंदपंत बुंदेल्याकडे हिशेब घेण्यास पेशव्यानें जनार्दनपंत एरंडे यास पाठविलें. पंत गारद झाल्यावर त्याचे सर्व कागद घेऊन एरंडे परत आला. ते कागद जसेच्या तसे रा. राजवाड्यांस स. १८९७ सालीं मिळाले आणि लगेच त्यांनीं पहिल्या खंडांत छापून प्रसिद्ध केले; आणि पानपतच्या प्रसंगाची साधार चर्चाही केली. या पत्रांवरून स० रा० च्या सर्वव्यापी उद्योगाची व दक्षतेची खात्री पटते. एका बुंदेल्यास गेलेलीं त्याचीं पत्रें इतकीं आहेत, तर पेशव्यास व दुसऱ्या हजारों इसमांस त्यानें किती तरी पत्रें लिहिलीं असलीं पाहिजेत.

**३. बऱ्हाणपुर ते आगरा.**—ता. २ एप्रिल रोजीं सदाशिवरावानें गोविंदपंतास लिहिलें, ' स्वारी एक दोन रोजां बऱ्हाणपुरास दाखल होईल. तुह्मांकडे बाकीचा ऐवज येणें त्यास पंचवीस लाखांची तर्तूद करून सत्वर ठेवणें; व पांच सहा लाख पुढें आह्मांकडे पाठविणें. वरकड आपल्या ठाण्यांचा बंदोबस्त कसा आहे, तिकडील मंडळी इकडील लक्षानें कोण आहेत, कोणाचें राजकारण कसें आहे, किंवा सारेच तिकडे आहेत, तें तपशीलवार लिहिणें. तुह्मींही युक्ति प्रयुक्तिनें राजकारण राखून जे इकडे नसतील ते हाताखालीं घालणें. हिंदुपत वगैरे बुंदेले यांणीं दारूगोळा सरंजाम घेऊन फौजेसुद्धां हुजूर चाकरीस यावेंच हेंही करणें. अखर डाक बसवून बातमी पाठवीत जाणें. आह्मी मजल दरमजल मधील वाटेनें ( म्हणजे उज्जनीकडे किंवा पश्चिमेस न जातां ),

येतों. आठ रोजीं नर्मदेपार होऊं [ १·१७१ ]. नर्मदापार झाल्यावर ता. १८ एप्रिलला सदाशिवरावानें गोपाळराव गणेशास पत्र लिहून (इ. सं. ए. टि. २·३३ ). त्यांत पुढील सर्व व्यवस्था व येत सविस्तर कळविले. गोविंदपंतास धीर देऊन सुजा व पातशहाजादा अलीगौहर यास त्यानें आपल्याकडे वळविण्याविषयीं सांगितलें. त्यानंतर ता. २८ एप्रिलला सिहोराहून बुंदेल्यास पत्र गेलें तें असें, ' तुमचें पत्र प्रविष्ट झालें. अब्दालीमुळें दंगा फार, फौज मातबर आली म्हणजे दबावानें जाईल, अथवा राहिली तर मातबर झुंज होईल. पन्नास हजार फौजेनिशीं जलदीनें मदत आली म्हणजे इकडीलही बंदोबस्त होईल, अब्दाली हावभरी झाले आहेत, यामुळें फौजेनें आव टाकला, म्हणोन लिहिलें तें कळलें. ऐशास आम्ही मातबर फौज व तोफखाना गाडदीसुद्धां सिहोरास आलों. इकडील संस्थानिक जमा करून नरवरच्या सुमारें येतों. पुढें जिकडे सोय दिसेल तिकडे जाऊं. माधोसिंग, बिजेसिंग व कोटेवाले राणाजी या सर्वांकडे पत्रें देऊन वकील पाठविले आहेत. सर्व मंडळी इकडील व तिकडील दोहीं राजकारणांवर आहेत. परंतु आमचे येण्यामुळें एक पक्ष धरून जमा होतील. हे सर्व एक होऊन, मल्हारबा, जाठ यांसहित अब्दालीचें पारिपत्य करावें हाच विचार आहे. त्यास तिकडील बंदोबस्त उत्तम प्रकारें राखून तुम्हीं हुजूर यावें. दतियाचे पेंचामुळें इकडे यावयास फावेना, तर तिकडील बंदोबस्त उत्तम राखावा. हिंदुपतीकडे शहाणा मातबर कारकून पाठवून त्यास फौजसुद्धां सत्वर लावून देणें' [ १·१७४ ]. पुढें ता. २८ एप्रिलच्या पत्रांत ' चांगले प्यादे मर्द माणूस तीन हजार, झुंजाचे उपयोगी पडे असे, तलाश करून ठेवून पाठविणें. सुजाउद्दौला व फर्रुखाबादवाले अनुकूळ होत असें राजकारण करणें. तिकडे शह असल्यास तुम्हांस राहवें लागेल. शहाणे आहां. ऐवजाविषयीं खराबीच लिहिली येते, शत्रू प्रबल यास्तव जरूर तर्तूद करणें, तपशील लिहून न पाठविणें' ( १७६ ). ता. २ मे १७६० रोजीं बुंदेल्यास लिहितो, ' अब्दालीच्या लष्करांतून बातमी यावयाची तुम्हीं तजवीज केली, हें फार उत्तम केलें, त्यास येथें आलियावरी पैका काय

मिळाला, बराबर खर्च त्याचा किती आहे, खासा फौज त्याचे देशची किती, कोण कोण सरदार, किती जुमलेदार, बरकंड रोहिले किती, पायाचे माणूस किती, तोफा किती, कशा आहेत, मुलकांत अंमल कोणत्या जागां कसा आहे, तें कुल वर्तमान बारीक बारीक कळावेंसें जरूर करणें. सटवाजी खराडे व त्याचे पुत्र यांचा शोध करवून बातमी कळविणें' ( १·१७८ ).

शिंदेहोळकर अब्दालीची दहशत खाऊन स्वस्थ बसले, तेव्हां गोविंदपंत हाच कायतो एकटा इसम उत्तरेंत वावरत होता. तो मूळचा कारकुनी पेशाचा मनुष्य, वसुलाच्या कामास धाक दपटशा दाखविण्यापुरती फौज ठेवून काम करी; परंतु स०रा०नें त्याजवर शक्तीबाहेरचीं कामें टाकिलीं. तोही वयानें मल्हाररावाचेच अबळ जवळ होता. 'जेथें जातील तेथें माघार घेण्याचाच या दोन म्हताऱ्यांचा विचार' ( राजवाडे ). पावसाळ्याचे सुरवातीस शिंदेहोळकर करोलीच्या बाजूस छावणी करून राहिले, तेव्हां अब्दाली यमुना उतरून आग-ऱ्याचेही पुढें त्यांचे पाठीवर आला होता, परंतु उन्हाळा न सोसून किंवा दूर जाणें धोक्याचें वाटून अब्दाली अंतर्वेदींत कोळ्जळेश्वर[१] येथें छावणी करून राहिला. पूर्व प्रघातास अनुसरून उन्हाळ्यांत तो परत जाईल अशी अटकळ होती, परंतु ती खरी ठरली नाहीं.

ता. ६ मे रोजीं स०रा० सुजास कळवावयाचा निरोप पंतास लिहितो. 'हे तयमूरशहाची पातशाही, याचा बंदोबस्त पंतप्रधान करतील. तुम्हीं या गोष्टींत न पडावें, रोहिल्यामुळें हावभरी न व्हावें. पुढें भारी पडेल याचा पुरता विचार करवा. बादजफत्ते दिल्लींतील पातशाहीचा बंदोबस्त तुमचे आमचे विचारें होऊन येईल, तोच केला जाईल' [ १·१७९ ]. 'सुजाकडे मल्किाजमानी गेली आहे म्हणोन वर्तमान आलें, त्यास त्या उभयतांस पत्रें लिहून पाठविलीं आहेत, तीं त्यांस द्यावीं. सुजास लिहिलें आहे कीं, 'तुम्हीं अब्दालीस साफ लिहून आम्हांकडे तयारी करून यावें. हें एक होऊन अब्दालीचें पारिपत्य करून पातशाहीचा बंदोबस्त तुमचे

---

१ मथुरेच्या पूर्वेस यमुनेच्या कांठीं अतरास म्हणून इटाबा परगण्यांत गांव आहे, त्यास लागूनच जलेश्वर हल्ली. हातरस व टुंडला यांच्या दरम्यान रेल्वे स्टेशन आहे.

आमचे विचारेंच होऊन येईल.' या समयीं तुमची कारीगारी काम करून दाखवावयाची आहे. मलकाजमानी तेथें असेल तरी तीस हें पत्र देऊन तिचाही भावगर्भ कळवा. आह्मीं सिरोंजेस आलों. अहिरांनीं फार लबाडी केली. यास्तव कांहीं फौज पाठविली. खेचीवाड्यांतील बाकीच्या रकमा कांहीं उगवून नरवरावरून पुढें जातों. सरदारांचें लिहिलें येईल तसे सारे एक जागां होऊं. माधवसिंग दोहीं-कडे, राजकारण तिकडेच फार; आह्मांकडे येऊं ह्मणतात. बोलावूं गेलें. वरकडांस-ही पत्रें गेलीं. येतील ते जमा करीतच आहों. सुजाचें काम ठीक करणें. वरचेवर बातमी चहूंकडील वर्तमान व अब्दालीकडीलही वरचेवर लिहीत जाणें. पेशजी लिहिल्याप्रमाणें दहापासून तीस लाखपर्यंत तर्तूद जरूर करणें. नवीन दोन तीन हजार प्यादे चांगले ठेवून पाठविणें' [१·१८०]. 'पाराशर[१] दादाजी यांच्या फौजेनें शिकस्त खादली, लुटली, नागवली, शिलेदार उठ उठोन जातात, ह्मणोन रा. रखमाजी दादाजी यांनीं विनंति लिहिली, तरी मशारनिल्हेस हुजूर पाठवून देणें,' असें नानासाहेबानें पंतास ता. ७ मे रोजीं लिहिलें [१·१८१]. बुंदेलखंड, अहीरवाडा, खेचीवाडा, रजपुताना, अंतर्वेद येथील बहुतेक राजे व लोक पेशव्यांचे विरुद्ध होऊन पंतास वसूलही देत नव्हते. ता. १४ मे रोजीं सदाशिवरावानें लिहिलें, 'अंतर्वेदांतून नावा कुल जमा करून एक जागा कोणाचा उपद्रव नावेस न लागे ऐसे ठिकाणीं ठेवणें. स्वारीपुढें आलियावरी आज्ञा होईल त्या ठिकाणीं आणावयास येतील. तुमच्या जिल्ह्यांत असतील त्या कुल दक्षिण तीरीं आपले जबरदस्तीखालीं जमा करणें. स्वारी अरुण प्रांत खेची येथें आलों. नरवरच्या सुमारें डबलपुरचे घांटें उतरोन गिलच्यांचे पारपत्यास जातों. हिंदुपत वगैरे बुंदेले येत तें करणें, पैका जरूर पाठविणें. सुजाउद्दौलाचा पुरता भाव शुद्ध पाहून लौकर येतसें करणें. रोहि-ल्यांकडे तुमची डांक बसलीच आहे, फौज कोण सरदाराची किती, रमजान

---

१. टीप.—दादोपंत बाघ पेशव्यांचा सरदार, साताऱ्याचे बंदोबस्तास पेशव्यानें फौज ठेविली, तिचा मुख्य. त्याचा मुलगा पाराजीपंत बुंदेल्याचे दिमतीस होता.

झाल्यावर उमेद कोणती याची बातमी येईसें करणें. नजीबखान तों अब्दालीच आहे. त्याखेरीज बरकड रोहिले फुटतील तर फोडावे, अहंमदखान बंगसाची निष्ठा तुह्मी फार लिहीत होतां, ते प्रस्तुत जाऊन तेथें मिळाले, त्यांनीं व हाफीज रहमतखानांनीं इकडील आश्वासन घेऊन, त्याचा बुद्धिभेद करून माघारें कुच करवावें, आपण निराळें व्हावें, यांत ते वांचून, अब्दाली–नजीबखानांचें पारिपत्य होईल. ते निष्ठा राखतात यास्तव सूचना असावी. करतील तर उत्तम, न करतील तर सरदार आठ आह्मी एक जालियावर त्यांस पुरते भारी आहों. परिणाम त्यांनीं आपला पाहवा. नजीबखान तर मूळच आहे. त्याचें बोलणें प्रमाण नाहीं' [ १·१८६ ]. या गोष्टी बऱ्याच अशक्य कोटींतील होत्या. मलिकाजमानी व नजीबखान यांनीं सर्व मुसलमानांची जूट करून अब्दालीची व्यवस्था लावून दिली होती. त्यानें दिल्ली हस्तगत करून मराठी फौजांस चंबलपुर पलीकडे हांकून दिलें होतें. सुजा वगैरे मंडळी मराठ्यांनीं गाफील रहावें ह्मणून गोड थापा देऊन मनांतील कपट दाखवीत नव्हती; आणि जवळ अब्दाली छातीवर बसलेला असतां त्यांना उघडपणें मराठ्यांस मिळणें शक्यही नव्हतें. मुसलमानांस चार महिने चांगली सवड मिळून सरहिंदपासून थेट काशीपावेतों संपूर्ण प्रदेशांत त्यांनीं आपला जम चांगला बसविला होता. आदल्या सालीं पीक उत्कृष्ट येऊन सर्वत्र सुबत्ता होती, त्यामुळें धान्याची, पैशाची व युद्धसामुग्रीची हरएक तजवीज त्यांस निर्वेध राखतां आली. अशा स्थितींत चंबलच्या पलीकडे गेल्याबरोबर मराठ्यांचा पाया सुटत चालला; आणि ते ज्यास्त ज्यास्त शत्रूच्या घेऱ्यांत येत चालले. अर्थात् ( १ ) शत्रूच्या ताब्यांतील मुलखांतून गोविंदपंतानें वसूल पाठविला नाहीं, ( २ ) धान्याची रसद पोंचविली नाहीं, ( ३ ) नांवा तयार ठेविल्या नाहींत, ( ४ ) सुजास आपल्या बाजूस वळविलें नाहीं, आणि ( ५ ) अब्दालीस व रोहिल्यांस अंतर्वेदींतून पायबंद दिला नाहीं, हे पांच आरोप राजवाड्यांनीं पंतावर आणिले आहेत. परंतु वरील परिस्थितींत प्रत्यक्ष सदाशिवराव तरी हीं कामें करूं शकला असता कीं नाहीं याचा संशयच वाटतो. यमुनेच्या पलीकडे इटावा वगैरे दक्षिण बाजूचीं

कांहीं थोडीं ठाणीं मराठ्यांचीं होतीं तीं पंतानें व आठांचीं कांहीं फौज पावसाळ्या-पूर्वीच पलीकडे गेली होती तिनें सांभाळून धरलीं हेंच मोठें भाग्य समजलें पाहिजे. रजपूत व जाठ हे तरी मनापासून मराठ्यांचें हित चिंतिणारे नव्हते. दोन बलवान शत्रूंच्या दरम्यान असली लहान मंडळी नेहमींच दोन दगडींवर हात ठेवून असावयाची. खरें ह्मटलें तर शिंदे होळकरांच्या पाडावानें मराठ्यांचा अंमल सर्वत्र उठला होता, आणि प्रथम अब्दालीस हांकून दिल्याशिवाय तिकडून कांहीं एक लभ्यांश होण्याजोगा नव्हता. कराकुडाचा कारभार गोपाळ गणेश बर्वे व गणेश संभाजी खांडेकर[१] यांजकडे होता, परंतु हे दोघे गोविंदपंताहूनही भित्रे व अकुशल होते. एकंदरींत अंतर्वेदींतील मराठ्यांचा अंमल केवळ नामशेष असून फक्त कराकुडाचा लहानसा भाग पंत संभाळीत होता. गंगा यमुना अलाहा-बादेजवळ संगम पावतात, त्यांच्या अंतर्गत जो हल्लीं फत्तेपुर जिल्हा आहे, त्यासच कराकुडा ह्मणत. तो व त्यावरचा कोळजळेश्वरपर्यंतचा सुभा गोविंदपंत सांभाळीत होता. त्याच्या पुढचा उत्तरेकडील सर्व अंतर्वेद प्रांत हिमालयाच्या पायथ्यापर्यंत रोहिले व अब्दाली व्यापून बसले होते. ता. ५ मेला स०रा० लिहितो [ १·१८७ ], 'रामगड जाठाचा घेऊन पुढें अंतर्वेदींत अंमल करणार म्हणों, तर आम्ही सिरोंजेस आलों. मातबर फौज व तोफखाना गाडदी व दोनही फौजा सरदारांच्या व जाठ इतके येथें गाडून उभे राहून चालून घेऊं, तेव्हां अब्दाली-च्यानें दम धरून उभें राहणें व तोफांचे माराखालीं बाहेर येणें कठिणच आहे. सुजाउद्दौला सर्व प्रकारें स्वामीची फत्ते इच्छितात म्हणोन लिहिलें. तर हेंच त्यास योग्य आहे. सरदारांनीं त्याजकडे वकील त्यांची निशा व्हावी ह्मणोन पाठविले आहेत, तेही पोंचले असतील. अंतर्वेदींतील अंमल जबरदस्तीनें राखला तसाच राखावा. आमचे येण्याची आवई तेथें गेलियानें ते घाबरे होऊन आपला देश जवळ करावयाची तजवीज करीत असतील, त्यास बारीक खबर राखून लिहिणें. बंगल्याकडील खबर राखोन लिहीत जाणें. बंदोबस्ताची खातरजमा असेल तर तुम्हीं फौजसुद्धां चमेली कांठीं येणें.' केवळ आवईनें अब्दाली निघून जाईल अशी

१ टीप.–होळकर येथें,–( श्री. वि. आठल्ये ).

समज होती ती बरोबर नाहीं. ठांसून सामना करण्यासाठींच तो बंदोबस्तानें होता. अशी अनेक पत्रें पंतास लिहिलेलीं आहेत. सर्व फौजा चमेलीवर एकत्र व्हाव्या असा स०रा०चा बेत होता. 'ऐवजाचा बोभाट लिहिला तो खराच आहे, परंतु तूर्त ओढ फार असल्यामुळें पांच सात लाख सत्वर पावते करणें.' [ १·१८८ ]. अलीगौहर यास पातशहा करून सुजास त्याची वजिरी द्यावी असें बोलणें कायम करण्याकरितां श्यामजी रंगनाथ यास स०रा०नें सुजाकडे वकिलीस पाठविलें. 'अब्दालीची लष्करची बातमी तपशीलवार लिहून पाठविली ती कळली. याच प्रकारें बारीक मोठें वर्तमान लिहिणें.' ( १·१९१ ). इटाव्याच्या ठाण्यास रोहिल्यांनीं येऊन वेढा घातला असें सदाशिवरावास परस्पर कळलें. हें एकच महत्वाचें ठाणें गोविंदपंताचें असून, त्याचेखालीं कुरा येथें ठाण्यांत गोपाळ-राव बर्वे होता. ठाणें मजबुदीनें राखण्याबद्दल सदाशिवरावानें मेच्या अखेरीस ग्वाल्हेरहून पंतास लिहिलें. ता. ३० मे रोजीं सदाशिवराव ग्वाल्हेरीस पोंचला. ग्वाल्हेरहून आग्रा ७२ मैल. आग्र्यापर्यंत पोंचण्यास ता. १० जुलई आली. 'रोहिले दहा हजार फौज आहे, तोफा नाहींत. उगेच आवईनें ठाणीं पळतात, हें कामाचें नाहीं. तर्तूद करोन इटावें राखणें, पंधरा रोजांत तर्व फौजा एक होऊन फडशा होईल. तुमचीं बातमीचीं पत्रें वारंवार आलीं तीं पावलीं. अंताजी माणकेश्वराची कमावीस दूर करून तुम्हांस जप्ती सांगितली आहे, तरी अती कळम ऐवज सरकारांत जमा करणें.' [ १·१९४ व अ ).

सदाशिवराव मोठ्या फौजेनिशीं चालून येतो असें समजतांच अब्दाली व रोहिले यांनीं जोरानें उचल केली. 'नजीबखान व अब्दालीचा जहानखान बाढोन आले त्यांचे पारिपत्याची तजवीज होऊन येईल. तुम्हीं आपले ठाणे-दारांस ताकीद करून, निकड पडल्यास चांगले तऱ्हेनें झुंजत, केवळ दुरील आवईनें ठाणीं टाकून पळोन न जात, ऐसें करणें. ठाणें टाकून पळतील, त्यांचें पारिपत्य उत्तम प्रकारें करावें. झुंजून मरावें हेंच बरें आहे, तेव्हांच इकडील ही कुमक चांगली पोहोंचून शह बारेल. आम्ही डबळपुरचे खालीं चार पांच कोसांवर चमेल उतरून सरदारांकडे आलं. सरदारांसी मथुरेचे सुमारें येतील.

सर्व मिळोन यमुनापार होऊं अगर तुम्हांकडे फौज पाठवूं. इटाव्यासारखे ठाण्यांतील कमावीसदार पळतात अपूर्व आहे.' जूनचे आरंभीं हाफीज रहमतखान येऊन स० रा० स भेटला. नुसत्या थापा देऊन त्यास बेसावध करण्यापलीकडे त्याचा उद्देश नव्हता. तिकडे अब्दालीनें अलीगौहरास पातशाही देऊं करून वजिरी सुजास दिली आणि मराठ्यांचे विरुद्ध बळकट कारस्थान केलें. यावरून सुजाचा हेतु कळतो. त्याचे मातुश्रीचा व गोविंदपंताचा घरोबा होता. म्हणून तिच्या मार्फत सुजास बोध करावा असें स० रा० नें पंतास लिहिलें [ १·१९६ ]; आणि यमुनापार होण्यास नांवा पाहिजेत त्या सर्व जमवून तयार ठेवाव्या असें त्यानें पंतास व यशवंतराव कोन्हेरास लिहिलें (१·१९८ व ३·२२३). नांवांसंबंधानें एकट्या पंतावरच सदाशिवरावाची भिस्त नव्हती. इतरांसही त्यानें अनेक ताकिदी दिल्या, परंतु शत्रुमुलखांत तजवीज होऊं शकली नाहीं. ता. १०·६·१७६० रोजीं सदाशिवराव लिहितो. ' आम्ही चंबेल उतरलों. आगरें १८ कोस आहे. एक दों दिवसांत सरदार व आम्ही होऊन यमुनापार उतरावयाची तजवीज करणार. नजीबखान व जहानखान यांणीं इटाव्याहून कूच केलें, कोळेकडे येतात अशी खबर आहे. तुम्ही, गणेश संभाजी, बाबूराव कोन्हेर, अब्दाली कोळेहून यमुना उतरून अलीकडे येऊं लागले तरी, अंतर्वेदींत सर्वांनीं उतरून पायबंद द्यावा. कदाचित् दिल्लीकडे चालला तरी सहजच ठाणीं सुटतील. सुजाउद्दौल्यांनीं त्याकडे न जावें, दम धरावा.' [१·२००]. ११ जुनला ऐवज न पाठविल्याबद्दल सदाशिवरावानें पंतावर ताशेरा झाडला आहे. हाफीज रहमत नुसता सदाशिवरावासच भेटला नाहीं, तर अब्दालीच्या मार्फत सरदारांशींही राजकारण करीत होता. सलुखावर घालवून, एकदम आपणावर मराठ्यांचा हल्ला न यावा, एवढीच अब्दालीची या वेळीं खटपट होती. या वेळींच त्वरा करून यमुनापार फौजा झाल्या असत्या तर कदाचित् अब्दालीचा नाश झाला असता; कारण त्याचीं सर्व कारस्थानें अद्यापि परिपक्व झालीं नव्हतीं, आणि नजीबखानाचें व त्याचें बेसावरून बरेंच वांकडें आलें होतें. ' अब्दाली उपरी, किती दिवस पुरवेल,

आम्ही नेहमी आहों, सर्व अर्थ नरम गरम होऊन सुजाचें जाणें अब्दालीकडे न होई तें करणें' [ १९ जून, १·२०४ ]. शिर्धांकडून भिकारीदास नांवाचा वकील सुजाकडे होता. सुजाकडील कारस्थान गोविंदपंताचे मार्फत जुळेना, तेंव्हां सदाशिवरावानें रामाजी अनंत व नारोशंकर यांस सुजाकडे पाठविलें, परंतु तेही कांही ज्यास्त करूं शकले असें दिसत नाहीं [ १·२०८ ]. कोळजळेश्वराच्या वरती राहून अब्दालीनें नजीबखान व जहानखान यांस मराठ्यांचीं ठाणीं मारण्यास व सुजास घेऊन येण्यास पाठविलें. मराठ्यांची फौज आगऱ्याजवळ येतांच, नजीबखानास इटाव्यास राहणें धोक्याचें वाटून तो परतला. पुढें अब्दालीही आगऱ्याचे बाजूस मराठ्यांचे समोर यमुनेच्या पलीकडे येऊन त्यांजवर नजर ठेवूं लागला. [ १ टी. २९० ]. या वेळीं गोविंदपंत इटाव्याचे पूर्वेस कनोज फफुंदच्या बाजूस होता. सदाशिवरावाची व त्याची भेट अशी झालीच नाहीं. मरण पावल्यावर त्याचें शीर मात्र अब्दालीनें सदाशिवरावाकडे पाठविलें. या सालीं पावसाळा जरा लवकर सुरू होऊन नद्या सर्व भरून गेल्या. त्यामुळें सबंध जून महिना सदाशिवरावाचा फुकट गेला. ता. ८ जुनला तो चंबळच्या उत्तरेस गेला, आणि पुढें आगऱ्यास पोंचण्यास जवळ जवळ महिना लागला. गंभीर नदी पलीकडे मुचकुंदतीर्थावर ( भा. सा. ब. ). रविवार ६ जुलईस त्याची व सरदारांची भेट झाली [ १·२१७ अ ]. सरदारांच्या गांठी पडल्यावर दोन्ही फौजा एकवटल्या, आणि सर्वांस प्रेमाचें मोठें भरतें आलें. दत्ताजी पडल्याबद्दल जनकोजीची दरबारांत समजूत करून, त्यास मोठ्या सन्मानानें सदाशिवरावानें सरदारीचीं वस्त्रें दिलीं. अशा दरबारांत पेशव्यांच्या ठिकाणीं विश्वासराव मुख्य असे. विश्वासराव व जनकोजी यांची अप्रतिम जोडी पाहून प्रेमपूर उत्पन्न झाल्या शिवाय राहत नसे. दोघेही समवयस्क व सुंदर असून, स्वभावानें गोड, विनयशील, सदाचरणी व अभिमन्यूसारखे शूर होते. ते एकमेकांस जीवश्चकंठश्च समजत.

पावसामुळें गंभीर नदीस पाणी फार येऊन वाटेंत मुक्काम झाले. ही लहानशी नदी चंबळचे उत्तरेस दहापंधरा कोसांवर तिला समांतर अशीच वहात,

प्रवाहांसह पुढें यमुनेस मिळते. १० जुलईपर्यंत सदाशिवराव आगऱ्यास पोंचला होता. पण पुढें आगऱ्यास न थांबतां सरदार व जाठ यांसह १६ जुलईस फौज मथुरेस दाखल झाली. आगरा ताब्यांत घेऊन तेथें मुलें माणसें ठेवण्याची सिद्धता करून मग मथुरेस गेला असें बखरींत आहे. मध्यंतरी शुजाउद्दौला अब्दालीकडे जातो, शहाजादा कोणाकडेच न जातां बाहेर तटस्थ राहणार, अशी बातमी सदाशिवरावास दिली. हिशेब व पैसे पाठविण्याबद्दल पंतास तगादा लावला. शुजा अब्दालीस मिळाल्याची खबर कळतांच त्याचे प्रदेशांत थेट काशीपर्यंत दंगा उसळून द्यावा व तुम्ही अंतर्वेदींत रोहिल्यांवर यावें, आम्ही इकडून यमुना उतरून त्याजवर येतों,' असें सदाशिवरावानें पंतास लिहिलें. आगऱ्याचे समोर यमुनेपार सकुराबादचें ठाणें अब्दालीनें घेतलें होतें तेंही परत घेण्यास सदाशिवरावानें सांगितलें. जाठांची कांहीं फौज यमुनेपार येऊन तिनें हें ठाणें हस्तगत केलें [ १० जुलई १·२१६ ], आणि येथून जाठाची मदत पुढें गोविंदपंतास होतच होती ( १·२४४ ). मात्र सदाशिवरावाला गंभीर नदी ओलांडण्यास महिना लागला व यमुनेस उतार नव्हताच. यामुळें आरंभींचा अब्दालीवर एकदम चालून जाण्याचा बेत त्यास सोडून द्यावा लागला, आणि प्रथम दिल्ली घेऊन नंतर अब्दालीस कोंडावें असा बेत ठरला. असें करण्यांत मराठे आपल्या पायापासून दुरावत गेले.

**४. दिल्ली काबीज** ( १·८·१७६० ).–आग्रा येथें बायकामुलें ठेवण्याचा बंदोबस्त करून सदाशिवरावानें मथुरेकडे चाल केली तेव्हां नदीपलीकडून अब्दालीही फौज घेऊन तयारीनेंच चालूं लागला. यमुना दुथडी भरून जात असल्याकारणानें एकमेकांस भिडण्याविषयीं दोघांचाही नाइलाज होता. याच सुमारास म्हणजे ता. १० जुलै रोजी (?) शुजाउद्दौल्यानें आपलें वजन या दोघांच्या सामन्यांत अब्दालीच्या बाजूस टाकिलें. ही गोष्ट नजीबखानाच्या कारस्थानानें सिद्ध झाली. नजीबखान कानपूर बिठुरापर्यंत सामोरा जाऊन शुजाउद्दौल्यानें मन त्याच्या आईच्या विरुद्ध आपल्याकडे वळवून त्यास घेऊन अब्दालीच्या फौजेस मिळाला. शुजाचा दर्जा फार मोठा, त्याप्रमाणें त्याची

मानमरातब ठेवला जाईल अशी हमी नजीबखानानें घेतली होती, त्याप्रमाणें अब्दालीनें सुजाचा मान राखिला. मराठ्यांच्या व मुसलमानांच्या फौजेंत तफावत होती ती सुजा आल्यानें भरून निघाली असें म्हणतां येईल. मथुरेस आल्यावर याच वेळीं अधिक श्रावणमास असल्यानें सर्वांनीं तेथील यात्रा स्वस्थपणें व निर्विघ्नपणें सिद्धीस नेली. समोरच्या तीरावर अब्दाली होता, त्याची यत्किंचित् पर्वा कोणास वाटली नाहीं. मथुरावृंदावनांतील तीर्थांचें व देवदर्शनांचें सुंदर वर्णन नानाफडणिसानें केलें आहे (का. सं, प. या. ५३). याच ठिकाणीं भरतपूरचा राजा सुरजमल्ल जाठ शिंदे होळकरांच्या मध्यस्थीनें सदाशिवरावाच्या भेटीस आला. त्यास एक कोस सामोरें जाऊन सदाशिवरावानें त्याचा बहुमान केला, आणि हत्ती घोडे वगैरे नजर करून त्याची मदत संपादन केली. एकमेकांस अंतर न देण्याविषयीं उभय पक्षीं यमुनेच्या उदकानें आणभाक झाली. जाठानें आपली फौजही बरोबर आणली असून मराठ्यांच्या सर्व फौजेस रसद पोंचविण्याची त्यानें हमी घेतली. येणेंप्रमाणें सदाशिवराव व अहंमदशहा अब्दाली यांनीं दिल्लीच्या पटावर बुद्धिबळाचा प्रचंड डाव आरंभिला.

ता. १६ जुलईस स० रा० लिहितो. 'पुढील कर्तव्यार्थ करीतच आहों. पलीकडे उतरावें तर नदीस पाणी फार, त्यांत दोन तीन हजार जाठ फौज पार उतरली. मामाजी पायगुडे वगैरे सरकारी पथके उतणार. हे पलीकडील ठाणीयांचा बंदोबस्त करतील. अब्दाली मातबर फौज घेऊन इकडील शहास येणार. यास्तव तुम्हीं फार सावध राहणें. ठाण्यांचा बंदोबस्त उत्तम ठेवणें.' [१·२१७]. मथुरेस गेल्यावर यमुनेस उतार मिळेना, तेव्हां सर्वांनीं मिळून प्रथम पुढें जाऊन दिल्ली काबीज करण्याचा विचार ठरविला. सरदारांच्या भेटी होऊन पुढील उपक्रम ठरला तो हाच होय. सदाशिवरावानें मोठी फौज घेऊन ग्वाल्हेरच्या पुढें येऊं नये म्हणून कडाक्याचे वाद विवाद सरदारांचे व त्याचे वर्णिलेले आहेत ते सर्व काल्पनिक व संग्राम होऊन गेल्यावर रचलेले दिसतात. एवढा मोठा प्रळय पानपतावर उडाला, तेव्हां पुढें कैक वर्षे नानातऱ्हेच्या आफवा व कल्पना पसरल्या व आधुनिक प्रबंधकारांनीं त्या जशाच्या तशा स्वीकारिल्या, त्याचा हा

परिणाम असावा. मोठ्या फौजा इकडे तावडतोब पाठवा, कोणी तरी खासा आला पाहिजे अशी जोराची मागणी बुंदेले वगैरे मंडळीकडून पेशव्याकडे जात होती; आणि शिंदे होळकरांचें व बुंदेल्याचें नेहमीं मतैक्य होतें. जनानखाना ग्वाल्हेरच्या पुढें आणूं नये अशी मात्र सरदारांची सांगणी होती. जनानखान्यामुळें दत्ताजी शिंद्याचा घात झाला आणि स०रा०चाही घात होण्यास हेंच मोठें कारण झालें. मात्र हा जनानखाना अगदीं लहान १०।५ बायकांचा होता.

मथुरेस आल्यावर लगेच दिल्लीवर जाऊन तें शहर काबीज करण्याचा विचार सदाशिवराव व सरदारांनीं ठरविला. त्यासाठीं शिंदे होळकर व बळवंतराव गणपत मेहेंदळे पुढें ता. २२ ला दिल्लीवर गेले. त्यांनीं लगेच शहर घेतलें किल्ला ही सत्वरच घेतील. आम्हीही मजलदरमजल तेथें जातों, अब्दालीचे मनांत देशांत जावें, लढाई एकंदर पाहूं नये, एक वांटा त्याची देशची फौज गेली, दोन वाटे राहिली आहे, सुजाचें मतें आपले हातें अब्दालीचा व श्रीमंतांचा तह करावा, म्हणजे आम्ही सर्व ठीक करून अब्दालीस देशीं लावून देऊं, अशीं पत्रें सुजाचीं पंतास आलीं व पंतानें त्याजबद्दल सदाशिवरावाकडे खुलासा विचारला, तेव्हां दिल्लीस गेल्यावर खुलासा देऊं असें सदाशिवरावानें पंतास कळविलें. (ता. २८ जुलई, १७२२). दिल्लींत पठाणांची फौज एक हजारापर्यंत होती. दुराणीचा वजीर शहावलीखान याचा भाऊ, याकूबअलीखान त्यांचा मुख्य होता; आणि दत्ताजी शिंदे पडल्यावर तें शहर व किल्ला अब्दालीनें हस्तगत केला होता. सरदारांनीं व बळवंतराव मेहेंदळ्यानें शहर हस्तगत केलें. त्यानंतर लगेच मराठ्यांचे शें पन्नास लोक किल्ल्यांत शिरले, परंतु ते लुटीस गुंतल्यामुळें किल्लेदारांनीं सावध होऊन बाहेर काढिले. तेव्हां मराठ्यांनीं किल्ल्यास मोर्चे लाविले. खंदकावर मोर्चे कायम करून इब्राहीमखानानें तीन तोफांचा मार दिल्हा. युरोपीय तोफखान्याच्या जोरापुढें एक एक बळकट बुरूज धडाधड कोसळून पडूं लागले, तेव्हां अब्दाली पलीकडे समोर होता, परंतु मदत करतां येईना. किल्ला खालीं करून दिल्यावर याकूबअलीस व सर्व मुसलमान कुटुंबांस मराठ्यांनीं सुरक्षित बाहेर जाऊं दिलें. ते १ ऑगस्ट रोजीं अब्दालीस

मिळाले. 'जागा फारच थेट, मजबुतीची आहे. हुमायूंचे अवलद यमुनेच्या पैल तीरीं येऊन उतरले आहेत, गोड बोलतात. होईल वर्तमान तें लिहिलें जाईल.' 'ऐवजाविशीं वारंवार लिहून भागलों. पैक्याची तर्तूद होऊन येईना हें बरें नाहीं.' सुजाची उमेद अब्दालीस कळली. दिल्ली घेतल्यामुळें कमर तुटली. लढाई तर पाण्यावर तहकूब आहे. तोंपर्यंत फुटाफुट करणें ते करितों.' ( ता. २ ऑगस्ट १७२४ ) दिल्ली काबीज केल्यावर मुसलमानांची जूट फोडण्याचे मार्गास सदाशिवराव लागला. पुढें दोन महिने मुक्काम दिल्लीस करून हेंच काम त्यानें केलें, परंतु तें सिद्धीस गेलें नाहीं. अब्दालीस हाकलल्याशिवाय जूट फुटणारी नव्हती.

दिल्ली हस्तगत केल्याबद्दल मराठ्यांस व विशेषतः सदाशिवरावास अवर्णनीय आनंद झाला. मराठ्यांच्या सार्वभौमत्वाविषयीं हुजत घालणाऱ्या अब्दालीच्या डोळ्यांदेखत हिंदुस्तानची सार्वभौम राजधानी सदाशिवरावानें हस्तगत केल्यानें मराठ्यांच्या पराक्रमाची परीक्षा सहज झाली. हिंदुपद पातशाहीचा झेंडा पांचशें वर्षांच्या मुसलमानी राजधानीवर सदाशिवरावानें रोंविला. इब्राहीमखानाच्या तोफखान्याचा प्रभाव सर्वांच्या प्रत्ययास आला. ज्या हिमतीनें, व मर्दुमकीनें सदाशिवराव दक्षिणेंतून चालून आला, त्याचें मर्म पाहणाऱ्यांच्या निदर्शनास आलें. विश्वासरावास पुढें करून सदाशिवरावानें किल्ल्यांत प्रवेश केला, व झपाट्यानें तेथील सर्व मिळकत, जागा व मनुष्यें आपल्या ताब्यांत घेतलीं. किल्ल्यांतील व्यवस्था व शोभा पाहून सदाशिवरावाचें मन प्रसन्न झालें. तोफखान्याच्या जोरावर ही जागा पाहिजे तितके दिवस लढवितां येईल असें त्यास वाटलें. इब्राहीमखान, मल्हारराव, जनकोजी, दमाजी, समशेरबहादर, यशवंतराव वगैरे लहान थोर सरदारांसह सदाशिवराव व विश्वासराव यांनीं सर्व जागा तपासून पाहिली. दिल्ली शहर प्रथमच पाहून यांना मोठी धन्यता वाटली. इतबार भरून सदाशिवरावानें, सर्वांकडून विश्वासरावास नजरा करविल्या. लुटीनें मराठी फौज समृद्ध झाली, कोणी गरीब म्हणून राहिला नाहीं. नारोशंकर राजा राय बहादर यांनी किताब देऊन शहरांतील व किल्ल्यांतील कुल बंदोबस्त

या विजयानें अब्दालीच्या फौजेची स्थिति अगदीं उलट झाली. आपण अब्दालीस मिळालों याबद्दल सुजाउद्दौल्यास पश्चात्ताप वाटूं लागला. नजीबखानाच्या नादीं लागून आपण व्यर्थ संकटांत पडलों असें सर्वांस वाटूं लागलें. अहंमदखान बंगश, हाफीज रहमतखान इत्यादि रोहिले सरदारही मराठ्यांचें शत्रुत्व केल्याबद्दल हळहळ मानूं लागले. अब्दालीचे अफगाण पठाण स्वदेशीं निघून जाण्यास उत्सुक झाले. अशा स्थितींत सुजास फोडून घेतला म्हणजे अब्दाली आपोआप निघून जाईल अशा समजुतीनें सदाशिवरावानें तो प्रयत्न चालविला. भवानीशंकर नांवाचा सुजाचा वकील सदाशिवरावाजवळ होता, त्याच्यामार्फत हा उपक्रम सुरू झाला. रोहिले सरदारांनाही गोविंदपंतास जाऊन मिळण्याबद्दल सदाशिवरावानें सूचना केली. अब्दालीनेंही तहाचें बोलणें सुरू केलें. परंतु मराठे या वेळीं जोरांत असल्यामुळें त्यांनीं त्याच्या म्हणण्याकडे लक्ष दिलें नाहीं. सुजास व रोहिल्यांस अलग करून अब्दाली व नजीबखान या दोघांस तोफखान्याच्या माऱ्याखालीं रगडून टाकूं अशी सदाशिवरावास धमक होती. त्यानें या वेळीं तह केला नाहीं, ही त्याची दुसरी चूक असें कित्येक प्रतिपादितात तें बरोबर नाहीं. कारण अब्दालीचा कायमचा बंदोबस्त करून हिंदुपद पातशाहीचा निकाल लावण्यासाठीं व दहा पांच वर्षें रेंगाळत चाललेला खेळ एकदम जोरानें पुरा करण्यासाठींच सदाशिवराव मुद्दाम जय्यत तयारीनें आला होता; आणि दिल्लीच्या पुढें जाऊन त्यानें आपला पाया तोडून घेतला नसता, तर हलके हलके तो अब्दालीला सहज जिंकूं शकला असता. यापुढें त्याच्या हातून झालेल्या चुका उत्तरोत्तर दाखविण्यांत येतील, परंतु दिल्ली काबीज करीपर्यंत त्याचा कोणताही डाव चुकलेला नव्हता, असें निःसंशय म्हणतां येतें. तसेंच पूर्वेकडून गोविंदपंतानेंही या वेळपर्यंत सर्व मंडळीस बरेच धाकांत ठेविलें होतें, हेंही सिद्ध आहे. दिल्लीच्या पुढें न जातां यमुनेस उतार झाल्यावर दुआबाच्या बाजूस जास्त फौज पंताच्या मदतीस जाती, तर त्यांनी हुसकून लावलेला दुराणी सहज भाऊसाहेबाचे कचाट्यांत आला असता. असो. अशीच महिन्यांच्या मुदतांत दिल्लीस सदाशिवरावाच्या पुढें दोन मुख्य प्रश्न होते, एक

अब्दालीच्या सोबत्यांस फोडणें, व दुसरा दिल्लीच्या पातशाहीची व्यवस्था लावणें. सेनापतीच्या कामांत अब्दाली सदाशिवरावाहून वरचढ होता, प्रत्यक्ष लढण्यांत त्याचे लोक मराठ्यांहून ज्यास्त दमदार होते, आणि त्यास आजू-बाजूच्या लोकांची सहानुभूतिपूर्वक मदत होती. तितक्याच अंशानें या तिन्ही गोष्टी मराठ्यांस जाचक होत्या. निरनिराळ्या सरदारांच्या अंतःकरणांत खासगी विरोध पूर्वी कितीही असले, तरी त्यांमुळें प्रत्यक्ष कृतींत या वेळीं वैगुण्य आलें नाहीं. सर्व असामी सदाशिवरावाचे हुकूम मनोभावानें अमलांत आणीत होते, आणि अंतर्वैमनस्यामुळें पानिपतचा संग्राम उद्भवला असला, तरी तो त्यांमुळें बुडाला असें म्हणतां येत नाहीं.

तसेंच विश्वासरावास पातशहाच्या गादीवर बसविल्याबद्दलचा आरोप आहे, तोही निराधार होय. आपण स्वतः दिल्लीस बादशहा व्हावें अशी हाव पेशव्यास नव्हती. तयमूरच्या घराण्यांतील कोणी तरी लायक इसम दिल्लीच्या सिंहासनावर ठेवून त्याचा कारभार आपल्या तंत्रानें व्हावा, एवढाच बाजी-रावाच्या वेळेपासून पेशव्यांचा खटाटोप होता. खून झालेला बादशहा आलमगीर यानें आपल्या संरक्षणार्थ मुद्दाम सदाशिवरावाचे नांवानें ता. २०·८·१७५९ रोजीं फर्मान[1] पाठविलें होतें, ( भा. इ. मं. त्रै. मा. अं. १ ), त्यांतील आज्ञेस दृष्टीसमोर ठेवून स० रा० वर्तत होता. शहा आलम यास दिल्लीस आणण्याची पुष्कळ खटपट केली. परंतु अब्दाली व मराठे यांचे युद्धाचा निकाल लागेपर्यंत आपण दिल्लीस येत नाहीं असें त्यानें साफ कळविलें. किल्ला हस्तगत झाल्यावर सदाशिवरावानें दरबार भरवून विश्वासरावास नजरा करविल्या, त्याचा विपर्यास छद्मी नजीबखानानें मुद्दाम करवून विश्वासरावास बादशाही पद दिल्याचा पुकारा केला. ही गोष्ट पुढें सदाशिवरावास कळली तेव्हां मराठ्यांचा वकील शिवभट साठे अलीगौहरजवळ होता, त्याचेमार्फत खटपट करून, अलीगौहरचा मुलगा जवानबख्त यास दिल्लीस आणून त्यास वलीअहद म्हणजे 'युवराज' नेमण्याचा समारंभ १०·१०·६० रोजीं स०रा०नें केला. अब्दाली स्वतः

१ या फर्मानाची तारीख १४·१०·१७५४ नसून २०·८·१७५९ आहे

किंवा त्याचा पुत्र तयमूरशहा दिल्लीचें तख्त घेण्यास उत्सुक होते असें दिसत नाहीं. बाबरानें स्थापिलेली चकत्यांची (मुगलाईची) बादशाही मोडून पठाणशाही व्हावी या गोष्टीस मलिकाजमानी किंवा इतर मंडळी बिलकूल अनुकूल नव्हती; आणि इराणच्या हद्दीपासून दिल्लीपर्यंत आपला पाया लांबविण्यांत अब्दालीस सुरक्षितता वाटत नव्हती. गाजीउद्दीन जाठाचे आश्रयास होता, त्यास आणून वजिरी द्यावी अशी जाठ व होळकर वगैरेंची शिफारस होती. परंतु सुजास अब्दालीकडून फोडण्याच्या आशेनें स०रा०नें वजिरी तूर्त त्यासच दिली. या कृत्यानें जाठ रुसून मराठ्यांस सोडून गेला असें सांगण्यांत येतें, परंतु त्यास आधार नाहीं. इतर आफवांप्रमाणें हीही मागाहून निघालेली कल्पना असावी.

**५. दिल्लीचा मुक्काम, तहाची वाटाघाट** (१·८–१०·१०·१७६०).– इकडे गोविंदपंताचे मागें एरंडे व कानेटकर यांचा लकडा चालूच होता. ‘ पठाणाकडील काम नासो अगर होवो, तुम्हीं येणें असें असेल तर तसेंच लिहिणें. अगर त्या शहावर फौज ठेवून आठ रोजांत येणें. नववा रोज लागणार नाहीं तर तसेंच लिहिणें. जर फौज पुढें जाईना, तर पठाण कसे दबतात; आणि फौज घेऊन पुढें जावें तर एरंडे श्रमी. याजकीरतां दोनही पेंच आहेत.’ ( ९·८·६०, १·२२५ ). पंताची अशी तारांबळ असतां अब्दाली व स० रा० यांजमध्यें तहाची बोलाचाली सुरू झाली. सुजाचे मूर्तें आपले व नजीबखानाचे मध्यस्थीनें सल्ला व्हावा, हाफीज रहमत, अहंमदखां, गाजुद्दीन हे त्यांत नसावे ’ ( १·२२६ ). ‘ आम्ही अब्दालीकडे आलों म्हणून कांहीं श्रीमंतांनीं वसवसा न धरावा. सर्व प्रकारें त्यांचें कार्य होय तेंच करीन ’ अशा गोडगोड थापा सुजा देत होता [ १·२२७ ]. सदाशिवराव त्याचें कपट ओळखून होता. नागपुरकर भोसल्याचा बंगाल्यांत शिवरामभट साठे म्हणून एक वकील स.१७५३ अगर त्याचेही पूर्वीपासून होता (खं. ३ ते ४३६, ४३९, ४४२, ४४३, ४५०), तोच पटणास या वेळीं अली गौहरजवळ जाऊनें राहिला होता, त्याच्यामार्फत गोविंदपंताचें बोलणें पुढील तहाविषयीं चालू होतें. गोविंदपंतानें सदाशिवरावास लिहिलें, ‘ मजला फिरकोळ वराता न कराव्या. ऐवज नाहीं. मुलखांत बखेडा

जाला आहे. बंदोबस्त करून मीच सेवेशीं हिशेब घेऊन येतों. तेथें आल्यावर जे आज्ञा होईल तेकरीन.' [सदर] सर्व सरदारांचा, मुख्य धन्याचा व एकंदर मोहि-मेचा सर्वच बोजा एकदम गोविंदपंतावर कसा पडला हें ले. २२९ वरून दिसतें.

एकंदरीत मराठ्यांच्या फौजा अडीच महिने दिल्लींत तळ देऊन बसल्यामुळें उभयपक्षांची मोठी कुचंबणा सुरू झाली. यमुनेच्या अलीकडे मराठे व पलीकडे पठाण यांनीं त्या पावसाळ्यांत सर्व मुलुख खाऊन व लुटून फस्त केला. दोघांचेंही सामर्थ्य समसमान असल्यामुळें, पुढें काय प्रकार होणार याची उमज कोणासच पडेना; आणि जे सामान्यतः तटस्थ म्हणून होते त्यांची मात्र अतिशय त्रेधा उडूं लागली. कारण दोनही पक्ष शक्तीच्या जोरावर त्यांजवर जुलूम करूं लागले, म्हणून एक निश्चय मनाचा करून कोणत्याही पक्षास मिळ-ण्याचें धैर्य त्यांस होईना. दिल्ली मध्यबिंदु कल्पून तेथून सुमारें शंभर दीडशें मैल अंतराच्या परीघांत समाविष्ट होणारा प्रदेश या दोन समसमान शत्रूंच्या वावरानें अगदीं त्रस्त होऊन गेला. एकमेकांचे साथीदार फोडण्याचे प्रयत्न सारखे चालू राहिले, त्यांत आरंभीं मराठ्यांचे पक्षास ज्यास्त वजन असून, पुढें पुढें तें पारडें उलट फिरूं लागलें. ता. १७ ऑगस्टला सदाशिवराव लिहितो, 'अब्दालीची फौज कांहीं फुटून येणार, त्यांचा करार तुम्हांजवळ जया व्हावें, एक लाख खर्चास देऊन इकडे आणावें, त्यांत फौजही फुटते' (१.२३१). गंगानदीला सोरमचे घांटावर पूल बांधून नांवा ठेवाव्या म्हणजे अब्दालीकडे जमा झालेले रोहिले पुलावरून उतरून स्वदेशीं जातील अशी युक्ति सदाशिवरावानें गोविंदपंतास सुचविली. नावांचे पूल बांधून नदी ओलांडण्याचा प्रघात अद्यापि उत्तर हिंदुस्थानांत चालू आहे. ता. २१ ऑगस्टची स्थिति येणें प्रमाणें. 'अब्दालीची फौज दिल्ली घेतल्यामुळें फार घाबरी झाली. रोहिले फार करून गेले व जाणार. नजीबखान मात्र हिंमत दाखवितो. सुजाउद्दौला जाऊन फसले आहेत. पुरतेंच त्याचें पारिपत्य होईल,' असें गोविंदपंत लिहितो. त्यावर सदाशिवरावानें कळविलें, 'तुम्ही कनोजेपुढें रोहिल्यांच्या मुलखांत गंगातीरीं येऊन पार उतरण्याची अवई घालणें आणि तुम्ही गंगातीरीं

राहणें म्हणजे यांस पायबंद लागेल; आणि जे दुदिले ( दोन दिलाचे ) झाले आहेत ते यांस सोडून जातील. शिदाप्पाशेट वीरकर हा सदाशिवरावाचे फौजेबरोबर सामान पुरविणारा व्यापारी असून देवघेवीचें काम त्याचेमार्फत चालत असे [ १·२३४ ]. ता. २९ ऑगस्टला गोविंदपंत आपलेकडील वर्तमान लिहितो. 'आम्ही मौजे मही घेऊन सेंगर नदी घेऊन दरमजलींनीं तालगांवीं ईसन नदीवर आलों. पाऊस अतिशय, चिखल झाला. नद्या भरल्या व जलमय सर्व झालें. परंतु तसे भिजतच तालगांवीं आलों. पठाणास कळलांच वकील पाठवून सलूख केला. इतक्यांत अहंमदखान बंगसाची पत्रें आम्हांस आलीं कीं मी सर्वस्वी तुमचा आहें. तुमचे भरंवशावर कनोज वगैरे ठाणीं एका मतलबाकरितां बसविलीं होतीं. बिबीनेंही त्यास लिहिले. दुसरे दिवशीं तिरव्यावर आलों. पाहोन घाबरे झाले. कौल घेऊन समरसिंग बघेला भेटीस आला. ठाणें सरकारचें बसलें. हटिया वगैरे ठाणीं तमाम खालीं झालीं. आतां बिठुरास जाऊन स्नान करून उमरगडीं येऊं. सुजाउद्दौले जाऊन अनुपशहरा भेटले. बहुत शिष्टाचार अब्दालीनें दिल्हा. दुसरे दिवशी वजिरीचा शिरपाव देऊं लागला, तेव्हां त्यानें विनंति केली. पातशहा कोण व मी वजिरी कोणाची करावी! त्याजवर रात्रीस सर्व लहान थोर जमा करून अब्दालीनें मसलत केली कीं आपणास येथें राहणें नाही. मराठ्यांचा जोर दिवसेंदिवस होऊं लागला, त्यास कोणाचें ऐकूं नये, सलूख करून आपले देशास जावें. हें वर्तमान बोलत आहेत,' [ १·२३६ ]. सुजाची भेट घेण्याकरितां मुद्दाम अब्दाली कोळजळेश्वराहून अनुपशहरास गेला. सुजाचा विचार कोणत्याच पक्षास उघडपणें मिळण्याचा नव्हता. अब्दालीनें व त्याच्या बापाचें उघड वांकडें होतें. तथापि नजीबखानाच्या मध्यस्थीनें व अब्दालीनें आदर दाखविल्यावरून सुजा प्रस्तुत अब्दालीस मिळाला [ एल्फिन्स्टन ]. गंगा नदीवर मंडी घाट आहे येथें सुजाची गांठ नजीबखानानें जाऊन घेतली; आणि सुजास घेऊन तो अनूपशहर येथें अब्दालीचे भेटीस आला. तेथून पुढें सर्व मंडळी हळूहळू दिल्लीचे समोर सिकंदरा येथें आले. त्या वेळीं नदीस पूर असल्यामुळें त्यास

अलीकडे येतां येईना. ता. २ सेप्टेंबर रोजीं सदाशिवराव पंतास लिहितो. ‘आम्हीं प्रस्तुत दिल्लींत नारोशंकर यास ठेवून बंदोबस्त केला आहे. रोहिले, अब्दाली सुजाउद्दौले यांचीं राजकारणें तह्याचीं आलीं आहेत. त्याचा बनाव बसतो न बसतो हें पहात बसल्यानें ठीक नाहीं, याजकरितां कुंजपुऱ्याकडे जाणार आहों. येथील बंदोबस्त केलाच आहे. आम्ही तिकडे गेल्यानंतर तेही त्यारोखें सहजांत येतील. आपला मुलूख पाठी पडोन, लढाई पडली तरी तिकडेच पडेल, तुम्हीं तूर्त इकडे न येणें. गोपाळराव गणेश व तुम्हीं कनोज जवळ गंगा किनारा धरून पलीकडील दबावास जाऊन राहवें. म्हणजे रोहिल्यांवर दबाव पडेल. अहंमदखान बंगस, सादतखान वगैरेचीं राजकारणें आलीं आहेत कीं आम्ही निघोन गोविंदपंताजवळ जमा होऊं. ऐवजासंबंधानें सहा महिने लिहितां भागलों. तरी तर्तूद करणें’ [ १·२३७ ]. या वेळीं अब्दाली उलटून गोविंदपंताचे अंगावर आण्याचा मोठा संभव होता आणि त्याजबद्दल सावध राहण्यास सदाशिवरावानें पंतास इशाराही दिला होता [ १·२३८ ]. पंत लढाईंत गुंतल्यामुळें मुलखाची लावणी व आबादानी बिघडली, त्याचा अर्थ विपरीत करून लोकांनीं सदाशिवरावास कळविलें कीं, लावणी कमती करून खावंदांस तोटा दाखवावयाकरितां मुद्दाम पंत असें करतो, त्याजबद्दल सदाशिवरावानें पंताची कानउघाडणी केली आहे [ १·२३९ ]. ‘कमाविशीचा मामला, सबब उपज कमी यावी अशा डौलानें हयगय करतां म्हणोन बारीक बारीक शोध करतां विदित झालें. मक्ता होता तेव्हां मेहेनत लावणी करीत होतां, आतां कमावीस जाली, आमचें येणें झालें, आतां लावणी पाडून तोटा नजरेस पडेसा करावा, असा शब्द न येई, सरकारचें काम होय तें खातरजमेनें करणें. ऐवज जरूर पाठविणें, इकडे न येणें, [ १·२४१ ]. तुम्हीं फौज सुद्धां सोरमच्या घांटाजवळ जाऊन राहणें. पलीकडे सुजाउद्दौला व रोहिले यांच्या मुलखांत आवई घालणें, अब्दालीस रसद जाते, ती लाग भाग पाहून मारावी, लुटावी, त्याप्रमाणें गोपाळराव गणेश व तुम्हीं मिळोन लिहिल्याप्रमाणें करावें. तुम्ही आतां केवळ महालकरी नव्हां, सरदारा सारखी तुम्हां बराबर फौज आहे. आमचेही

लोक जवळ कुमकेस आहेत. रात्रंदिवस सडे फोजेनें गनिमी करावी' असें १८ सेप्टेंबरला सदाशिवराव पंतास लिहितो [ १·२४४ ], सेप्टेंबर महिन्यांत अब्दालीची हालत कशी होती, हें खालील मजकुरावरून दिसतें. 'चार रोजांखालीं सुजातउद्दौले अब्दालीजवळ गेले. अब्दालीनें त्यांजला सांगितलें, तुम्ही मातबर, दोन करोड रुपयांचा मुलूख तुम्हां खालें. मी हैराण, मजवर शिपायांची तलब चढली. याची तजवीज करून देणें. हें ऐकून सुजा खखेद जाले. शहावलीखानाकडे गेले, कीं मी तुमचे इमानावर आलों, आतां हें काय! वजीर शहावलीखान बोलला, तुम्ही लुच्चयांचे सांगीवरून आलां. आम्ही तुम्हांस इमान पाठविलें नाहीं. नदी उतरून तुम्हांवर कोण येत होता? जसे आलां तसे शहास राजी करा'. त्याजवर फजीत होऊन डेरां आले. नजीबखानानें अब्दालीस सांगितलें, 'मी सुजास घेऊन आलों. आतां रुपये घेणें तेव्हां सोडणें.' हें वर्तमान ऐकून सुजा व नजीबखान यांस बिघाड झाला. एक करोड रुपये सुजाजवळ मागतात, हें वर्तमान घनसुंदरदासानें लिहिलें आहे., सुजानें घनसुंदरदासास कळविलें, मजला नजीबखानानें फसविलें. श्री. भाऊसाहेबांनीं, सरदारांनीं, गोविंदपंतांनीं व माझे आईनीं सर्वांनीं सांगितलें कीं तुम्हीं न जाणें. त्यांचें न ऐकोन या कुंटणाचे बोलास लागोन आलों, फजीत पावलों. अब्दालीचे लष्करीं गडबड झाली, सर्व लहानथोर मराठ्यांशीं सलूख करून आपले देशास जावयाचा मनसुबा करितात. लढाईची हिंमत त्यांत राहिली नाहीं. दहा हजार घोडे उंट खेचर अनुपशहरीं मेले, नित्य मरतात. स्वामींचें दैव थोर सर्व उत्तमच होईल.' [ १·२४६ ]. त्याच वेळीं कपिलाषष्ठीचें महापर्व [ बहुधा भाद्रपद वा. ३० ता. ३० सेप्टेंबर ], असून त्यासाठीं गंगास्नानास पंतानें आपले मुलगे व जनार्दनपंत यांस आपले जवळ बोलाविलें. ( १·२४७ ). गोविंदपंतास पत्र लिहिण्याचें काम तरी दररोज मोठेंच होतें. अब्दाली, रोहिले, सुजा वगैरे मंडळीचीं कारस्थानें व हालचाली पंतासच चांगल्या समजत होत्या, आणि सर्व प्रकार विस्तारपूर्वक तो सदाशिवरावास, दक्षिणेंत नानासाहेबास, बुंदेल खंडांतील आपल्या हस्तकांस व इतर मंडळीस व राजे

रजवाड्यांसही लिहीत होता. [१·२५३] या वेळीं सदाशिवरावानें शिंदे किंवा तसाच योग्यतेचा दुसरा सरदार पंताचे मदतीस पाठविला असता तर बरेंच काम झालें असतें. इकडे प्रस्तुत सर्व भार पंतावर येऊन पडला, आणि तिकडे सदाशिवरावाजवळ सर्व फौज व सरदार रिकामे राहिले.

इकडे तहाची वाटाघाट चालली होती, तिचा फलितार्थ प्रथम सांगितला पाहिजे. सेप्टेंबर ता. १८ रोजीं खालील पत्र दिल्लीतून पिलाजी जाधवाचा मुलगा सटवाजी जाधव यानें पेशव्यास लिहिलें. 'इकडील वर्तमान तरी वरचेवर श्री. भाऊसाहेब यांच्या पत्रांवरून निवेदन होत असेलच. श्रीमंतांचा मुक्काम सालेभार बागासंनिध आहे. गिलच्यांचा मुक्काम यमुनेपलीकडे आहे. गिलच्यांचे वकील श्रीमंताकडे येतात, यांचेही त्यांजकडे जातात. जाबसाल लागले आहेत. आपला दबाव भारी, श्रीमंत जें करणें तें उत्तमच करतील; आणि श्रीकृपेनें व आपल्या पुण्यप्रतापें सर्व गोष्टींचें यशच येईल' [६·४०४]. या शब्दांवरून मराठ्यांची हुरूप केवढी होती, व त्यांचा सदाशिवरावाचे ठिकाणीं केवढा भरंवसा होता, हें निदर्शनास येतें. सटवाजी जाधवासारखा वयस्थ गृहस्थ हें लिहितो, यावरून सदाशिवरावावर सरदार सर्व नाराज झाले होते वगैरे प्रवाद पाठीमागून अपजयानंतर उठलेले होत.

विश्वासरावास पातशहा केल्याची व आणखीही पुष्कळ खोटी बातमी पसरवून नजीबखानानें मराठ्यांचें नांव मुसलमान मंडळींत पुष्कळच खराब केलें. त्यांत पैशाची अडचण भरून काढण्याकरितां सदाशिवरावानें दिवाणी-आमचें छत तोडून त्या चांदीचे रुपये पाडले, या क्षुल्लक परंतु हृदयक्षोभक गोष्टीची भर पडली. छतास बोटभर जाडीचा चांदीचा पत्रा असून वर सोन्याचें काम केलेलें होतें. छत तोडून रुपये केले ते तीन लाख झाले असें बखरकार म्हणतो, व १७ लाख झाले असें मुसलमान इतिहासकार लिहितात. दागदागिने वगैरे सर्व मिळून १७ लाख झाले असावे. कांहीं असलें तरी या कृत्यानें लौकिकांत पातशाहीची अप्रतिष्ठा होऊन मराठ्यांचे विरुद्ध मुसलमान मंडळी साफ बिथरून गेली. जाट, होळकर वगैरे कित्येक इसम छत तोडूं नये म्हणून सांगत होते,

तु सदाशिवरावानें तें मानलें नाहीं. आलेल्या नडी कोणत्या ना कोणत्या ायानें त्यास भागवाव्या लागल्या.

आपल्या कचाटींत पूर्णपणें अब्दालीस आणून त्याजकडून योग्य असा यमचा तह व बंदोबस्त करून घेण्याचे सदाशिवरावाचे प्रयत्न चालू असतां, टेंबर महिना खलास होत आला. अलीकडच्या महिना पंधरा दिवसांत ब्दालीची बाजू बरीच खालावली होती; आणि महिनाभर यमुना उतार देणार हीं हा अजमास खरा ठरता तर सदाशिवरावानें त्यास नरम केलें असतें. ारंगाबादचा राहणार पंडित भवानीशंकर यास सुजाकडे बोलाचाली करण्यास दाशिवरावानें पाठविलें असून, उलट पक्षीं दिल्लीचा रहीश देवीदत्त हा सुजाचा कील सदाशिवरावाजवळ होता. या देवीदत्ताबरोबर दुसरा एक इसम काशी- य नांवाचा असून त्यानेंच पानपतानंतर एकंदर प्रकारणाची हकीकत मुसल- ानींत लिहिली ती काशीरायाची बखर म्हणून हल्लीं प्रसिद्ध आहे. ही बखर शियाटिक रीसार्चिसच्या तिसऱ्या पुस्तकांत इंग्रजी भाषांतररूपानें प्रसिद्ध ाऊन पुढें या इंग्रजीचें भाषांतर मराठींत विविधज्ञान विस्तार मासिकांत प्रसिद्ध ालें. वरील वकिलांच्या मार्फत होत असलेल्या वाटाघाटी सुजाकडून नजीब- ानास व अब्दालीस कळत होत्या. ऑक्टोबर महिन्यांत हे त्रिवर्ग एकत्र ाऊन पुढील विचारास लागले. या सर्वांचा सूत्रचालक नजीबखान होता. ोणत्याही रीतीनें या वेळीं मराठ्यांचा पाडाव केला नाहीं तर त्यांचा पगडा ायमचाच पातशाहींत बसला म्हणून समजावें, कदाचित् थोड्या दिवसांत ते आपलाच ब्राम्हण पातशहा दिल्लीस बसवितील, पुनः त्यांचें पारिपत्य करण्याची अशी संधि प्राप्त होणार नाहीं, असे विचार चालून शेवटीं भवानीशंकराबरोबर आपला खोजा याकुतखान यास सुजानें सदाशिवरावाकडे पाठवून खालील निरोप कळविला. 'रघुनाथ, दत्ताजी व मल्हारराव यांनीं व त्यांच्या फौजांनीं सर्व राजे व रोहिले सरदार यांची सर्व प्रकारें धूळधाण उडवून दिल्यामुळें, त्या सर्वांनीं आपल्या बचावाकरितां अब्दालीस हिंदुस्थानांत आणिलें. त्यांनीं पेरलेल्या बीजास आतां फळें येऊं लागलीं आहेत. तथापि आपली सलूख

करण्याची मनापासून इच्छा असेल तर, आपला आमचा पूर्वापार स्नेह मनांत आणून, उभय पक्षांत स्नेह घडवून आणण्याची खटपट मी करीन.' याप्रमाणें सरहिंद पावेतोंचाप्रदेश अब्दालीनें मागितला. ही गोष्ट सदाशिवरावानें कबूल केली नाहीं आणि तह फिसकटला [ काशीराय ]. एल्फिन्स्टन व एल्यटच्या इतिहासांत याचाच अनुवाद आहे.

दिल्लीस रिकामें कुचंबत बसण्यांत अर्थ नाहीं असें सदाशिवरावास वाटूं लागलें. या वेळीं तहाची वाटाघाट जोरांत चालू होती. परंतु युद्ध चालू असतां, तहाच्या योजनेस तोंडजबानीनें जोर कधींच येत नसतो. त्यास मनगटाचा दब्या मागून अवश्य पाहिजे, तो दब्या बरोबर न लागल्यामुळें तहाची खटपट निष्फळ झाली. गोविंदपंताकडून अंतर्वेदींतून शत्रूंवर शह बसला नाहीं व थोड्या फौजेनें तो बसणें शक्यही नव्हतें. तेव्हां अब्दाली अडचणींत सांपडला आहे, वगैरे बातम्या येत होत्या त्या खऱ्या नव्हत्या. मराठ्यांनीं दिल्ली घेतली ही बातमी मात्र हिंदुस्थानांत पसरून, त्यांचा गौरव लौकिकांत होऊं लागला. मोगल पातशाहीचें मुख्य ठिकाण अब्दालीच्या हातून मराठ्यांनीं हिसकावून घेतलें या गोष्टीनें मराठ्यांचा दरारा वाढला. त्या योगें त्याचे साथीदार डळमळूं लागले. त्याच्या सैन्यांत स्वदेशीं परत जाण्याविषयीं कुरकूर सुरू झाली. रोहिले सरदार व इतर लहानमोठे गृहस्थ अब्दालीच्या सामर्थ्याबद्दल साशंक होऊन त्याच्यापासून विभक्त होण्याच्या खटपटीस लागले. सुजालाही अब्दालीस मिळाल्याचा खेद वाटूं लागला. अब्दालीनें सुजावर मोरेकरी घातले व तो खर्चाकरितां पैसा मागूं लागला, तेव्हां सुजाला त्याचा अगदीं वीट आला. अलीगौहरनेंही त्याजकडे येण्याचें नाकारिलें. बादशाही मिळवून देण्याच्या नजीबखानाच्या थापा जागच्या जागीं राहिल्या; लूट व पैसाही मिळेना. तेव्हां त्यानें सलुखाचें बोलणें करण्यास वकीलही पाठविले. परंतु मनाप्रमाणें तहाचा जम बसण्यास अवधि लागेल असें पाहून, सदाशिवरावानें त्याच्या म्हणण्याकडे विशेष लक्ष दिलें नाहीं. या वेळीं सदाशिवरावाची स्थिति एकूण बाबतींत अब्दालीच्याहून श्रेष्ठ होती. दिल्लीचा कबजा, फौजेची

तयारी, उत्कृष्ट तोफखाना, मोठमोठ्या शूर सरदारांचें साह्य, व सर्व गोष्टींची सुबत्ता हे प्रकार त्यास अनुकूल असून, दत्ताजीच्या वधाचा सूड घेण्याची सोत्कंठ ईर्षा त्याच्या मनांत होती. तेव्हां अब्दालीला अडचणींत गांठून त्याचा समूळ फन्ना उडविण्याचा त्याचा मानस होता. अब्दालीनें मनाप्रमाणें तह केल्यास त्यास स्वदेशीं सुखरूप जाऊं द्यावयाचें, नाहीं तर अंतर्वेदींत गांठून किंवा अलीकडे आल्यास एकदम हल्ला करून, त्याचा पाडाव करण्याचा सदाशिवरावाचा बेत होता.

परंतु तह त्यास नको होता असें मात्र नाहीं. सदाशिवराव गर्वानें फुगून गेला होता, तो कोणाचेंच मानीत नव्हता, वगैरे अपवाद पश्चात् बुद्धीचे केवळ असत्य आहेत. पराभव झाल्यावर खरी स्थिति समजण्याची ज्यांस शक्ति नाहीं अगर साधनें नाहींत, त्यांनीं मनाचें समाधान करण्याकरितां, किंवा काशीरायासारख्या मराठ्यांच्या द्वेष्ट्यांनीं त्यांची मानखंडना करण्याकरितां या गर्वाच्या फाजील कल्पना मागाहून सदाशिवरावाच्या माथीं मारल्या आहेत. काशीरायाची बखर वाचून तो केवळ मुसलमानांचा हेरच असावा असें वाटल्याशिवाय राहत नाहीं. तह घडवून आणण्यास मागून चापती लावली पाहिजे, हें तत्त्व सदाशिवराव ओळखून होता; आणि दिल्ली काबीज होऊन तेथील व्यवस्था लागतांच त्यानें पुढें कुंजपुऱ्यावर जाऊन अब्दालीचा मार्ग अडविण्याचा उपक्रम सुरू केला. ता. २ सेप्टेंबरच्या पत्रांत त्यानें हा इरादा व्यक्त केला आहे. त्यापूर्वीच कांहीं दिवस तो घाटत असला पाहिजे. अब्दालीस अडविण्याचा मुख्य मार्ग म्हणजे पूर्व पश्चिम दोहींकडून त्यास आवळून मध्यें कोंडणें. दक्षिणच्या बाजूनें यमुना नदी भरून चालली असून आगऱ्यापासून तों थेट कुंजपुरा ताब्यांत आल्यावर तेथपर्यंत दक्षिणच्या बाजूनें अलीकडे येण्यास त्यास वाव नव्हताच. तेव्हां पूर्वेकडून गोविंदपंतास मदत पाठवून त्याजकडून अब्दालीस हूसकून आपल्या अंगावर पुढें आणणें हाच मुख्य उपाय सदाशिवरावास होता. परंतु यमुना भरलेली असल्यामुळें पलीकडे गोविंदपंतास मदत पोंचणें शक्य नव्हतें, तेव्हां कुंजपुऱ्याचे बाजूनें सहारणपुरावरून त्याजवर चालून त्यास मागें रेटीत

तर उत्तम, न आलिया फिरोन येऊं. लिहिल्याप्रमाणें तुम्हीं शह देणें. जाठ आपल्याच आहे. वसवास नाहीं ' [ १–२५९ ].

'जाठ आपकाच आहे, वसवास नाहीं,' व 'जाठची फौज जवळ कुमकेस आहे' ( १·२४४ ), या विधानांवरून व पराभूत मराठ्यांस पुढें जाठनें भरपूर साह्य केलें, यावरून जाठ स०रा०वर रुसून चालता झाला, हा समजही खोटा ठरतो. मात्र ' रसद पोंचविण्यास जाठ तुम्हांस त्रास देणार नाहीं ' (१·२६४), या स०रा०च्या इशाऱ्यावरून लोकांत त्या वेळीं जाठ रुसून गेल्याचा प्रवाद उठला होता असें दिसतें. दोन प्रबळ शत्रूंच्या या तीव्र झगड्यांत इतरांप्रमाणें जाठासही अमुकच एका पक्षाकडे उघडपणें सामील होण्याची बुद्धि नव्हती, एवढाच प्रकार फार तर म्हणतां येतो. 'इकडे भाऊ, तिकडे अब्दाली, दोनही सबळ अनुष्ठानी, दोहोंचीं सुकृतें सऱ्यां ताजव्यांत घातलीं आहेत. न्यूनपूर्ण थोडक्याच दिवसांत दिसोन येईल. तों पावेतों आम्ही आपले जागां दम बांधोन स्वस्थ राहवें, असा जाठानें निश्चय केला ' ( भा. सा. ब. ९६ ), हीच वस्तुस्थिति खरी दिसते. कबिले ग्वालेरीस ठेविले नाहींत, मीरशहाबुद्दिनास वजिरी दिली नाहीं, सभागृहांतील छताची चांदी काढून त्याचें नाणें केलें, आणि दिल्लीचा बंदोबस्त जाठाकडे दिला नाहीं, हीं चार कारणें जाठाचे रुसण्याचीं काशीरायानें दिलीं आहेत. पुष्कळ असामी आपापल्यापरी स०रा० स सल्ला देत होते, सर्वांच्याच सूचना ऐकणें त्यास शक्य नव्हतें. डाव फसल्यावर मागाहून ' मग मीं, सांगितलेंच होतें, ' असें जो तो म्हणणार, हल्लीं सुद्धां अशा मोठ्या भानगडीच्या मोहिमांत बजबजपुरी कशी माजते, हें सर्व ध्यानांत ठेवून त्या वेळच्या स्थितीचा अंदाज केला पाहिजे.

६. **कुंजपुऱ्याचा पाडाव** ( १७·१०·१७६० ).—दिल्ली सोडून दहा वीस कोस पुढें आल्यावर कांहीं तरी आकस्मिक कारण घडून नाना पुरंदरे व आपाजी जाधव यांस सदाशिवरावानें परत पाठवून त्यांजकडून आश्विन शु० १,–१०·१० रोजीं दिल्लीस वलीअहदीचा समारंभ करविला [१·२५८–५६]. मधल्याअवधींतच कुंजपुऱ्याची मोहीम ठरून कांहींनीं पुढें जाऊन पानपत सोनपत वगैरे

ठाणीं हस्तगत केली. बळवंतराव मेहेंदळे लिहितो, 'कुंजपुऱ्यास आम्यास पाणिपतपावेतों येऊन पोंचले, व लोकांस तफावत आहे. नदीस पाणी आठ चार दिवस उतरावयास पाहिजेत. गिलच्यांची फौज दिल्लीजवळ पलीकडे ये कांठींच आहे. कूच करून पलीकडले तीरानें येणार होते. प्रस्तुत लष्करांत खर्चाची निकड फारच आहे. आम्हांसारख्यांनीं वस्ता मोडून खादल्या. सर्वही पेंच श्रीमंतांचे प्रतापें वारतील. एक भाऊसाहेबांची हिंमत व लोकांवर उत्तम दृष्टि आहे, येणेंकरून फत्तेच आहे' [१२ ऑक्टो०, इ. सं. ए. टि. १·१४]. कुंजपुऱ्यावर शिंदे, होळकर व विठ्ठल शिवदेव पुढें गेले. मध्यें सदाशिवराव मागें तोफखाना व पिछाडीस दमाजी गायकवाड आले. हें नाक्याचें ठिकाण मराठ्यांनीं काबीज करण्यांत अब्दालीचा स्वदेशीं जाण्याचा मार्ग बंद होऊन त्याचा पाया तुटणारा होता. येथूनच त्याचें स्वदेशाशीं दळणवळण होतें. मरा०च्या फौजा कुंजपुऱ्यावर आलेल्या ऐकून अब्दाली गडबडला. त्यानें कांहीं फौज मदतीसाठीं यमुनेच्या पूर्वतीरानें रवाना केली, आणि मदत येईपर्यंत कसाबसा टिकाव धरा, असें पत्र अब्दुस्समदखानास पाठविलें. तें पत्र सहज गत्या मराठ्यांचें हातीं लागलें, तेव्हां दोन तीन दिवसांत त्वरा करून इब्राहीमखानाच्या तोफखान्याकडून जोराचा मारा देवविला आणि तीन टोळ्यांनीं तीन बाजूंनीं चढाई करण्यांत लढाई मोठी निकराची झाली. शिंदे तर दत्ताजीच्या मरणाचा सूड घेण्यासाठीं टपलेले असून सर्वांनींच मोठी शिकस्त केली. दामाजी गायकवाडानें हरहर महादेव असा घोष करून तोफांनीं पडलेल्या भगदाडांतून घोडे घातले. त्याबरोबर झटक्या सरशीं शहर व किल्ला हस्तगत झाला. कुत्बशहा व अब्दुस्समदखान दमाजीच्या फौजेस जिवंत सांपडले. दमाजीनें त्यांस हत्तीवर बसवून सदाशिवरावाकडे रवाना केलें. त्याला पाहून सदाशिवरावास दत्ताजीच्या वधाची आठवण झाली आणि लागलीच त्यानें त्या दोघांचा शिरच्छेद करविला. यामुळें अब्दालीच्या पक्षास अत्यंत चीड आली, आणि इतउत्तर युद्धाचा रंग पालटला. पाडाव केलेल्या शत्रूस ठार मारल्याची उदाहरणें मराठ्यांचे हातून सहसा घडलेलीं नाहीत;

आणि या प्रसंगींही वरील दोघां सरदारांस मारूं नये असा शिंदे होळकर आग्रह करीत असतां त्यांचें न ऐकून, दहशत बसविण्याकरितां म्हणून वरील कृत्य सदाशिवरावानें केलें. कसेंही असलें तरी तें गैर होय. मात्र यावरून अब्दालीच्या आजपर्यंतच्या क्रौर्यांचा यथास्थित फेड जशास तसें न्यायानें करावयाचा निश्चय सदाशिवरावाचा दिसून येतो. पूर्वीच्या स्वारींत रघुनाथरावानें अब्दुस्समदखानास पकडल्यावर दंड घेऊन सोडून दिलें होतें. अशा प्रकारें उभय पक्षीं निष्ठुरता वाढत गेल्यामुळें, शेवटच्या संग्रामानंतर अब्दालीनें पाडाव झालेल्या मराठ्यांस बिलकूल दया दाखविली नाहीं. ' उपरांत कुंजपुऱ्याचें वस्त्रहरण केलें. लूटही बेमुबलक सांपडली. किल्यांत नजीबखानाचा व्याही व जांवई होता. तो मुलांमाणसांसह पकडला. द्रव्याचे आशेनें बोटास पलिते लावून त्यांचे हाल केले. तेव्हां पंधरा लक्ष रुपयांची मालिस्त दाखविली. कामाठी व बेलदार लावून कुंजपुऱ्याचा किल्ला व शहर पुन्हा ढांसळून टाकिला. सर्वांना यशप्राप्तीचा संतोष झाला [भा. सा. ब.]. कुंजपुऱ्यावर पांच सात हजार फौज व पांच सात हजार प्यादा लुटला, यामुळें अब्दालीचे लष्करांत दहशत पडली. कित्येक लोक उठून जातात ' ( १·२६० ). एकंदरींत कुंजपुऱ्यांत पुष्कळ लूट मराठ्यांस मिळाली. त्या लुटींत दत्ताजी शिंद्याचा हत्ती जव्हेरगज आठ दहा महिन्यांपूर्वी पाडाव करून नेलेला पुनः शिंद्यांस परत मिळाला.

रविवार ता. १९ ऑक्टोबर स. १७६० रोजीं विजयादशमीचा दिवस मोठ्या विजयानंदानें कुंजपुरा येथें मराठी फौजांनीं साजरा केला. सदाशिवरावाच्या भाग्याचा तारा या दिवशीं परमोच्च बिंदूस पोंचला होता. सार्वभौम सत्तेचा खरा निदर्शक म्हणजे पराक्रमी सरदारांची जूट व अभ्यस्त तयारीनें हिंमतीस चढलेली प्रचंड फौज या दोनही गोष्टी सिद्ध असून, शिवाय धनधान्याची समृद्धि असल्यामुळें मराठ्यांच्या आनंदास पारावर काय असणार! या दिवशीं फौजेची गणती करून मोठ्या थाटानें सदाशिवरावानें सर्व सरदारांसह सीमोल्लंघनसमारंभ केला. दरबारास सर्वांनी विश्वासरावास

नजरा केल्या; तोफांचे आवाज सुटले. जिकडे तिकडे आनंदी आनंद झाला. आश्विन शु. ८, ता. १७ ऑक्टोबर रोजीं सदाशिवरावानें कुंजपुरा घेतला, ही गोष्ट २३ ऑक्टोबरास नाना पुरंदऱ्यानें दक्षिणेंत कळविली. 'दिल्लीचा बंदोबस्त करून श्रीमंत कुंजपुऱ्यास आले. अब्दालीकडील दहा हजार फौज, समदखान, कुत्बखान होते, त्यांजवर हल्ला करून झुंज झालें. मोडले, गोठ लुटला. तसेंच हल्ला करून गांव घेतला. लोकांस लूट पुरती घोडा, उंट विगेरे मिळाले. दाणादुणा लष्करास मिळाला. आपल्याकडील सर्व ब्राह्मण मराठे मंडळी खुशाल आहे. तुम्ही झुंजाच्या खबरी भलत्या ऐकाल, घाबरे व्हाल, मातुश्री चिंता करतील यास्तव लिहिलें आहे,' [ ६·४०५ ].

इकडे गोविंदपंताला सांगितलेल्या कामगिऱ्या अशक्य कोटींतल्या असल्यामुळें, बहुतेक कागदावरच राहिल्या. एवढेंच भाग्य समजावयाचें कीं तो स्वतः आपलें स्थान सोडून परत बुंदेलखंडांत पळून आला नाहीं. अब्दाली त्याजवर चालून जाता तर तो परतही आला असता. तत्रापि तो आपल्या स्थानास चिकटून राहिला, येणेंकरून त्या बाजूनें अब्दालीला अलीकडे येण्याचा मार्ग बंद राहिला. अब्दालीला हुसकून गोविंदपंतानें आपल्या अंगावर आणून सोडावें असें सदाशिवरावानें शेंकडों वेळां लिहिलें. 'तुम्हीं व गोपाळराव गणेश एकत्र होऊन जलदीनें सुजाचे मुलखांत हंगामा करणें व रसद न चाले तें करणें. शेंपन्नास राऊत प्यादे येतील जातील त्यांस लुटून मारून टाकीत जाणें. असें लिहीतच गेलों, परंतु तुम्ही गढ घेत बसलां हें काय! या उपरी पत्रदर्शनीं जाणें. नेहमीं मुलकांत फिरावें. रसद वाट मारावी, गांव लुटावा, माणसें मारावीं, दहशत बसवावी, हेंच नित्य करावें. वाटेचे गांव व रस्ते असतील त्यांस दहशत पडोन बेचिराख होय तें करावें. वारंवार लिहितों, परंतु तुमचेकडून त्यास उपसर्ग होत नाहीं. पायबंद बसत नाहीं. तरी या उपरी उशीर न लावणें. अब्दाली कूच करून बागपतेवर चार कोस कांहीं फौज उतरूं लागली. लौकरच त्याचें पारिपत्य होईल. तुम्ही तिकडून गनिमी तऱ्हेनें उपद्रव लावावा. अब्दाली अलीकडे आला. तुम्ही पुढें येऊन त्याच्या वाटा माराव्या. सत्वर

लिहिल्याप्रमाणें करणें, [ ता. २५ ऑक्टोबर, १·२६० ]. परंतु गोविंद-पंताच्या लहानशा फौजेकडून पावसाळ्यांत शत्रूच्या भर अंगावर चालून जाणें शक्य नव्हतें. पुढें पानपतावरून प्रत्यक्ष सदाशिवरावसुद्धां शत्रूवर चालून जाऊ शकला नाहीं.

ता. २५ ऑक्टोबरच्या पत्रांतच अब्दाली बागपतावर यमुना उतरूं लागल्याची सदाशिवरावास खबर होती. यमुनेच्या पूर्वतीरानें त्यानें कुंजपुऱ्याचे मदतीस फौज पाठविली, पण ती पोंचण्यापूर्वींच तें स्थळ काबीज होऊन आपल्या सरदारांचा शिरच्छेद झाला व नजीबखानाचा व्याही व जांवई हस्तगत झाले, ही बातमी येऊन अब्दाली अतिशय चिडून गेला, आणि मराठ्यांवर चालून येण्यासाठीं उतार पाहतांना बागपतासमोर छाती इतक्या पाण्याचा गचक्या उतार त्यास मिळाला. चांदीच्या मोठ्या पत्र्यांवर कुराणांतील कांहीं वाक्यें लिहून ते पत्रे त्यानें यमुनेंत सोडिले, [ एल्यट पु. ८ पृ. १४६ ]. नदींत हत्ती उभे करून त्यांजवरून सर्व जड सामान व तोफा पलीकडे नेण्याचा हुकूम केला; आणि स्वतः तंग सोडलेला आपला घोडा यमुनेंत घालून पलीकडे गेला. अशा रीतीनें तीन चार दिवसांत सर्व फौज त्यानें पलीकडे नेली. या प्रयत्नांत पुष्कळ लोक मृत्युमुखीं पडले. पण त्याची त्यानें क्षिति केली नाहीं. बागपतावर मराठ्यांची थोडी फौज होती, तिनें अब्दाली अलीकडे येतांच पळून कुंजपुऱ्याचा रस्ता सुधारला. अब्दालीनें येथें फौजेची गणती केली. त्यांत स्वतःची, २४ हजार स्वार व वीस हजार पायदळ, सुजाउद्दौल्याची सुमारें तीस हजार, व सर्व रोहिले सरदार मिळून तीस हजार, अशी एकंदर एक लाखावर फौज भरली. शिवाय तोफा दोन अडीचशें होत्या. सोनपतापासून गणोरावरून सराई संभाळकियापावेतों अब्दालीची छावणी झाली. नदी उतरतांना मराठी फौज अब्दालीवर मारा करण्याऐवजीं आपण होऊन मागें सरकली, तेव्हांच अब्दालीनें मराठ्यांचें पाणी ताडलें. अशा अडचणींतच त्यास गांठलें पाहिजे होतें. त्याची स्वारी स्वारस्थावर होण्यापूर्वींच स०रा०नें त्यास कां गांठलें नाहीं तें समजत नाहीं. अनायास अंगावर येतो हें बरें असें त्यास वाटलें.

कुंजपुऱ्याहून पुढें जात असतां सदाशिवरावास अब्दाली यमुना उतरल्याची बातमी कळली. लगेच पुढील मसलतीची भरपूर वाटाघाट त्यानें सर्व प्रमुख मंडळींशीं केली. त्यांत मल्हाररावाचा उद्देश गनिमी काव्यानें अब्दालीस हैराण करण्याचा असून इब्राहीमखानाचा सल्ला, खंदक मोर्चे वगैरे तयार करून, बंदोबस्ताची छावणी करावी आणि मग अब्दालीस हैराण करावें, असा पडला. उन्हाळ्यांत गनिमी काव्यानें अब्दालीशीं लढतांना शिंदे होळकरांची पोळजत्रा कशी उडाली हें सदाशिवरावाचे डोळ्यांसमोर असल्यामुळें आणि कवाइती तोफखान्याचा प्रभाव त्यानें अनुभविलेला असल्यामुळें, त्यानें इब्राहीमखानाची योजना स्वीकारिली. ता. १ नोव्हेंबर रोजीं स०रा० लिहितो, 'अब्दाली यमुना बागपताजवळ उतरला व गणोरास आला. खासा स्वारी कुंजपुऱ्याहून पानपतास आली. त्याजवर तीन दिवस गणोरास होते. तेथून संभाळकियास ( मागें ) आले, तेथून दोन अडीच आजी आले. फार आवळून चालतात. कही लांबवूं देत नाहींत. चाळीस पन्नास कोस धावतात तें नाहीं. अंतर थोडकें आहे. त्याचे आमचे बातमीची गोळागोळी होती. याप्रमाणें तीन दिवस होते. दाणा दोन अडीच शेर गिलच्यांचे लष्करांत आहे. हिंमत फार आहे. तरी यास मिळणार. त्यास लढाई लवकरच होऊन येईल. तुम्ही जलदी यमुनेपलीकडून ( अलीकडे ) येऊन बागपतपर्यंत धुमामा चालवून, त्यास रसद न पोंचे, फौजेस शह पडे तें करावें. आतां गिलच्याचा पेंच तिकडे नाहीं, यास्तव लांबलांब मजलीनें येणें. दोन चार हजार सडी फौज निवडून बागपतावर यमुना पारून यावें. रसद मारावी. गडमुक्तेश्वर, शामळी[१] वगैरे नजीबाचे प्रांत जाळावे. इरे धरून थडकून येऊन काम करावे' [१.२६१]. थोड्या फौजेनिशीं अब्दालीचे तोंडावर बागपतावर यमुना उतरणें पंतास शक्यच नव्हतें. रसद मारण्याचें काम त्यास शक्य होतें व अब्दालीस या वेळीं रसद पोंचत नव्हती, यावरून तें काम गोविंदपंत थोडें बहुत करीत होता.

**७. पानपतावरील कुचंबणा.** ( नोव्हें.-जाने. १७६१ ).—ता. २५

१. दीप-दिल्लीच्या उत्तरेस ५४ मैल सहारणपुर रेल्वेवर स्टेशन.

ऑक्टोबरास पानपतावर अब्दाली यमुना उतरूं लागला, तेव्हां तो होऊन आपल्या अंगावर आल्याबद्दल स० रा० स समाधान वाटलें आणि आतां आपण त्यास खास बुडवूं अशा हिंमतीनें स० रा० परत फिरून गणोरापर्यंत त्याचे अंगावर चालून आला. या ठिकाणीं अब्दालीचें खरें तेज कळून स० रा० चपापला, आणि आपणास वाटलें होतें तितकें काम सोपें नाहीं, अशी खात्री होऊन, बचावासाठीं लगेच मागें सरून, पानपत पाठीशीं घालून, तेथें कबिले सुरक्षित ठेवून, इब्राहीमखानाच्या सल्ल्यानें, फौजेस फांकूं न देतां आवळून धरून खंदकाच्या[1] आंत वंदोबस्त करून राहिला, म्हणजे अब्दालीचा पाया तोडण्याऐवजीं त्यानेंच आपला पाया तोडल्याचें स० रा० च्या प्रत्ययास आलें. मात्र त्याची व सर्व फौजेची हिंमत जबरदस्त असून सरंजाम व रसद मुबलक असल्यामुळें अब्दालीस बुडविण्याची त्यास खात्री होती. ' मराठी फौज शेर झाली, या उपरी अब्दालीचें पारिपत्य सत्वरच होईलसें दिसतें,' असें ता ३ नोव्हें० चें पत्र आहे [ १·२६२ ]. पंतास ता. ४ नोव्हेंबरचे पत्रांतील मजकूर.–' आजपर्यंत रिकाम्या गोष्टी लिहीत गेलां, निदर्शनास एकही येत नाहीं. तरी मातबर ऐवज अविलंबें रवाना करणें. अब्दालीची आमची गांठ पाणिपताजवळ पडली आहे. तोफखान्याचा आराबा रचून लढाई करावयास तयारी केली आहे. त्याच्यानें इकडे तिकडे जाववत नाहीं व कांहीं करवत नाहीं. दीड पावणेदोन कोसांची तफावत आहे. पेंढारी व लुगारे राऊत, नित्य उंटें, घोडीं, तट्टें,

---

१. टीपः—पानिपत शहर व त्याचे दक्षिणेकडील पसीनम हे दोन गांव आंत धरून सभोंवार ५० हात रुंद व १२ हात खोल असा खंदक खणून इब्राहीमखानानें छावणीची योजना सिद्ध केली. मातीचे ढीग, मोर्चे व खंदक ऐवढे मोठे होते कीं स. १८७२ त आपण ते पाहिले असल्याचें सर डेन्झिल इबेट्सन लिहितो. दोन छावण्यांच्या दरम्यान रणखांब उभारलेला असून तेथें दोहोंपक्षाकडील योद्धे एकमेकांस पाचारण करून द्वंद्वयुद्धें करीत. लढाईचे सुरवातीपूर्वी अब्दालीचा डेरा दुरपूर पसीनम येथें व सदाशिवरावाच्या आंबा म्हणून ठिकाण दाखवितात त्याजवळ होता.

बैल, आघाडी पिछाडीवरी जाऊन गोटापासून घेऊन येतात. तुम्हीं या गोष्टी भयाच्या मनांत न आणितां, सत्वर ऐवज आमरियावरून दिल्लीस रवाना करणें. तेथें आलियावरी घेऊन जाऊं. पटपटगंजावरी[1] त्यांचे पिछाडीस येणें. त्यांची रसद लुटणें, दबाव पाडणें म्हणजे चहूंकडून घाबरा होईल. जाटाच्यानें तुह्मांस अटकाव होत नाहीं. वेडें वांकडें तो करणार नाहीं. गोपाळराव गणेश सुद्धां सामील करून सुजा व रोहिल्यांचा अंमल उठवावा' [ १·२६४ ]. ता. ५ नोव्हेंबर रोजीं कृष्ण जोशी पानपतावरून दक्षिणेंत लिहितो,

श्रीमंतांनीं महाष्टमीस समदखान कुत्बशहा मारून दहा हजार सेना लुटून, कुंजपुरा घेऊन लुटला. गढी खणून जमिनीबरोबर केली. श्रीमंतांस भूमिगत सात लक्ष रुपये सांपडले. तेथून कूच करून कुरुक्षेत्रास चालिले होते. इतक्यांत अब्दाली बागपतापाशीं यमुना पायाब उतरून सोनपतास आला. हें वर्तमान श्रीमंतीं ऐकतांच माघारे फिरोन यवनाचे सन्मुख फणिपथास आले. नित्य थोडथोडें युद्ध होत आहे. श्रीमंतांहीं चोहोंकडे तोफखाना पसरला आहे. यवनास थोर भय जाहलें आहे, पुढें येववत नाहीं. आमचे सैनिक यवनाचे समक्ष उभे राहून, नित्य शें पन्नास यवन मारून, उंट घोडीं आणितात. दोन हत्ती पेंढारी यांणीं काल आणिले. यवनाच्या सैन्यांत रसद बंद झाली आहे. यामुळें पीठ तीन शेर, चणे चार शेर, व तूप अर्धा शेर याप्रमाणें महर्घ आहे. आमचे सैन्यांत गहूं सोळा शेर व चणे बारा शेर व तूप अडीच शेर याप्रमाणें संवगाई आहे. आणखी दोन चार दिवसांत यवन चालोन तोफांवरी येईल तर क्षणमात्र बुडेल. न ये तर आमचे लोक जाऊन युद्ध करणार. वरकड सर्व शुभ चिन्हें होतात. सर्व सैन्यास उत्साह आहे कीं, अब्दाली व नजीबखान व सुजा आठ चौ रोजांत क्षयास जातील. अब्दाली शहानशा बहुत युद्धें केलेला, परंतु दो कोसांवरी येऊन आठ दिवस बसोन कांहीं पराक्रम नाहीं, त्याजमुळें आमची फौज बहुत शेर आहे. अब्दालीनें स्वदेशास जावें तर मार्ग नाहीं, युद्ध करावें तर परिणाम नाहीं, उगेंच

---

१. टीप.—बागपताच्या समोर यमुनेच्या पूर्व कांठावर.

बसावें तरी भक्षावयास नाहीं, याप्रमाणें विचारांत पडला आहे. मग्याक्षुय सविस्तर होईल तें लिहूं' [ १·२६५ ]. या पत्रानंतर दोन दिवसांनींच हा कृष्ण जोशी गोळा लागून मरण पावला. दीक्षितांचेंही पत्र याच प्रकारचें आहे. मोगलांच्या लष्करांत रुपयास शेर दीड शेर अन्न व हरिभक्तांच्या लष्करांत १४·१५ शेर आहे. मोगल अंतरीं भयभीत आहे' [ ३·५०७ ]. हें पत्र ता. ५·१·१७६१ चें आहे.

अब्दालीस पायबंद बसेना तेव्हां पंतास स० रा०नें ज्यास्त उत्कंठेचीं पत्रें लिहिलीं. नारोशंकर लिहितो, 'अशा समयास आणीक सर्व कामें एकीकडे ठेवून रात्रीचा दिवस करून दाखवावयाचा प्रसंग असतां, ढील करतां यास काय म्हणावें ! तुम्हांपाशीं दहा हजार फौज असोन पंचवीस लाख रुपये खात असतां लटके बहाणे करून मुलखांत रहावें हे गोष्टी तुम्हांस योग्य नाहीं. हा सेवक लोकांचा धर्म नव्हे. तरी आपण या समयीं दरोबस्त फौजा व जमीदार समागमें घेऊन गोपाळराव गणेश वगैरे त्या प्रांतींचे श्रीमंतांचें अन्न खाऊन दौलत कमावितां. सर्वांनीं जमा होऊन सत्वर यावें. एक दोन रोजांत युद्ध तुंबल होऊन श्रीस करणें तें होईल. परंतु श्रीमंतांचे हिमतीस तारीफ कोठपर्यंत लिहावी ! सफेजंगीस कांहीं बाकी नाहीं. बुणगे, कबिले सर्व बराबरच आहेत. ऐसें निदान आरंभिलें आहे. आम्ही किल्ले मजकूरचा बंदोबस्त करून दीड हजार फौजा मोगलांचे लष्करावर जवळ कनोजीस ठेवून, घोडीं, उंटें आणितात, व हजार स्वार प्यादा उतरोन धामधूम मांडिली. रसदही बंद करविली आहे. अशा समयीं आपण रात्रीचा दिवस करून आलीया श्रीमंतांस बहुतच समाधान वाटेल' [ १·२४३ ]. ता. १५ नोव्हेंबर रोजीं असेंच निक-राचें पत्र पंतास लिहिलें ( १·२६८ ). परंतु या पत्रांचा कांहीं एक उपयोग नव्हता. ता. १५ नोव्हेंबरपावेतों सदाशिवरावाला अब्दालीवर चालून जाण्याची उत्कृष्ट संधि होती. वास्तविक या संधीचा उपयोग करून तो कां चालून गेला नाहीं याचेंच आश्चर्य वाटतें. कुंजपुऱ्यावरून कुरुक्षेत्राच्या मार्गानें सारंगपुरावरून सदाशिवराव आपल्यावर चालून येईल, आणि आपणास कोंडून

धरील, तर तसा प्रसंग चुकविण्याकरितां आणि मराठ्यांचा फन्ना उडविण्याच्या भरपूर इराद्यानें अब्दाली बागपतावर यमुना उतरला. त्या वेळीं तो कोणत्याही तऱ्हेनें भागलेला, किंवा दुर्बल नव्हता. सर्व मुसलमान एक होऊन एक जुटीनें त्यास मदत करीत होते. सर्वच प्रदेश मराठ्यांवर उठलेला असून, त्यांचा नाश तिकडचे सर्व रहीश इच्छित होते. यमुनेचा पूर कमी होईपर्यंत थोडे दिवस त्यास धान्याची वगैरे महर्घता वाटली असेल, परंतु त्यानें आपले सर्व मार्ग व वाटा व्यवस्थित बंदोबस्तानें आपल्या कबजांत ठेविल्या होत्या, आणि लवकरच यमुने पलीकडून हर एक प्रकारची मदत सुजा व रोहिले त्यास करूं लागले, तेव्हां त्याचा दम चढत गेला. हा प्रकार उमजून आरंभींच त्याजवर सदाशिवराव चालून जाता तर थोड्या बहुत संकटानें कां होईना, मराठे परत आपल्या मूळ पायाच्या प्रदेशांत येऊं शकले असते. कुंजपुऱ्यावर जाऊं नये असें जाठाचें सदाशिवरावास आग्रहाचें सांगणें होतें तें त्यानें मानलें नाहीं. सदाशिवराव कुंजपुऱ्यास गेला नसता तर अगर लगेच तेथून परत दिल्लीस येता तर अब्दालीला कुचंबूनच परत जावें लागलें असतें. त्यास निघून जाण्याची वाट मराठ्यांनीं न ठेवल्यामुळें त्यांच्या अंगावरच येणें त्यास भाग पडलें. अशा रीतीनें अंगावर आल्यावर लगेच त्याजवर चालून जाण्यांत मराठ्यांचा फायदा झाला असता. परंतु एक तर अब्दाली इतक्या बंदोबस्तानें राहत असे कीं दरखेपेस मराठे चालून आले असतां, त्यांस त्यानें मागें हटवावें. अशा स्थितींत उपासमार होऊन तो टेंकीस येईल अशी सदाशिवरावाची अटकळ होती, परंतु तीही उत्तरोत्तर निष्फळ ठरली.

नोव्हेंबर ता. १ पासून जानेवारी ता. १४ पावेतों अडीच महिन्यांच्या काळांतील उभयपक्षांकडील हालचालींची तपशीलवार माहिती मिळेल तर या मोठ्या झगड्याचें स्वरूप लष्करी व इतर दृष्टीनीं स्पष्ट करून दाखवितां येईल. तशी माहिती मिळत नाहीं याजबद्दल मनास मोठी तळमळ लागते. हरहंमेश थोडथोड्या चकमकी झडत होत्या, पण त्यांतल्या त्यांत कार्तिक शु० १५ [ २२·११ ] रोजीं जनकोजीचें, कार्तिक व० ३० [ ता. ७ डिसेंबर ] रोजीं

बळवंतराव मेहेंदळ्याचें, व मार्गशीर्ष शु. १५ [ ता. २२ डिसेंबर ]. रोजीं गोविंदपंत बुंदेल्याचें, अशीं तीन रणें बरींच महत्त्वाचीं अब्दालीशीं झालीं. पहिल्या दोहोंत मराठ्यांचीच सरशी झाली. दुसऱ्या दोहोंत बळवंतराव व गोविंदपंत मारले गेले. नोव्हेंबर अखेर मराठ्यांची स्थिति उत्कृष्ट होती, आणि उपासमार करून अब्दालीस बुडविण्याच्या नादास न लागतां, जोराचा हल्ला करून अब्दालीशीं ते लढते तर ते त्याचा पराभव करूं शकते, निदान दिल्लीशीं आपला पाया सलंग करून आणि दक्षिणेंतून आलेली ज्यास्त मदत घेऊन, ते अब्दालीस हांकलूं शकले असते. डिसेंबरपासून मराठ्यांची स्थिति खालावत जाऊन अब्दालीची सुधारत चालली; बागपतावरील उतार निर्वेध ताब्यांत राहिल्यामुळें पलीकडून त्यास भरपूर रसद मिळत राहिली आणि हळू-हळू सर्व बाजूंनी मराठ्यांचा पुरवठा अब्दालीनें तोडिला. असें होतां होतां शेवटचे दोन आठवडे मराठ्यांची स्थिति इतकी बिकट झाली कीं निराशेनें शत्रूवर जाऊन पडण्यापलीकडे दुसरा मार्ग त्यांस राहिला नाहीं. शेवटच्या क्षणापर्यंत वाट पाहण्याचें कारण नव्हतें. शेवटच्या महिन्यांत पान-पतावरून लिहिलेलीं कोणाचींच पत्रें उपलब्ध नाहींत. नोव्हेंबर व डिसेंबर महिन्यांत स० रा० नें पंतास लिहिलेली पत्रेंही उपलब्ध नाहींत. यावरून बहुधा तीं अब्दालीनें पकडून घेतलीं आणि त्यांचा स्वतःचे फायद्यासाठीं भरपूर उपयोग केला. दक्षिणेंतून मदत येऊन आपली सुटका होईल अशा आशेवर स० रा० वाट पाहत बसला असावा. दक्षिणेंत बातमी पोंचती तर जी फौज माळव्यांत आली तीच पुढें त्वरेनें येऊन दोन फौजांच्या मध्यें अब्दालीचा नाश झाला असता. पाराशर दादाजीनें ४ जानेवारीस पानपतावर खजिना पोंचविण्याचा उद्योग केला तो सफल झाला नाहीं.

नोव्हेंबर व डिसेंबर या दोन महिन्यांतली स्थिति सांगणारे नाना फड-णिसाचें खालील पत्र उपलब्ध आहे [ २८·१२·६०, १ पृ. ३७५]. ' चिरंजीव मोरोबा दादा यांप्रती बाळाजी जनार्दन आशीर्वाद, १९ जमादिलावलपावेतों पाणिपत एथें सुखरूप असों. इकडील मजकूर पूर्वी कुंजपुऱ्यास लढाई आली.

अब्दुस्समदखान वगैरे मारले, त्याजवर अब्दालीची गांठ पडली, कृष्ण जोशी संगमेश्वरकर यांस गोळा लागून देवाज्ञा झाली. त्या अलीकडील मजकूर. यांणीं तोफखान्याचा आराब पसरून खंदक खणून पाणिपत गांव पाठीशीं घालून, त्यांच्या फौजा तोफांचे मागें उभ्या, याप्रमाणें बंदोबस्तानें राहिले आहेत. बुणगे गांवाचे पुढें फौजेचे मागें ठेविले आहेत, नित्य गोळागोळी होती. सभोंवत्या त्यांच्या फौजा आहेत. त्यापाशींही चाळीस पन्नास तोफ चांगली आहे. साठ हजारपर्यंत फौज आहे. एके दिवशीं सरदारांकडील बाजूकडे त्याची फौज वाढून आली. त्याची यांची लढाई चांगली झाली. शिंद्यांकडील लोकांनीं त्यांना गोठांत नेऊन घातलें. सहाशेंपावेतों माणूस जखमी व ठार त्याजकडील जाहलें. याजकडीलहीं दोन अडीचशें पर्यंत जखमी व ठार झाले. अस्तमान झालें यास्तव लढाई राहिली. त्यानंतर पंधरा दिवशीं २८ रबिलाखरीं ( ७·१२·१७६० ). श्रीमंतांकडील मोर्चावर चालून चार पांच हजार आले. वरकड फौज त्यांचे पाठीमागेंच उभी होती. त्यांची यांची लढाई होऊं लागली. लढाईस आरंभ होतांच अस्तमान झालें. ते दिवशीं बळवंतराव गणपत यांस छातींत गोळी लागली. तसेच घोड्याखालीं पडले. तों त्यांजकडील माणसें धावलीं. त्यांतील एकानें तोंडावर तरवारीचा वार केला. दुसऱ्यानें गळा कापून, शीर नेऊं लागले, तो पांच सात राऊत धावून सोडविलें. गळा अर्धा कापला होता, तसेच आणून दहन केलें. समागमें स्त्री अग्निप्रवेश केली. त्या दिवशीं त्यांजकडील दीड हजार माणूस ठार आमच्या आराब्यापुढें पडलें होतें, त्याचे पुढें किती होतें हें कळलेंच नाहीं. अवशीची तीन घटका रात्रपावेतों लढाई झाली. आपल्याकडील दीडशेंपावेतों ठार व पांच सातशेंपावेतों जखमी जाहले. ही लढाई फार चांगली झाली होती, परंतु बळवंतराव याचा प्रकार असा झाल्यामुळें ते सर झाले. त्यावर गोविंद बल्लाळ यांस पूर्वीपासून पत्रें जात होतीं कीं अंतर्वेदींत उतरून अब्दालीची रसद बंद करणें. त्यावरून ते दिल्लीच्या सुमारें आले. नारोशंकरचीही कांहीं फौज मदतीस घेतली; व पुढें रसद मारावी तों अब्दालीनें दहा हजार फौज निवडक

पाठवून दगा केला. कोणी लढले व कोणी पळाले. गोविंद बल्लाळाचें शीर कापून श्रीमंतांकडे पाठवून दिलें. मग दहून झालें. गोविंदपंताकडील वगैरे तीन चारशें फौज ठार झाली. बाबाजी गोविंद पळोन नारोशंकराजवळ दिल्लीस आले. मोठे दगेबाज सबब आराब पसरून खंदक खणून मोगलाई रीतीनें राहिले आहेत. दोन महिने यांची लढाई होते. अद्यापि लढावें हाच निश्चय उभय पक्षीं झाला आहे. ईश्वर काय परिणाम लावील तो खरा. मनसबा भारी पडला आहे. पैसा नाहीं. महागाई फार, यामुळें लष्कर गलबललें आहे. आपले बुणग्यांत गोळे जातात. बहुत काय लिहिणें.' 'तीन युद्धें मातबर झालीं. दोनही फौजा कायम आहेत. पठाणाकडील थोडें बहुत माणूस मारलें गेलें. कांहींशी शिकस्त खाऊन चार कोस मागें सरला.. अब्दालीचा कमजोर आहे. मुलखांत धामधूम बहुत आहे. काळ बरा नाहीं. ईश्वर लज्जा राखील ते खरी. या वर्षी पीकपाणी बरें आहे. रबी चांगलीच आहे.' [ ३·५०९ ]. हें १८·१·१७६१ चे पत्र काशींतून लिहिलेलें आहे. खं. ३·५११ चें पत्रही असेंच असून त्यांत गोविंद-पंता प्रमाणेंच गोपाळ गणेश बर्वे हाही रसद मारीत असतां, पराभव पावून पळून गेला असा मजकूर आहे. ता. २४ डिसेंबरचें रामाजी अनंताचें खालील पत्र पाहतां, त्या वेळीं मराठ्यांची अगदीं निकृष्ट स्थिति होती असें दिसत नाहीं. 'इकडील मजकूर तरी, आजदोन मास मोगलांशीं लढाई होत आहे. दोन लढाया उत्तम जाहल्या, ते समयीं मोगलांचा मोड झाला, श्रीमंतांची फत्ते जाहली. एक बळवंतराव गणपत स्वामींच्यावरी खर्चेले एवढी गोष्ट ईश्वरें वाईट केली. त्यांचे स्त्रीनें आपलें सार्थक केलें. गोविंद बल्लाळ यांस अंतर्वेदींतून नजीबखानाच्या मुलखांत रसद बंद करावया निमित्त बोलाविलें होतें. ते येऊन मेरटेस पावले. रसद बंद कांहींशी केली. हें वर्तमान गिलच्यांस कळ-तांच पांच सात हजार फौज यमुना उतरोन पाठविली. गाजुद्दीन-नगराजवळ कांहींसें युद्ध झालें, तेव्हां सोसेनासें पाहिलें, मग निघाले. गोविंदपंतांचें ठिकाण अद्याप समजलें नाहीं.' [ इ सं. ऐ. टि. १·२३ ].

ता. २२·११·१७६० रोजीं अनपशेरीनें अब्दालीवर जी चढाई केली, ती

मेहेंदळ्याच्या चुरशीनें अंगीकारिली, आणि सदाशिवरावानें हुकूम केला असतांही मेहेंदळे जनकोजीच्या मदतीस गेला नाहीं, असें बखरकार म्हणतो, तें खरें वाटत नाहीं. वरील पत्रांत त्याचा उल्लेख नाहीं, आणि हुकमाची अवज्ञा यत्किंचित् सहन करण्याचा सदाशिवरावाचा स्वभाव नव्हता. वरील लढाईत जनकोजीचा व रोहिल्यांचा सडकून सामना झाला. शेंकडों स्वारांचे व घोड्यांचे मुडदे पडले. रोहिल्यांचे असंख्य लोक कापून व त्यांच्या तोफा हिसकून घेऊन त्यांस शिंद्यानें परत त्यांच्या गोटांत घातलें. रात्र झाल्यामुळें जयाचीं वाद्यें वाजवीत जनकोजी छावणींत परत आला. या लढाईपासून अब्दालीनें चांगलीच शिकस्त खाल्ली. आपणास पुढें निभावण्याची फारशी आशा नाहीं असें पाहून बायकामुलांस मारून पळून जाण्याची सुद्धां त्यानें तयारी केली. [एल्यट पु. ८·१५६]. जनकोजीच्या विजयानंतर दोन आठवडे पर्यंत महत्त्वाची हालचाल उभय पक्षीं झाली नाहीं. तिकडून गोविंदपंतानेंही अब्दालीची रसद बहुतेक बंद पाडिली, तेव्हां फौजेस हिंमत चढाविण्याकरितां कार्तिक व. ३० स [ ७·१२ ] कांहीं निवडक अफगाण व रोहिल्यांच्या तुकड्या छावणीच्या मध्यभागावर म्हणजे पेशव्याच्या फौजेवर चालून आल्या. अमावास्येच्या दिवशीं अंधार पडल्यावर मराठ्यांस पेंचांत धरण्याचा अब्दालीचा विचार असावा. ही आयती चालून आलेली संधि साधून आज शत्रूशीं दोन हात करून सर्वांस आपला पराक्रम दाखवावयाच्या निश्चयानें बळवंतराव मेहेंदळे हुजरातीचे वीस हजार स्वार घेऊन समोर येणाऱ्या मुसलमानांवर चालून आला. सायंकाळीं चार वाजतां लढाईचें तोंड लागलें. तास दोन तास गोळागोळी होऊन मग तोफांचा मारा सुरू होऊं लागला. या वेळीं मराठ्यांचा तोफखाना बरोबर नव्हता. तोफांच्या मारापुढें कच खाऊन लोक परत येऊं लागले, तेव्हां बळवंतरावानें स्वतः मोठा नेट करून आपल्या लोकांस परत फिरविलें; आणि हरहर, महादेव अशी गर्जना करून आपण सर्वांच्या पुढें होऊन लोकांस गिलच्यांच्या अंगावर घातलें. त्या हातघाईंत बळवंतरावास गोळी लागली, आणि तो खालीं पडला, त्या वेळीं त्याचें शीर कापून नेण्यास मुसलमान बावळे असतां अकलूज येथील खंडेराव नाईक

निंबाळकर यानें बळवंतरावाच्या प्रेतावर पडून तें शत्रूंच्या हातीं लागूं दिलें नाहीं. मुसलमानांची फौज अगदीं मराठ्यांच्या खंदकाजवळ आलेली पाहून शिंदे-होळकरांनीं आपल्या फौजा हुजरातीचे मदतीस पाठविल्या. तेव्हां दोन तीन हजार पठाण कापले गेल्यावर शत्रूची फौज मार्गे फिरून आपल्या छावणींत गेली. बळवंतराव मेहेंदळे याचा शेवट ऐन तारुण्याच्या भरांत असा हृदयद्रावक झाल्याबद्दल मराठ्यांच्या छावणींत मोठा शोक झाला.

बळवंतराव उ० रामचंद्र गणपत मेहेंदळे हा सदाशिवरावाचा श्यालक असें मध्यविभाग १ पृ. १५७ वर लिहिलें आहे तें बरोबर नाहीं. सदाशिव-रावाच्या बायका दोन उमाबाई व पार्वतीबाई. दोघीही मेहेंदळ्यांकडच्या नव्हत. पार्वतीबाई कोल्हटकरांकडची. बळवंतराव मेहुणा असून त्याच्या तंत्रानें सदाशिवराव वागे, या दोनही गोष्टी काल्पनिक होत. बळवंतराव नाना फडणिसाचा मातुल होय.

तिसरा महत्त्वाचा प्रसंग मार्गशीर्ष शु. १५ (२२ डिसें.), चा गोविंदपंताचे मृत्यूचा. पंतानें अब्दालीस कसा शह दिला होता त्याचा तपशील ६.५३२–५३८ यांत सांपडतो. हा शह उडविण्यासाठीं शिकारीचें निमित्त काढून नजीबखानाचा पुतण्या आताईखान यास अब्दालीनें दहा हजार निवडक स्वारांनिशीं गुप्त रीतीनें यमुनेपार गोविंदपंतावर रवाना केलें. तीन चार प्रहरांत वीस पंचवीस कोसांची दौड करून दिवस मावळण्याच्या सुमारास गाजुद्दीननगराजवळ आताईखानानें गोविंदपंतास गांठिलें. बांड्या रंगाचें होळकरी निशाण पुढें करून हे स्वार त्याजवर आले, तेव्हां ते शत्रू असतील असें पंतास वाटलें नाहीं. जवळ येतांच त्यांनीं कापाकापी सुरू केली. शत्रू किती आहे याचा अंदाज न लागल्या-मुळ पंताची फौज कांहीं लढली व कांहीं पळाली. स्वतः पंत व त्याचा मुलगा पळून गेले. पळतांना पंत घोड्यावरून पडला, त्याबरोबर शत्रूंनीं त्याचें शीर कापून घेऊन तें अब्दालीस दिलें. बुंदेल्याचे दोन तीन हजार लोक मारले गेले. दुसरे दिवशीं अब्दालीनें तें शीर सदाशिवरावाकडे पाठविलें. सदाशिवरावानें पंताचे मुलास समाधानीचीं पत्रें पाठवून बुंदेलखंडांतील व्यवस्था दक्षतेनें ठेवण्या-

विषयीं लिहिलें [ १·२७२ ]. या दिवसापासून मराठ्यांच्या फौजेची छबी मावळली. गोविंदपंत अब्दालीची रसद मारण्याचें काम चांगलें करीत होता, हें काशीरायाच्या बखरीवरून उघड होतें. या कामांत मराठ्यांचा हातखंडा होता. दररोज सकाळीं पुष्कळशा झुंडी लहान मोठीं तट्टें बरोबर घेऊन दूरपर्यंत चहूंकडे हिंडत; आणि लांकडें, गवत, धान्य, मिळेल तेथून पैदा करून सायंकाळीं छावणींत परत येत. गोविंदपंताचे मृत्यूनंतर हा प्रकार त्वरेनें बदलला.[1] पानपतावर कोंडले गेल्यावर रसद मिळविण्याचे शक्य ते प्रयत्न करण्यांत सदाशिवरावानें कसूर केली नाहीं. गवत आणण्यास कही बाहेर जाई, त्याजबरोबर हजार हजार स्वारांच्या टोळ्या तो रसद आणण्यास पाठवी. तसेंच लमाणांचे तांडेवाल्यांस बोलावून आणून त्यास उत्तेजन व मदत देई; आणि जो कोणी हिकमतीनें लमाण आणून पोंचवी, त्यास कडीं, तोडे वगैरे देऊन त्याचा सन्मान करी. पश्चिमेकडचा रस्ता खुला होता, परंतु तिकडे अरण्य व झाडी फार होती. गिलच्यांची हिंमत वाढत गेली तेव्हां त्यांनीं हा पश्चिमेकडचा रस्ताही बंद करून टाकिला. मराठ्यांच्या सर्व बाजूंस गिलच्यांच्या टोळ्या फिरूं लागल्या आणि बाहेर पडेल त्यास बेलाशक तोडूं लागल्या. अशा विपन्न स्थितींतही सदाशिवरावाच्या तोंडून गैरहिमतीचें अक्षर निघालें नाहीं. खजिन्यांतील नाणें सर्व खलास झालें, तेव्हां बरोबरचें चांदी सोन्याचें सर्व सामान काढून फौजेंत नवी टांकसाळ उभी करून रुपये व मोहरा पाडण्याचा क्रम सुरू केला. एका बाजूस बादशाही शिक्का कायम ठेवून दुसऱ्या बाजूस भा. ज. म. म्हणजे भाऊशाही, जनकूशाही व मल्हारशाही, अशा अक्षरांचा ठसा होता. परंतु हीं नवीन नाणीं सुद्धां पंधरा दिवसांत खलास झालीं. पानपत गावांत होतें नव्हतें तें सर्वच मराठ्यांनीं घेतलें, आणि आजूबाजूचा पांचपंनास मैल परीघाचा प्रदेश त्यांनीं सर्व खाऊन टाकिला. अब्दालीच्या छावणीवरही अनेक वेळां

१ टीप.—खं. १ प्र. पृ. ६८ वर व इतरत्र गोविंदपंतावर व एकंदर कऱ्हाडे जातीवर रा. राजवाड्यांनीं निष्कारण आरोप करून जी निंदा केली आहे, तिनें इतिहास विपर्यास वैगुण्य येतें, म्हणून त्याचा उल्लेख मुद्दाम टाळिला आहे.

छापे घालण्यास स० रा० ने कमी केलें नाहीं. सोनपत पानपतच्या पश्चिमे-कडून बिकानेरच्या मुलखांत जाण्यास मध्यें कांटेरी झुडपांचें दाट जंगल असल्या-मुळें त्या बाजूनें निघून जाण्यास मराठ्यांस मार्ग नव्हता. उत्तरेस कुंजपुऱ्या-कडून व यमुनेच्या कांठानें मराठ्यांस कोणत्याही प्रकारची मदत मिळूं नये असा सक्त बंदोबस्त अब्दालीनें केला, तेव्हां मात्र मराठ्यांचे हाल सुरू झाले.

अशा स्थितींत सुटकेच्या नाना प्रकारच्या सूचनांचा खल सारखा चालूच होता. नानासाहेबास पत्रें जात असल्यामुळें तिकडून दुराणीवर शह येईल, निदान आपणास रसद तरी येऊन पोंचेल, अशी सदाशिवरावास अखेर पर्यंत आशा होती. पण त्याचीं पत्रेंच बाहेर पोंचलेलीं दिसत नाहींत. तापट स्वभावमुळें स० रा० स समोर कोणी उलट बोलत नसेल, तथापि लहान मोठ्या सर्व मंळळीचा सल्ला घेऊन सर्वांशीं पूर्ण वाटाघाट त्यानें केली नसेल हें संभवत नाहीं; आणि कितीही दिमाखाचा मनुष्य असला तरी सर्वस्वनाशाचा प्रसंग आल्यावर, तो कोणाचेंच ऐकणार नाहीं हेंही संभवत नाहीं. त्याचें धैर्य अलोट असल्यामुळें, जनानखाना तसाच ठेवून पळून जाणें, अगर त्यांस स्वहस्तानें कापून काढणें किंवा अब्दालीस शरण जाऊन स्वाधीन होणें, असले लांछनकारक मार्ग त्यानें पसंत केले नाहींत, किंवा अखेरपर्यंत त्यानें हिंमत सोडिली नाहीं. उत्कृष्ट फौज, सरदार व जय्यत तोफखाना आणि सर्वांची अप्रतिम हिंमत यांचे योगानें आपण आलेला प्रसंग निभावून नेऊं, अशी त्यास अखेरपर्यंत खात्री वाटत होती. इब्राहीमखानासं वचन दिलेलें असल्यामुळें पळून जाण्याचे विचारास थारा देतां येईना. एकदां कांहीं मंडळींनीं पळून जाण्याचा बेत केला असतां इब्राहीमखानानें आपल्या तोफा त्यांजवर रोखून त्यांस थांबविलें.

इकडे सुजाचे मार्फत अब्दालीशीं तहाची वाटाघाट बंद पडली नव्हती. 'पूर्वीही सल्याचें राजकारण हंमेशा येतच होतें. मल्हारबा वगैरेंचें मत होतें कीं सल्ला करावा. पण भा० सा० ऐकेनात ( ६·४०९ ). दुरभिमानास प्रवर्तले. महागाई भारी. माणसें घोडीं खाया विना उठलीं.' सदाशिवरावाची व एकंदर फौजेची ही विलक्षण हिंमत पाहून अब्दालीस सुद्धां अतिशय

अचंबा वाटला. गनिमी काव्यानें लढणारे मराठे आपणा पुढें ठांसून उभे राहणार नाहींत अशी त्याची समजूत होती. इब्राहीमखानास मराठ्यांकडून फोडून आपल्या बाजूस आणण्याचा त्यानें अतिशय प्रयत्न केला. एवढा हा इसम आपले पदरीं असता तर इराणपासून दिल्ली पर्यंतचे सर्व बंडावे आपण लगेच मोडले असते असें तो म्हणे. वास्तविक मराठ्यांची व अब्दालीची सारखीच कुचंबणा होती; आणि दोघांचाही स्वदेशाचा मार्ग एकमेकांकडून अडविलेला होता. अब्दालीस थोडी बहुत रसद मिळत होती; बाकी एवढें साहस करण्यासारखें त्यास कांहीं साधावयाचें नव्हतें. नजीबखान मध्यें नसता तर कांहीं तरी तडजोडीचा सलूख होऊन ही पकड सुटली असती. जयापजयाचें पारडें दोनही बाजूंस सारखें खालीं वर होत होतें. एकदम जोराचा हल्ला करून प्रतिपक्षाचा पाडाव करून निभावून जाऊं अशी उमेद एकासही नव्हती, कारण दोघांचाही बंदोबस्त अगदीं परिपूर्ण होता. अशा स्थितींत जानेवारींत मराठ्यांची उपासमार होऊन गळ्याशीं आल्यावर निकरानें अब्दालीवर घुसून जाण्याशिवाय दुसरा मार्ग मराठ्यांस राहिला नाहीं. कांहीं खटपटीनें रजपुतांकडून व जाठाकडून त्यांस थोडी अन्नसामुग्री आली, परंतु ती लगेच खल्लास झाली. वीस लाख खजिना दिल्लींत येऊन पडला होता, पण पुढें तो येण्याची सोय नव्हती. तेव्हां, परांजीपंत वाघ व गोविंदपंताचा पुत्र असे भग्न फौज घेऊन दिल्लींत असतां खजिना आणण्याविषयीं सदाशिवरावाचीं पत्रें निकडीचीं आल्यावरून ता. २-१-१७६१ रोजीं पाराशर दादाजी तीनशें स्वार घेऊन व प्रत्येकापाशीं पांचपांचशें रुपयांची एकेक थैली देऊन दिल्लीहून पानपताकडे निघाला. बंदोबस्ताकरितां आणीक ५०० स्वार बरोबर होते. ता ४ रोजीं ते रात्रीं वाट चुकून अब्दालीच्या लष्करांत गेले, कारण त्याच दिवशीं अब्दालीची कांहीं फौज नेहमींची जागा सोडून दिल्लीचे बाजूस आली होती. रात्रीचे वेळीं हे मराठे स्वार पेटलेल्या शेगटीजवळ शेकत बसले असतां ते मराठ्यांचा खजिना घेऊन चालले आहेत अशी मुसलमानांस खबर लागतांच, त्यांनीं एकदम कापाकापी सुरू केली, तेव्हां बराचसा खजिना शत्रूचे हातीं लागला. कांहीं थोडा भाग मात्र

सदाशिवरावाचे लष्करांत येऊन पोंचला. [ खं. १ टीप ३२४ ). पाराशर दादाजी त्या प्रसंगांत मारला गेला कीं जिवंत आला याचा पत्ता लागत नाहीं. इतकें झालें तरी सदाशिवरावाची हिंमत खचली नव्हती, आणि त्याच्या फौजेची अगदीं निकृष्टावस्था होत आहे, हा प्रकार अब्दालीसही अऊक नव्हता. रोहिले व सुजाउद्दौला हे त्यास वारंवार आग्रह करीत कीं, एकवार निकरानें हल्ला करून निघून जावें. त्यावर अब्दालीनें एवढेंच उत्तर द्यावें कीं लढाईचें एवढें काम सर्वथैव माझ्या मर्जीवर ठेवा. इतर सर्व व्यवहार तुम्ही पाहिजे तसे करा. आपल्या छावणीच्या समोर कांहीं अंतरावर त्यानें एक लाल तंबू ठोकिला होता, त्या ठिकाणीं तो दररोज सकाळीं नमाज पढण्यास व सायंकाळीं भोजनास येत असे. दिवसभर घोड्यावर बसून सारखा हिंडत राही. रोज पन्नास साठ मैलांपेक्षां त्याचा फेर कधीं कमी होत नसे. रात्रीं पांच हजार स्वारांचा जाप्ता तो शत्रूंवर नजर ठेवण्यास पाठवून देई, आणि अशाच दुसऱ्या टोळ्या आपल्या छावणीच्या सभोंवार फिरतीवर ठेवी. तुम्ही खुशाल स्वस्थपणें झोपीं जा, अशी सूचना त्यानें आपल्या दोस्तांस देऊन ठेविली होती. 'पाणिपतावरी अडीच महिने मोर्चेबंदी करून राहिलों. सड्या फौजा पुढें, मागें बुणगे, याप्रमाणें मोर्चे बांधून, तोफा पसरून राहिलों होतों. एक लढाई कार्तिक शु. १५ मेस व दुसरी वा। ३० स झाली. दोनही लढायांत दोहींकडील फौजा कायमच होत्या. गिलचा आमचे लष्करा भोंवता फिरोन रसद बंद केली. वैरण जाळली. यामुळें लष्करांत काळ पडला, दोन अडीच शेर दाणे झाले. लोकांस अन्न न मिळे. घोडीं तों बहुत लोकांचीं मेलींच होतीं. राहिलीं तींही पोटामुळें तुटलीं होतीं. निदानीचा प्रसंग जाणोन पौष शु. ८ स बुधवारीं हल्ला केला' [६·४०६]. सदाशिवरावाची कुचंबणा होऊं लागली तेव्हां तो काशीरायास वारंवार पत्रें लिहून तह करण्याची खटपट निकरानें करूं लागला. अब्दालीस हा प्रकार काशीरायानें कळविला, तेव्हां त्यानें जबाब दिला, तहाची वगैरे भानगड मी जाणत नाहीं. मी फक्त लढाईकरितां आलों, आणि तेवढें काम मी करीन.' सुजाउद्दौला वगैरे मंडळींच्या मनांत

तह घडवून आणावा असें होतें. परंतु अशी कांहीं व्यवस्था जुळण्याच्या बेतांत आली म्हणजे नजीबखान ती साफ मोडून टाकीत असे. तो म्हणे, मराठ्यांची फौज शाबूद असतां तह करून अब्दाली निघून गेल्यावर मागाहून ते पुरेपूर सुड घ्यावयास चुकावयाचे नाहींत. दिवसेंदिवस मराठा छावणीची अगदीं दुर्दशा होत चालली. हजारों जनावरें मरून लहानशा जागेंत भयंकर दुर्गंधि सुरू झाली. भुकेनें सर्वांचे प्राण कासावीस होऊं लागले. प्रत्येकाच्या डोळ्यांसमोर भावी परिणामाचें चित्र मूर्तिमंत उभें राहूं लागलें. जिवावर उदार होऊन पुष्कळ टोळ्या हरप्रयत्नानें सामान आणण्यासाठीं बाहेर गेल्या, त्यांस पठाणांनीं साफ कापून काढिलें. शेवटीं कांहींच उपाय राहिला नाहीं, तेव्हां सर्वांनीं येऊन सदाशिवरावाची विनंति केली कीं आम्हांस आतां असे भुकेनें मारूं नका. शत्रूंशीं दोन हात करून तरी एकदांचे मरूं द्या. शनिवार ता. १०·१·१७६१ रोजीं मकरसंक्रांतीचा दिवस सर्वांनीं आनंदानं साजरा केला. पुढें दोन दिवस मराठ्यांनीं आपापली शक्य ती व्यवस्था लावून, बुधवार पौष शु० ८ शके १६८२ रोजीं पहांटेच शत्रूवर चाल करून निघून जाण्याचा बेत ठरविला. सर्व बाजूंस मोठमोठे सरदार तसेंच समोर व बाजूंनीं तोफखाना असा गोल बांधून, मध्यें कबिले घेऊन लढत लढत शत्रूची फळी फोडून निघून जावें असा सर्वानुमतें निश्चय झाला. जवळ जवळ मध्यरात्रीं पर्यंत व्यवस्था लाविल्यावर रात्रींच एक शेवटची चिठ्ठी सदाशिवरावानें काशीरायास लिहिली. ' आतां पात्र कांठोकांठ भरलें. एक बिंदुही ज्यास्त राहणें शक्य नाहीं. तेव्हां सलुखासंबंधानें काय तो निकाल तात्काळ करावा ' बुधवार ता. १४·१·६१ रोजीं पहांटे ही चिठ्ठी काशीरायानें सुजाकडे आणिली. त्याचा विचार होऊन काशीराय अब्दालीकडे त्याच्या तंबूंत जातो तों, मराठे सज्ज होऊन चालून आले अशी बातमी अब्दालीस आली. ' आजचा दिवस दम खा, मग याचा निकाल करूं, ' असा जबाब अब्दालीनें दिला तो स० रा० स वाटेंतच मिळाला. पण त्याचा आतां उपयोग नव्हता.

**८. पौष शु. ८ ची प्राणाहुति.**—पानपतच्या या शेवटच्या संग्रामाचा दिवस

बुधवार पौष शु. ८ शके १६८२, १४ जानेवारी १७६१ होय. उजाडतांच मराठ्यांच्या फौजा आपणांवर चालून आलेल्या मुसलमानांस दिसल्या. इब्राहीमखानानें स० रा० स प्रणाम करून आजपर्यंत खाल्लेल्या अन्नाचें चीज आज कसें करून दाखवितों पहा असें म्हणून, तोफांस सरबत्ती दिली. तेव्हांपासून पुढें एकंदर लढण्याचा प्रकार कसकसा बनत गेला, त्याचा योग्य तपशील लष्करी दृष्ट्या समाधानकारक असा मिळत नाहीं. सबब रणांगणावर हजर असलेल्यांचीं पत्रें आहेत, तीं प्रथम देऊन, मग त्यांत बखरींतून भर घालणें बरें. नाना फडणिसानें लिहिलेली हकीकत विस्तृत व खुलासेवार आहे ती अशी (का. सं. प. या. ५३). 'श्रीमंतांचे बुद्धीस भावी अर्थ तेणेंकरून विपर्यास पडला. आप्त बळवंतराव व नाना पुरंदरे वगैरे अनाप्त जाले. जे शहानवाजखानी, भवानीशंकर वगैरे अनाप्त ते आप्त झाले. त्यांचे वाक्याचे ठायीं विश्वास, तेणेंकरून आपली रीत युद्धाची सोडून यवनाची रीत धरिली. परस्परें युद्ध होत असे. शत्रूचे गोळे प्रत्यहीं राहुटीवरून जात. मातुश्री व स्त्री भयभीत होत, कीं कसें होईल! ते समयीं मातुश्रीस विनंति करीत गेलों, ईश्वरीं लक्ष असावें. त्यांत बळवंतराव युद्धांत पडले. या दोन महिन्यांत मनुष्यें पशु बहुत मेले. अन्नाची महर्घता, दुर्गंधी एकेच ठिकाणीं, असे श्रम पाहिले. थोरलें युद्ध उदयीक होणार, तों पूर्व दिवशीं संकेत कीं पराजय आपला जाहला तरी शत्रूचे हातीं आपलें व श्रीमंतांचें कुटुंब लागूं देऊं नये. आपणच नाश करवावा. आपण तर वांचत नाहीं असा सिद्धान्त करून श्रीमंतांनीं याचीही योजना केली. दुसरे दिवशीं तयार होऊन प्रातःकाळचे दोन घटिका दिवसास युद्धास गोळागोळीचा प्रारंभ झाला. श्रीमंत अति बुद्धिवान, धैर्यवान्, शूर, कृतकर्मे, गर्व मात्र विशिष्ट, परंतु तर्तूद फारच सैन्याची वगैरे केली. शेवटीं निशाणाजवळील तर्तूद एकीकडे जाऊन, शत्रूची मुख्य स्थानींच गांठ पडली. मी श्रीमंतांसंनिध ईश्वर स्मरण किंचित् करून असें. तों विश्वासराव यांस गोळी लागली, पडले. ते हत्तीवर श्रीमंतांनीं घालून उभेच राहिले. तों पठाण पाय उतारा आंत येऊन मिसळले. तोंडातोंडी होऊं लागली; आणि डावे

बाजूचे मातबर सरदार चौघड्याचे धनी देखील पूर्वीच पळाले. उजवे बाजूचेही होळकर शिंदे निघोन निशाण निघालें. दोन तीन शत पायदळ होतें. श्रीमंत दिसेनासे झाले. तेव्हां ईश्वरें बुद्धि दिली. माघारे फिरलों. प्रथम युद्धांत बापूजीपंतीं ( हिंगणे ) बोध केला, माघारे फिरावें. त्यांस उत्तर केलें कीं अशा समयीं श्रीमंतांस सोडणें ठीक नाहीं. परंतु पुढें याप्रमाणें जहालें. लक्ष सैन्य असतां एकही त्या समयीं श्रीमंतांस आप्त न जाहला. बहुत दिवस अन्न भक्षिलें. कृपा पुत्रवत् केली. चांगला काळ होता तेव्हां केंसास धका लागल्यास प्राण देऊं अशा प्रतिज्ञा. परंतु ईश्वरघटित विपरीत काळ, त्यांत सोबती कोण होतो! सर्व सुखाचे सोबती, निदान कोणी नाहीं. सर्व वाताहत जहाले. मी सायंकाळचे दोन घटका दिवसास पाणिपतांत आलों. तेथें परमेश्वरें वाट दाखववायापुरते रामाजीपंत ( दाभोळकर ) उभे होते. सांगूं लागले, घोडे वस्त्रें टाकून यावीं. शुद्ध लंगोटी लावून बसलों. रात्र जहाल्यावर चाललों. तों एका कोसांत तीन चार वेळ टोपीवाल्यांनीं शरीरास हात लावून झाडा घेतला. दर खेपेस समागमेंचे दहावीस तोडून टाकीत. त्यांत मी राहिलों हे सत्ता ईश्वराची. परंतु बापूजीपंत, रामाजीपंत (आमचे बरोबर) राहतच गेले. असे जातां दहा बारा कोश पश्चिमेस गेलों. तों तेच शत्रु येऊन रामाजीपंत व बापूजीपंत यांस जखमी भारी केलें. पडले. मी एकटा राहिलों, तो गवतांत ईश्वरें माझें रक्षण केलें. पुढें दो कोशांवर मागती दृष्टीस पडले. तो मागती तृणांत जाऊन बसलों. तों जवळ येऊन काढूं लागले. मग गेले. पाणिपतावर शक्ति बहुत क्षीण, पण पादचारी अभ्यास नसतां, सोळा सत्रा कोस अन्नोदकाव्यतिरिक्त आलों. क्षुधा तिसरे प्रहरीं लागली, तेव्हां बोरीचा पाला सांपडला तो खाऊन पाहिला. तो तोंडांत जाईना. तसाच सायंकाळीं एका ग्रामाबाहेर आलों. तों एका बैराग्यानें पीठ आणून दिलें. त्याची भाकर खादली ती अमृतप्रमाण लागली. नंतर निद्रा केली. प्रातःकाळीं दुसरे गांवास गेलों. एका साहुकारानें भोजन घातलें. तों शत्रूचे स्वार गांवांत आले. तेव्हां पायउतारा होऊन चाललों. असे सात दिवस समागमेची मंडळी सुद्धां रेवडीस आलों.

तेथें बालेराव म्हणून चौथे भाऊ माझें नांव ऐकून असत, त्यांनीं घरीं नेऊन भोजनाचें साहित्य दिल्हें. तेथें सात दिवस राहून एक लग्न निघालें त्याबरोबर दीग भरतपुरास निघालों. वाटेंत कृष्णंभट वैद्य आले. त्यांनीं सांगितलें स्त्री विरोजी बारावकर यांणीं सांभाळून आणिली, ती नारोपंत गोखल्यांचे घरीं आहे. तेथें गेल्यावर भोजन क्षिरीचें घातलें. आनंद झाला. मग गाडी करून स्त्रीसह डिगेस आलों. तेथें पुरुषोत्तम महादेव वानवळे याचे गुमास्त्याचे बिऱ्हाडास होते, त्यांजकडे गेलों. तेथें महिनाभर होतों. वस्त्रें वगैरे भोजनाचें साहित्य चांगलें केलें. तेथून मातुश्रींचा शोध फार केला. घरचा खिजमतगार बराबर होता, त्यानें सांगितलें कीं घोड्यावरून पडून जखम लागून मेली.* पुढें ढवळपुरावरून ग्वालेरीस सगळें लष्कर पळून पार्वतीबाई, नानापुरंदरे, मल्हारजी होळकर, सारे होते तेथें आलों. पुढें लष्कराबरोबर येत असतां श्रीमंत नानासाहेबांचें दर्शन बऱ्हाणपुरावर जहालें. त्यांचें शरीर फार क्षीण, मर्जी बेतऱ्हा, बहुतांच्या अब्रू क्षणां जातात. परंतु मजवर सदयतेनें लोभेंकरून वर्तमान पुशिलें, सांगितलें. तीनचार दिवस बरोबर राहिलों. गोपिकाबाई व नारायणराव यांस देवी आल्या. करितां त्यांसहवर्तमान नर्मदातीरीं राहिलों. परस्परें उभयतांचें चित्तही ठीक नाहीं हें कळलें. कालवैपरीत्यें न घडावयाचें तेंही घडलें. तदनंतर या मर्जीत कसें होईल जाणून निरोप घेतला कीं टोंक्यास पुढें जातों. जावें म्हणून आज्ञा दिली. टोंक्यास येऊन राहिलों. श्रीमंतही मागाहून तेथेंच येऊन राहिले. एके दिवशीं प्रदोष तेथें पडला. ते दिवशीं श्रीमंत थोरले राव यांचें श्राद्ध. मला भोजनास बोलाविलें. गेलों. एकीकडे माधवराव व एकीकडे मला बसविलें. दुसरे ( म्ह० नूतन ) स्त्रीकडून वाढविलें. नंतर आज्ञा घेऊन कांहीं दिवस गंगातीरीं राहिलों. श्रीमंत पुण्यास गेल्यावर शेवटील समय, लवकर यावें म्हणून पत्रें आलीं. तों पारनेराअलीकडे वर्तमान ऐकिलें कीं कैलासवास केला.'

---

* टीप—नाना फडणिसाची आई रखमाबाई ही बळवंतराव मेहेंदळ्याची बहीण. हिला एकच मूल झालें तो नाना फडणीस होय. जन्म १२-२-१७४२.

फेब्रुवारी २१ चें उज्जनीचें पत्र. 'भा०सा० व जनकोजी शिंदे दोघे मात्र कांहीं थोडीशी फौज घेऊन जे समयीं लढाई जाहाली, ते समयीं झुंज मातबर जालें. गिलचे मारले गेले चाळीस हजार, दोन मातबर सरदार पडले. सावकारी खबर आहे कीं मलकाजमानीचा जांवई उमरशहा, गिलच्याचा लेक, झुंजांत ठार झाला. तोफेचा गोळा लागून मारला गेला. नजीबखानास भारी जखम लागली, एक भुज उडोन गेली. वरकड आणखी सरदार मेले. लढाईच्या समयीं हेच ( मराठे ) चालोन गेले. लष्करांत खावयास अन्न मिळेना म्हणोन चालोन गेले. लढाई जाली, ते समयीं यांनीं तों त्यांचा मोड केलाच होता. परंतु भा० सा० हत्तीवरून उतरले, ते समयीं आपलेकडील सरदारांनीं मागें पाहिलें, तों सरदार ( भाऊ साहेब ? ) दिसेना. गिलच्यांकडील फौज दोन हजार रूसून आलेली भा०सा०नीं ठेविली होती, ती इब्राहीमखान पडलेला पाहून माघारी पळोन बुणग्यांत आली. तेणेंकरून बुणग्यांत भ्रम पडला कीं गिलच्यांचा जय जाला. यामुळें बुणगें लुटलें गेलें. विश्वासराव दिसेनात म्हणोन श्रीमंत भा०सा० हत्तीवरून उतरले इतकाच फेर पडला. यामुळें त्यांनीं मोड खाल्ली. नाहीं तर फत्ते जहाली होती. मोडलेले सर्व एका जागां भिंडेवर जमा झाले.' [ इ. सं. ऐ. टि. १.१४ ].

दुसरें एक नाना फडणिसाचें पत्र. 'तीन प्रहर युद्ध चाललें तों विश्वासराव गोळी लांगून पडले, हें वर्तमान लोकांस समजतांतच धीर सुटला. कोणी-कोणाचें ऐकेना. जीव बचावण्यासाठीं धूम पळत सुटले. मातुश्रीची चुकामूक झाली. शोधार्थ माणसें पाठविलीं. पैकीं एकानें येऊन बातमी सांगितली कीं शत्रूंचे हातीं पडूं नये म्हणून तिनें एका माणसास सांगून आपला वध करविला. पळालेलं लोक कांहीं मारवाडाकडे, काहीं जयनगरकडे व कांहीं जंबुरकडे गेले, कांहीं भागीरथीपार निघाले. चाळीस हजार लोक कापला गेलीं. घोडा साठ हजार होता, पैकीं सहाएक हजार जिवंत राहिला. तोफा सामान वगैरे सर्व गेलें. तमाम फौज उखळून गेली. नारोशंकर दिल्लीचे बंदोबस्तास होता. जवळ सात आठ हजार फौज, व सरकारी खजिना पांच लाख, आणि शिंदे

व सावकारांचा खजिना पांच सहा लाख असा होता. तो सर्व ऐवज तसाच टाकून, पानपतचें वर्तमान कळतांच, फौजेसह दिल्लींतून त्वरेनें पळून गेले. दिल्ली जागा चांगली मजबूद, आंत तीन चार महिने पुरेल इतका दारूगोळा व पोटगी भरपूर होती. त्यावरून त्यांस तेथें निर्भय व सुरक्षित राहतां आलें असतें. नारोशंकर पळून न जाते तर पानपतावरून आलेल्या फौजेस आश्रय मिळून तेथेंच सर्वांस ठांसून राहतां आलें असतें. गिलचे कांहीं त्यांच्या पाठलागास आले नव्हते. नारोशंकरानें पळ काढिल्यामुळें अब्दालीनें सात दिवसांनीं येऊन दिल्लीचा कबजा घेतला. सुरजमल्ल व माधोसिंग यांचे वकील येऊन त्यास भेटले. नंतर तो त्वरेनें स्वदेशीं निघून गेला ' [ ४·३·१७६१,– माक्डोनेल कृ. ना. फ. च. पृ. १७२ ].

पिलाजी जाधवाचा मुलगा सटवोजी जाधव पानपतावर होता त्यानें धाकटा भाऊ सुभानबा यास लिहिलेली पळाची हकीकत मनोरंजक आहे. त्याचें ता. ९·२·१७६१ चें पत्र ( ६·४०६ ). ' पौष शु० ८ स पुढें फौजा, त्यापुढें तोफखाना बुणगे पाठीवर, समागमें घेऊन निघोन मोगलांवर चालून जाऊन झुंज उत्तम प्रकारें केलें. अडीच तीन प्रहरपर्यंत झुंज चांगलेंच झालें. राजश्री विश्वासराव यांस गोळी लागून ठार झाले. इब्राहीमखान गारदी यास गोळ्या लागून ठार जाले. वरकडही कित्येक लोक कामास आले. आपले फौजेनें शिकस्त खादली. ज्यास जिकडे सोय पडली तिकडे निघाले. कोणी कोणास मिळाले. मल्हारजीबाबा हजार दोन हजार फौजेनिशीं निघाले. दिल्लींत नारोशंकर पांच सात हजार फौजेनिशीं निघोन सौ. पार्वतीबाई दोन चारशें स्वारांनिशीं निघाली होती, त्यांची मल्हाररावांची गांठ पडली, त्यांजला ते संभाळून घेऊन चमेलीपार भदावरच्या मुलखांत गेले. वरकड फौज बाळोबाच्या मुलखांतून ज्यास जिकडे वाट फुटली तिकडून निघाली. वाटेनें गांव मातबर. गांवोगांव राउतांचा भरणा. दोन रोज रात्रंदिवस गवारांचें झुंज पुरवलें. घोडीं थकोन गेलीं. कोणाचें घोडें निभावलें नाहीं. तमाम फौज पाय उतारां झाली. आम्ही मागाहून गाड्यांत व डोल्यांत बसून हळूहळू कुंभेरीस आलों. तेथून भरतपुरास जात होतों तों, ५/ कूर सुरजमल्ल सामोरे येऊन भेटले. फिरोन

ते व आम्ही समागमें कुंभेरीस आलों. तेथून मल्हारजीबावांकडे पत्रें लिहून पाठविलीं आहेत. दो चौ रोजांनीं त्यांचें उत्तर आलें म्हणजे, येथून स्वार होऊन सिपरीस जाऊं. पार्वतीबाई व मल्हारजी होळकर जिवानिशीं मात्र गेलीं. भाऊसाहेब कोणीकडे गेले त्यांचें अद्यापि ठिकाण नाहीं. जनकोजी शिंद्याचेंही ठिकाण नाहीं. वरकड सरदार कोणी पुढें गेले, कोणी अद्याप मागेंच आहेत. सारांश आपले फौजेचा विध्वंस झाला तो लिहितां पुरवत नाहीं. ईश्वरी सत्तेनें होणार तें झालें. सिपरीस गेल्यावर सर्व सरंजाम नवा केला पाहिजे. तुम्ही कोणेविशीं काळजी न करणें. आपले ठायीं सावध राहणें.' खालील पत्र २१ फेब्रुवारीचें राजा अनुपगीर गोसावी याचें नानासाहेबास असून त्यांत विश्वासराव व सदाशिवराव यांच्या अंत्यक्रियेचा उल्लेख आहे (६·४०७). झुंजांत रणमंडळांतून रायाशीं दुराणी घेऊन आले. त्यांसमागमें बापू हिंगणे होते. तें वर्तमान दुसरे दिवशीं तृतीय प्रहरीं सुजाउद्दौल्याकडे आलें. त्यांनीं रायांचें लोथ आपणांजवळ आणविलें, आणि आज्ञा केली कीं याचें सार्थक यथासांग करणें. तेव्हां आपले डेऱ्यास घेऊन आलों. गणेश वेदांती, गणेश शंकर उज्जनकर, काशीराज वकील व वेणीप्रसाद समागमें होते. तितक्यांत दुराणीचा नशेकची येऊन लोथ परतोन नेलें. तिसरे दिवशीं शुक्रवारीं वर्तमान कळलें कीं रणभूमींत स्वामिकार्यानिमित्त थोरथोर सरदार कामासी आले. त्यांसी नबाब-साहेबासीं सांगून रणभूमीवर शोध केला. त्यांपैकीं एका शरीरास मस्तक नव्हतें. त्या शरीराखालीं सात मोतीं सांपडले. त्याचें चिन्ह उजवे पायावर केश नव्हते. कमरेस कट्यारीची जखम होती. सरकारचे खिसमतगार बलराम व वाघोजीनाईक व गणेश वेदांती वगैरे कारकून मंडळी या सर्वांनीं पाहिलें. तेव्हां संताजी वाघांनीं उभयतांनीं हस्तीवर घालून आणिले. मग चंदनादिक विधी करविले. गणेश वेदांतीनें अस्थी भागीरथीसी पाठविल्या. आपणाशीं संदेह निर्माण जाला असेल तर जाठाकडे कांहीं फौजा गेल्या आहेत, त्याची बातमी आणून वकिलांचे पत्रावरून विदित केलें पाहिजे (म्ह०संशयनिवृत्ति केली पाहिजे).' पत्राचे खालीं. 'गणेश शंकर याचे नमस्कार. वर्तमान पत्रीं लिहिलें आहे, त्यावरून सर्व विदित होईल.'

याच बाबतींत काशीराज शिव म्हणजे बखरकर्ता काशीराय यानें नाना पुरंदऱ्यास लिहिलेलें ता. ३ मार्चचें पत्र असें. ‘ येथील वर्तमान तों आपणास क्लृप्तच आहे. श्रीमंत भाऊसाहेब व रावजीचें साहित्य केलें म्हणून लिहिलें, त्यास त्यांहीं तों उभय लोक साधन केलें. खेरीज पुण्य कीं योग ऐसा आला असतां चंदनादि संस्कार ब्राम्हणहस्तें जाला. आम्ही असतां न होय तर कोणे कार्यास यावें ! आणीक सेवा न घडली. ईश्वरें हाच वांटा आम्हांस नेमिला होता. भगवादिच्छेस उपाय काय ! गृहस्थ मंडळीचे साहित्यास लिहिलें, त्यास आपणाकडील सखोपंत व खंडोपंत वगैरे होते व आणीकही गृहस्थ मंडळी पांचचार शत व पांचसात हजार मनुष्यें आपले सैन्याचीं होतीं. नवाबास उत्तम प्रकारें विनंति करून जें साहित्य व आपलें दास्य, तें करून, फतुराबादेपुढें जठवाड्याकडे मार्गस्थ केलें. सुखरूप सेवेशीं पावलियां सविस्तर सांगतील. नबाबखानास या प्रसंगामुळें बहुत खेदावह झालें. परंतु उपाय काय ! भगवत्सत्ता खरी. श्रीमंतांचा व नवाबसाहेबाचा स्नेह अविच्छिन्न, अकृत्रिम आहे तोच आहे. या कलेवरास पोष्य वर्गांत जाणून सदैव कृपा पत्रीं सांभाळ करीत जावा ’ ( ६·४०८ ). यावरून सुजाउद्दौला वगैरेचें अब्दालीशीं पुढें मुळींच जुळलें नाहीं. उलट ते पूर्ववत् पेशव्यास आदर दाखवूं लागले. सुजानें व काशीरायानें मराठ्यांकडील मृतांचें और्ध्वदेहिक व जिवंतांचा परामर्ष योग्य प्रकारें केला. तसेंच नारोशंकर दिल्लींत ठांसून राहता व पेशवा लगोलग पुढें आला असता तर, अब्दाली तेव्हांच स्वदेशीं निघून गेला असता वगैरे प्रकार व्यक्त होतात.

सुभानबा जाधवास लिहिलेलें दुसरें एक पत्र महत्त्वाचें आहे. ‘ बुधवारीं पौष शु० ८ स मजबुदीनें चालोन गेले. गिलचा गनीम भारी व कट्टा. तथापि आपले फौजांनीं बरीच शर्थ केली. निदानीं शिकस्त खाल्ली, मोड झाला. त्यास जिकडे सोय फावली त्या मार्गें तो निघाला. बहुत लोक आपले फौजेचे मारले गेले. आपले पन्नास हजार घोडे गिलच्यांनीं व गांववाले गवारांनीं घेतले. ऐसी कधींही जाली नव्हती. ईश्वरी क्षोभ हेंच खरें. लोक पायउतारा, अंगा-

री पांघरूण नाहीं असे विपत्तीनें आले. नारोशंकर व बाळोजी पलांडे दिल्लींत होते, दोनचार हजार फौज होती, ते पुढील पुढें निघाली. मागोन मल्हारराव होळकर आले. हे लढाईतून अगोदरच निघाले होते. यांजवळ प्रस्तुत आठ दहा हजार फौज आहे. होळकर व आम्ही एक जागां ग्वालेरीस आहों. भरतपुरास सुरजमल्ल जाठांनीं फार संगोपन केलें. पंधरा वीस रोज तेथें राहिलों. बहुतच त्यांणीं आदर केला कीं, मी तुमचे घरचा, तुमचा चाकर, हें राज्य तुमचें, ऐसे प्रकारें हात जोडून बोलावें. ऐसे थोर माणूस ! त्याणीं आपले राऊत व मातबर सरदार बराबर देऊन ग्वालेरीस लष्करास पोंचविलें. माणसांचे हाल मोठे झाले. कुल सरंजाम अवघे लष्करचा गेला. तेथें आम्ही आपलें निवडून काय लिहावें ! श्रीकृपेनें व वडिलांचे पुण्येंकरून जिवानिशीं शाबूद आलों. मुलखांतील तमाम जमीदार बदलले आहेत. धुंदी झाली आहे. श्री. पंतप्रधान सिरोंजेवरी आले. आम्हांस पत्रें आलीं कीं तुम्ही व मल्हारजी व त्रिंबक नाना पुरंदरे ऐसे जाऊन गोहदवाल्याचा बंदोबस्त करणें. अब्दालीकडूनही सल्याचें राजकारण मागती आलें आहे ' [ ६·४०९ ].

मार्च १९ चें नाना फडणिसाचें पुरुषोत्तम महादेवास पत्र, ' काल पार्वतीबाईनीं कूच करून श्रीमंतांकडे सिरोंजेस चालली. आम्ही व नाना पुरंदरे समागमेंच आहों. सुभेदार, बाबूजी नाईक, सदाशिव रामचंद्र वगैरे ग्वालेरीस राहिले. श्रीमंतांचें दर्शन जाल्यावर जें होणें तें होईल. परंतु सुरजमल्लाकडे त्यांचें चित्त फार दिसोन आलें. जें करणें तें सुभेदारांचे अनुमतें करितात यास्तव कठीण दिसतें. भगवदिच्छाप्रमाण' [६·४१०]. 'श्रीमंत रा. मल्हारराव होळकर यांजपाशीं ग्वालेर नजीक पछोरावर[1] आहेत. बाबूजी नाईक, सदाशिव रामचंद्र, त्रिंबक शिवदेव, व गोपाळराव बाबूजी, विठ्ठल शिवदेव असे पंचवीस तीस हजार सडी फौज आहेत. गोहद प्रांतें संचारितात. गिलच्याचे मुलखांत लाख फौज इराणी आली, गिलच्याची पातशहात घेतली, याजमुळें तो

१. टीप.–सिरोंज व ग्वालेरच्या बरोबर मध्यावर.

दिल्लीहून ११ साबानीं जातो [ ११ साबान=८·३·१७६१ ]. सुजा यमुनापार होऊन अयोध्येस चालला. लबाडी करावयास नजीबखान व माधवसिंग आहेत. परंतु त्यांच्यानें चमेली अलीकडे येववत नाहीं. सलूख करावयाबद्दल मल्हारजी-कडे आले आहेत. त्यांच्या मुद्याप्रमाणें तह झाला तरी करतील. कुंभेरीहून पत्रें जाठाचीं व बापूजी महादेवाचीं आलीं. या उपरी ईश्वरें दिवस उत्तम आणिले आहेत. नष्टचर्यास कांहीं बाकी राहिली नव्हती. परंतु उगवते दिवस आलेसें दिसतें' [ ६·४१२, २७ मार्च ]. त्याच तारखेचें दुसरें पत्र सुभानजी जाधवराव यांस, ' श्री. सौ. पार्वतीबाई व नाना पुरंदरे व दमाजी गायकवाड, नारोशंकर मिळोन मल्हाररावाकडीलसुद्धां चाळीस हजार जमाव जाला होता. गिलच्यांवर व नजीबखानावर सलावत पडली. वकील सलुखास येत होते. श्रीमंत नाना सा० शिरोंजेवरती व खेचीवाड्यांत जानोजी भोसले व गोपाळराव गोविंद पंधरा हजार फौज होती. परंतु लोकांस रोजमुरा न मिळाला. ऐवज श्रीमंतांनीं न पटविला. यास्तव पार्वतीबाई, नाना पुरंदरे व नारोशंकर ग्वालेरीकडून सिप्रीस आले. प्रांतांत धुंदी जहाली. तहशील बंद जाली. आम्हीं बहुत रदबद्दल केली. ते साफ म्हणतात कीं तुम्हांस अद्याप आशा या प्रांतीं आहे कीं काय? अगदीं मुलूख खराब केला आहे. हा काळवर जागे रक्षिले. झांशीकर बाबूराव कोन्हेर याचे हाल काय झाले त्याचा विस्तार कोठवर लिहावा ! बाबूराव कोन्हेर यांचे भाऊ ( यशवंतराव ? ) शेवडियावर पडले. याच काळांत धीर धरून आपले जागे रक्षिले ' [ ६·४१३ ]. नाना फडणिसाची मातुश्री पानपता-वरून पुढें कोठें गेली कळलें नाहीं, तिचा तपास करून कळविण्याबद्दल त्यानें पुरुषोत्तम महादेवास पत्र लिहिलें ( ६·४११ ), परंतु ती घोड्यावरून पडून मरण पावल्याची खबर मागाहून आली [ ६·४१५ व का. सं. प. या. ५३ ]. सदाशिवराव भाऊ व जनकोजी शिंदे हयात असल्याबद्दल बरेच दिवस गवगवा होता ( ६·४१४; ३·५२० ). 'विश्वासराव अभिमन्यूप्रमाणें रण भेदून कैलास-वासी झाले. चिरंजीव भाऊ व जनकोजी शिंदे जाठाच्या मुलखांत आहेत.

दहा पांच बातम्या आल्या. शोधास माणसें कारकून गेले. लौकरच त्यांचे हातचें पत्र घेऊन येतील. इब्राहीमखान पाडाव झाले. सरदार व लोक मारले गेले. युद्धच आहे. यश अपयश ईश्वराधीन. असो, चिंता काय ! पुढेंही जे तर्तूद होणें ते होते ' ( ३·५१७; मार्च १७६१ ). पेशव्याच्या या शब्दांवरून त्याचा धीर व्यक्त होतो. भाऊसाहेब व जनकोजी यांच्या हातचीं म्हणून कांहीं पत्रें घेऊन माणसें सुद्धां पेशव्याकडे आलीं होतीं ( ३·५१८ ). बाबूजी नाईक व दुसऱ्या पुष्कळांस त्यांचे तपासास पेशव्यानें पाठविलें [का. सं. प. या. १७५]. परंतु पुढें लवकरच संशयनिवृत्ति तात्पुरती झाली. जनकोजी शिंदे हयात असल्याचा संशय मे महिन्यापर्यंत चालू होता [ ६·४१४ ]. अर्थात् या घोटाळयामुळें मुख्य काम तहकूब राहिलें.

जाठानें ज्याप्रमाणें मराठ्यांचा उत्कृष्ट परामर्श घेतला, त्याचप्रमाणें काशींत दक्षणी मंडळीचा सांभाळ तेथील राजा बळवंतासिंग यानें केला. ' राजे यांणीं परामृष केला म्हणून श्रींत बहुतांची अब्रू राहिली. आमच्याविषयीं ( दीक्षितांविषयीं ) तों सर्वांस सांगितलें जे, माझी आणि बाळकृष्ण दीक्षित यांची भिन्नता नाहीं. ब्राम्हणभोजन आदिकरून सर्व गोष्टींचा आपण समाचार घेत असे. सर्व मुत्सद्यांस सांगितलें जे, मी कै. नारायण दीक्षितांचा लेक, मला त्यांचें वृत्त चालविणें जरूर. ज्याप्रमाणें दीक्षितांचे वेळीं साहित्य लोकांचें होत असे, त्याप्रमाणें करीत जाणें; आणि त्याप्रमाणें दोन महिने चालविलें. सर्वत्र वडिलांचे पुण्येंकरून निर्वाह होतो.' असें बाळकृष्ण दीक्षित गोविंद दीक्षितास लिहितो [ २०·४·६१, ३·५१९ ]. ' भगवत् कृपेंकरून श्रीमंतांचें राज्य कायम आहे.' अशी शेखी २३·२·६१ ला नारोशंकर मिरवितो [१·२८२]. म्हणजे पानपतानें मराठ्यांचा दम बिलकूल खचला नाहीं हें उघड आहे.

येथबर दिलेले उतारे अस्सल पत्रांतले पानपत संग्रामाची व तदुत्तर स्थितीची योग्य कल्पना सुचवितात. आतां याची पूर्तता बखरींच्या आधारानें करितां येते. भाऊसा०चे कैफीयतींत खालील वर्णन या संग्रामाचें आहे. ' प्रथम बिठ्ठल शिवदेव, यशवंतराव व माणिकराव कापरे कांहींसे वाढून पुढें

गेले, त्यांजवर जुंज मांडिलें. तेव्हां ते कचरून माघारे तोफखान्यांत येऊन राहिले. तों दमाजी गायकवाड यांजवर गिलच्यानें येऊन कांहींशी मारामार केली. तेही माघारे फिरले. डावे बाजूकुडे मुक्कामीं गोटाचे गोट राहिले होते. त्याप्रमाणें पतकें होतीं. त्यांजवर खासा अब्दाली त्या जुंजावर डावेकडे होता त्याणें जुंज भारी केलें. कुल आपणांकडील पतकें माघारीं फिरलीं. हलके बहुत जाले. इब्राहीमखान गारदी याजवर खासा खुरानशहा व रोहिला याणें चालोन घेतलें. एक रंजक उडाली. इकडील लोक बहुतेक पडिले. हटला नाहीं. तसेच नेट धरून मारांत आले. इब्राहीमखान गारदी याजवर चाल पडली, कुमक कोणीं केली नाहीं. तथापि हुजरातचे लोक एकत्र होऊन संधान साधिलें. तोफा सुटत होत्या. लढाई मातबर एक प्रहर केली. इकडे उजवे बाजूस शिंदे, होळकर यांजवर सुजाउद्दौला व गोसावी वगैरे यांणीं येऊन (धाव) घातले. जुंज मातबर होऊं लागलें. मध्यें भाऊसाहेब व कांहींसे लोक व रावसाहेब हे उभयतां घोडियांवर संभाळून होते. भाऊसाहेब परी घोडीवर, रावसाहेब दिलपाक घोड्यावर होते. चहोंकडून लोक सांभाळोन होते. जुंजाचें तोंड लाविलें. मारामार होत होती. मातबर लोक पडों लागले. इतक्यांत रावसाहेब यांस छातीमध्यें गोळी लागोन ठार जाले. हें भाऊसाहेब यांणीं पाहून अवसान सोडिलें. बहुतेक शोक करूं लागले. मुडदा उचलून हत्तीचे अंबारीमध्यें घातला; आणि भाऊसाहेबीं निश्चय केला कीं, या उपरी गिलचा खाशानिशीं मारीन; ऐसें जहालें; आणि लोकांस ताकीद करून जुंज लागलें. हाणा हाणा ऐसें मुखें बोलून सर्वत्रांस ताकीद करूं लागले. बरोबर समशेर बहाद्दर होते. ते घेऊन पुढें जाऊन तीन वेळां मागें हटविलें. त्यांजवर चहूंकडोन गिलच्यानें मार तोफांचा व गोळ्यांचा व शरांचा केला. तेव्हां लोकांनीं हिंमत धरून भाऊसाहेबांबरोबर सरसावून शिपाईगिरी बहुत केली. रोहिला माघारा फिरविला. हल्ला करून मोड करून माघारा फिरविला. गिलचा खाशा पळ काढून यमुनापार दाखल जाला. शिपाईगिरी भाऊसाहेबांची म्हणावी तैसी जाली कीं, ज्याचें नांव शिपाईगिरी. विश्वासराव पडिले. डावे बाजूचे लोक कचरून माघारे फिरले. अशा मध्यें सांभा-

रून रोहिला माघारा सारिला. अब्दाली पळून नदीतीरीं गेला. लढाईची शर्त केली.

'विठ्ठल शिवदेव यांजकडेस पेशजी गिलचे चाकर दोन हजार ठेविले, त्यांस इशारतीस भगवें फडकें दिलें होतें. तें डोईवर बांधून फिरत होते. जे समयीं विश्वासराव पडिले ही खबर लष्करांत बुणगियांत जाली, तेव्हां लष्कर गडबडलें होतेंच. गिलचे चाकर यांणीं भगवें फडकें टाकून दिलें आणि बुणगियांत आवई घातली कीं, लुटूं लागले. बुणग्यानें पळ काढिला. बुणगे पळतात हें पाहून विठ्ठल शिवदेव याणींही पळ काढिला. आधीं रावसाहेबांचें वर्तमान ऐकून दहशत खाल्लीच होती. बुणगे पळतात हें पाहून ते पळाले. डावी बाजू रिकामी होत चालली. रोहिला याजकडील लोकांनीं लुटीची धुमाळी मांडिली. इकडे जुंज भाऊसाहेबांकडे होतच होतें. उजवे बाजूस शिंदे होळकर यांजकडे जुंज होतच आहे. मारामारी होतां होतां भारी खणाखणी झाली. रावसाहेबांचें वर्तमान ऐकून जनकोजी शिंदे व मुकुंदजी शिंदे यांणीं मोठी मर्दुमकी करून मारामारी करीत भाऊसाहेबापाशीं आले, तों इब्राहिमखान गारदी यांजवर झूट पडली. त्याणें जिवाचा निधडा करून शिपाईगिरी म्हणावी तैशी जिवाची तमा न धरतां केली. कित्येक गारदी बेतांत आले व कित्येक ठार जाले. हुजरातीचे लोक जवळचे पळों लागले. तोफखाना बंद जाला. जातीनिशीं तरवार सीमेपरती केली. खान जाऊन गिलच्यांचे लष्करांत मिळाला. दहा पांच ठार केले. भोंवता वेढा गिलचांचा पडला. अंगावर जखमा भारी पडल्या. ऐसें असतां लढतच होता. प्रयत्न न चाले तेव्हां हत्यारें राहिली. धरून नेला. तेव्हां हें वर्तमान श्रीमंतांस कळलें. मल्हारजी होळकर यांचे बाजूवरही मातबर जुंज जालें. रेटत नाहींसें जालें, तेव्हां दोही बाजू सोडून निघाले. भाऊसाहेबांचे हेंच तोंडीं कीं, हाणा हाणा. हेंच करीत असतां, जातीनिशीं मोठा हिय्या केला. बहुत जुंज मातबर केलें तें कोठवर लिहावें ! सरकारचे मुत्सद्दी तमाम बिलकूल एकीकडे पळूं लागले. सोनजी भापकर याशीं भाऊसाहेब बोलिले कीं, " सोनजीबाबा, हा समय निघावयाचा नव्हे. तुमचा भरंवसा बहुत धरिला होता. उभे राहावें. " तेव्हां ते बोलिले कीं,

"कुललोक पळतात, त्यांजला माघारे फिरवितों. साहेबांस टाकून आम्हीं कोठें जावें ?" ऐसें म्हणून लोक फिरवावयास गेला तो तिकडेच गेला. तेव्हां मुकुंदजी शिंदे म्हणों लागले कीं, 'महाराज, क्षात्रधर्माची शर्थ झाली ! याजउपर निघावें हें उत्तम आहे.' तेव्हां भाऊसाहेब बोलिले कीं, मुकुंदजीबावा, आतां कुणीकडे जावें ? काय तोंड दाखवावें ? रावसाहेबांकडे पाहावें." तेव्हां मुकुंदजी शिंदे यांणीं घोडियावरून उडी टाकिली. जातीनें हत्यार करवलें तेथवर केलें. मातबर मराठे धर्माची शर्थ करून ठार झाले. जरीपटक्याचे निशाणाजवळ अगोदर दाटी झाली होती. तेव्हां हत्तीवरून उतरून घोडियावर घातले होते. निशाण गुंडाळून पळूं लागले, तेव्हां भाऊसाहेबीं शहाजणें वाजवावयास आज्ञा केली. फत्ते जाली, शहाजणें वाजतात, याजकरितां तरी लोक माघारे फिरतील या अर्थी शहाजणें वाजवूं लागले. परंतु ज्यांणीं पळ काढला त्यांपैकीं कोणी माघारा फिरला नाहीं. भाऊसाहेब व जनकोजी शिंदे व शें पन्नास लोक व रायाचे मुडद्याचा हत्ती इतकीं बाकी राहिलीं. त्यांजभंवता वेढा भारी पडला. तेव्हां युद्ध बहुत केलें. पूर्वीं भारतीं अतिरथी महारथी जुंज झालें, त्याप्रमाणें भाऊसाहेबींही लढाईची शर्थ केली. पुढें कांहीं इलाज चालेनासा जाला. त्यानंतर भाऊसाहेब व जनकोजी शिंदे यांची गती काय झाली ती कोणीं पाहिली नाहीं. रावसाहेबांचे मुडद्याचा हत्ती व भाऊसाहेबांची वसती घोडी ऐसी सुजातउद्दौवला याजकडे गेली. प्रातःकाळचे प्रहर दिवसानंतर जुंज लागलें, तों तीन प्रहर हाणा मारा हेंच चाललें. पृथ्वीनें रक्त प्राशन केलें.'

पेशव्यांच्या सरकारी बखरींतील उल्लेख अल्प परंतु मार्मिक आहे तो असा. 'पातशहाचा फर्मान नानासाहेबांस फौजेविशीं आला, त्यावरून भाऊसाहेब व विश्वासराव यांची रवानगी फौजसुद्धां केली. दिल्लीस जाऊन पुढें अब्दालीची गांठ कुरुक्षेत्रीं सोनपत पानपतजवळ पडून लढाई होतां अब्दालीस मोडलें. त्या समयांत विश्वासरावास अंबारींत गोळी लागोन कामास आले. हें वर्तमान अब्दालीस कळतांच चालोन घेतलें, तेव्हां फौज पळों लागली. मल्हारजी होळकर वगैरे सरदार निघाले, ते समयीं भाऊसाहेबांवर लगट केला, लोक पडले व जखमी झाले. भाऊसाहेब, जनकोजी शिंदे व यशवंतराव पवार यांचें

ठिकाण लागलें नाहीं ' [ ४ पृ. ५३ ]. यांत सर्व प्रकार थोडक्यांत सफाईनें वर्णिलेला सर्वस्वी प्रमाण धरून चालण्यास हरकत नाहीं. मराठ्यांचा पाडाव झाला, असें यांत म्हटलेलें नसून, अब्दालीस मोडलें, आणि विश्वासरावाच्या मृत्यूनें दम सुटून गोंधळ उडाला नसता तर, त्या दिवशीं मराठ्यांचाच जय होता, असा याचा आशय आहे. मराठ्यांचा संहार झाला, पाडाव झाला नाहीं, हाच तात्पर्यार्थ पूर्वीच्या पत्रांवरूनही निघतो.

तमाम फौजेचा गोल बांधून शत्रूचे अंगावरून लढत लढत निघून जाण्याची कल्पना फार चांगली असून, ती शेवटपर्यंत तशीच अंमलांत आली असती तर मराठ्यांचा बहुधा बचावच झाला असता. मराठे गोल बांधून आपल्या अंगावरून निघून जातील असा अब्दालीचा अंदाज नव्हता. परंतु त्याची फौज लढण्यासाठीं आंवळून उभी राहिलेली पाहून, त्याच्याशीं समोर लढूनच आपण निघून जावें, अशी मसलत, जवळ आल्यावर, सदाशिवरावानें करून, रात्रीं मनसबा केला, तो राहविला. विनाशकालीं विपरीत बुद्धि निर्माण झाली. फौज जमून नव्हती. नवीन योजना सर्वांस कळण्यास अवधिच मिळाली नाहीं. एकाएकीं मसलत बदलल्याबद्दल इब्राहीमखान गार्दी यास अत्यंत चीड आली. क्षणभर त्यानें भाऊसाहेबांची समजूत घालण्याचा प्रयत्न केला, परंतु सत्तेपुढें शहाणपण नाहीं अशी स्थिति होऊन, सर्वस्वी घात झाला, असें त्याच वेळीं इब्राहीमखानास वाटलें. भाऊसाहेबांच्या बखरींतील हा प्रसंग वाचण्यालायक आहे: आणि तो विश्वसनीय दिसतो. ' निशाणाजवळील तर्तूद राहिली ' असें नाना फडणीसही म्हणतो. ठरलेली मसलत बदलून नवीन हुकूम करणें झाल्यास, तो सर्व फौजेस यथास्थित कळेल अशी योजना प्रथम केली पाहिजे, ती सदाशिवरावानें केली नाहीं. तितका अवकाशच मिळाला नाहीं. वास्तविक सदाशिवरावाचें मन सर्वस्वी गोंधळून गेलेलें होतें. चिंता व जिवापाड मेहनत यांच्या योगानें त्यास झोंप सुद्धां बहुधा बिलकूल नसे. अर्थात् आपण करतों काय याचें त्यास भान न राहून, फौजेंत एकच गोंधळ उडाला. प्रत्येकानें आपापल्या कल्पनेप्रमाणें त्या दिवशीं लढण्याची शिकस्त केली, परंतु

सर्वांमध्यें एकात्मता असावी लागते ती मात्र बिलकूल राहिली नाहीं. अब्दालीस पाहून, आगाऊ ठरलेली व्यवस्था एकाएकीं बदलणें, व विश्वासराव पडल्यावर एकदम देहभान विसरून रणांत आवेशानें घुसणें, या दोन अक्षम्य चुका सदाशिवरावानें केल्या. त्याच्या ठिकाणीं अनेक बहुमोल गुण होते, परंतु बिकट प्रसंगीं शांत चित्त ठेवण्याचा सेनापतींचा एक मुख्य गुण सदाशिवरावांत नव्हता, ही गोष्ट पेशवाही जाणून होता. कुशल सेनापतीनें इतक्याही अडचणींतून निभावणूक केली असती.

'प्रातःकालचे दोन घटका दिवसास युद्धास प्रारंभ झाला,' (नाना फडणीस) आणि 'अडीच तीन प्रहरपर्यंत युद्ध चांगलेंच झालें' (सटवोजी जाधव ). घटका व प्रहर फौजेस कळविण्याची तजवीज त्या वेळीं हत्तीवर अवश्य असे, यावरून वरील अंदाज केवळ काल्पनिक मानण्याचें कारण नाहीं. जानेवारी ता. १४ ला दोन घटका दिवस म्हणजे सकाळीं आठांचा सुमार, तेव्हांपासून सात तास तरी युद्ध चालल्यावर म्हणजे तिहींच्या सुमारास विश्वासरावास गोळी लागली; आणि अर्ध्या तासांत पळ सुरू झाला. आदल्या रात्रीं बहुधा सर्वांसच अलोचन जागरण झालेलें, सकाळीं चार पांच वाजल्यापासून तयारी करून व खाणेंपिणें आटपून दहा पांच मैलांची मजल मारून आल्यावर, आठ वाजतां लढाईस तोंड लागलें, तेव्हां पासून तीनचार वाजेपर्यंत कोणास तोंडांत पाणी सुद्धां घालण्यास सवड झालेली नाहीं. अशा प्रसंगांत दमलेल्या फौजा परत घेऊन नवीन ताज्या दमाच्या पुढें करावयाच्या व सर्वांस योग्य विश्रांति द्यावयाची, असा सामान्य प्रघात असतो, परंतु पानपतावर अशी कांहीं एक योजना नव्हती, आणि सर्वच लोक निकरावर येऊन निघालेले होते. अब्दालीनें मात्र ताज्या दमाचा दहा हजार कतलबाज[1] रिसाला मागें ठेविला होता, तो आयत्या वेळीं पुढें आणिला, तेव्हां मराठ्यांचा धीर सुटला.

काशीरायाचे बखरींत व अन्यत्र संग्रामाचे वेळीं फौजेची रचना दाखविणारा नकाशा दिलेला आहे. अब्दालीची फौज यमुना पाठीशीं घालून

1 कझलबाजी हें स्थळाचे नांवावरून झालेलें विशेषण, असें एक ग्रंथकार म्हणतो.

पश्चिमामुख होती. रेटीत नेऊन तिला यमुनेंत बुडवूं अशी सदाशिवरावाची अपेक्षा होती. कारण यमुनेचें पात्र रुंद असल्यामुळें अल्पावधींत सर्व फौज पलीकडे सुरक्षित नेणें शक्य नव्हतें. सदाशिवरावांनें गोल मोडला नसता तर बहुधा इब्राहीमखानाच्या तोफांनीं मराठ्यांस सुरक्षितपणें दिल्लीच्या टापूंत आणून सोडिलें असतें. फौजांची व सरदारांची रचना खालीलप्रमाणें होती:—

| मराठे पूर्वाभिमुख. | गिलचे पश्चिमाभिमुख. |
|---|---|
| १ इब्राहीमखान गारदी. | १ बरखुरदारखान. |
| २ दमाजी गायकवाड. | २ अमीर बेगखान. |
| ३ सटवोजी जाधव. | ३ दुंदेखान. |
| ४ विठ्ठल शिवदेव. | ४ हाफीज रहमतखान. |
| ५ विश्वासराव व स० रा० | ५ अहंमदखाम बंगश. |
| ६ समशेर बहादूर. | ६ वजीर शहावल्ली व आताईखान. |
| ७ यशवंतराव पवार. | ७ सुजाउद्दौला. |
| ८ मल्हारराव होळकर. | ८ नजीबखान रोहिला व कलंदरखान. |
| ९ जनकोजी शिंदे. | ९ शहा पसंदखान. |

स्वतः अब्दाली फौजे मागें राहून जरुरीप्रमाणें पाठपुरावा करीत होता. दहा हजारांचा कझलबाज रिसाला त्यानें मुद्दाम मागें राखून ठेविला होता. उभय दळांची लगट झाल्यावर बारा एक वाजेपर्यंत निकराचा संग्राम चालून, इब्राहीमखानानें बरखुरदारखान वगैरेंचा, पेशव्यांच्या हुजरातीनें वजीर शहावल्लीखानाचा, व शिंदे होळकरांनीं नजीबखानाचा इतका फडशा उडविला, कीं आतां थोड्या वेळांत आपला शेवट होणार अशीच भावना शत्रुफौजेची झाली. स्वतः अब्दाली मात्र शांत वृत्तीनें जरूर त्या तजविजी करीत होता. आरंभीं इब्राहीमखानाच्या तोफांचे गोळे शत्रूंच्या डोक्यावरून जाऊं लागले, तेव्हां इब्राहीमखान कांहीं वेळानें हातांत स्वतः निशाण घेऊन बागनेटांनीं निकरानें शत्रूंवर चालून गेला, त्याबरोबर समोरच्या रोहिल्यांचा साफ फन्ना उडाला. तेणें करून वजिराची उजवी बाजू खचून, मोकळी जागा सांपडतांच पेशव्यांच्या हुजरातीनें

वजिरावर चाल केली. त्याचा पुतण्या आताईखान पडला; आणि स्वतः वजीर पायउतारा होऊन पेचांत आला. काशीरायानें हें वर्तमान सुजास कळविलें, परंतु सुजानें मदत केली नाहीं. वजिराचे लोक हार खाऊन पळूं लागले असें मागें अब्दालीनें पाहून, पळून येणाऱ्या लोकांस एकदम छाटून टाकण्याचा हुकूम त्यानें दिला; आणि त्यांस परत फिरवून संग्रामांत लोटिलें; आणि अशा रीतीनें दोनही दळें व विशेषतः मराठे श्रमानें व तृषेनें अगदीं थकून गेलेले पाहून, अब्दालीनें दोन वाजण्याच्या सुमारास आपला ताजा रिसाला पुढें आणिला, आणि अगदीं मोजक्या क्षणीं व मोजक्या जागीं फिरून जोराचा मारा केला. त्याबरोबर पुनः निकराचें कंदन झालें. कोणीही हार म्हणून घेईना. असा तास अर्धातास गेला. इतक्यांत मराठ्यांची फौज एकाएकीं रण सोडून पळूं लागल्याचें मुसलमानांनीं पाहिलें. याचें कारण इकडे विश्वासरावास गोळी लागून तो गतप्राण झाल्याची वार्ता फौजेंत पसरली, त्याबरोबर लोकांचा धीर सुटला, आणि लढाईचें काम सोडून जो तो आपल्या बचावाचे विचारास लागला. सदाशिवरावाचें भान तर अगोदरपासूनच बहुतेक नाहींसें झालेलें होतें. पुढें विश्वासराव पडल्यावर आतां नाना सा० स तोंड काय दाखवावें अशा आवेशानें कोणाचेंही न ऐकतां तो शत्रूंत घुसला. त्या वेळीं सर्व मारा हुजरातीच्या निशाणावर येऊन तें निशाण हातचें जाऊं द्यावयाचें नाहीं म्हणून सदाशिवरावानें लगट केली. 'तोंडास खरस आली. हाणा मारा म्हणावयाचें राहिलें. कोणी ओळखीचा आला तरी तोंडानें मात्र हुंकारा देऊन मानेची संज्ञा दाखवीत. ब्रह्मांड कोसळलें पण हिंमत हरली नाहीं. यांप्रमाणें पराक्रमी दुसरा होणें असाध्य, हजार बाराशें मात्र जागयावर उभे राहिले. ते समयीं सोनजी भापकर भाऊचे मागें रिकीबीत पाय देऊन उभा राहिला. सभोंवता वेढा पडला. आंत खंदळाखंदळ क्षणभर बहुतच केली. त्यांत भाऊसाहेब व जनकोजी शिंदे यांची गत कैशी झाली न कळे. उभयतां कोणीही दृष्टीनें पाहिले नाहींत.' ही झोंबाझोंबी अब्दालीच्या कत्तलबाज रिसाल्याशीं झाली. खरें म्हटलें असतां, मराठ्यांच्या बाजूस जो तो आपापल्या बुद्धीप्रमाणें लढला,

सर्वांचा मिळून एक हेतु धरून लढणें झालेंच नाहीं. श्रमानें व जखमांनीं असंख्य लोक व्याकुळ झाले. स्वतः इब्राहीमखान घायाळ होऊन शत्रूंचे हातीं पडला. त्याचा मुलगा व भाचा मारले गेले. यशवंतराव पवार गोळी लागून पडला. समशेर बहाद्दर जखमी झाला. असा प्रकार झाल्यावर तीन चार वाजण्याचे सुमारास आतां आपला निभाव लागत नाहीं असें पाहून, मल्हारराव होळकर, विठ्ठल शिवदेव, दमाजी गायकवाड वगैरे मंडळींनीं रणांतून आपला पाय काढिला, त्याबरोबर सर्वत्र पळापळच सुरू झाली. 'विश्वासराव व सदाशिवराव दोघेही युद्धाची व्यवस्था पाहत होते. बहुतेक यशस्वी झाले. अफगाण बहुतेक मोडले. शहावलीखानाची फौज सर्व गारद झाली. एक वाजतां त्यास ताजी मदत आली म्हणून तो बचावला. तीन वाजतां विश्वासरावास गोळा लागून घोड्याखालीं पडला, तेव्हां त्यास हत्तीवर घालून बसविण्यांत आलें. नंतर पुनः निकराचा झगडा कांहीं वेळ झाला. परंतु सकाळपासूनच्या श्रमानें मराठ्यांचा दम पुरला नाहीं; आणि एकाएकीं अंगांत कांपरें भरल्यासारखें होऊन ते रण सोडून पळूं लागले. अफगाणांनीं पाठलाग करून त्यांस क्रूरपणानें कापून काढिलें.' [Tate's Afghanistan].

पळणाऱ्या मराठ्यांचा पाठलाग शत्रूंनीं जोरानें केला. अशा वेळीं जिंकणाऱ्या पक्षास एक प्रकारचा आवेश चढत असतो. तावडींत सांपडले त्यांची त्यांनीं एक जात कत्तल चालविली. रात्र पडेपर्यंत पानपतच्या बाजूस मोठीच कापाकापी झाली. प्रत्येक अफगाणानें आपल्या भावाबहिणींच्या किंवा इतर नातेवाइकांच्या नांवानें मुद्दाम जितके मारवले तितके लोक मारले. रात्र होऊन शहाच्या तंबूवर जयाची नौबत वाजूं लागली, तेव्हां मराठ्यांच्या खंदकाबाहेर पहारे बसवून शत्रु आपल्या छावणींत परत गेले. दुसऱ्या दिवशीं सकाळीं मराठ्यांच्या छावणींत जे पुष्कळ लोक जिवंत सांपडले, त्यांपैकीं बायकांमुलांस गुलाम करून, पुरुषांची अत्यंत क्रूरपणानें कत्तल केली. यांपैकींच कांहीं इसम सुजाउद्दौल्यानें तीन लाख रुपये दंड भरून धर्मार्थ सोडून दिले. साताऱ्याजवळच्या आरळें गांवचा कुळकर्णी नारो भगवंत इब्राहीमखानाच्या तोफखान्याकडे कारकून

होता, तो या कत्तलीसाठीं उभा करण्यांत आला असतां, एका अफगाणाच्या कृपेनें वांचून परत आला. तो स्वतः पुढें वृद्धापकाळीं आपली सुटकेची हकीकत ग्रँट डफ यास सांगत असे. त्याचा उल्लेख डफनें पानिपतचे प्रसंगांत केला आहे. दक्षिण व पश्चिम दिशेनें होळकर वगैरे कांहीं मंडळी सावधगिरीनें व बेतावेतानें निभावून परत येत होती. बऱ्याच लोकांनीं हाच रस्ता घेतला; आणि याच फौजेंत हळूहळू इतरत्र पळालेले लोक सामील होऊन प्रथम जाठाच्या राज्यांत येऊन नंतर ग्वाल्हेरीवर जमा झाले. पार्वतीबाईच्या संरक्षणार्थ होळकरानें विसाजी जोगदंड यास नेमिलें होतें. परंतु तो इमानास जागला नाहीं. जानू भिंताडया नांवाचा दुसरा ऐक इसम होता, त्यानें अनेक अनर्थांतून बाईस वांचवून ग्वाल्हेरवर सुखरूप आणिलें. त्याबद्दल पुढें जानू भिंताडयास एक गांव इनाम मिळाला ( भा. व. श. पृ. ४२ ). पार्वतीबाईबरोबरच विश्वासरावाची बायको लक्ष्मीबाई या संकटांतून बचावून दक्षिणेंत आली, ती पुढें पुण्यास वारली [ का. सं. प. या. पृ. ५४१ ]. पार्वतीबाई, होळकर, नानापुरंदरे, महिपतराव चिटणीस ( धा. रा. च ). वगैरेंनीं जाठाचे मुलखांतून ग्वाल्हेरीस व भिंड येथें येऊन तेथें एक महिना मुक्काम केला. पळाचे लोक आले, त्या सर्वांस वस्त्रें व पांच रुपये खर्चास जाठाचे राणीनें दिले. तेथून नानापुरंदऱ्यानें भाऊसाहेबाचे शोधास बैरागी पाठविले. परंतु ठिकाण लागलें नाहीं.

लढाईच्या दुसऱ्या दिवशीं रणांगणावर पुष्कळ मोठमोठ्या पुरुषांचीं प्रेतें पडलीं आहेत अशीं बातमीं समजल्यावरून, अशीं प्रेतें शोधून काढून त्यांस अग्नि देण्याच्या विचारानें शेषधर पंडित, गणेश पंडित ( वेदांती ? ) वगैरे सदाशिव रावाचे माहितगार इसम बरोबर घेऊन सुजाउद्दौला आपले घोड्यावर बसून पुष्कळ वेळ समरभूमीवर फिरला. यशवंतराव पवाराचें शव त्यास सांपडलें. पुढें एका ढिगाखालीं प्रेताच्या अंगावरील तीन चार रत्नें चमकलीं तीं पाहून वरील गृहस्थांनी तें प्रेत बाहेर काढिलें. त्याच्या पायांवर व पाठीवर जखमांचे वण होते त्यांवरून हें प्रेत सदाशिवरावाचें होय असें त्या मंडळींनीं ओळखिलें, आणि पुढें काशीरायानें दुराणी शहाची परवानगी आणून त्यास अग्नि दिला.

अंताजी माणकेश्वर, बाजी हरि, नाना पुरंदरे, व मल्हारराव होळकर असे रात्रौ दिल्लीचे सुमारें चालले असतां दांडग्यांच्या हुल्लडींत फरुखाबादच्या जमीनदाराचे हातून अंताजी माणकेश्वर व बाजी हरी ठार झाले. सुजाउद्दौल्याचा सरदार उमरावगीर गोसावी यानें विश्वासराव, तुकोजी शिंदे, संताजी वाघ व यशवंतराव पवार असे चार मुर्दे तीन लक्ष रुपयांस सोडवून त्यांस ब्राम्हणांकडून विधियुक्त अग्निसंस्कार केला. नारोशंकर दिल्लीचे किल्ल्यांत असून जवळ चाळीस लाख रुपये खजिना होता. तोही गुरुवार ता. १५ रोजीं सायंकाळीं निघून गेला. बरोबर गंगोबा तात्या होळकराचा दिवाण होता. खजिना सुद्धां नारोशंकरानें तसाच मागें टाकिला. दिल्लींतील बकाल बायका देखील लष्कराचे लोकांस मारूं लुटूं लागल्या. पुढें मथुरेहून जाठाचे मुलखांत आले. जाठानें हिंदुधर्मास जागून तमाम मुलुखांत स्वार पाठवून अन्नवस्त्र देऊन सर्वांचा संभाळ केला. भरतपुरास जाठाची बायको होती, तिनें धर्म बहुत केला. भरतपुरास पावल्यावर तीस चाळीस हजार लोकांस आठ रोजांचें अन्न व ब्राम्हणांस दूध, पेढे, मिठाया वगैरे दिल्या. आठ दिवस सर्वांस आरामासाठीं राहवून घेतलें. शहरांस ताकीद केली कीं ज्यास जसें अनुकूळ पडेल, तसें जागा व अन्न द्यावें. कोणां छळूं नये. याप्रमाणें जाठानें एकंदर दहा लक्ष रुपये खर्च केला. तेणें करून बहुत लोक जगले. घायाळ शमशेर बहाद्दर कुंभेरीस (दीग येथें?) आला. सुरजमल्लानें त्याची निगा चांगली केली. परंतु भाऊ भाऊ असा शोक करून तो लवकरच मरण पावला.

एकंदरींत या संग्रामांत प्रचंड संहार झाला. मराठ्यांची एक सबंध पिढी कापली गेली. दक्षिणेंत बहुधा एक घर मृत्यूशिवाय राहिलें नाहीं. काशीराय म्हणतो, चांदी सोनें, हिरेमाणकें, ५०० हत्ती, पंनास हजार घोडे एक हजार उंट, दोन लक्ष बैल आणि तंबू वगैरे प्रवासाचा अजबाब असें पुष्कळच सामान पानपतचे छावणींत अब्दालीस मिळालें.

त्या छावणीच्या जागेंत हल्लीं दोन सतींचे चबुतरे आहेत. पैकीं एक लक्ष्मीबाई मेहेंदळे इचा होय. दोन मोठ्या विहिरी जवळ जवळ आहेत, त्यांचेंच

पाणी लष्करास पोंचत होतें. स० रा० च्या तंबूच्या जागेस 'काळा अंबा' असें नांव असून, बहुधा तेथें अंब्याचें झाड असावें. सदाशिवराव लढाईत पडला त्या स्थलावर हल्लीं एक लहानसें स्मारक सरकारानें उभारलें आहे [ य. रा. गुप्ते ].

पेशव्याच्या घरांत विश्वासरावासारखा सुंदर पुरुष झाला नाहीं. पहिला बाजीराव सुरूप होता आणि त्याचीच छाया त्याच्या या नातवावर पडली होती. विश्वासराव केवळ मदनाचा पुतळा दिसत असे. पानपतच्या समरभूमीवर पडलेलें त्याचें शव जेव्हां अहंमदशहा अब्दालीनें पाहिलें, तेव्हां तोही त्याचें सुस्वरूप व तेज पाहून फार हळहळला असें सांगतात. तो मुर्दा पहावयास संपूर्ण दुराणी लष्करांतील आबालवृद्ध जमा झाले व त्याचें सौंदर्य पाहून प्रत्येकास कौतुक वाटलें, असें बखरकार लिहितो.

दुर्दैवी रंगूंत सदाशिवरावाची योग्यता येणेंप्रमाणें वर्णिली आहे ( पृ. १०७, १५९, १७९ ). सदाशिवराव शरिरानें उंच व मजबूद दिसे. तालीम व नमस्कारांच्या अभ्यासानें त्याचें शरीर घटलेलें होतें. त्याच्यासारखा हुशार, सावध व चतुर मुत्सद्दी पेशव्यांच्या कुळांत कोणीच जन्मला नाहीं. तो जितका हुशार तितकाच शूर व साहसी होता. शिपायाचें व कारकुनाचें अशीं दोनही कसबें त्यास अवगत होतीं. त्याच्या स्वभावांत हट्ट व गर्व नसता तर, त्यानें पेशवाईस हिंदुस्थानच्या सार्वभौम पदास पोंचविलें असतें. दक्षिणेंतून निघाल्या दिवसापासून पुढचीं धोरणें बांधून रोज हिंदुस्थानांतील प्रमुख लोकांस तो दहा पांच पत्रें पाठवी. ज्या मुलखांतून तो जाई, त्यांत लुच्चे कोण त्याचा बारकाईनें शोध करून तेथून निघण्यापूर्वी त्यांचा बंदोबस्त करी. लढाईच्या प्रसंगीं फौजेच्या मागें पायबंद नसावा, हें लढाईचें धोरण त्यानें चांगलें ध्यानांत ठेविलें. फौजेला धान्याचा पुरवठा करण्यांतही त्यानें हयगय केली नाहीं. फौजेंतील प्रत्येक पथकाच्या तर्तुदीची व्यवस्था तो स्वतः पाहत असे. तो अत्यंत निरलस होता. पहाटेस उठून स्नान संध्या व हजार नमस्कार उरकून लगेच सर्व कामें स्वतः करूं लागे व निकाल ताबडतोब करी. त्याच्याच तालमेंत विश्वासराव

तयार होत असून तोही शूर व शहाणा होत चालला होता. त्यास आयुष्य असतें तर त्यानें इतिहासांत आपलें नांव चिरस्थायी करून ठेविलें असतें. सदाशिवरावाचा क्रोध मात्र अनावर होता. वास्तविक त्याच्याठायीं हा मोठा दोषच होता. खऱ्या माणसास क्रोध बहुधा आवरत नसतो. पण राजकारणांत पडलेल्या माणसानें क्रोधाचें वारें बिलकुल आपणास शिवूं देतां नये. एवढा दोष सोडला तर त्याचे सर्व गुण राज्याला पोषक असेच होते. शिंदे होळकरांच्या फौजांनीं गिलच्यांची धास्ती खाल्ली होती, परंतु सदाशिवरावास शत्रूची धास्ती अशी कधींच वाटली नाहीं. गिलच्यांस मारूं ही त्याची हिंमत अगदीं अखेरच्या वेळेपर्यंत कायम होती. त्याचा सरंजामही तसाच होता. इब्राहीमखानाच्या तोफखान्याची करामत शिंदे होळकर किंवा गिलचे यांस माहीत नव्हती. हुजरातीचे निवडक स्वार व इब्राहीमखानाचीं कवायती पलटणें व तोफखाना यांच्या जोरावर आपण सर्व शत्रु पादाक्रांत करूं अशी सदाशिवरावास खात्री होती. बलाढ्य शत्रूंसमोर पर्वताप्रमाणें छातीठोक उभें राहण्याचें त्याचें धैर्य, पोटच्या पोरासारखी त्याची फौजेची जपणूक, सर्व हिंदुस्तानाची सूत्रें आपल्या हातांत ठेवून चालविण्याची त्याची धमक, कामामधील त्याची जबरदस्त उरक, त्याचें निर्लोभ व करारी आचरण, आणि त्याच्या भव्य व तेजस्वी स्वरूपानें दुसऱ्यास नमवून सोडणारा त्याचा दरारा या गुणांच्या जोरावर या स्वारींत तो यश मिळविणार, अशी लोकांची खात्री होती. त्याच्या हातून चुका झाल्या, परंतु शेवटीं यश मिळालें असतें तर या चुका केवळ सत्क्रियाच भासल्या असत्या. होळकरास त्यानें कधींही अयोग्य रीतीचें उत्तर केलें नाहीं, सर्व प्रमुख मंडळींची नेहमीं सल्ला घेऊन, स्वतःच्या विचारानें काय करणें तें तो करीत असे. युद्धशास्त्राची विशिष्ट माहिती नसल्यामुळें डावपेंचांत जरी त्याची चतुराई विशेष नसली, तरी निश्चय व शौर्य हे गुण त्याचे अंगीं भरपूर होते. फौजेची त्याजवर अत्यंत भक्ति असून याची त्यांजवर जरबही तशीच होती. सर्व शिपाई त्याजकरितां प्राण देण्यास तयार असत.'

पानिपतच्या मोहिमेसंबंधानें सदाशिवरावाच्या स्वतःच्या फौजेचा खर्च

दरमहा सहा लाख रुपये म्हणजे दहा महिन्यांचा खर्च साठ लाख व शेवटच्या चार महिन्यांतील महागाईबद्दल आणखी चाळीस लाख मिळून एक कोट रुपये झाला, असा रा. राजवाड्यांचा अंदाज आहे ( खं. १ टीप २८७ ). स्वतंत्र सरदार आपले खर्च आपण भागवीत. परंतु त्यांचीही शेवटीं शेवटीं तारां-बळ उडून कांहीं दिवस सर्वांचेंच ओझें सदाशिवरावावर पडलें. शिवाय उत्तर हिंदुस्थानांतील तमाम मुलखाचा वसूल स्वतःच कमाविसीनें उगवून आण-ण्याची व्यवस्था सदाशिवरावाने केली, आणि त्याजबद्दल नानासाहेबासही वैषम्य वाटलें, असे उल्लेख आहेत. सर्व फौजांचा मिळून एक वर्षाच्या या मोहिमेचा खर्च जवळजवळ तीन कोटी झाला, असा बखरींचा अंदाज आहे, तो फारसा चूक वाटत नाहीं. ह्या खर्चाचें मोठेंसें ओझें पेशव्यांस वाटलें नाहीं.

९. **अब्दालीचें नफा नुकसान.**—नुसती प्राणहानि सोडून दिली तर पानपतच्या ह्या संग्रामांत अब्दालीचें कांहीं कमी नुकसान झालें नाहीं. त्याच्या दीड वर्षाच्या मोहिमेंत लढाईचे पुष्कळच प्रसंग झाले, त्या सर्वांत मिळून पुष्कळ लोक प्राणांस मुकले. शेवटच्या दिवशीं सुद्धां त्याचा संहार कांहीं थोडा झाला नाहीं. मात्र त्यानें रोहिल्यांस पुढें केलें; त्यामुळें रोहिले बहुतेक सर्व कापले गेले. सुजाउद्दोला थोडासा अंग चोरून वागला. एकं-दरींत हिंदुस्थानांतील या उद्योगापासून लभ्यांशापेक्षां नुकसानच ज्यास्त, अशी त्याची खात्री झालेली दिसते. होळकराचा निघून जाण्याचा सल्ला न ऐकतां नारोशंकर दिल्लीस नेट करून राहता, आणि ग्वाल्हेरपर्यंत आलेल्या दक्षिणच्या फौजा पुढें चालून येत्या, तर अब्दाली बहुधा पानपतावरून परभारेंच स्वदेशीं गेला असता, असे सटवाजी जाधव, नाना फडणीस वगैरेंचे उल्लेख वर दिलेच आहेत. दिल्ली सोडून मराठे पळून गेले असें पाहून, पानपतच्या संग्रामानंतर सातवे दिवशीं अब्दाली दिल्लीस आला. राजधानीचा कबजा घेऊन सुजास वजिरी व नजीबखानास बक्षीगिरी देऊन, तेथें त्यानें स्थिरस्थावर केली. सुमारें दीडदोन महिने अब्दालीचा मुक्काम दिल्लींत झाला. परंतु या अवधींत साथीदारांचें व त्याचें सडकून वितुष्ट

आलें. सुजाउद्दौला त्यास सोडून गेला. नजीबखानानें आपले वकील पेशव्याकडे सलुखास पाठविले. लवकरच पेशवा स्वतः येऊन सर्व बंदोबस्त करील अशी दिल्लींत समजूत झाली. 'भगवत्कृपेंकरून श्रीमंतांचें राज्य कायम आहे' [ १.२८२ ]. याउपरी ईश्वरें दिवस उत्तम आणिले, उगवते दिवस आलेसें दिसतें' [ ६. ४१२ ]. 'युद्धच आहे, यशापयश ईश्वराधीन असतें,' अशी सर्वत्र आशामय भावना होऊन, अब्दालीस पुढील मार्ग संकटमय वाटूं लागला. हिंदुस्थानची पातशहात मिळविण्याची त्यास हाव असलीच तर ती, त्याच्या दुराणींनीं दिल्लींत प्रचंड बंडावा उपस्थित केला, त्यामुळें साफ नाहींशी झाली. दोन वर्षांचा तुंबलेला पगार एकदम चुकवून देऊन स्वदेशीं चलावें, अशी त्यांनीं निकराची मागणी केली. ती अमान्य करितांच सर्व फौजेनें दिल्लींत बंड केलें. लोकांची समजूत कांहीं केल्या होईना. अब्दालीच्या छावणींत एकच गोंधळ उडून गेला. हा प्रकार पाहून सुजाउद्दौला अब्दालीस सोडून अयोध्येंत निघून गेला. पैशाची अडचण मिटविण्यासाठीं अब्दालीनें नजीबखानास निकड लाविली, तेव्हां मोठ्या शिकस्तीनें त्याजपासून चाळीस लाख रुपये अब्दालीस मिळाले. मध्यंतरीं इराणी फौजेनें अफगाणिस्तानावर चाल केल्याची खबर आली, तेव्हां अनेक विवंचनांनीं त्रासून अब्दालीनें ता. २२.३.१७६१ रोजीं शालिमारची आपली छावणी उठवून स्वदेशीं प्रयाण केलें. [ Tate ].

सतलज पावेतों आपलें राज्य असावें अशी अब्दालीची आकांक्षा होती. परंतु याच सुमारास पंजाबांत शीखांचा जोर वाढूं लागला, तेणेंकरून मराठे व शीख असे दोन शत्रु त्यास उत्पन्न झाले. शीखांनीं लाहोर काबीज केल्याचें ऐकून स. १७६१ च्या अखेरीस अब्दाली पुनः पंजाबांत आला. लाहोर शहर त्यानें परत हस्तगत केलें आणि ५.२.१७६२ रोजीं लुधियाना नजीक त्यानें शीखांचा पराभव केला. परंतु तो निघून गेल्याबरोबर पुनः शीखांनीं सर्व पंजाब प्रांत परत मिळविला; तेव्हां दोन शत्रूंशीं सामना करणें धोक्याचें वाटून मराठ्यांशीं त्यानें आपलें भांडण मिटविलें. नाना सा० पेशवा वारल्यावर

मराठ्यांचेही उत्तरेंतील उद्योग थोडे मंदावल्यामुळें उभयतांची गोडी सहजच झाली. दिल्लींतून हिंगण्यांचे मार्फत कांहीं दिवस वाटाघाट चालून अब्दालीचे वकील गुलराज व आनंदराम दक्षिणेंत पेशव्यांकडे आले. फेब्रुवारी व मार्च स. १७६३ त हे वकील सुमारें एक महिना इकडे होते. त्यांजबरोबर करार झाला कीं, 'ती० कैलासवासीयांच्या वेळेस ज्याप्रमाणें अंमल होता, त्याप्रमाणें परगणियांत अंमल शहांनीं ताकीद करून देवावा. याप्रमाणें जाल्यास वाकिलांस चाळीस हजारांची जहागीर अंतर्वेदींत देण्याचा करार' पेशव्यानें लिहून दिला. [ ८·३·१७६३–मा. पे. रो. १·१, ६, ७; व इ. सं. ऐ. टि. १·५६ ]. या वाकिलांचा बंदोबस्त पेशव्यानें अहंमदनगरास ठेविला होता. पेशव्यास त्यांनीं अब्दालीकडील पोशाख आणिले आणि पेशव्यानें भद्रगज हत्ती अब्दालीस नजर केला. याप्रमाणें मराठ्यांशीं गोडी झाली, पण शीखांनीं मात्र त्याचा पंजाबांतून साफ उठाव केला. एकदां स. १७६७ त तो पंजाबांत आला. पण त्यामुळें लभ्यांश कांहीं झाला नाहीं. अशा प्रकारें हिंदुस्तानच्या इतिहासावर चिरंतन परिणाम घडविणारा हा प्रसिद्ध पुरुष वयाचे ४८ वे वर्षी ता. १९·१०·१७७२ रोजीं काळपुळीच्या विकारानें चमननजीक मरण पावला. त्याचा मुलगा तयमूरशहा बापासारखाच उपद्व्यापी होता. गादीवर येतांच त्यानें वजीर शहावलीखानास ठार मारिलें. अति मद्यप्राशनानें विकार होऊन तयमूरशहा १८·५·१७९३ रोजीं मरण पावल्यावर त्याचा मुलगा जमानशहा गादीवर बसला, त्याचा संबंध पुढें इंग्रजी कारभाराशीं येतो.

**१०. पेशव्याची शेवटची स्वारी** [जानेवारी—मार्च १७६१].—निजामावर नजर ठेवण्याच्या इरायानें या सालीं पेशवा दसऱ्यानंतर ता. २२ ऑक्टोबर रोजीं बाहेर पडून डिसेंबर अखेर नगराचे बाजूस राहिला. १४·११·६० चें पत्र ( ३·२१० ) सदाशिवरावाचें पेशव्यास गेलें त्यांत पानपतावर फौजांची समीपता झाल्याचा मजकूर आहे. त्यानंतर पत्रें न आल्यानें पेशव्यास चिंता उत्पन्न झाली आणि अनेक लोकांस तिकडे त्यानें निकडीचीं पत्रें लिहून खबर विचारिली. विश्वासरावाचें एक पत्र आहे तें असें. 'फौजेत रसदेची

व पैशाची तूट पडल्यामुळें फार हलाकी आहे. गिलचे यांचा पेंच भारी पडला आहे. तरी या समयीं ५० हजार फौज व एक क्रोड खजिना यांची मदत सत्वर न आल्यास निभावणी कठिण आहे. केवळ अगतिक म्हणोन पत्र लिहीत आहें. मी आपल्याकरितां लिहीत नाहीं. माझ्यासारखे पुत्र आपल्यास आणखी आहेत व होतील, परंतु भाऊसा० सारखा बंधु मिळणार नाहीं.'[1] ता. २० नोव्हेंबरास फौजेची मुळींच हलाखी नव्हती, तथापि महादोबा पुरंदऱ्यानें एकदम मदतीस जाण्याविषयीं पेशव्यास आग्रह केला. हा पुरंदरे चतुर व अनुभवी गृहस्थ क्षयाचे व्यथेनें याच नोव्हेंबरांत मरण पावला [भा. व श.]. अक्कलकोटकर फत्तेसिंग भोसले सुद्धां ता. २० नोव्हेंबर रोजीं मरण पावला. डिसेंबर २१ रोजीं पेशव्याचा मुक्काम राक्षसभुवनावर होता. २७ डिसेंबरास त्यानें पैठणास दुसरें लग्न केलें. मुलगी नारोबा नाईक वाखरे देशस्थ सावकाराची केली. नांव राधाबाई. पुढें लगेच पेशवा उत्तरेंत निघाला. बरोबर जानोजी व मुधोजी भोसले, बाबूजी नाईक, गोपाळराव गोविंद पटवर्धन, सदाशिव रामचंद्र, यमाजी शिवदेव, विठ्ठल विश्राम, इत्यादि मंडळी होती. रघुनाथरावही प्रथम बरोबर होता, परंतु तो ९ जानेवारीस सखाराम बापूसह निघून निजामास आणावयास गेला [ ऐ. ले. सं. १-२६ ], तो पुढें एप्रिलांत पुण्यास आला. भेलसा येथें पानपतच्या सावकारांचा कासीद पौष शु. १३ स ( १९.१.६१ ) निघालेला सहावे दिवशीं म्हणजे ता. २४ जानेवारीस भेटला; त्याजवळ एक कागद मिळाला, त्यांत मजकूर कीं, 'दोन मोती गलत. दसवीस अश्राफत; रुपयोंकों गणति नहीं.' मागाहून हळू हळू ज्यास्त मंडळी येऊन दररोज नवीन नवीन हृदयद्रावक बातमी पेशव्यास कळत गेली. एकदां ऐकावें भाऊसाहेबाची फत्ते झाली, पुनः ऐकावें मोड झाला. अशा स्थितींत वास्तविक प्रकार समजण्यास पुष्कळच कालावधि लागला. महिना दोन महिने तर खऱ्या खोट्या अनेक बातम्या कानावर येऊन पेशव्याच्या व एकंदर मंडळींच्या

---

१ टीप.–हें पत्र बखरीचे आधारावर रा. चिं. वि. वैद्य यांनीं बनवून त्यास २०.११.१७६० ही मिति जोडली आहे.

मनाचा असा कांहीं गोंधळ उडाला कीं, खरोखरच वेड लागण्याची पाळी आली. दररोज किंबहुना दरघटकेस कोणी तरी नवीन इसम किंवा वर्तमान येऊन ऐकणारांच्या मनांत आशा व निराशा यांचें भयंकर काहूर उठत असे. प्रत्येकास कांहीं तरी थोडी हकीकत ठाऊक, समग्र कोणासच ठाऊक नाहीं. या घोटाळ्यानें मनाची त्रेधा होऊन मुख्य उद्योग राहिला. बाबूराव व यशवंतराव कोन्हेर हे भोसल्यांचे दोन सरदार झांशीस होते त्यांस पेशव्यानें बरीचशीं पत्रें लिहिलेलीं आहेत. ' खासा स्वारी हिंदुस्थनांत सत्वर होणार, बरोबर मातबर तोफखाना आहे, तर बैल चांगले मजबूद, तयार ठेवावे; तमाम राजेरजवाड्यांस लिहून सामील होणें' [ २२·११·१७६०; ३·१९७, २२७ ]. माळव्यांतच त्यांस भेटावयास बोलावून, पेशव्यानें तोफा, सामान वगैरे जमा करविलें [ ३·१९८, १९९, २०६, २१४; ऐ. ले. सं. १·२८ ], आणि पुढें चाल ठेविली.

' प्रस्तुत सर्व मंडळी बरोबर आहे. दिल्लीकडे जावयाचा निश्चय आहे. भाऊसाहेबांवर येऊन बेतली आहे. भाऊसाहेबांची हिंमत मोठी जे, साठ कोसांवर मराठी फौज उभी राहत नव्हती ते नेऊन झुंजावयास लाविली. ईश्वर त्यांस यश देईलच,' [९· १· १७६१, ऐ. ले. सं. १· २६]. नानासाहेबानें नेहमींच्या स्थितींत दिल्लीवर जाण्याचा हा निश्चय अंमलांत आणिला असता. परंतु दररोज नव्या नव्या बातम्या येऊन, त्याचें हृदय विदीर्ण झालें. भाऊसाहेबासारखा पराक्रमी भाऊ व विश्वासरावासारखा सुलक्षणी मुलगा गेल्याचें ऐकून त्याचें हृदय खचलें. त्यांत परत आलेल्या मंडळींत वृद्ध मल्हारराव त्यास भेटला. मल्हाररावाची वृत्ति तर नारोशंकरासही दिल्लीवर टिकूं देत नव्हती. तेव्हां त्याच्या सल्ल्यानें पुढें जाण्याचा बेत पेशव्यानें राहित केला. पानपताचें वर्तमान विजेसारखें हिंदुस्थानभर पसरलें. ठिकठिकाणचे मराठे अंमलदारांस भीति उत्पन्न झाली. ' लखनौस खुशाली झाली. नाना प्रकारच्या कंड्या पिकूं लागल्या. हुंड्या कोणी स्वीकारीना, [ ३·५१२ ]. ' गनीम सर्व एकत्र होऊन मथुरेवर जमा झाल्याची वार्ता आहे. हा काळ बहुत कठिण दिसतो. परिणाम काय होईल तो पहावा ' [ ३·५१०, ५१३, ५१५ ]. ' भाऊ, जनकोजी शिंदे

जमिराकडे आहेत. प्रांतांत रांगड्यांनीं मोठी धुंद मांडली आहे. लोकांनीं ोर सोडिले. ठाणींठुणीं राहणें संकट जाहे. स्वामीचें आगमन होऊन बंदोस्त झाला तरी ठाणीं राहतील. नक्ष होईल. यवनही बहुत हलकेंत आला ाहे.' असें ता. २३·२·६१ रोजीं बाबूराव कोन्हेर पेशव्यास लिहितो [३·२०१]. ोच नानासाहेबनें सिहोराहून जबाब लिहिला. ' भाऊकडील लढाई बिघडली खबर येऊन रांगडे लबाडी करावयास चुकणार नाहींत. तरी तुम्हीं जागांचा ाजबुदी ठेवणें. तुम्हीं तपशीलवार मजकूर लिहिला तो यथार्थ, परंतु प्रस्तुत ौजांनीं गिल्च्यांवर जाऊन जोर करणें कळतच आहे. जमीनदारांचे पारिपत्य रण्याकरितां फौजा रवाना केल्या आहेत.' [ ३·२०६ ]. पेशव्यानें महिपतावास पाठवून बाबूराव कोन्हेरकडून चार तोफा झांशीच्या आणविल्या [३·२०७]. वहूंकडून आकाश कोसळलें तरी नानासाहेबाचा धीर सुटला नव्हता.

सदाशिवराव ज्या वाटेनें गेला त्याच वाटेनें नाना सा० ही माळव्यांतून ता. ७ फेब्रुवारीपर्यंत भेलशास मुक्काम करून पुढें सिहोर, सिरोंजवरून ग्वालेरच्या अलीकडे पछोरापर्यंत गेला. या ठिकाणीं राहून ठिकठिकाणच्या कारभाराची व्यवस्था त्यानें लाविली. पुढें जावें कीं परत फिरावें या संबंधानें या ठिकाणीं पुष्कळ भवति न भवति झाली. पुष्कळांचा विचार पुढें जाऊन सर्व काम पुरें करावें असाच होता. नारो शंकरास दिल्लींतून पळून जाण्याचें कांहीं एक प्रयोजन नव्हतें. पूर्वीच्या अब्दालीच्या स्वारींत तो असाच पळून गेला, त्या नामर्दीबद्दल त्याचा शिरच्छेदच केला पाहिजे, असें अंताजी माणकेश्वर म्हणे [ इ. सं. ऐ. टि. २·३१ ]. एकादा युरोपीय सेनाध्यक्ष दिल्लींत अशा स्थितींत असता तर तो अगदीं शेवटच्या क्षणापर्यंत तेथून हालला नसता. परंतु मल्हाररावाची सल्ला पुढें जाण्याची नव्हती. नानासाहेबाचा मुलगा माधवराव हा जवळ होता परंतु लहान होता. पेशव्यास हिंमत देणारा व अधिकारानें मसलत सांगणारा एकही इसम पूर्वीच्यां पैकीं राहिला नाहीं. शिवाय स्वतः त्याची प्रकृति अत्यंत क्षीण होत चालली होती. तो दिल्लीपावेतों गेला असता तर पानपताच्या अरिष्टाचा वचपा भरून अपयश धुऊन निघालें असतें. 'होळकर,

विठ्ठल शिवदेव, नारोशंकर वगैरे मंडळी भेटली, सर्व वृत्तान्त निवेदन केला. श्रीमंतांनीं ऐकोन बहुत खेद केला. त्यांचा निश्चय कीं दिल्लीस जाऊन गिलच्यांचें पारिपत्य करावें. अशी विचारणा करून बंदोबस्त करीत असतां, गोपिकाबाईनीं बहुत बोध करून माघारे फिरविलें. फाल्गुन शु. २ (२२ मार्च). राजा परत निघाले. 'पुढें जावयाचा निदिध्यास प्रधान पंत यांणीं धरिला. श्रीप्रयागीं जावें, तेथें नावेमध्यें बसोन नाव बुडवावी ऐसें चित्तभ्रमेंकरून बोलों लागले. तेव्हां सर्वांनीं, चिन्ह ठीक दिसत नाहीं, ऐसा निश्चय करून, पुढें कूच झालें, ऐसें समजावून, दर मजल पुण्यास येऊन पावले.' [धा. रा. च. पृ. २९]. निघण्यापूर्वी त्यानें त्या बाजूचीं प्रकरणें बरींच विल्हेस लाविलीं. प्रकृति अस्वस्थ पाहूनच गोपिकाबाईनें परत येण्याचा आग्रह धरिला. नानासा०चें वजन स. १७५४ त १७८ पौंड होतें तें या वेळीं ११४ झालें. भाऊ भाऊ ऐसा शोक रात्रंदिवस करीत जूनचे आरंभीं स्वारी पुण्यास दाखल झाली. जनकोजी व सदाशिवराव यांच्या मृत्युसंबंधानें संशयनिवृत्ति पुढें पुष्कळ दिवस झाली नाहीं. मात्र इब्राहीमखान गारदी घायाळ होऊन पकडला गेला, त्यास अब्दालीनें मारून टाकिलें; आणि महादजी शिंदे घायाळ होऊन वांचला, हें कळलें.

मुसलमानांच्या पदरीं सुद्धां बोलाचाली करण्याच्या वकिलीच्या कामावर हिंदु लोकच असत हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. बरखुरदारखानाचा दिवाण मोतीलाल खत्री, नजीबखानाचा मेघराज, भाऊसाहेबाचा बाबू पंडित, हीं नावें काशीराय देतो. राजा वेणीबहादूर हा सुजाउद्दौल्याचा दिवाण त्या वेळीं सुप्रसिद्ध होता.

११. **पानपतच्या संग्रामाचा निष्कर्ष. (१) कागदपत्रांचा अभाव.**– या अवाढव्य झगड्यांत अनेक प्रसंग इतके विचित्र व भयंकर घडून आले कीं, त्यास प्राचीन काळच्या महाभारतासारखें प्रचंड स्वरूप आलें आहे. सदाशिवराव भाऊ, जनकोजी शिंदे, इब्राहीमखान गारदी, इत्यादि अनेक पुरुषांचा हृदयद्रावक अंत व एकंदर प्रसंगांत घडलेला विलक्षण संहार, यांच्या योगानें या झगड्याचें स्मरण महाराष्ट्राच्या मनांतून कधींही लुप्त व्हावयाचें नाहीं. अलीकडील

संशोधनांत वीस वर्षांपूर्वी रा. राजवाड्यांनीं या प्रकरणाची चर्चा केली, तेव्हांपासून आणखी कांहीं नवीन पुरावा बराच पुढें आला आहे; तरी अद्यापि न उलगडलेले भागही पुष्कळ आहेत. सदाशिवरावाची एकट्या बुंदेल्यास दहा महिन्यांत लिहिलेलीं पत्रें जर तीनशें सांपडतात, तर असंख्य सरदारांस, रजपूत वगैरे रजवाड्यांस व खुद्द पुण्यांत पेशव्यांस किती तरी पत्रें त्यानें लिहिलीं असलीं पाहिजेत. पेशव्यास स्वारींतून अनेकांनीं लिहिलेलीं पत्रें पुण्याच्या दप्तरांत शाबूद आहेत कीं नाहींत कोणास ठाऊक ! शिंदे, होळकर, गायकवाड वगैरे लहान मोठ्या सरदारांनीं, त्यांच्या हस्तकांनीं, सटवोजी जाधव, नाना फडणीस, किंवा कृष्ण जोशी यांच्यासारख्या इतर असंख्य लोकांनीं, दक्षिणेंत आपापल्या यजमानांस किंवा नातेवाईकांस या दहा महिन्यांत पुष्कळच पत्रें स्वारींतून लिहिलीं असलीं पाहिजेत. काळजीपूर्वक शोध होईल तर काळाच्या तडाख्यांतून वांचलेले कित्येक कागद अद्यापि सांपडण्याचा संभव आहे. महाराष्ट्राबाहेर रजपूत, जाठ, बुंदेले राजे वगैरे लोकांना त्यांच्या हस्तकांनीं ठिकठिकाणांहून कांहीं तरी वर्तमानें, आपापल्या मतलबापुरतीं तरी, त्यांच्या भाषांत अवश्य लिहिलेलीं असलीं पाहिजेत. याशिवाय ऊर्दू भाग तर सर्वथैव अज्ञातच आहे. निरनिराळे मुसलमान सरदार, मोगल दरबारांतील नाना व्यक्ति, अब्दाली, सुजाउद्दौला, नजीबखान इत्यादिकांनीं आपापसांत अनेक पत्रें लिहिलीं असलीं पाहिजेत. म्हणजे अर्व्हिननें जसा स. १७०७–३९ पावेतोंचा मोगल बादशाहीचा सायंत इतिहास लिहिला आहे, तसा पानपतच्या काळाचा तपशीलवार इतिहास अस्सल कागदांवरून अद्यापि कोणीं लिहिलेला नाहीं. सांगण्याचा मुद्दा इतकाच कीं, आपणांस जी काय माहिती आज उपलब्ध आहे, ती सर्व एकतर्फी मराठ्यांचे बाजूची असून, विरुद्ध बाजूची हकीकत पन्नास वर्षांपूर्वी लिहिलेल्या एल्फिन्स्टनच्या ग्रंथापलीकडे बिलकूल बाहेर आलेली नाहीं. इंग्रज व्यापाऱ्यांचा पत्रव्यवहारही अद्यापि अज्ञातच आहे. सारांश, यासंबंधानें एकंदर संशोधन कोठें, कसें, व किती व्हावयास पाहिजे तें यावरून कळून येईल. मात्र पानपत प्रकरणांत मराठी गद्याचे कित्येक अप्रतिम मासले हल्लीं सुद्धां एकवटलेले दिसतात.

एवढ्या मोठ्या प्रकारणासंबंधानें संपूर्ण अथवा थोडा बहुत तरी तपास माधवराव पेशव्यानें केला नसेल हें संभवत नाहीं. त्यानें पुनः दिल्लीवर आपल्या फौजा पाठविल्या, तेव्हां मागील व्यवहारांची तपासणी अवश्य झाली असली पाहिजे. माधवरावानें होळकरास तंबी दिली, नारो शंकरासारख्या अनेक कुचर मंडळांचा झाडा घेतला, तेव्हां, ‘मोडलेल्या झुंजाची शिफारस कशास लिहावी !’ ‘आयुष्यापुढें कोणाचा उपाय नाहीं !’ असे जबाब या मंडळींनीं माधवरावास दिलेले उपलब्ध आहेत. त्यांवरून आणि पुष्कळांचीं उत्पन्नें त्यानें खालसा केलीं यावरून, त्या खरमरित पेशव्यानें पुष्कळ तपास केला होता यांत संशय नाहीं. ते कागद कधीं तरी बाहेर येणें शक्य आहे काय ? सारांश, हल्लींचे या प्रसंगाचे वृत्तान्त पुष्कळसे अपूर्ण आधारावर रचलेले असून बरेचसे कल्पनेनें सजविलेले आहेत, एवढें तरी वाचकांनीं सदैव ध्यानांत बाळगिलें पाहिजे. तसेंच न्यायाधीशाची निष्पक्षपात बुद्धि जागृत ठेवूनच या प्रकरणावर अभिप्राय दिले पाहिजेत. बखरकारांचा कल कल्पनेच्या भरारींत अद्भुत वर्णनांनीं वाचकांचें चित्त उद्दीप्त करण्याचा केव्हां केव्हां दिसतो. सदाशिवरावानें मोगल दिवाणखान्याचें छत फोडिलें, सुजावर फाजील विश्वास टाकिला, जाठास दुखविलें, शत्रूकडील बातमी ठेविली नाहीं, गर्वाच्या ताठ्यांत अनेकांची हितकर सल्ला झुगारून दिली, वगैरे कारणें निव्वळ काल्पनिक नसलीं तरी निदान अतिशयोक्तीचीं तरी असावीं. एवढ्या मोठ्या प्रकरणांत असे प्रकार हल्लींच्या व्यवस्थेच्या व टापटिपीच्या काळांतही जर अपरिहार्य आहेत, तर त्या वेळच्या संबंधानें बोलावयासच नको. काशीराय तर उघड उघड मुसल्मानांचाच पक्षपाती दिसतो. बहुतेक लोक परिणामावरून निकाल देतात. अब्दालीवर समोर आघात करून आदले सालीं घडलेला दत्ताजी शिंद्याच्या मृत्यूचा पुरेपुर सूड घेणें व दहा वर्षें भिजत पडलेला हिंदुस्थानांतील उद्योग तडकाफडकी विल्हेस लावणें, या निश्चयानेंच पटदुरास संपूर्ण वाटाघाट करून स. १७६० च्या ता. १४ मार्च रोजीं सदाशिवराव स्वारीस निघाला. हा हेतु त्या वेळीं सर्वस्वी सिद्धीस गेला नाहीं एवढ्यावरून, सदाशिवरावाच्या वर्तनांतील

कित्येक क्षुल्लक मुद्दयांस नसतें महत्त्व देणें वाजवी नाहीं. पानपतच्या संग्रामास नुकतींच एकशें साठ वर्षें पुरीं झालीं, तरी त्या अपयशाची जबाबदारी कोणावर किती येते, हा अद्यापि मोठ्या वादाचा मुद्दा होऊन राहिला आहे. त्याची शहानिशा करितांना पुढील कारणें स्पष्ट होतात.

(२) **अपजयाचीं पूर्व कारणें.**—या मुद्दयाचा विचार करितांना पानपतचा संग्राम दोन भिन्न दृष्टींनीं ध्यानांत घ्यावा लागतो. प्रथम, असा आणीबाणीचा प्रसंग मुळीं उत्पन्न होण्याचीं कारणें काय ? व दुसरी, एकवार भयंकर पेच येऊन पडल्यावर त्याची योग्य निभावणी कां झाली नाहीं ? इ. स. १७५० त शिंदेहोळकरांनीं बादशहाशीं विशिष्ट करार करून, सिंधुनदीपासून बंगालच्या उपसागरापावेतोंच्या प्रदेशाची चौथाई संपादन केली; म्हणजे एवढ्या विस्तृत प्रदेशांतील बादशहाच्या शत्रूंचें निवारण करण्याची जबाबदारी शिंदेहोळकरां-मार्फत पेशव्यानें आपल्या अंगावर घेतली. ' ही जबाबदारी तुम्ही कशी पार पाडतां ती पाहूं ! ' अशा भावनेनें मुसलमान पक्ष अब्दालीस पुढें करून मराठ्यांशीं झगडूं लागला. तेव्हांपासून मराठ्यांनीं दिल्लीस जाऊन बंदोबस्त करावा, आणि त्यांची पाठ वळली म्हणजे अब्दालीनें आंत येऊन मराठ्यांची व्यवस्था मोडून टाकावी, असा खेळ दहा वर्षें चालून, त्यांत अब्दाली व मराठे यांची अपरिहार्य पकड उपस्थित झाली. तिचा निकाल पानपतावर लागला.

वरील करारानें आपण केवढी जबाबदारी अंगावर घेतली याची जाणीव अगदीं कंठावर येईपर्यंत पेशव्यास असावी तशी नव्हती. स. १७५० पासून दोन वर्षें तो साताऱ्च्या भानगडींत गुंतलेला असून, त्यानंतर त्यानें आपलें लक्ष दक्षिणेंत कर्नाटकच्या कारभारांत घातलें आणि उत्तरेचा कारभार सर्वस्वी अन-भ्यस्त व नालायक अशा रघुनाथरावावर सोंपविला. (१) स. १७५० नंतर स्वतः पेशवा एकदांही उत्तर हिंदुस्थानांत गेला नाहीं. एकवार जर तो तिकडे स्वतः गेला असता, तर किंवा निदान स० रा० बरोबर तो पानपतच्या मोहिमेवर जाता तर, तिकडील व्यवहार त्यानें असे निकरावर येऊं दिले नसते, असें त्याच्या इतर कर्तबगारीवरून खास अनुमान होतें. (२) स. १७४६

पासून शिंदे–होळकरांचें वांकडें होतें तें उत्तरोत्तर वृद्धिंगत होत गेलें. हिंगणे, अंताजी माणकेश्वर, बुंदेले, विठ्ठल शिवदेव, नारो शंकर वगैरे उत्तरेंत वावरणारे सरदार आपआपसांत भांडून मुख्य कारभार बिघडवीत होते, त्यांस ताळ्यावर आणण्याची ताकद रघुनाथरावाचे अंगीं बिलकूल नव्हती. उलट त्यानें तिकडील कारभारांत आपल्या नालायकीनें ज्यास्तीच गोंधळ उडवून दिला; संधि आली असतां अब्दालीवर चालून जाण्याऐवजीं, अब्दाली स्वदेशीं निघून गेल्यावर, मागाहून अटकेपर्यंत पोकळ झेंडे फडकावून, कांहीं एक बंदोबस्त केल्याशिवाय परत येऊन, अब्दाली दहशत खाऊन पळून गेला, अशी भलतीच समजूत स्वतःच्या बढाईत त्यानें पेशव्याची करून दिली. यामुळें पेशवा निर्धास्त राहिला. (३) रघुनाथरावास कोणत्याही वादांत स्वतः निर्णय देण्याची ऐपत कधींच नव्हती, त्यामुळें हाताखालचे लोक आपआपल्या दृष्टीनें त्यास जें सांगत त्यास होस हो म्हणून तो वेळ मारून नेई. आतां एकास एक सांगावें आणि पुढच्या क्षणीं दुसरा त्याचे उलट सांगणारा आला कीं त्यासही हो म्हणावें. अशा अनिश्चितपणामुळें त्याचा लोकांवर धाक किंवा दाब मुळींच बसत नसे. (४) काशी प्रयाग वगैरे हिंदूंचीं तीर्थस्थळें मुसलमानांचे हातून सोडविण्याची पेशव्याची आज्ञा बाजूस ठेवून, रघुनाथरावानें जयाप्पास नागोरचे स्वारींत जाऊं दिलें. तिकडे जयाप्पाचा खून होऊन प्रकरण इतकें अंगावर आलें कीं तें निस्तारतां पुरे वाट झाली, आणि वरती रजपूत लोक चाळीस वर्षें मराठ्यांचे पूर्ण पाठीराखे होते, ते तेव्हांपासून त्यांचे वैरी बनले. पानपतच्या संग्रामांत रजपुतांचें पाठबळ असतें तर मराठ्यांचा असा घात खचीत झाला नसता. सारांश, नजीबखान वगैरे मराठ्यांचे द्वेष्ट्यांस जोर येण्याचें आदिकारण रघुनाथराव होय. स. १७५० नंतर शिंदे होळकर सर्वस्वी पृथक्पणें वागत होते. एकाचा उद्योग संपल्यावर दुसऱ्यानें काय तें करावयाचें, संगनमतानें म्हणून वागावयाचें नाहीं, ही त्यांची बेबंदशाही रघुनाथरावानें चालूं दिली. हा प्रकार इतका विकोपास गेला होता कीं, स. १७५९ च्या अखेरीस दत्ताजी शिंदे अब्दालीच्या पेंचांत सांपडला असतां, (५) मल्हारराव होळकर नजीक असून व शिंद्यांकडून मदतीस

येण्याविषयीं निकडीचीं बोलावणीं येत असतां, होळकर धावून गेला नाहीं; आणि दत्ताजीसारखा शूर मोहरा रणांगणीं पतन पावला. तसेंच (६) नजीबखानाचा बंदोबस्त होळकरानें होऊं दिला नाहीं. तात्पर्य, पहिल्या दहा वर्षांत अव्यवस्था होऊन अब्दाली व मराठे यांचा संग्राम निकरावर येण्यास रघुनाथराव व होळकर हे दोघे मुख्यतः कारण झाले, आणि पेशव्यानेंही त्याजबद्दलची हयगय केली.

(३) **तात्कालिक कारणें.**–स. १७६० च्या मकारसंक्रान्तीचे दिवशीं दत्ताजी शिंदे पडला व अब्दालीनें मराठ्यांचा सर्व उद्योग उलथून पाडिला, ही बातमी, पुढील फेब्रुवारींत सदाशिवराव निजामास उदगीरवर रगडीत असतां, पेशव्यास अहंमदनगर येथें पोंचली. तेव्हां लगेच निजामाची मोहीम पुरी करून सदाशिवराव व नानासाहेब वऱ्हाडांत शिंदखेडनजीक पटदुरावर रंगपंचमीच्या दिवशीं, ह्मणजे ता. ७ मार्च १७६० रोजीं, एकत्र झाले. तेथें एक आठवडाभर मोठ्या कडाक्याचा वाद झाला. मागील सर्व चुकांची झडती होऊन रघुनाथरावाची नालायकी उघडकीस आली. महाराष्ट्रांत त्या काळीं सर्व बाजूंनीं लायक व अंगावर आलेली बाजू निभावून नेण्यास समर्थ असा एकच पुरुष होता. तो सदाशिवराव होय. अर्थात् त्यासच हिंदुस्थानांत पाठविण्याचें ठरून ता. १४ मार्च रोजीं त्यानें उत्तरेस प्रयाण केलें. सदाशिवरावास यश आलें नाहीं एवढ्यावरून, वरील नेमणूक चुकीची झाली, असें समजूं नये. वस्तुतः त्यानें अंगीकारिलेली कामगिरी बहुतेक सिद्धीस नेली.

ता. १४ मार्च १७६० पासून १४ जानेवारी १७६१ पावेतों एकंदर प्रसंगाची जबाबदारी सदाशिवरावावर येते. त्याचा विचार करितांना शेवटच्या महिना पंधरा दिवसांची गोष्ट बाजूस ठेविली तर, सदाशिवरावाच्या कारभारांत दोषास्पद असें फारसें कांहीं आढळत नाहीं. पहिल्या दोन तीन महिन्यांत तडाख्यासरशी स्वकीय व परकीय बंडखोरांचा त्यानें निक्षून बंदोबस्त केला; आणि फौजेची, वसुलाची व एकंदर कारभाराची सुरळीत हुकमत सर्वत्र उत्पन्न केली. रघुनाथरावाच्या वेळचा गोंधळ नाहींसा होऊन सर्वांवर वचक बसला.

नेहमींच्या प्रघातास अनुसरून अब्दाली स्वदेशीं निघून न जातां अंतर्वेदींत छावणी करून राहिला, याजबद्दल सदाशिवरावास आनंद वाटून, त्यास धुळीस मिळविण्याची संधि प्राप्त झाल्याबद्दल त्या धैर्यशाली पुरुषाचा हुरूप अत्यंत वाढला. त्या सालीं सर्वत्र सुबत्ता असून सदाशिवरावानें दक्षिणेशीं आपलें दळणवळण शाबूद ठेविलें होतें. ता. १७ ऑक्टोबरास कुंजपुरा हस्तगत केल्यावर सारंगपुरावर यमुना उतरून अब्दालीस चेंगरणें त्यास अशक्य नव्हतें. मुसलमानांचे बाजूसही अव्यवस्था असून, कुंजपुरा हातचा गेल्यावर अब्दालीस स्वतःची धडगत दिसेनाशी झाली. पेचांत सांपडल्यावर नाइलाजानें यमुना उतरून त्यानें बागपतावर मराठ्यांचा रेषाभेद केला. यांत त्याची सैनिक कर्तबगारी वरचढ ठरते. तथापि नोव्हेंबर महिन्यांत सदाशिवरावाची चांगली सरशी असतां, दक्षिण व उत्तर अशा दोनही दिशांनीं चाल करून मध्येंच त्यास मराठ्यांनीं कां चेंगरलें नाहीं हें एक मोठें गूढ आहे. रसद बंद झाल्यानें अब्दाली आपण होऊनच टेकीस येईल अशा भावनेवर, इब्राहीमखानाच्या सल्ल्यानें, पानपतावर ५० हात रुंद व १२ हात खोल असा प्रचंड खंदक खणून व मातीचे उंचवटे बांधून, तोफखान्यावर भिस्त ठेवून, सदाशिवराव बंदोबस्तानें अब्दाली आपणावर चालून येण्याची वाट पाहत राहिला. या वेळीं गनिमीकाव्यानें लढून अब्दालीस जेरीस आणावें अशी होळकराची मसलत होती. परंतु फ्रेंचांच्या कवायती तोफखान्याचा प्रभाव सदाशिवरावानें दक्षिणेंत अनेक प्रसंगीं अनुभवलेला असल्यामुळें, इब्राहीमखानाचीच मसलत सदाशिवरावानें स्वीकारिली. इकडे यमुनेपलीकडील सर्व मुसलमान अब्दालीस मनापासून साह्य करीत असल्यामुळें, त्याची रसद बंद न होतां, उलट महिन्या दीड महिन्याचे अवकाशांत त्यानेंच मराठ्यांची रसद सर्व बाजूंनीं बंद केली. पांच पन्नास मैलांतला सभोंवारचा प्रदेश मराठ्यांनीं खाऊन उजाड केला. नोव्हेंबर डिसेंबर महिन्यांतलीं मराठ्यांचीं पत्रें पहिल्यासारखीं मुबलक नाहींत, व दक्षिणेंत पेशव्यासही कांहीं वर्तमान आलें नाहीं. यावरून मराठ्यांचें टपाल अब्दालीनें कबज केलें खास. कारण

मराठ्यांची हलाकी ओळखूनच तो हळूहळू शेर बनत गेला. एकट्या बुंदेल्याच्या हातून मुसलमानमय मुलखांतील सबंद रसद बंद होणें शक्य नव्हतें. यांत बुंदेल्याची कुचराई म्हणतां येत नाहीं. प्रत्यक्ष सदाशिवराव नजीक असतां त्याजकडून बागपतावर यमुना उतरतांना अब्दालीला अटकाव जर होऊं शकला नाहीं, तर एकटा बुंदेला मुसलमानांच्या जुटीस केवळ त्यांच्या नजरेखालीं कितीसा पुरा पडणार ! बळवंतराव मेहेंदळ्यानें जनकोजीचा पाठपुरावा केला नाहीं, हाही अपवाद कल्पनाकोटींतलाच होय, असें ता. २८ डिसेंबरच्या नाना फडणिसाच्या पत्रावरून वाटूं लागतें. बळवंतरावाचें व सदाशिवरावाचें पटत नव्हतें, असाही नाना फडणिसाच्या आत्मचरित्रांत उल्लेख आहे. होळकरानेंही सदाशिवरावाचा यत्किंचित् आज्ञाभंग न करितां सांगितलेली कामगिरी बरोबर बजाविली. डिसेंबर ता. २२ रोजीं गोविंदपंत पडल्यावर सदाशिवरावाची कुचंबणा होऊं लागली. (७) तेव्हांपासून ता. १४ जानेवारीपर्यंत एकदम अब्दालीवर चाल करून निघून जाण्याचा प्रयत्न त्यानें केला नाहीं, आणि अन्नाचा व पैशाचा शेवटचा रज संपेपर्यंत तो तसाच वाट पाहत राहिला, यांतच त्याच्या युद्धकौशल्यावर मोठा दोष येतो. कदाचित् दाक्षिणेंतून नवीन फौजा अब्दालीवर चालून येतील व आपली सुटका होईल अशी त्याची अटकळ असेल. कदाचित् आपलीं पत्रें नानासाहेबास पोंचत नाहींत हें त्यास माहीत नसेल, कांहीं असलें तरी शेवटच्या क्षणापर्यंत तो वाट पाहात राहिला; (८) शेवटीं गोल बांधून शत्रूंस बेसावध पकडण्याच्या बुद्धीनें, त्यांजवर घुसून मारतां मारतां त्यांचे अंगावरून निघून जाण्याचा शेवटच्या रात्रींचा बेत सकाळीं एकाएकीं त्यानें मोडिला; (९) थोडें तरी खाणें शिल्लक ठेवून ताज्या दमाची कांहीं फौज त्यानें मागें मदतीस ठेविली नाहीं; तसेंच विश्वासराव पडल्याचें समजल्यावर, (१०) मागचें पुढचें भान सोडून तो अविचारानें संग्रामांत घुसला; या गोष्टी सेनानायकाची नालायकी दर्शवितात. शांत विचारशक्तीस प्रसंगीं फांटा देणारा आवेशी गृहस्थ कितीही हुशार असला, तरी सेनापतीचे कामास तो नालायकच होय. मात्र येथें हेंही ध्यानांत ठेविलें

पाहिजे कीं, त्या वेळच्या एकूण एक मंडळींत एकंदर गुणांच्या मानानें सदाशिवरावाइतका योग्य इसम मराठ्यांकडे दुसरा कोणी नव्हता. जनकोजी व महादजी शिंदे त्या वेळीं लहान होते. मल्हारराव होळकर गनिमी काव्यांत कल्पक, परंतु विभिन्न मतांच्या अनेक इसमांस हाताखालीं वागवून, संहत कार्य घडवून आणण्यांत त्याची लायकी कधींच बाहेर आलेली नाहीं.(११)आदल्या वर्षी जनानखान्यामुळें दत्ताजीची झालेली कुचंबणा डोळ्यांपुढे असतां, सदाशिवरावानें तीच चूक केली. जनानखाना शत्रूंचे हातांत पडेल या भीतीनें मराठ्यांस अब्दालीचे अंगावरून निघून जातां येईना. स्त्रियांस मारून टाकण्याचाही प्रश्न निघाला होता. परंतु असलें क्रूर कृत्य मराठ्यांनीं केलें नाहीं हें बरेंच झालें म्हणावयाचें. (१२) सकाळीं पांच वाजल्यापासून दोन प्रहरचे तीन वाजेपावेतों मराठी फौजांस सारखी मेहेनत पडून, तोंडांत पाणी सुद्धां घालण्यास मिळालं नाहीं, म्हणून अब्दालीच्या ताज्या दमाची फौज पुढें येतांच मराठ्यांचा धीर सुटला. स० रा० व विश्वासराव हत्तीवरून उतरून घोड्यांवर बसून लढूं लागल्यामुळें गोंधळ उडाला, वगैरे कित्येक मुद्दे विचारार्ह आहेत, परंतु त्यांची शहानिशा करण्यास आधार नाहीं. सदाशिवरावांत गर्व व हट्ट यांची सांगड होती; पण त्याचें एकंदर कर्तृत्व लक्षांत घेतां, यामुळें राष्ट्राचा लाभच झालेला आहे. बुसीचें कौशल्य पाहिल्यावर गार्दीस नोकरींत घेऊन युद्धकलेंत नवीन क्रान्ति घडवून आणण्याचा त्याचा प्रयत्न पुढें पन्नास वर्षांनीं सर्वांनींच स्वीकारिला, यावरून या बाबतींत याचें शहाणपण विशेष वाखाणण्यासारखें असून, पानपतावरून तो बचावून आला असता तर, कवायती फौजेच्या जोरावर मागें पुढें दक्षिणचे मराठे इंग्रजांशींही कदाचित् यशस्वी टक्कर देऊं शकले असते, अशी आशा वाटूं लागते. सदाशिवरावाचें वय मरणसमयीं केवल ३१ वर्षांचें होतें.

शिंदे घराण्याची देशभक्ति व स्वार्थत्याग हे गुण या संग्रामानें उत्कृष्ट निदर्शनास आले. किंबहुना, पाऊणशें वर्षांचा महाराष्ट्राचा इतिहास या एका घराण्यानें बराचसा बनविला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. पानपतानें

सदाशिवरावाचा बळी घेतला, पण महादजीच्या कर्तृत्वास जन्म दिला. उत्तर मराठशाही सावरून धरणारे नाना व महादजी हे दोन पानपतजन्य राष्ट्रपुरुष होत. मागील विपत्तींच्या चिरंतन स्मरणानें व अनुभवानें पुढील राष्ट्रकार्य करण्याची ऐपत व स्फूर्ति त्यांस प्राप्त झाली; आणि त्यांच्याच अस्ताबरोबर मराठशाही संपली.

मल्हारराव होळकराच्या कुचराईमुळें पानपताचा संग्राम विपरीत झाला असें म्हणतां येत नाहीं. आरंभींच्या घोटाळ्यास मल्हारराव कारण झाला हें वर दाखविलेंच आहे; परंतु सदाशिवरावाची स्वारी सुरू झाल्यावर त्याची हुकमत यथायोग्य पाळून, मल्हाररावानें व इतर सरदारांनीं आपाआपलीं कामें बजावण्यांत शिकस्त केली यांत संशय नाहीं. सदाशिवरावास विरोध करून अगर त्याजवर रुसून होळकर किंवा दुसरा कोणी इसम त्यास सोडून गेला नाहीं किंवा कर्तव्यपराङ्मुख झाला नाहीं; किंवा शेवटीं प्रत्यक्ष मृत्यु डोळ्यांसमोर दिसत असतां, एकानेंही इतरांस सोडून स्वतःचा जीव बचावण्याचा प्रयत्न केला नाहीं, हें सर्वांसच भूषणावह आहे. शेवटपर्यंत न डगमगतां शूर पुरुषास शोभणारा क्षात्रधर्म सर्वांनीं मोठ्या धैर्यानें पाळिला, यामुळेंच मराठ्यांचा इतिहास आज एवढा उज्ज्वल वाटत आहे. मल्हारराव होळकर, दमाजी गायकवाड वगैरे बचावून आले, याजबद्दल त्यांस दोष देण्याचें कारण नाहीं. प्रसंगावधान ठेवून त्यांनीं शक्य तितका बचाव केला हें ठीकच झालें. जनकोजी किंवा सदाशिवराव जिवावर उदार होऊन मरून गेले हें म्हणजे त्यांस मोठें भूषण आहे असेंही नाहीं. होळकराप्रमाणें तेही जीव बचावून आले असते तर, ग्वाल्हेरीवर पुनः सर्व जमवाजमव करून त्यांनीं अल्पावकाशांत मराठ्यांची सत्ता अटकेपर्यंत बसविली असती. मात्र (१३) मल्हारराव होळकर दिल्लीस आल्यावर नारोशंकरास मदत करून दोघांनीं तेथेंच ठांसून राहण्याचें सोडून, ते दक्षिणेकडे त्वरेनें सरकत आले हें त्यांच्या शूर बाण्यास व इभ्रतीस शोभत नाहीं. माधवराव पेशव्यानें त्यांस पुढें या संबंधानें नरम केलें, तेव्हां त्यांस पुष्कळच पड खावी लागली.

इतकाही प्रकार झाल्यावर, ग्वाल्हेरपावेतों खुद्द नानासाहेब पेशवा आला

होता, (१४) तो हिंमत धरून तसाच पुढें पळणाऱ्या मंडळीस मागें फिरवून दिल्लीवर येता तर येथें मराठ्यांचा जम लगेच बसला असता. परंतु अगोदरच क्षीण झालेल्या पेशव्यास पानपतच्या धक्यानें चित्तभ्रम झाला. जगले कोण व मेले कोण हें कळण्यासच कित्येक महिने लागले. धीर देणारा एकही इसम जवळ राहिला नाहीं. ब्राइस् म्हणतो, 'संकटसमयीं धीर न सोडणें या एकाच गुणावर इंग्रजांची सत्ता आज भूतलावर निर्वेध चालते.' संकटांत भेदरून न जाण्याचा मराठ्यांचा स्वभाव असता तर, पानपतानंतर एक दोन महिन्यांतच दिल्लीस मराठ्यांची सत्ता कायम झाली असती. दूरदूरच्या प्रदेशांत वारंवार फौजा नाचविल्यानें प्रत्यक्ष युद्धकलेंत सदाशिवरावाहून अब्दाली निर्विवाद वरचढ दिसतो, तरी हिंदुस्थानचें राज्य संभाळण्याचे कामीं त्याची करामत पेशव्यांचे पासंगालाही पोंचण्याजोगी नसून, नानासाहेब किंवा सदाशिवराव उत्तरेच्या कारभारांत आरंभींच लक्ष घालते तर, त्यांजपुढें अब्दालीची मात्रा बिलकूल चालली नसती. पानपतानंतर मराठ्यांचा सामना पाश्चात्यांशीं घडला, हा प्रकार निराळा; परंतु कोणत्याही प्राच्य सत्ताधीशांस मराठे पुरे पडले असते, असें पानपतच्या झगड्याच्या हकीकती वाचून मनांत भरल्याशिवाय राहत नाहीं.

सदाशिवरावास या स्वारीस पाठविल्यामुळें पानपतचा प्रसंग विपरीत झाला, असेंही म्हणतां येत नाहीं. (१५)अडचणींत शांत वृत्ति ठेवून, सुखदुःखाची पर्वा न करितां, लष्करी व्यवस्था राखणारा कुशल सेनापति क्वचित्‌च एखादा निपजतो. सदाशिवरावाची वृत्ति अशा धरतीची नव्हती. पाश्चात्यांच्या कारभारांत रणांगणावरील लष्करी हालचाली ठरविण्याची जबाबदारी सेनापतीवर असली, तरी राष्ट्रीय हिताहिताचे दृष्टीनें युद्धाची व्यवस्था ठरविण्याचें काम प्रधान मंडळी रणांगणापासून दूर अंतरावर राजधानींत राहून करीत असतात, आणि साधक बाधक विचार करून ते सेनापतीला हुकूम सोडितात, तशी व्यवस्था मराठ्यांकडे नव्हती, हें वैगुण्य होय. सदाशिवरावास आवरून धरणारा नानासाहेब पेशवा बरोबर असता तर प्रसंग असा निकरावर आला नसता.

दाशिवरावाची मनोवृत्ति उदगीरच्या विजयानें किंचित् अविचारी झाली होती, गेंही म्हणतां येईल. (१६) पुढें जातांना बागपतावरील उताराचा व मागील कंदर युद्धरेषेचा बंदोबस्त त्यानें ठेविला नाहीं ही त्याची चूक होय. बाकी या ोहिमेवर त्यासच पाठविण्याचें एक कारण मागें पृ. १५४ वर सांगितलेलें बाद- ाही फर्मानही असावें. 'शाहू राजाच्या वंशाची आपण उत्तम व्यवस्था ठेविली आहे त्याप्रमाणें आमचीही व्यवस्था आपण चांगली लावून द्यावी,' अशी बादशहानें सदाशिवरावास गौरवपूर्वक आज्ञा केली होती. पूर्वीच्या स्वाऱ्यांत रघुनाथराव प्रमुख असतां, त्यास ही आज्ञा केली नाहीं, यावरून सदाशिवरावाच्या कर्तृत्वाबद्दल बादशाहींत आदर होता असें दिसतें.

(४) **पानपतावरील अरिष्टाचे परिणाम** ठरविण्यांतही मोठमोठ्या लेख- कांनीं असाच विपर्यास केलेला दिसतो. हिंदुस्थानचें राज्य हस्तगत करण्याचे मराठ्यांचे कल्पनातरंग या पराजयानें लयास गेले, अशा आशयाचे उद्गार बहुधा सर्व इंग्रज ग्रंथकारांच्या लेखांत आढळतात, ( The disaster of Panipat put an end to the dreams of supremacy cherished by the Marathas ), ते यथार्थ नाहींत. त्या रणांगणावर अपूर्व संहार झाला, एक सबंद पिढी कापली गेली, अनेक क्रूर व हृदयद्रावक प्रसंग घडले, महाराष्ट्रांत घरोघर दुःखाचें ठाणें कांहीं काळ बसलें, यामुळें पानपतच्या युद्धाचें स्वरूप कितीही भीषण वाटलें, तरी त्याचे चिरकालीन परिणाम राज्यावर फारसे झाले नाहींत. मोगल बादशहास दिल्लीस आणून तेथील सुव्यवस्था लावण्याचें काम पुढें दहा वर्षांनीं महादजी शिंद्यानें सिद्धीस नेलें. ठोकळ मानानें विचार केल्यास १७२० पासून ८० वर्षें हिंदुस्थानचें स्वामित्व मराठ्यांकडेच होतें, आणि त्यांच्या मध्यस्थीशिवाय कोणतेंही राज्य- कार्य देशांत घडत नव्हतें, ही गोष्ट सिद्ध आहे. वास्तविक पानपतावरील प्रसंगाचा मुख्य परिणाम म्हणजे होतकरू इंग्रजांचे दोन मुख्य प्रतिस्पर्धी मराठे व मुसलमान आपआपसांत लढून हीनबल झाले, आणि तेणेंकरून इंग्रजांची सत्ता येथें स्थापन होण्यास अप्रत्यक्ष मदत झाली, हा होय. The fall

of the Angrias and the disaster of Panipat freed the British from the thraldom of insidious neighbours and hastened their rise.'* अठराव्या शतकांत हिंदुस्थानची स्थिति इतकी खालावली होती कीं, हा देश मागें पुढें पाश्चात्यांच्या कबजांत जाणार, हें बहुतेक ठरल्यासारखेंच होतें; आणि पानपतावर मराठ्यांचा जय झाला असता तरी हा परिणाम टळला असता असें म्हणतां येत नाहीं. सदाशिवरावाच्या स्वारीनें देशांतील अनेक बंडखोरांना मराठ्यांचा धाक बसला; व सरदार निमूटपणें सरकारची आज्ञा पाळूं लागले. त्यामुळें माधवरावाचे वेळीं त्या बाजूचा उद्योग सुलभ झाला. वास्तविक पानिपतच्या पराभवापेक्षां माधवराव पेशव्याच्या अकालीं मृत्यूनें राज्याचें नुकसान जास्त झालें, ही गोष्ट इतिहासज्ञांस कबूल आहे. पानपतानें मराठ्यांचे राज्यास धक्का बसला ही भावना कोणत्याही तत्कालीन हिंदी लेखांत आढळत नाहीं. कित्येक इंग्रज लेखकांचेंही मत असें आहे कीं पानपतच्या प्रसंगानें मराठ्यांचा अधःपात न होतां उलट त्यांत त्यांचा लौकीकच वृद्धिंगत झाला. मेजर इव्हॅन्स बेल लिहितो. " Even the battle of Panipat was a triumph and a glory for the Marathas. They fought in the cause of " India for the Indians," while the great Mohammedan Princes of Delhi, of Oude and the Deccan stood aside, intriguing and trimming. And though the Marathas were defeated, the victorious Afghans retired and never again interfered in the affairs of India. "

पानपतावर मराठ्यांचे पुष्कळसे अनुभवी सरदार व योद्धे मारले गेले, तथापि लहान मोठे अनेक लोक तिकडील अनुभव मिळवून बचावून परत आले, त्यांचा व एकंदर प्रसंगाचा उपयोग पुढें राष्ट्रास झाल्याशिवाय राहिला नाहीं.

---

* Gerson da Kunha's Origin of Bombay.

ण पानपतावर हरलों अशी त्या वेळीं राष्ट्राची भावना झाली नाहीं, उलट क्रुत कार्य तडीस नेण्याचा नवीन हुरूप त्यांस आला. मराठ्यांचें राज्य म आहे, युद्धच आहे, त्यांत प्रसंगीं अपजय येणेंही प्राप्य असतें, अशा नेचें पुढें सर्व राष्ट्राचें वर्तन राहिलें. खरें म्हटलें तर दत्ताजी, सदाशिव-, जनकोजी, इब्राहीमखान वगैरे पुरुषांचे मृत्यु हेच राष्ट्रीय दृष्ट्या भावी याचीं अंतर्भेदी आशाबंधनें होत. अशा स्फूर्तिदायक प्रसंगाची योग्य ासना सर्व राष्ट्रें करीत असतात.

कडव्या मुसलमान लोकांशीं समोरासमोर लढण्याची हिंमत व शौर्य मरा-ंच्या अंगीं बिलकूल नाहीं, ते केवळ पळपुटे होत, हा अपवाद सुद्धां पतच्या ह्या एकाच प्रसंगानें निरसन झाला आहे. शिंदेहोळकरांची दाणा-ण डोळ्यांपुढें असतां, सर्व मराठे सरदार सदाशिवरावाच्या हाताखालीं ब्दालीवर घुसले; त्याचा पाडाव केल्याशिवाय परतावयाचें नाही अशा श्चयानें वर्ष सहा महिने मुसलमानांच्या केवळ घरांत शिरून त्यांनीं त्यांच्याशीं कराचा सामना केला; बळवंतराव मेहेंदळे, गोविंदपंत बुंदेले वगैरे सरदार ल्यावरही पळून जाण्याच्या विचारास थारा न देतां, शेवटपर्यंत खळी खणून एकत्र बसले; जेव्हां जेव्हां निघून जाण्याचा विचार· निघे, तेव्हां लहाना-सून मोठ्यापर्यंत सर्व सैनिकांनीं, बायकामुलांनीं, व बाजारबुणग्यांनीं सुद्धां, जमानाबरोबर अखेरपर्यंत लढून प्राणही देऊं, असा निश्चय शेंकडों वेळां प्रद-ित केला, आणि एवढा प्रचंड संहार धैर्यानें सहन करून, चिकाटी न सोडतां, पुनः ांनीं तोच उद्योग अल्पावधींत सिद्धीस नेला यापेक्षां खऱ्या शौर्याचें दुसरें लक्षण ाय पाहिजे ! पानपतचा संग्राम मराठ्यांची कीर्ति यावच्चंद्रदिवाकरौ उज्ज्वल ाखील; कितीही राज्यक्रांत्या किंवा घडामोडी झाल्या, तरी पानपतच्या आठ-णीनें मराठ्यांच्या बाहूंस सदैव स्फुरण चढेल; आणि कोणत्याही देशाचें ाज्य करण्यास मराठे सर्वथैव लायक आहेत, याची खात्री हा एकच प्रसंग नेरंतर पटवीत राहील, यांत तिलमात्र संशय नाहीं.

**१२. पानपत नंतरची उत्तरेंतील परिस्थिति.**—पानपतच्या संहारानें

मराठ्यांचा कारभार म्हणण्यासारखा कोसळला नाहीं आणि नानासाहेबानें आपल्या मुक्कामांत पुनः सर्व जम ठीक बसविला. या गोष्टी व्यक्त करणारे पुष्कळ कागद स्मरणीय आहेत. "दिल्लींहून गिल्चा पठाण आपले देशास गेला. रोहिला नजीबखान फौजेनिशीं दिल्लींत आहे. मल्हारराव होळकर माळव्यांत इंदुरीं आहेत. गंगाधरपंत तात्या कांहींशी फौज घेऊन जाठापाशीं आहे. खासा जाठाची फौज व तात्या व गाजुद्दीन ऐसे त्रिवर्गांनीं मिळून आग्र्याचा किल्ला सोडविला म्हणून वार्ता आहे. किल्ल्यांत अंमल जाठाचा. आजी जाठ जबरजस्त आहे. उभयतां त्याच्या अनुमतें आहेत. अयोध्येचा नबाब श्री काशीस आला. तेथून आठ दाहा कोस पूर्वेस जाऊन पटण्यास पातशहा होता त्यास आणविला. त्यानें नबाबास वजिरी दिली. आज तीन दिवस काशींत आहेत." ( २८·६·१७६१, ३·५२३ ). जाठानें मराठे सरदारांस खूष ठेवून स्वार्थ साधून घेतला. 'जाठाची फौज भदावर प्रांतांत येऊन अटेर घेतली, आणि भिंडेस लागले आहेत. तेथून पुढें सरकारच्या प्रांतांत येऊन उपसर्ग करणार म्हणोन वर्तमान आलें' [का. सं. प. या. ५०]. रघुनाथरावानें गोपाळराव बर्व्यासच या प्रांताचा कारभार सांगितला. 'नबाब काशीस आले आहेत, परंतु रयतेवरी बहुत कृपा करितात. शहरांत कोणास काडीइतका उपद्रव नाहीं ( २१·५·६१, ३·५२२ ). जानोजी भोसले पेशव्याबरोबर आला होता, त्यानें काम चांगलें करून ठिकठिकाणीं बंदोबस्त केला. ता. ८·५·६१ रोजीं तो लिहितो. 'आपण आम्हांस व गोपाळराव यांसी खचवाडियाचे पारिपत्याबद्दल ठेविलें होतें. त्यास तेथील गुंता उरकून दरकूच सुरंजेस आलों. तेथून मंडले प्रांताचे बंदोबस्ताबद्दल सागराचे सुमारें आलों, तों राजश्री विसाजी गोविंद कमावीसदार दिम्मत बाळाजी गोविंद हे भेटीस येऊन निवेदन केलें कीं, बुंदेलखंडांत बुंदेले यांनीं जमाव करून तमाम ठाणीं घेतलीं. एक सागर व हाटें राहिलें त्यांजमध्यें हाट्यास मोर्चे लाविले आहेत. तें घेतल्यानें तर सागरास लागतील, म्हणजे बुंदेलखंडाचा अंमलच उठतो. याची साहित्य केलिया मुलूक रहातो, नाहीं तर नाहीं. यास्तव या प्रांतीं येऊन हाट्याचे मोर्चे कापून

:. वरकड ठाणीं घेऊन मशारनिल्हेचे स्वाधीन केलीं. याचा मजकूर
र पेशजी लिहिलाच आहे. सांप्रत राजश्री हिंदुपत राजे यांचा वकील
ानिमित्त आला आहे. त्यास कमाविसदार मशारनिलेचा व त्याचा
करून देऊन सत्वरच आपले प्रांतास जावयाचें होईल. जाते समयीं
प्रकारें फौजेंत ताकीद करून आपले मुलुखांत पायमल्ली सर्वथैव
। येणार नाहीं.' [ का. सं. प. या. ३७५ ]. अंतर्वेदींतील अंमल उठला
तो फिरून पहिल्या प्रमाणें बसला. बुंदेलखंड व माळवा येथें जमीदारांनीं
ूम केली होती, त्यांसही शह देऊन अंमल बसाविला. सांप्रत जानोजी
े रेवामुकुंदपुरावर फौजेसमेत आहेत. मल्हारबा इंदुरीं आहेत.'
।·५·१७६१, ३·५२२, ]. जून महिन्यांत पेशवा मरण पावला त्या वेळीं
कडील स्थितीचा उल्लेख खालीं लिहिल्या प्रमाणें आढळतो. 'अंत-
ा बहुत करून अंमल बसला आहे. कड्याकडे अद्यापि दंगा आहे. फरु-
ादेपलीकडे रोहिल्यांची फौज आली म्हणून वर्तमान आहे. जाठ व गंगोबा
ा मथुरेजवळ उतरून कौलास ( कोळजळेश्वरास ) आले हेंही वर्तमान आहे.
ाजादा व सुजातउद्दौला यांचें वैमनस्य आलें आहे. जानोजी भोसले सागरा-
नागपुरास गेले [ २४·६·१७६१, १.२८५ ]. इटावें येथीलही ठाणें उठोन
लें. रोहिल्यांचें ठाणें बसलें. गंगाधरपंत तात्या व जाठ कोलेवर आहेत.
ाबखान पाणिपतावर आहे. त्यास माधवसिंग मिळाला आहे. त्यांनीं
ाशीं बिघाड केला आहे. गंगापारच्या रोहिल्यांचें सूत्र जाठाकडे लागलें
हे. नजीबखान एकटाच वेगळा पडला आहे. जाठाचे मतें सुजाउद्दौल्यानें
जेरी करावी, व गाजुद्दीनखानानें बक्षीगिरी करावी. हें अलीगौहरचे मनास
त नाहीं. गाजुद्दीनखान अगदींच नसावा, आपल्या हातीं यावा. त्यास जाठ देत
ाहीं, त्यामुळें जाटाचें त्याचें बिघडेलसें दिसतें. गणेशसंभाजीनें झांशीची मामलत
ाबूराव कोन्हेरकडून करून घेतली [ ५·८·१७६१; १·२९५, २९७, २९९ ].

परत निघाल्यावर पेशव्यास हळूहळू पानपतावरील प्रकार कसे व कां घडले,
समजून त्यास मल्हारराव होळकर, नारो शंकर वगैरे मंडळींचा राग आला.

होळकराचे महाल पेशव्यानें जप्त केले. या कामांत पेशवा रघुनाथरावाचे विचारानें वागत होता. पवारांची व शिंद्यांचीही जप्ती करण्यांत आली, पण ती पेशव्यानें लवकरच उठविली [ ६.५०७ ]. परंतु मल्हाररावाचें प्रकरण कैक वर्षे विकोपास गेल्यावर त्यांतच त्या वृद्ध पुरुषाचा अंत झाला, आणि पुढें माधवराव पेशव्यानें अहल्याबाईशीं समेट केला. गंगाधर यशवंताचा मुलगा कृष्णराव मे १७६१ त लिहितो [इ. सं., ऐ. च. १]. 'हिंदुस्थानची मसलत विघडली. भाऊ.चा तो प्रकार! श्रीमंतांचे शरीरीं समाधान नाहीं यामुळें प्रकृत विलक्षण जाली. श्री. विश्वासराव कैलासवासी, हा श्रम मोठा. त्या खेदाकरितां रा. सुभेदारांस त्यांनीं लिहिलें असेल. त्याचें विषम सुभेदारांस वाटेल; उदासीनता मानतील, आपण प्रसंगीं आहेत; सूचना असावी, म्हणून विस्तारें लिहिलें. ऐशीयास श्रीमंतांनीं यजमानांस लिहावें, आम्हीं करूं न यावें, अशा गोष्टी न लिहितां अमलांतच आणिल्या. सुरंजेहून श्रीमंत मागें फिरतां पवारांचे महाल जप्त केले. उज्जनीस जाऊन शिंद्यांकडील ऐवज नक्त व कापड जवाहीर येणें प्रमाणें घेऊन, कारकुनासही पुसावयाचें तें पुसलें. रा. गोविंद शिवराम यांसी इंदुरीं पाठवून ऐवज कांहीं व तोफा मागत होते, तेथें द्रव्यसाधना न झाली. उपरांतीक संवत्सर प्रतिपदेचे दिवशीं ( ६.४.१७६१ ) खासा स्वारी इंदुरास आली. एक दिवस राहून प्रयत्न करावयाचा तितका करून पाहिला. दुसरे रोजीं कूच करून ब-हाणपुरास दरमजल गेले. तेथून पत्रें पाठविलीं कीं, देशचे महाल आम्ही जप्त करितों. येणेंकरून यजमानांची मर्जी फारच कडू जहाली, त्याचा विस्तार कोठपर्यंत लिहावा. रायापासून आजपावेतों एकनिष्ठेनें सेवा केली, कोणे गोष्टीचा शब्द यजमानांनीं लावून घेतला नाहीं. हल्लींही कमी केली न केली हें, या प्रसंगी होते त्यांस प्रसिद्ध आहे. यजमान वर्तमान असतां, जाप्ती करावी, हें खावंदा- पासून दूर असे. आम्ही कित्येक प्रकारें रा. सुभेदारांची मर्जी न कळावी अशी विनंति करून, यथापूर्व चालावें, याच विचारें बोलत असतों. परंतु दिवसें दिवस ० हे विनंति.' याच कृष्णरावाचें खालील पत्र रघुनाथरावास आहे [ १९.५.६१ ]. हिंदुस्थानच्या मनसुबियाचे कित्येक प्रकारें पत्रीं आज्ञा. ऐशियास. तदर्थरूप

ाजश्री सुभेदार साहेबीं हिंदुस्थानच्या बंदोबस्तास्तव वजीर गाजुद्दीखान व
: सुरजमल्ल यांजकडे रवाना केले. स्वामींचीं पत्रें बजिन्नस त्यांजकडे
वेलीं. सांप्रतही रा. सुभेदारांनीं विनंतिपत्रें लिहिलीं आहेत, त्यांवरून
त्न होईल. हिंदुस्थानचा मदार सर्व सुभेदारांवर आहे, हे आज्ञा पूर्व-
त सर्व कारभार राव कैलासवासी यांनींही रा. सुभेदारांचेच हातीं घेतला.
कडेही येणेंप्रमाणेंच चालत आलें. परंतु अंवदां श्रीमंत सिरोंजेहून माघारे
ल्यावर खावंदांनीं पूर्व लोभास अंतर केलें. चाकरांनीं सेवा करावयास अंतर
नाहीं. जे लढाईंत होते ते सर्व भेटलेच असतील. त्यांनीं वर्तमान
दन केलें असेल. मोडल्या झुंजाची शिफारस करयास लिहावा! शिंदे,
र पूर्वपासून चाकर साहेब कामावर त्यांच्या ह्या गति, अशा समयांत
ची जप्ति नसावी. रा. सुभेदार यांजकडील महाल देशचे जप्त केले, म्हणून
मंतांनीं येथें लिहिलें होतें. तेणेंकरून यांचे चित्तास उदासीनता जाली.
जपावेतों सेवा केली त्याचें फळ हें, पुढें केलिया कळतच आहे, ऐसें वारंवार
ह्मतात. आज्ञेप्रमाणें आम्हीही यांचें शांतवन करीत असतों. आतां साहेब
ले, सर्व बंदोबस्त करतील, सेवक लोकांचें समाधान करून मागती सर्व
ोबस्त करवावा, ह्या रीती सर्व खावंद जाणतच आहेत. या समयांत पांच
र हजार फौज येती तर थोडा बहुत बंदोबस्त होता. श्रीमंतांनीं इकडे
हीं फौज ठेविली नाहीं. रा. बाबूजी नाईक, सदाशिव रामचंद्र व रा. गोपाळ
विंद सर्व देशास गेले. सेवेशीं श्रुत होय ही विज्ञप्ति' [रा. ब. पारसनीसकडून].
ठ्ठल शिवदेव १५·५·६१ रोजीं रघुनाथरावास माळव्यांतून लिहितो. 'स्वामींचीं
त्रें मल्हारराव होळकर सुभेदार यांस येतात. आम्ही ते एका जागांच आहों.
ामींस परस्परें कळलें असेल. (स्वामींनीं आम्हांस) पत्र न पाठवावयाचें कारण
तकेंच दिसोन आलें कीं, **हे वांचून कशास आले?** त्यास हें प्रमाणच
ाहे. मरणाच्या खस्तीस कोण्ही चुकलें नाहीं. कारण आयुष्यापुढें इलाज
ाहीं. जखम लागली तेथें खैर होऊन वांचून यावें हे ईश्वरी सत्ता. 'आयूरक्षति
र्माणि आयुरन्नं प्रयच्छति' ऐसें आहे. परंतु आम्हीही आपल्या जिवास खातच

आहों. आम्हांसहि सर्व गोष्टीं कळतच आहेत. परंतु मेहनत ( अगर ) गैरमेहनत, सर्व एक इश्वरी क्षोभानें वायां गेल्या ! सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना. ग्वालेरीस तीन वर्षे पैसा नाहीं. मामलेदारांवर वराता दिल्या. त्यांनीं माघाऱ्या टाकिल्या ! स्वामींनीं किल्याची वेगमी करणें ते करावी. मागील फडशा करून किल्ला सरकारांत ठेवावा. नाहीं तर दुर्निमित्य आहे. सरंजामाचा पैसा, दोन वर्षे जालीं, पुण्यास रसदा घेऊन फौजेस दिल्या, त्या तैशाच देणें राहिलें. माळव्यांत अंमलास खलेल, तेथें ग्वाल्हेर तो म्हारवाडा आहे. सरदार नव्या दमाचे अले, ते आम्हां अगोदरच देशास गेले ! हिंदुस्थान राहतां कठीण आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना. ता. ९ सवाल मु० गांगरोणी. [ रा. श्री. वि. आठल्ये यांजकडून ].

---

# प्रकरण एकतिसावें

## नानासाहेब पेशव्याची योगता.

१ पेशव्याचा मृत्यु ( २३.६.१७६१ ) २ कर्तबगारीचा अंदाज.
३ कौटुंबिक परिचय. ४ सामाजिक व धार्मिक परिचय.
५ श्रावणमास दक्षिणा. ६ पर्वतीचा देवदेवेश्वर.
७ पुण्य नगरीचें ऐश्वर्य.

१. **अखेरचे दिवस व मृत्यु.**—नाना फडणीस लिहीतो, ' शिरोंजेहून आलों ते बऱ्हाणपुरचे मुक्कामीं श्रीमंतांची भेट झाली. मर्जीचा प्रकार म्हणावा तर, अस्थि चर्म मात्र राहिलें आहे. शरीर फारच कृश झालें. घटकेच्या गोष्टीचें स्मरण राहत नाहीं. ज्याजवर रागें न भरावयाचें, त्याजवर भरावें, मनास येईल तें करावें, ही प्रकृत पाहून फारच श्रम झाले. उपाय काय ! ईश्वरें कसें तरी त्यांस सलामत राखावें, हेंच ईश्वराजवळ मागणें आहे. तमाम मुत्सद्दी निरोप मागून देवास वगैरे जागां जागां गेले. टिकाव होतां कठीण.

त्येक बारीक बारीक मर्जी फारच बिघडली आहे, ती लिहितां येत नाहीं. रिंगाबादेजवळ आल्यावर राजश्री देवराव यांचे बंधु तेथें होते ते आले. त्यांची ट झाली. मग मिसरजीकडील वगैरे सर्व वर्तमान त्याजपाशींच मात्र सांगितलें. ांचे आमचे विचारें ठराव जाहला कीं, श्रीमंतांजवळ बोलावयाचें नाहीं. ीमंत राजश्री दादासाहेबांसच विनंति करून मग काय ठराव होईल तो करावा. सा निश्चय करून ही गोष्ट तशीच ठेविली. याचीं कारणें फार आहेत. कोणा-वळ काय बोलतील हा भरंवसा नाहीं. भलत्याच जवळ बोलले, तर तेथें र्तमान प्रकटून विकोपास जाईल हें एक, व एके घटकेस एक बोलणें, अशानें रिणाम कसा लागतो ? अशा बहुत गोष्टी चित्तांत आणून ठेविलें. श्रीमंत चार दिवस झाले पुण्यास गेले. आम्ही मातोश्रींचें कार्य करावयास्तव टोकें येथें राहिलों. राजश्री देवराव तात्याही आम्हां जवळच आहेत. श्रीमंतां-बरोबर फिरोन खर्चाखालीं मात्र यावें, ते गंगातीरींच कां न राहिले ? यास्तव राहिलों. त्यांनीं तुम्हांस पत्र लिहिलें आहे, त्यावरून कळेल. श्रीमंतांचा यख्तियार प्रस्तुत हिंदुस्थानचा मल्हारबावरच आहे. याप्रमाणें वर्तमान आहे' [ ६·४१५; १७·६·१७६१ ]. 'श्रीमंतांस किंचित् भास जाहला होता. त्याज-मुळें मर्जी फार कठिण. परंतु पुरुषोत्तमराव यांवर पूर्ण कृपा श्रीमंत रागानें थोर थोरांस कमचीनें ( वेताची छडी ) मारूं लागले. यामुळें मंडळी जवळ जाईनाशी झाली. एके दिवशीं नर्मदातीरास संध्या करीत असतां अकस्मात् झोंक गेला. पुरुषोत्तमराव दाजीचे बंधु नारायणराव नाना यांनीं उठोन श्रीमंतांस धरिलें. तेव्हां मागें पाहून बोलले, दुसरा कोणी असता तर कमच्यांनीं मारिलें असतें. मला यांचा विटाळ झाला. पुरुषोत्तमराव बोलले, पुनः स्नान करावें. तेव्हां श्रीमंत हसून म्हणाले, अरे पुरुषोत्तमराव तूं बोललास म्हणजे माझा राग नाहींसा होतो. पुढें पुण्यास आल्यावर वरचेवर बोलावणें पाठवीत. एके दिवशीं पुण्यास दहा बारा घटका रात्रीं श्रीमंतांचें बोलावणें आलें. दाजी बोले. श्रीमंत दिवाणखान्यांत होते. बाईसाहेबही तेथेंच होत्या. आंत गेले. जवळ जातांच हात धरला. हे मनांत म्हणाले कीं तोंडांत मारतात. तों

श्रीमंतांनीं ओढून पलंगावर बसविलें. मग पूर्वीच्या गोष्टी काढिल्या. म्हणाले तुला कांहीं द्यावेंसें वाटलें. परंतु आतां जामदार पोतनीस घरास गेले असतील. तेव्हां अंगावरची पांढरी शालजोडी काढून पुरुषोत्तमरावाचे अंगावर घातली. बाईसाहेबांकडून विडे देवविले. याप्रमाणें श्रीमंत नानासाहेबांची पूर्ण कृपा संपादिली.' [ हरिवंशाची बखर पृ. १४·१५ ]. ही बखर वाचली म्हणजे पुष्कळ आख्यायिका व व्यक्तिस्वभाव समजतात. या हकीकतींतील पुरुषोत्तम कृष्ण हा पटवर्धन घराण्यापैकीं नानासाहेबाच्या लोभांतला गृहस्थ होता.

परत येतांना वर्षप्रतिपदेस इंदुरास जाऊन नर्मदेवर मुक्काम असतां ११·४·६१ रोजीं मांधाता येथें तुलादान करण्यांत आलें. त्या वेळीं ना० सा० चें वजन ४५६८ तोळे म्हणजे ११४ पौंड भरलें. स. १७५४ च्या जून महिन्यांत अशाच तुलादानप्रसंगीं तें ७१२२ तोळे म्हणजे सुमारें १७८ पौंड होतें. ३३ व्या वर्षी १७८ पौंडांचें वजन असणें म्हणजे तो पुरुष भव्य, हाडापेरानें थोराड व बराच स्थूल असला पाहिजे. नर्मदेहून पुढें येतांना १६ मे रोजीं गोदातीरीं कायगांव टोक्यास बाजीरावाचें श्राद्ध करून ३ जून रोजीं पेशवा पाबळास आला. तेथून पुढें तो एक दोन दिवसांनीं पुण्यास दाखल झाला. याच वेळेस पुण्याचा प्रसिद्ध लकडी पूल घाईघाईनें सहा दिवसांत तयार करण्यांत आला. 'पुलाचे कामावर स्वारी नित्य जात होती' [ का. सं. श. पृ. १८–१९ ]. हळूहळू तब्यत ज्यास्तच क्षीण झाली. १८ जून रोजीं स्वारी पर्वतीचे बंगल्यांत जाऊन राहिली. दिवसेंदिवस भाऊसाहेबांच्या शोकें करून शरीर कृश झालें. बुद्धिभ्रंश झाला. लोकांस शिव्यागाळी करूं लागले. कारभार विपरीत होऊं लागला. पुत्रशोक व बंधुशोक ( भा. व. श. ). अंतकाळीं जवळ कृष्णराव पारसनीस व कोन्हेर त्रिंबक होते. गोपिकाबाई व नाटकशाळा पलीकडे खोलींत होत्या. काळ जाहला तेव्हां रघुनाथ बाजीराव जवळ आले, त्यांनीं मांडी दिली. माधवरावसाहेबही होते. मंगळवार ज्येष्ठ वद्य ६ शके १६८३ रोजीं दीड प्रहर रात्रीं देहावसान झालें. लकडी पुलाजवळ सार्थक केलें. तेथें वृंदावन आहे [ का. सं. श. ].

'प्रधानपंत क्षयाची व्यथा होऊन वारले' [ धा. रा. च. पृ. ३० ],

असें स्पष्ट वाक्य उपलब्ध आहे, त्यावरून मृत्यूचें कारण उघड होतें. पानपतच्या संहारानें त्याचें मन उद्विग्न व बेकाबू झालें असेल. परंतु त्याचें शरीर एकाएकीं खचण्यास हाच रोग कारण झाला असावा. कुटुंबांत क्षयाचा प्रादुर्भाव असून शेवटच्या तीन चार महिन्यांतील प्रकृतीचा तपशील या व्याधीला विशेष संभवतो. गोपिकाबाईशीं त्याचें बिनासलें असल्याचा उल्लेख नानाफडणिसाचा आहे. स. १७६० च्या डिसेंबरांत दुसरी तरुण बायको त्यानें केली आणि लवकरच अस्थिचर्मावर शरीरस्थिति आली. बारावर्षांच्या वयापासून २५-२७ वर्षें जबरदस्त उद्योग, दगदग व चिंता यांच्या योगानें त्याच्या शारीरिक व मानसिक शक्ति क्षीण होऊन त्यास अकालीं वार्धक्य आलें. कदाचित् शेवटच्या पांच चार वर्षांत त्याची भरभराट व वाहवा झाल्यानें तो थोडासा आरामप्रिय व विषयलोलुप झाला असावा. सदाशिवराव, रघुनाथराव व गोपिकाबाई इत्यादिकांच्या कौटुंबिक कलहांत गुरफटून त्याचें मन उदास झालेलें असावें. अशा अनेक कारणांनीं क्षयाची वृद्धि होऊन त्यांतच मनःक्षोभानें पेशव्याचा अंत झाला.

शेवटच्या दोन तीन वर्षांत नानासाहेब रंगेल बनून त्यास नाचरंग वगैरेंचा शोक उत्पन्न झाला होता. शके १६८० त 'शिमग्याचा रंग मोठा केला. श्रीमंत कोंकणांतून पर्वतीस आले. भाऊसाहेब भेटीस गेले. भेटी होऊन वाड्यांत आले. रंग सर्वत्रांवर टाकिला. रंगाची चाल वाड्यांत चालू जाली. शके १६७९ व ८१ या सालींही रंग झाले. शेवटचा रंग पटदुरास झाला. कदाचित् कौटुंबिक कलहांनीं मनास आलेली उद्विग्नता दूर करण्याकरितांही हे रंग असतील. पण ते पुढील अरिष्टाचे पूर्वरंग होते असें वाटूं लागतें.

'मंगळवारचे दिडा प्रहरा रात्रीस मृत्यु आला. मृत्यु होतांच बंदोबस्ती केली. जागजागां दहा वीस गाड्यांच्या चौक्या ठेवून वाड्याभोवतीं हजार बाराशें चौकी ठेवून बंदोबस्ती केली. दुसरे दिवशीं बुधवारीं अग्नि दिला. ते दिवशीं शहरांत मोठा आकान्त जाहला. तशामध्यें कोणी परसैन्य नव्हतें, नाहीं तर मोठा प्रळय झाला असता. इतकें असतां जो आंगऱ्या (तुळाजी)

कैदेमध्यें आहे, त्याणें, व इब्राहीमखान गारद्याचा भाचा चाकरीचे उमेद-गारीमुळें सात आठ हजार गारद्यांनिशीं आला आहे त्याणें, श्रीमंत सावध असतांच पैगाम केला होता कीं, यांचा काळ होतांच तूं व आपण मिळून शहर लुटावें आणि गर्दी करावी. ऐसा पैगाम होताच. तों इकडे काळ झाला. आणि आंगऱ्यानें त्यास पत्र पाठविलें कीं आतां हे वेळ आहे. गारदी व तुम्हीं येऊन पोंचणें. त्यानें तें पत्र बजिन्नस नेऊन श्री. दादासाहेबांस दाखविलें. त्याजवरून आंगऱ्यावर आणखी चौकी मजबूत गारद्यांची ठेवून बंदोबस्ती केली. जीवनराव वकिलान मोगलास पत्रें पाठविलीं होतीं तीं धरलीं कीं तुम्ही या वेळेस येऊन पोंचणें. त्यावरून त्याची अप्रतिष्ठा केली, अशी जन-अफवा आहे, प्रस्तुत कामकाज कुलअखत्यारी बाबूराव फडणीस व सखाराम बापू दोघे जण आहेत. यांज वेगळें काडीमात्र कामकाज होत नाहीं. दादासाहेब चौदावे दिवशीं सोमवारचे बारा घटका रात्रीं वाड्यामध्यें मुहूर्त करून दाखल जाले. तोंपर्यंत पर्वतीस होते. श्री. माधवराव व बाईसाहेब बुधवारीं ( ता. ८ जुलई ) दाखल होणार. पर्वतीस आहेत. पुढें मानस आहे कीं साताऱ्यास जाऊन ताराबाईचे विद्यमानें राजापासून पांघुरणें घ्यावीं व नवे शिक्के करावे, मग पुढें राज्याचा बंदोबस्त करणें तो करावा. ताराबाईनें आपले खुशीनें राजापासून पांघुरणें दिलीं तर उत्तमच आहे. नाहीं तर आपणच कार्य भाग संपादून सत्वरच यावें ऐसा निश्चय आहे. मंगळवारीं जेजुरीचा मुक्काम होता. चिटकोपंत नाना पुढें स्वार होऊन गेले. तों, मागें फिरून मनसुबा राहिला. चार दिवस मुक्काम झाला. चौ दिवसां करार जातील. सारांश, कारभार उभयतांकडे आहे.' [ ६·७·१७६१; १·२८६ ]. श्रीमंतांचा आजचा बारावा दिवस आहे. दानधर्म उत्तम प्रकारें दानें वगैरे होतच आहेत. रा. माधवराव क्रिया करितात. तेरावा दिवसही उत्तम होईल. श्री. माधवराव साताऱ्यास जाणार. एक विचार एकटेच जाणार, एक विचार दादाही बराबरीच जातील. अवघे मुत्सद्दी जातील. श्री. नानासाहेबीं राजा करावयाचा नेमिला होता, तो राहिलासा झाला आहे. दादांचे व

गोपिकाबाईंचे मतें ताराबाईंचे विचारें जो राजा बसावयाचा अगर न बसावयाचा विचार जो करतील त्याप्रमाणें, ताराबाईचे विचारें करावें. त्यास रामराजाच बाहेर काढावा असें असे. श्री. माधवराव उद्यांच्या सोमवारीं साताऱ्यास जाणार. सप्तमीस पेशवाईचीं वस्त्रें द्यावयाचा मुहूर्त आहे. त्रिंबकराव मामा सातारीं आहेत. राजा बाहेर काढावा, कऱ्हाड वाई प्रांत त्याजकडे द्यावा. असेंही करतां न ऐकत, तरी जसा कळेल तसा बंदोबस्त करावा. परंतु आधीं वस्त्रें द्यावीं, मग मजकूर जो करणें तो करावा. सांप्रत मुख्यत्वें सखारामपंत व बाबूराव फडणीस दोघे एक विचारें आहेत. दादासाहेबांपाशीं पेश रामचंद्र गणेश व कृष्णराव काळे या दोघांची चाल बहुत आहे. आबा पुरंदरे व नाना पुरंदरे हेही आहेत. माधवराव यांनीं वस्त्रें घेऊन साताऱ्याचा बंदोबस्त करून पुण्यास यावें, त्यांनीं घरीं देशीं दहा हजार फौजेनिशीं असावें, दादांनीं स्वारीस जावें असेंही आहे. जागां जागां विचार होतच आहेत. [४·७·१७६१, १·२८९].
' उभयतां कारभाऱ्यांचें एक चित्त. आहे. सखारामपंत करार म्हणतात, दादा 'द्यावें' म्हणतात. 'देणें' अद्यापि बंदच आहे नारोशंकराचा पहिला करार जाला होता. अलीकडे म्हणतात, आम्हांस कर्जवाम फार जालें आहे, सबब रसद मागतात शिंद्याची मामलत महादजी शिंद्याचे नांवें करावी, त्याची दिवाणगिरी रामचंद्र गणेशास सांगावी. दादांचें, गोपिकाबाईचें व दोघे कारभारी यांचें एकचित्त एकत्र जालें आहे. पुढें कसें चालेल पाहवें [६·७·६१, १·२९२].

यावरून अंतकाळची हकीकत कळते. मोठ्या लोकांच्या मृत्युप्रसंगीं बंडखोराचें कसें फावतें याची कल्पना यावरून होते. पेशव्यांनीं राज्याचा अपहार केला किंवा राज्यकारभार बिघडविला अशी सामान्य भावना असती तर, विरुद्ध पक्षास नवीन घडी बसविण्यास ही संधि चांगली होती. छत्रपति, ताराबाई किंवा प्रधान सरदारांत तशी ताकद असती तर पेशव्यांस बाजूस सारण्यास कोणीं कमी केलें नसतें. तसा कांहीं बनाव घडला नाहीं यावरून राज्य करण्याचें पेशव्यांचें सामर्थ्य व हुशारी मराठमंडळास मानवली होती असें म्हणतां येतें. यावरून नानासाहेबासारख्या कर्तृत्ववान पुरुषाचा मृत्यु ही वर्धमान राष्ट्र-

वरील मोठी आपत्ति होय. ताराबाईही पुढें ता. ९ नोव्हेंबर रोजीं वारली. एकंदरींत हें साल मोठें क्रान्तिकारक समजलें पाहिजे.

पानपतचा संहार व नानासाहेबाचा मृत्यु हीं दोन असामान्य अरिष्टें एकाएकीं राष्ट्रावर कोसळलीं, तत्राप त्यांच्या योगानें मराठमंडळाचा धीर खचला नाहीं. तशा संकटांतही त्यांचा दम कायम होता; आणि पुढील घडी नीट बसविण्याकडे सर्वांचें चित्त वेधलें होतें. त्रिंबक हरि पटवर्धन पुतण्या गोपाळरावास लिहितो. ' मुख्य यजमान परधामास गेले. भाऊसाहेबही नाहींत. दादासाहेबांनीं फौजेचा गाहा सचंतर करून कोटकिल्ले जागजागां पत्रें पाठवावीं. दक्षिणेस तर्तूद करून फौज पाठवावी. दर वर्षास पहिली इकडून फौज जात होती, तेव्हां लोकांत दबाब होता. ते यंदां फौज राहिली आहे यामुळें काटक शेर होतील. रा. हरिपंत व विसाजीपंत यांस बोलावणें आलें होतें. त्यास आतां अमावास्या जाहलीयावर येतील. सर्वांनीं जे आजवर करामत केली त्याचें नवल नाहीं. आतां मोडली बाजू सांवरली तरच कर्तृत्व सर्वांचें ! रा. बाबूराव आणवावे. गडकिल्ले मजबुदीनें राखावे. सिंहगडची, पुण्याची खबरदारी करावी. आळस न करावा. तुम्हींही सांगावें कळेल तसें, चुकों नये. सर्व मंडळी शहाणे आहेत, तितक्यांनीं लोभ धरूं नये. एक वेळ नाइकीस आव घालावा. राजा नवा करणार तो करावा. तेव्हां एकंदर बहुत विचारें करावें. नाहीं तर नवा राजा झाला म्हणजे त्याभोंवतीं आणखी चवघे मिळून फितवाफांदडा करतील. आपण होऊन कलह केला, ऐसें होईल. त्रिंबकराव व नाना पुरंदरे ऐसे सर्वांनीं मिळोन एक चित्त असावें. जशी वर्षास दक्षिणा देतात तशी द्यावी. चहूंकडे चिठ्या पाठवाव्या कीं वर्षाप्रमाणें येणें. ऐसें आहे. त्यांत थोर कर्ते आहेत. आमची बुद्धि काय आहे ? श्रीमंत राघोबा सुज्ञ आहेत. तुम्हीं आपणांस कळेल ते बुद्धीस अंतर न करावें. यांत ईश्वर फुरसत देईल तो आव धरील. कोण बळावल्यानें अपाय आहे, हें दृष्टींत असावें. श्रीमंत फत्तेसिंगबाबाची फौज आहे, हे माहा करून एक गांठीं करावी. दिवाणासही बोलवावें. होळकरास वडीलपणें लेहून त्याचें पत्रीं बहुत समाधान करून भर

भरवावा. दमाजी गायकवाडासही पत्रें पाठवावीं, कारकून पाठवावे. तांम्रांची बातमी राखावी' [ऐ. ले. सं. १·३३]. 'श्रीमंत कैलासी जाल्याचें वर्तमान लिहिलें. बरें, ईश्वरसत्तेस उपाय काय! आज प्रसंगीं भाऊसाहेब असते तर चिंता नव्हती. आतांही दादास्वामी आहेत, माधवराव कर्ते आहेत. चिंता काय आहे! स्थळांची बंदोबस्ती करावी. जितके माणूस असतील तितक्यांचें समाधान करावें. उत्तरेस होळकर आदिकरून मातबर सरदार आहेत त्यांचें व जो जो संस्थानिक असेल तितक्यांचें राजकारण, बंदोबस्त राखावा' [सदर, ३४]. सदाशिवरावाचें कर्तृत्व व होळकराचा बेभरंवसा हे वरील प्रकार स्मरणीय आहेत. मराठ्यांच्या शत्रूंनीं उचल खाल्ल्याचेही उल्लेख आहेत [सदर, ३२, ३३, ३६, ३८].

२. **कर्तबगारीचा अंदाज**.–यासंबंधानें पूर्वी ठिकठिकाणीं विवेचन केलेलें असल्यामुळें, त्या वेळचेच अभिप्राय दाखल केले म्हणजे पुरे आहेत. बखरकार म्हणतो. 'बाळाजीपंतनानांनीं साहसकर्म करून महाराजांची कृपा संपादिली, त्याजवर रावसाहेब व आपासाहेब यांहीं सरदार व मुत्सद्दी वगैरे लहान मोठे यांजवर ममता वाढवून ज्याची जशी योग्यता पाहून ज्याचें स्वरूप वाढवून, बहुमान करून, परम सदयत्वें कृपा दर्शवित होते. त्यांचे मागें नानासाहेबही पूर्वान्वय दृढोत्तर चित्तांत धरून सर्वांचें मनोधारण करून, गांव मोकासे व वृत्ती घोडे, पालख्या, अब्दागिरें, इनाम, बक्षिसें व अलंकार देऊन मनुष्य पाहून उमेदवार केलें, व सेवक लोकांनीं धन्याची कृपा निःसीम सर्वांनीं पाहून कायावाचामनेंकरून एकनिष्ठ सेवा करून महत्पदास योग्य होऊन स्वामिसेवा केली. सरदार व लोक साहसकर्ते, मर्द. आणि नानासाहेब अजातशत्रु, तेणेंकरून शत्रू पराभवातें पाववून महाराजांच्या राज्याची वृद्धि करून कीर्ति भूमंडळीं मेळविली. नानासाहेब अतिपुण्यवान, त्यांच्या तपोबलें करून शत्रु विनयभावें शरणागत होऊन, करभार देऊन, हात जोडून चाकरीस तत्पर राहिले. रामेश्वरापासून इंद्रप्रस्थापावेतों शत्रू पादाक्रान्त करून देवब्राह्मण, प्रजापालन व दानधर्माची कीर्ति कलियुगीं विख्यात केली [पे. ब. खं. ४]. हा अभिप्राय मार्मिक आहे.

'नानासाहेब व भाऊसाहेब अवतारी पुरुष उभयतांप्रमाणें मनुष्य लोकीं या मार्गें कोठेंही जाले नाहींत व पुढेंही होणें कठीण. उभयतांचा ऋणानुबंध कीं एक मरतांच एकानें मरावें ! पूर्वी बाजीराव साहेब मुक्त जाहलियावर सहा महिन्यांनीं चिमाजी आपा गेले. तैसेच भाऊसाहेब गैब झाल्यावर वर्तमान नानासाहेब यांणीं ऐकतांच सहा महिन्यांतच मृत्यु पावले. भाऊसाहेब मृत्यु पावले म्हणून कोणीं ऐकिलें नाहीं, व पाहिलें नाहीं. भगवंत इच्छेंकरून त्या कहरांतून पार पडून वांचून हरएक कोठें असले तरी निर्माण होतील. बहुत भाऊ आहेत, परंतु श्रीमंत लोकांत यांजप्रमाणें भाऊपणा कोठें नाहीं. राम भरताची साम्यता ' [ भा. व पृ. १३५ ]. रा. नातू म्हणतात. 'पेशव्यांमध्यें नानासाहेबासारखा मुत्सद्दी, कार्यकर्ता पेशवाच झाला नाहीं. त्याला पेशवाईचीं वस्त्रें मिळाल्यापासून त्याचेवर गृहकलहादि मोठमोठीं लचांडें आलीं, परंतु तीं सर्व निभावून त्यानें जसा प्रसंग येईल तसा उपाय करून, मराठी राज्याचा व विशेषतः पेशव्यांचा अंमल सर्व हिंदुस्थानांत स्थापन केला. हिंदुपद पातशाहीची मराठ्यांस जी इच्छा होती तिची सत्यता होण्याचा समय जवळ आला होता. परंतु पानिपतची लढाई होण्याचे पूर्वी त्याच्या सरदारांनीं ज्या कित्येक मोहिमा व मुलुखगिऱ्या केल्या, त्यांत त्याच्या मसलतीविरुद्ध कामें झालीं, व पेशव्यावर कर्जाचा मोठा बोजा बसला. हिंदुस्थानचें राज्य मिळवून त्याचें रक्षण करणें त्या काळीं फार कठीण होतें. त्यासाठीं लाखों फौज पदरीं बाळगावी लागे. तिच्या खर्चासाठीं, शिंदे, होळकर, बुंदेले वगैरे सरदारांनीं कराराप्रमाणें पेशव्याकडे ज्या रकमा पाठवावयाच्या त्या न पाठविल्यामुळें, राज्यकारभार चालविणें पेशव्यास व भाऊंस फार कठिण जाऊं लागलें. नानासाहेबानें आपल्या कारकीर्दीत गुजराथ, माळवा वगैरे प्रांतांत मराठ्यांचा कायम अंमल बसविला. त्यानें तुळाजी आंग्र्यासारखे चांचे लोकांची बंडाई मोडली व त्याचे मनांतून इंग्रजांचे मदतीनें पोर्तुगीझ लोकांसही हिंदुस्थानांतून घालविण्याचा विचार होता. पेशव्यानें जी म्हैसुराकडे स्वारी केली, त्या वेळीं बेदनूरचा किल्ला जर ताब्यांत येता तर यापुढें मराठ्यांच्या राज्यास नवीन होणारा शत्रु हैदर मुळींच पुढें

आला नसता. परंतु पानिपतच्या घोर प्रसंगामुळें हे सर्व बेत जागच्या जागीं राहिले' [म. शि. च. पृ. ४२].

मनुष्यस्वभावाची पारख करून त्यास आपल्या कबजांत आणण्यांत नानासा० विशेष कुशल होता. स्वभावानें आंतल्या गांठीचा असून, स्वतःचा अंत लागूं न देतां, दुसऱ्याचें इंगित काढून घेऊन आपला शह कायम ठेवणें, अडचणीच्या प्रसंगांतून कांहीं तरी युक्ति काढून निभावून जाणें, प्रसंगीं पड खाऊन आपला हेतु सिद्धीस नेण्याची संधि उत्पन्न करणें, भिन्न प्रकृतींच्या व्यक्तींस नाना उपायांनीं नरम करणें, अशा प्रकारची अष्टपैलू वागणूक नानासाहेबाची होती. हिंमत, साहस, जरब इत्यादि बाबतींत सदाशिवराव वरचढ होता, परंतु तापट व हट्टी स्वभावामुळें त्याचीं कित्येक कामें बिघडत, तसा प्रकार नानासा० चा होत नसे. यमाजी शिवदेव, श्रीनिवासराव प्रतिनिधि, ताराबाई, जिजाबाई, बाबूजी नाईक, रघूजी भोसले, दमाजी गायकवाड, गोविंदराव चिटणीस, मानाजी आंगरे, अशा भिन्न व प्रखर व्यक्तींस कोणत्या ना कोणत्या मार्गानें ताळ्यावर आणून, त्यानें आपलें काम पुढें चालविलें. राज्यचालकाचें मुख्य कसब यांतच आहे. प्रत्येक व्यक्तीचा स्वभाव ओळखून त्याजकडून आपलें काम करून घेणें हेंच मोठें कसब आहे; आणि याच कारणामुळें नानासाहेबाच्या हातून राज्याचा एवढा उत्कर्ष झाला. केव्हां झगडून तर केव्हां हार खाऊन, केव्हां गोड बोलून तर केव्हां रागावून, केव्हां बक्षिस देऊन तर केव्हां शिक्षा करून, राज्यचालकास आपला शह ठेवावा लागतो. असें वर्तन ठेवण्यास दूर विचार व शांत वृत्ति हे गुण अवश्य पाहिजेत. म्हणूनच नानासाहेबानें शाहूची मर्जी पूर्णपणें संपादन केली, ताराबाईस निर्माल्यवत् केलें, शिंदेहोळकरांकडून दिल्ली अटकेपर्यंत राज्याचीं कामें घेतलीं; निजामाचा नकशा मोडिला, आणि थेट कर्नाटकापर्यंत अंमल बसविला. शाहूच्या मृत्युसमयीं राज्यावर मोठेंच गंडांतर आलें होतें, तें त्यानें म्हणूनच निभावलें. पानपत प्रसंगीं नुसता हात पाय गाळून स्वस्थ न बसतां, हिंमतीनें पुढें जाऊन तो दोन महिने ठासून बसला, म्हणूनच नर्मदेपलीकडे मराठ्यांचा अंमल कायम राहिला. प्रकृति ढांसळली

नसती तर अटके पावेतोंचा सर्व बंदोबस्त त्यानें तेव्हांच केला असता. तुळाजी आंगऱ्याची व नानासा०ची प्रत्यक्ष भेट झाली नाहीं हें दुर्भाग्य समजलें पाहिजे. भेट झाली असती तर आंगऱ्याचा कलह विकोपास गेला नसता. नीतिदृष्ट्या पेशवा माधवराव कदाचित् वरचढ दिसेल, परंतु राज्याचे दृष्टीनें सर्व पेशव्यांत एकंदर गुणांनीं नानासाहेबच ज्यास्त म्हणतां येईल. माधवरावास व सदाशिवरावास हाताखालचे लोक कांपत, नानासाहेबाला ते भजत. माधवरावानें भर दरबारांत गंगाधर यशवंताच्या तोंडांत मारिली, तसा प्रकार नानासाहेबाचे हातून घडला नसता. त्याचें आत्मसंयमन जबरदस्त होतें. ' कै. नानासाहेबांनीं लोभ केला, त्याप्रमाणें आपणही अकृत्रिमपणें लोभ करून चालवावें,' असे अनेक सरदारांचे उद्गार पुढें कैक वर्षें निघालेले वाचण्यास सांपडतात.

नानासा० व गोपिकाबाई सारखींच सुंदर, सशक्त, तेजस्वी, शहाणीं व भाग्यशाली होतीं. नानासाहेब कोणत्याही प्रकारच्या जुलमाचा कट्टा शत्रु असून त्याच्या वेळीं मराठीं राज्यांत सर्वत्र सुख नांदत असून, प्रजा त्यास अद्यापि धन्यवाद व आशीर्वाद देतात असें डफ म्हणतो. भाऊसाहेबानें नाक कान कापण्याकरितां कैदी त्याजपुढें आणिले असतां, नानासा० म्हणाला, 'अरे भाऊ, आपण कृष्णंभटाच्या घरीं मेजवानीस आलों आहों, लोकांचे नाक कान कापण्यास आलों नाहीं' ( ह. ब. ). तत्कालीन प्रघातास अनुसरून इतरांप्रमाणें त्याच्या रक्षा होत्या, एवढ्यावरून त्यास अनीतिमान म्हणतां येत नाहीं.

नानासाहेबाच्या कारकिर्दीत हिशेबाची व महसुलाची व्यवस्था सुधारली. पोलिसचा बंदोबस्त बरा होऊं लागला. बाळशास्त्री गाडगीळ त्यास मुख्य न्यायाधिशी मिळून त्यानें न्यायाचें काम चोख केलें; आणि राज्यकारभारांत नानाप्रकारच्या सुधारणा होऊन रयतेची भरभराट झाली, असें स्वतः डफनें सर्व तपासाअंतीं नमूद करून ठेविलें आहे, तें नुसत्या कल्पनेनें लिहिलेलें नव्हे. ह्या सर्व गोष्टी करण्यांत नानासाहेबास मुख्य साह्य सदाशिवरावाचें असून, तो हुशार व दक्ष कारभारी प्रथम रामचंद्रबाबाजवळ हीं कामें शिकला. वास्तविक नानासाहेबाच्या यशस्वी कारभाराचें मुख्य श्रेय सदाशिरावास आहे.

अनेक संकटें, मोहिमा, लढाया व विवंचना चालू असतांही पेशवा व त्याचे हस्तक यांनीं हें कारभाराचें काम निर्वेध व अखंड चालू ठेविलें. फिरतीवर व स्वारींत असतांना सुद्धा हें काम बंद पडत नसे. यशस्वी कारभारभाराचें बीज आयव्ययांवर योग्य दाब हें होय, आणि या दाबास मुख्य आधार हिशेब. पेशव्यांच्या राज्यकारभारांत हिशेबाची पद्धत फार नांवाजलेली असून, अनेक विद्वानांनीं या पद्धतीची तपासणी करून प्रशंसा केली आहे. ही पद्धत पुढें नानाफडणिसाचे वेळेस पूर्णत्वास आली. पण तिचा उगम पुण्यास स. १७५० पासून झाला. या पद्धतीचा मूळ उत्पादक रामचंद्रबाबा हा असून त्याचेच जवळ सदाशिवराव, महादोबा, व नाना पुरंदरे वगैरे अनेक इसम त्या पद्धतींत निष्णात झाले. सखाराम बापू, रामाजी अनंत, गंगाधर यशवंत इत्यादिकांनीं याच पद्धतीचा पुढें परिपोष करून ठिकठिकाणीं फैलाव केला. फड म्हणजेच हिशेबी कचेरी. ही कचेरी पुण्यास असून तिचा मुख्य चालक तो फडनीस. नाना फडणिसास बापाचा दरख २९·११·१७५६ रोजीं मिळाला, आणि सदाशिवरावाबरोबर राहून तो हिशेबांत निष्णात झाला. हिंदुस्थानच्या सर्व ठिकाणांहून आलेल्या हिशेबांचें एकीकरण पुण्यास या मुख्य कचेरींत होत असे. स. १७५० पासून नानाफडणिसाच्या मृत्यूपर्यंत देशांत निरनिराळ्या ठिकाणीं कारभार करणारे इसम मूळ पुण्यास या फडांत शिक्षण घेऊन तयार झाले. सरदार, सेनानायक वगैरे बाहेर मोहिमांवर जाऊन तयार होत, परंतु फडणीस, चिटणीस, सवनीस, कारखानीस इत्यादि शेंकडो कामें करणारे कारकुनी पेशाचे इसम प्रथम या फडांतून बाहेर पडत, आणि केव्हां केव्हां ते पुढें सरदारीही करूं लागत. सदाशिवराव, विश्वासराव, माधवराव वगैरे पुरुष याच पद्धतीनें तयार झाले.

नानासाहेबाचा उद्योग जबरदस्त होता. त्याचीं हजार पांचशें पत्रें नवीं उपलब्ध आहेत, त्यांवरून नुसत्या पत्रांसच किती श्रम पडले असतील याची कल्पना होते. शेंकडों पत्रें आज मिळत नाहींत. उदगीर व सिंदखेड या दोन मोहिमांतील पत्रांवरून सर्व गोष्टींचीं व्यवस्था नें ठेवून जबाबांनीं तजविजा

लावणें व सर्वांस खुलासे देणें हें काम कांहीं लहान नव्हतें. बारीक तपशिलाकडे त्याचें किती लक्ष होतें हेंही त्या पत्रांत उघड होतें. पुण्याहून साताऱ्यास घोडा पाठवितांना मोतद्दारास चार रुपये खर्चास दिले, त्याचा हिशेब त्यानें मागितला आहे [ ना. रो. ११४२ ]. बरसातीचे दोन तीन महिने खेरीज करून इतर वेळीं तो सदैव फिरतीवर असे, पण फिरतांना सुद्धां सर्व व्यवहार घरच्या सारखे सुरळीत चालत. हिंदुस्थानभर संचार करणाऱ्या लहान मोठ्या सरदारांस व त्यांच्या कारभाऱ्यांस दररोज किती पत्रें त्यास लिहावीं लागलीं असतील याची खरोखर कल्पनाच केली पाहिजे. उपलब्ध असलेल्या थोड्या बहुत कागदां-वरूनच जर कल्पना केली, तर सामान्यतः वीस वर्षांच्या त्याच्या कारभारांत दररोज सरासरीनें पांच तरी पत्रें त्यानें लिहिलीं असलीं पाहिजेत. यावरून एकंदर मराठी राज्यांत जबरदस्त लेखक असे दोन पुरुष दिसतात, एक हा नानासाहेब व दुसरा त्याचे खालोखाल नाना फडणीस. शिवाय नानासाहेबाचीं पत्रें उगाच कांही तरी कारकुनांनीं लिहून आणलेलीं नीरस नसत, स्वतःच्या हातचा किंवा कल्पनेचा पत्रांत ठसा उमटला नाहीं, असें बहुधा एकही पत्र नाहीं. त्याची भाषा गोड व मोहक असून अक्षरही जलद, सुवाच्य व मनांत भरणारें होतें.

एकाच जातींचे लोक कारभारांत भरले, सर्व जातींस सारखा फायदा मिळाला नाहीं, असा पेशव्यांवर आक्षेप आहे. जातिभेदानुसार कामें वांट-लेलीं होतीं, त्याप्रमाणें हिशेबाच्या व लेखनाच्या कामांत ब्राह्मण, सारस्वत व प्रभु सर्व बरोबरीनें कामें करीत. रामचंद्रबाबा, महिपतराव चिटणीस वगैरे नांवें पाहिलीं तर ते या कामांत ब्राह्मणांचे गुरूच होते. ' महिपतरावांनीं चिरं-जीवांचें साहित्य उत्तम प्रकारें केलें ' ( ऐ. ले. सं. १ पृ. २१ ). मराठे मंडळीचें लक्ष लिहिण्याचे कामापेक्षां सरदारीचे कामांत ज्यास्त होतें; आणि एकही ब्राह्मण सरदार मुलूखगिरींत पहिल्या प्रतीचा झाला नाहीं. मनुष्य स्वभावास अनुसरून भरंवशाच्या कित्येक कामांत पेशव्यांनीं आपल्या माहितीचे ब्राह्मण लोक पुढें आणिले याबद्दल वाद असण्याचें कारण नाहीं. परंतु मुद्दा

होऊन मराठ्यांस किंवा इतर जातींस त्यांनीं मागें टाकिलें, असेंही नाहीं. मराठे मंडळी सरदारींत भूषण मानीत तितकें लेखणींत मानीत नसत. बाकी बहुधा सर्व मराठे व त्यांच्या स्त्रिया अगदीं निरक्षर नसत; जरुरी पुरतें लिहिणें वाचणें जाणत. पेशव्यांच्या कारभारांत पुष्कळ माणसें उद्योगानें व अनुभवानें पुढें आलीं. लायकी अंगांत असणारांस कार्यक्षेत्र भरपूर मिळालें. हरिवंशाच्या बखरीवरून पेशव्यांच्या या उत्तेजनाची कल्पना होते. सर्व जातींच्या संगोपनाची भावना पेशव्यांस किती वाटत होती हें खालील उल्लेखावरून व्यक्त होतें. भास्करराव दादाजीनें लिहिलेल्या पत्रावर खालील मजकूर आहे. 'खावंदाचे घरीं सर्व लहान मोठे आहेत, बरे वाईट आहेत, परंतु आपपरत्वें जातीचा अभिमान हा प्रकार कांहीं एक नसावा. सर्वही खावंदाचीं लेकरें; व सेवक जो दौलतीचा खैरखवाई तो आपला उपयोगी, ऐसें ध्यानांत आणून सर्वांवर कृपा योग्यायोग्य असावी. अशी रीतीस जो आणीक तरेनें वर्तेल व दाखवील त्याचें पारिपत्यच असावें. तरीच बखेडेबंड मिटतील. आम्ही सेवक हें जाणतों कीं देशस्त, कोंकणस्त, कराडे, परभु, सेणवी, मराठे हे सर्व स्वामींचे, स्वामी इतक्यांचे मायबाप, चाकरी मात्र सर्वांनीं दौलतेची करावी, हे जातिभेद अभिमान नसावे.' ही सूचना छत्रपतींस केलेली दिसते. [ भा. इ. सं. मं. अप्रकाशित दप्तर ].

नानासाहेबाचीं जीं पत्रें मागें दिलीं आहेत त्यांवरून राज्याची कामगिरी करणारांची बूज पेशवा किती दक्षतेनें करी तें दिसून येतें. हत्ती घोडे, पालख्या, जवाहीर, इनामें इत्यादि देऊन लोकांचा गौरव केल्याचे उल्लेख भरपूर आहेत. पानपतावर पडलेल्या इसमांचे कुटुंबांचा परामर्ष पेशव्यांनीं फार दक्षतेनें घेतला ( इ. सं. ऐ. टि. ३·३२ ). नानासाहेबाचा स्वभाव शांत, विचारी व दयाळु होता. त्यामुळें लोक त्याजवर प्रेम ठेवीत. क्रूरपणाच्या शिक्षा तो सहसा करीत नसे. राजकीय कैद्यांसही तो सन्मानानें वागवी. तुळाजी आंगऱ्याची व्यवस्था चांगली ठेवण्यासंबंधानें त्याचे हुकूम होते.

आंगऱ्याचा पाडाव करून राज्याची समुद्ररेषा पेशव्यानें दुर्बल केली, हा

त्याच्या कारभारावर मुख्य दोष आहे. त्यानें भाऊच्या निधनानंतर उत्तरेंत एकदांही प्रयाण केलें नाहीं, त्यामुळें पानपतचा प्रसंग अंगावर आला. फौजेंत बायकामुलें नेण्याचा प्रघात बहुतेक त्यानेंच घातला, हें मोठेंच दोषस्थान समजलें पाहिजे. या दोषांचे विचार त्या त्या प्रकरणीं केले आहेत. बाजीरावाप्रमाणें नाना सा० कर्जबाजारी नव्हता. पानपतचे वगैरे सर्व खर्च भागवून, मरणसमयीं त्यास पांच पंनास लखांहून ज्यास्त कर्ज नव्हतें. तथापि सुरळीत कारभाराचे व धनोत्पादनाचे व्यापार वगैरे जे मुख्य मार्ग त्यांजकडे पेशव्याचें लक्ष यत्किंचित् होतें असें दिसत नाहीं. व्यापार व लष्कर यांच्या हालचाली निर्बंध राहण्यास सर्व राज्यांत मोठमोठ्या ठिकाणांस जोडणारे पक्के रस्ते कायमचे बांधावे लागतात. असे रस्ते पेशव्यांच्या राज्यांत बिलकूल नव्हते. अकबरानें सुद्धां असे रस्ते बांधले, पण पेशव्यांस त्यांची जरूर वाटली नाहीं, हें त्यांच्या कारभाराचें एक मोठें व्यंग नेहमींच मानलें जाईल. धर्माच्या दृष्टीनें मंदिरें तलाव वगैरे बांधले जात. परंतु लोकांच्या सोयीच्या दृष्टीनें रस्ते, तलाव किंवा सार्वजनिक इमारती बांधण्याकरितां पेशव्यांच्या राज्यांत स्वतंत्र खात्याची योजना नव्हती, एवढेंच नव्हे, तर आजूबाजूच्या शत्रुमित्रांच्या हालचाली व व्यवसाय समजून घेऊन, त्यांपासून आपली सुधारणा करण्याचे प्रयत्न नानासाहेबानें केले नाहींत. मुंबईस इंग्रजांचे काय उद्योग चालत होते, याची त्यास दाद नव्हती. पुण्याचे व्यापारी मुंबईस राहून धनसंपन्न कां होत, याचें बीज नानासाहेबानें समजून घेतलें नाहीं. या गोष्टींकडे लक्ष देण्यास त्यास अवकाश मिळाला नाही ही सबबही बऱ्याच अंशीं लंगडी आहे. वेळ आपण होऊन चालून येत नाहीं, ती मुद्दाम उत्पन्न करावी लागते. सारांश, व्यापार व आरमार यांजकडे दुर्लक्ष्य केलें, व धनोत्पादनाचे खरे मार्ग त्यास कळले नाहींत हा दोष पेशव्यावर नेहेमींच येणारा आहे. तथापि राज्यकारभारांत पेशव्यांनीं केवळ स्वार्थाची दृष्टि ठेविली होती, असेंही म्हणतां येत नाहीं. स्वार्थाकडे पाहण्याचा मराठे सरदारांचा स्वभावदोषच आहे, आणि निरनिराळे सरदार जिकडे गेले, तिकडेच आपली

व्यवस्था स्वतंत्र करूं लागले हा प्रकार पाहिला, म्हणजे पेशव्यांनीं या बाबतींत पुष्कळसें आत्मसंयमनच केलें असें म्हणावें लागेल. एकंदरींत पेशव्यांच्या चार पिढ्या पराक्रमी निघाल्या, आणि त्यांनीं राष्ट्रसेवेंत आपलीं आयुष्यें वेंचून मराठशाहीचा इतिहास पुष्कळसा नवीन बनवून तो चिरस्थायी केला, याजबद्दल सर्व राष्ट्रास नेहमींच अभिमान वाटेल. त्यांतल्या त्यांत नानासाहेब व सदाशिवराव यांनीं अश्रांत श्रम करून, हिंदुपदपातशाहीची शिवाजी महाराजांची कल्पना पूर्णावस्थेस आणिली हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. 'नानासाहेब यशस्वी, धारतील तें सिद्धीस नेतील,' असे विश्वासाचे, धन्यतेचे व गौरवाचे उद्गार तत्कालीन लेखांत आढळतात.

निरनिराळ्या राष्ट्रपुरुषांची योग्यता ठरविण्याची इतिहासकारांची एक विशिष्ट पद्धत आहे. कित्येक पराक्रमी व्यक्ती आपणास पाहिजे तशी परिस्थिति उत्पन्न करून आपल्या राष्ट्राचा भाग्योदय करतात. उलट पक्षीं कित्येक व्यक्तींना परिस्थितिच गडप करून टाकते, आणि कित्येकांच्या अंगीं या दोहींचें थोडथोडें मिश्रण असतें. शिवाजीसारखे कित्येक पुरुष पहिल्या कोटींतले होत. छत्रपति शाहू परिस्थितीच्या वर डोकें काढूं शकला नाहीं. परंतु नानासाहेबाला जरी परिस्थिति सर्वस्वी झुगारून देऊन शिवाजीप्रमाणें अनुकूल काल उत्पन्न करितां आला नाहीं, तरी असलेल्या परिस्थितींतच शक्य तितका राष्ट्रोद्धार त्यानें केला, असें निःसंशय म्हणतां येतें. पाश्चात्य इतिहासाच्या अवलोकनानें या मुद्यांचें ज्यास्त विवेचन वाचकांस करतां येईल. ' राजा कालस्य कारणं ' या न्यायानें प्रत्येक राष्ट्रपुरुषाच्या हातीं आपल्या लोकांस वळण लावण्याचें सामर्थ्य थोडें बहुत असतेंच. शिवाजीच्या अनुकरणानें जशी कांहीं विशिष्ट मंडळी राष्ट्रांत पुढें आली, तशीच पेशव्यांच्या अनुकरणानेंही राष्ट्रोद्धार करणाऱ्या असंख्य व्यक्ती पुढें आल्या, आणि या पहिल्या तीन पेशव्यांच्या वेळेस जी पद्धति व जीं माणसें निर्माण झालीं, त्यांच्या योगानें मराठ्यांचें राज्य पुढें शें पन्नास वर्षें चालून हिंदुस्तानच्या इतिहासांत त्यांचें नांव कायम झालें. ' जनार्दन बल्लाळ व बाबूराव फडणीस, कृष्णराव पारसनीस, अन्याबा मुजुमदार,

महिपतरावें चिटणीस, कोन्हेर त्रिंबक एकबोटे यांस पालखीचीं बस्त्रें व नेमणुका एकाच दिवशी स. १७५४ त मिळाल्या' [पु. रो.], यावरून लोकांस प्रोत्साहन कसें मिळे त्याची कल्पना होते.

नानाप्रकारच्या उद्योगांत अनेक लहान मोठीं कुटुंबें व माणसें या नानासाहेबाच्या वेळेस किती व कशीं भराभर पुढें आलीं; आणि राष्ट्रीय उद्योगाच्या हजारों व्यवसायांत लोकांची हांव व त्यांच्या उमेदी कशा झपाट्यानें वृद्धिंगत होत गेल्या, हें त्या वेळच्या कागद पत्रांत वाचून मोठें आश्चर्य वाटतें. स्वराज्याचा मुख्य उपयोग तो हाच आहे. मोहिमेच्या, यात्रेच्या, व्यापाराच्या वगैरे निमित्तानें लाखों लोकांचा संचार हिंदुस्तानच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत सारखा पन्नास पाऊणशें वर्षें होत राहिला, त्यामुळें ठिकठिकाणचे रीतरिवाज, कलाकौशल्य, आहारविहार, देवघेव वगैरे बाबतींत महाराष्ट्राचें जीवन पुष्कळ विस्तार पावलें. उत्तर हिंदुस्तानांतील नकशीच्या व कलाकौशल्याच्या चिजा महाराष्ट्रांत आल्या. आहारविहार व्यवसाय वगैरे बाबतींत सुद्धां नवीन प्रचार उद्भवले, आणि महाराष्ट्रांतील गरीब राहणी बदलून जाऊन सुखोपभोग व ऐषआराम वृद्धि पावले. उत्कृष्ट घोडे, उत्कृष्ट शस्त्रास्त्रें, नाना प्रकारच्या पोथ्यापुस्तकें व ग्रंथ, नाटकशाळा, वगैरे महाराष्ट्रांत आणण्याबद्दल त्या वेळच्या पत्रांतून भरपूर उल्लेख आहेत. [ ना. सा. रो. पृ. १·१४६–१४८ ]. ओळखी व उद्योग वाढत गेले, तशा जरुरी व आकांक्षाही वाढल्या. एकाचे दुसऱ्याकडे वशिले सुरू झाले. देवस्थानें इनामें, दानधर्म वगैरे संपादण्यासाठीं लोकांची धडपड सुरू झाली. याचें प्रतिबिंब त्या वेळच्या कागदांत उमटलेलें दिसतें. एकाच्या अनुषंगानें दुसरा उद्योग, व एका कुटुंबाच्या अनुषंगानें दुसरें कुटुंब, अशा रीतीनें राष्ट्राचा खटाटोप वृद्धि पावला. काम पडलें म्हणजे माणसें कशीं तयार होतात, याचीं उदाहरणें पदोपदीं मिळतात. नारायण दीक्षित कायगांवकर मूळचा साधुवृत्तीचा गृहस्थ होता, त्यानें काशींत प्रतिमहाराष्ट्र उत्पन्न केलें. त्याच्या मुलांनीं व नातवांनीं मूळचा साधुवृत्तीचा पेशा कायम ठेवून, त्यांत सावकारीची व राज्यकारस्थानाची भर घातली. ही दीक्षित मंडळी म्हणजे उत्तरेंतील

एक महाराष्ट्रीय शक्ति होती. त्यांच्या कृपेची व आशीर्वादाची लालसा महाराष्ट्रीय लोक तर ठेवीतच, परंतु अनेक मुसलमान सरदार व प्रत्यक्ष बादशहासुद्धां ती लालसा धारण करीत. [ का. सं. प. या. ३७ ]. दीक्षितांचा व्यापार व देवघेव सर्व देशभर चालू असून त्यांची किफायतही मोठी होती. बादशहाच्या दरबारांत सुद्धां त्यांचा मान मोठा होता. बाळकृष्ण दीक्षित दिल्लीस गेला तेव्हां त्यास बादशहानें ' आदरपूर्वक सन्मानानें शहरांत आणिलें. भेटीचे दिवशीं खुद्द बादशहा दरवाजापर्यंत सामोरे येऊन हात धरून नेऊन बसविलें. फार सत्कार ठेवून बोलले कीं राजा शाहूचे जे गुरू व ज्या थोरले दीक्षित महाराजांचा पूर्ण आशीर्वाद औरंगजेब बादशहावर जाला, त्यांच्या आशीर्वादानें या बादशाहीची दिवसेंदिवस ऊर्जित दशा आहे. आपले वडील पैगंबराप्रमाणें होऊन गेले. आपली तीच योग्यता आहे. तेव्हां आपण येथें येऊन दर्शन दिल्यामुळें आम्ही आज कृतार्थ झालों. वगैरे भक्तिपूर्वक भाषणें करून थोरले नारायण दीक्षितमहाराजांच्याप्रमाणें सन्मान ठेविला. नंतर पंधरा हजारांचा गांव, जहागिरीचें फर्मान व पोषाख, पालखी, मोरचेल, चवरी, जवाहीर, वगैरे खिलत दिली, आणि लिहिलें, दीक्षितांस जहागीरचें काय, त्यांचें पुण्य बलवत्तर, त्यांजवर ईश्वराची कृपा, व आपण त्यांचे शिष्य. तेव्हां त्यांस काय कमी आहे ? परंतु रियासतीचें कल्याण व आम्ही कृतार्थ व्हावें या करितां ही यत्किंचित् सेवा केली, याप्रमाणें पत्र आलें. दीक्षित लवकर काशीस जातील. शरीरें क्षेम आहेत. ' हें पत्र पेशव्यानें वासुदेव दीक्षितास लिहिलेलें आहे, [ सन १७५४, खंड ११·८९ ].

सर्व देशांत प्रमुख ठिकाणीं पेशव्यांचे हस्तक, आप्त, गुरु इत्यादि अनेक मंडळी असून त्यांजकडून अनेक प्रकारची कच्ची बातमी त्यांस मिळत असे. बगाजी यादव पुत्रदुःखामुळें यागी जाले आहेत, तरी हरप्रकारें समाधान करून ते तेथें येत ते गोष्ट करावी. त्यांस पत्र पाठविलें त्याचें उत्तर आलें नाहीं, असें पेशवा २४·९·१७५७ रोजीं दीक्षितास लिहितो. ' येथें कालगतीनें दुःशकुनादिक एक दोन जहालीं. पुढें ईश्वर इच्छा प्रमाण. श्रीकृपेनें सर्व विघ्नें परिहार होतील ' [ ३·४९७, ५४० ].

### ३. कौटुंबिक परिचय.—

**पेशव्यांची वंशावली,—मध्यविभाग १ पृ. २० वरून पुढें,—स. १७२०-१७६१.**

आधार, तीन शकावल्या, पे. वं. खं. ४, का. सं. प. यौं. ४९२ व ४९६.

**१. बाळाजी विश्वनाथ=राधाबाई.**

२. विसाजी ऊ० बाजीराव ल.काशीबाई. ३. भिऊबाई. ४. अंताजी ऊ० चिमाजी आपा. रखमाबाई. | अन्नपूर्णा. ५. अनूबाई

६. बाळजी ऊ० नानासाहेब. गोपिकाबाई. ७. रामचंद्र. ८. रघुनाथ. जानकी व आनंदी. ९. जनार्दन. सगुणा. १०. सदाशिवराव. उमाबा. | पार्वती. ११. बयाबाई ओंकार

१२. विश्वास. १३. माधव. १४. यशवंत. १५. मुलगा. १६. नारायण. २ मुलगे. २ मुलगे.

**वंशावळींतील व्यक्तींचा विशिष्ट तपशील अंकानुक्रमें:—**

१ मृ. २·४·१७२०. राधाबाई अंताजी मल्हार बर्वे डुबेरकराची कन्या. तिचा मृ. १९·४·१७५३. बाळाजीची बहीण बहिरवभट मेहेंदळे यास दिलेली, तिचा नातू बळवंतराव मेहेंदळे.

२ मृ. २८·४·१७४०. काशीबाई—चासकर महादाजी कृष्ण जोशी यांची कन्या, मृ. २७·११·१७५८. काशीबाईची यात्रा रामेश्वरची मे १७४२, काशीची, जानेवारी—मे १७४६, बंधु कृष्णराव चासकराचा मृ. १·४·१७५४. बाजीरावाची रक्षा मस्तानी, सती गेली. मुलगा समशेर बहादर ज. १७३४, लग्न १८·१०·१७५३; मृ. पानपतावर; नातू कृष्णसिंग ऊ० अलीबहादर, बांद्याचे नवाब.

३ भिऊबाई, लग्न आबाजी नाईक जोशी बारामतीकर. मूल झालें नाहीं. मृ. ७-६-१७४७.

४ मृ. ३१-१०-१७४० क्षयानें, पहिली स्त्री रखमाबाई, त्रिंबकराव पेठ्याची बहीण, मुलगा स० रा०; रखमाबाई मृ० ३१-८-१७३०. दुसरी बायको अन्नपूर्णा सती, मुलगी १ लहान बयाबाई.

५ अनूबाई, लग्न व्यंकटराव घोरपडे-मुलें दोन, वडील वेणूताई त्रिंबकराव पेठ्याची बायको, धाकटा नारायणराव. अनूबाई मृ. ३०-१२-१७८३.

६ नानासा० ज. ८-१२-१७२१, मुंज, ११-१-१७२८, ल. १ गोपिकाबाई रास्ते ११-१-१७३०, गर्भाधान जानेवारी १७४०, अपत्यें ५ मुलगे, मुलगी नाहीं. गोपिकाबाई मृ. ३-८-१७८८ नासिक पंचवटी येथें. दुसरें लग्न २ राधाबाई वाखरे, २७-१२-१७६० व तिचा मृ. १९-११-१७७०. एक लेकवळा हैबतसिंगदादा नांवाचा होता, [ म. द. रु. २ पृ. ९७ ].

७ रामचंद्रबाजी-स. १७२३-१७३३.

८ रघुनाथबाजी-१८-८-१७३४-११-१२-१७८३; मुंज ४-२-१७४०; ल. जानकीबाई गोपाळभट बर्वे २५-२-१७४२, इचा मृ. २२-८-१७५५, प्रसूतीनंतर-मुलगा झालेला लवकरच वारला. दुसरें ल. आनंदीबाई ओक १७-१२-१७५५, इचा मृत्यु १२-३-१७९४, पहिला मुलगा भास्करराव ज. १८-३-१७६२.

९ जनार्दनबाजी-१०-७-१७३५-२१-९-१७४९, मुंज २६-३-१७४०, स्त्री सगुणाबाई रामाजी अनंत भिडे याची कन्या, ल. २०-४-१७४४, इची काशीयात्रा १७५७, मृ. १३-११-१७८३.

१० सदाशिव चिमणाजी ५-७-१७३०-१४-१-१७६१, मुंज ११-२-१७३६; लग्न उमाबाई ७-२-१७४०, पहिला मुलगा कृष्णराव ज. २४-११-१७४६, वारसें ३०-६-१७४७ जगला नाहीं; दुसरा मुलगा ३०-७-१७४८ अल्पवयी. उमाबाईचा मृ. २२-३-१७५०; दुसरें लग्न पार्वतीबाई कोल्हटकर २६-४-१७५०,-इला दोन मुलगे झालेले लहानपणींच वारले. सदाशिव-

पेठेची वसाहत १७५८; मुजफरखानाकडून खुनाचा प्रयत्न २८·१०·१७५९. पार्वतीबाईचा मृत्यु १६·८·१७८३, नंतर उभय नवराबायकोचें और्ध्वदेहिक एकदम झालें. महादजी शिंद्याचें सांत्वनपत्र इ. सं. ऐ. टि. ३·३७.

११ बयाबाई ओंकार लग्न २४·४·१७४५ साडेचार वर्षें वय असतां; मृ. १८·४·१७५९.

१२ विश्वासराव २२·७·१७४२—१४·१·१७६१, मुंज ९·३·१७४९, लग्न लक्ष्मीबाई दीक्षित पटवर्धन २·५·१७५०, गर्भाधान एप्रिल १७५८, लक्ष्मीबाई मृ. १४·२·१७६३ पुणें येथें, पानपताहून आल्यावर.

१३ माधवराव–जन्म शनिवार १६ फेब्रुवारी १७४५ सकाळीं ११ घटिका मकरराशी, सावनूर येथें; मृ. क्षयानें १८·११·१७७२, मुंज १४·२·१७५२, लग्न ९·१२·१७५३ रमाबाई जोशी, गर्भाधान ३·७·१७६५, मूल झालें नाहीं. सती गेली. पेशवेगिरी १७·७·१७६१ रोजीं मिळाली.

१४ यशवंतराव १३·८·१७४८ लहानपणीं मृत्यु.

१५ चवथा मुलगा ज. ५·९·१७५० जगला नाहीं.

१६ नारायणराव १०·८·१७५५—३०·८·१७७३, मुंज २८·५·१७६२, लग्न गंगाबाई साठे १८·४·१७६३; गर्भाधान १७·७·१७६९; पुत्र माधवराव सवाई ज. १८·४·१७७४. गंगाबाई सकेशा स्थितींत मृ. १२·७·१७७७.

गोपिकाबाई व पार्वतीबाई या दोघी स्त्रिया पुढें पुष्कळ वर्षेपर्यंत पेशव्यांच्या अंतःपुरांत अधिकार चालविण्यास वांचल्या. गोपिकाबाई तेजस्वी, शहाणी परंतु हट्टी होती. मतलबी स्वभावामुळें मोठें कुटुंब चालविण्यास ती राधाबाईप्रमाणें समर्थ नव्हती. तिनें सवाई माधवरावास केलेला उपदेश सुप्रसिद्ध आहे [का. सं. प. या. ४५२ ]. तिच्या उत्तरकार्यास ३२५२९ रुपये खर्च झाला. पार्वतीबाई सौम्य व थोडी भोळसर असावी. सवाईमाधवरावाची लहानपणाची देखरेख तिच्याकडे होती. पेशव्यांच्या घराण्यांतील पुरुषांची आयुर्मर्यादा थोडी दिसते. माधवरावाचा क्षय, नारायणरावाचा खून, व सवाई माधवरावाचा अपघात. हे सोडून दिले तरी, पहिला पेशवा बाळाजी साठीच्या वर व

शेवटचा बाजीराव ७६ वर्षे जगले. पहिल्या बाजीरावाचें वय चाळिशीच्या वर दोन तीन वर्षेच असेल. चिमाजीआप्पा त्याहून दोन वर्षे कमीच जगला. नानासा० ४१ व्या वर्षी व सदाशिवराव ३१ व्या वर्षी वारले. रघुनाथराव अनेक भानगडींमुळें वृद्धावस्थेस पोंचला असावा अशी आपली कल्पना होते, परंतु तो मरणसमयीं ४९ वर्षांचा होता. दुसऱ्या बाजीरावाचा बंधु चिमाजी ४६ वे वर्षी वारला. एकंदरींत लहानपणापासून कामाचें ओझें व दगदग पडल्यामुळें या पुरुषांची आयुर्मर्यादा बरीच आंखडली असें वाटूं लागतें. वयाचे दहा अकराव्या वर्षी त्यांचे विवाह होऊन, बायकोचें वय ७–८ असे. म्हणजे पुरुषांची वैवाहिक राहणी १६·१७ वे वर्षी सुरू होई. हेंही एक अल्पायुष्याचें कारण असावें. त्यांस २०–२१ व्या वर्षी मुलें होत. सदाशिवरावास १७ व्या वर्षी उमाबाईच्या पोटीं मुलगा झाला होता. चिमाजी आपा, सदाशिवराव व थोरला माधवराव वैवाहिक नीतींत खंबीर होते. सर्वच पुरुषांचा आयुःक्रम हल्लींहून पुष्कळसा भरीव (Intensive) व फार लवकर वाढीस लागलेला होता.[1]

४. **सामाजिक व धार्मिक परिचय.**—शाहूमहाराजांचे कारकीर्दींत शिवछत्रपतीच्या पद्धतीचेंच अनुकरण होऊन पूर्वीच्या देणग्या व वर्षासनें पुनः चालू झालीं; आणि कवि, सत्पुरुष, स्वधर्मनिष्ठ ब्रह्मवृंद यांचा योगक्षेम यथास्थित चालूं लागला. शाहूचे पदरीं अनेक विद्वान थोर पुरुष उदयास आले. कालगांवचे कृष्णाचार्य शिरोमणि, कठापुरचे बाबदेव भट चाव्हरे, श्रीवर्धनचे भानजोशी ज्योतिषी, अष्टयाचे समुद्रभट बिन त्रिंबकभट, कऱ्हाडचे रघुनाथभट बिन शंकरभट इत्यादि विद्वान लोक राजाश्रयाचे योगानें प्रसिद्धीस आले. कचेश्वर कवि हाही त्याच वेळीं उदयास आला, त्याजकडून शाहूनें उपदेश घेतला असल्यामुळें तो ' राजगुरु ' या नांवानें प्रसिद्ध होता. पेशव्यांचे कारभारापासून तर राज्याचा व्याप वाढत गेल्यामुळें सर्व शिष्ट लोकांचीं मुलें लिहिण्या वाचण्यांत व हिशेबाचे कामांत तरबेज होऊन तलवार बहादुरीप्रमाणेंच विद्या–संपादनाकडे

---

१ **टीप**–स. १९१० सालच्या मनोरंजनांत ' पेशव्यांच्या स्त्रिया ' वर रा. ब. पारसनीस यांचा एक उपयुक्त लेख आहे.

लोकसमाजाची प्रवृत्ति वाढत गेली. बाजीराव पेशवा गुणिजनांचा चहाता होता. निरंजन माधव हा कर्नाटकांतील कवि बाजीरावाच्या आश्रयानें प्रसिद्धीस आला. शाहूच्या व बाजीराव नानासाहेबांच्या रोजनिशा वाचल्या म्हणजे राज्याचे कामीं खपणाऱ्या लोकांप्रमाणेंच देवस्थानें, सत्पुरुष, किंवा विद्वान ब्राह्मण यांस इनामें, नेमणुका वगैरे करून दिल्याचे उल्लेख भरपूर आहेत. यास विद्येस उत्तेजन असें एका अर्थें म्हणतां येईल, परंतु ही विद्या म्हणजे केवळ वेदविद्या असून, ब्राह्मणांपुरतेंच हें उत्तेजन असे. इतर जातीयांस सार्वजनिक शिक्षण देण्याची हल्लींची कल्पना त्या वेळीं बिलकूल नव्हती, या संबंधाचें विवेचन इतरत्र करण्यांत आलेंच आहे. तसेंच इतर जातीयांस आपापल्या धंद्यांत पोटाचा भरपूर उद्योग त्या वेळच्या राज्याच्या पसाऱ्यांत मिळत असल्यामुळें, त्यांनाही ब्राह्मणांस मिळणाऱ्या या धार्मिक उत्तेजनाचा हेवा वाटल्याचें एकही उदाहरण नाहीं. उलट मराठे, वैश्य, शूद्र वगैरे मंडळी भाग्यास चढली तेव्हां ते सुद्धां धर्मोपार्जनास्तव नाना प्रकारचीं इनामें किंवा उत्पन्नें ब्राह्मणांसच करून देत असत. या संबंधांत हल्लींची भिन्न दृष्टि त्या वेळच्या समाजस्थितीस लागू करण्यांत मतलब नाहीं. सर्व लहान मोठे सरदार स्वतःच्या मुखत्यारीनें इनामें किंवा वतनें देत, त्यास सरकारच्या परवानगीची अपेक्षा नसे. जिंकलेल्या प्रदेशांतील लोकांचीं इनामें, सदावर्तें वगैरे पेशवे जशींच्या तशीं चालवीत असत [ खं. १ ले. १२३ व ५१ व टीप १०७ ]. परधर्मीयांचींही उत्पन्नें चालविण्यांत ते कसूर करीत नसत. देवब्राह्मणांचे ठिकाणीं शाहू महाराजांची निष्ठा अतोनात असून, त्यांचे उत्सव व उत्पन्नें यथायोग्य चालवावीं अशी शाहूची पेशव्यांस अंतकाळची निक्षून आज्ञा होती. शाहूची आज्ञा पेशवे परमेश्वराची आज्ञा समजूनच पाळीत असत. देवब्राह्मणांच्या कृपेनेंच आपले उद्योग चालून राज्यवृद्धि होते अशी पेशव्यांची तत्कालानुरूप समजूत होती.

गणपतिपुळें, सिद्धटेक, मोरेश्वर, थेऊर, नासिक इत्यादि ठिकाणीं देवदर्शनास वारंवार जाण्याचा पेशव्यांचा रिवाज होता. तसेंच प्रसंगानुसार हिंदुस्थानांत कुरुक्षेत्रापासून गयेपर्यंतच्या सर्व यात्रा बहुधा सर्व ऐपतवान

स्त्रीपुरुष एकवार तरी करून येत असत. बंदोबस्तासाठीं म्हणून बहुधा ही यात्रेच्छु मंडळी फौजांच्या स्वारीबरोबर जात. अन्य प्रसंगीं गोविंदपंत बुंदेले वगैरे कित्येक सरदारांवर शिफारसपत्रें घेऊन लोक यात्रेस जात. सती जाण्याची स्त्रियांची चाल बहुधा सार्वत्रिक होती. तुलादानें, कल्पलतादानें, देवस्थानांच्या स्थापना, तपस्वी ब्राह्मणांचे योगक्षेमास नेमणुका, इत्यादि प्रकार हरहंमेशचे असत. जन्मोत्सव, बाळंतविडे, मृतांचे दुखवटे, मकरसंक्रमणाचे तीळगुळ इत्यादि सामाजिक व्यवहार जारी होते. शकुन व मुहूर्त पाहिल्याशिवाय बहुधा पाऊल पुढें पडत नसे. महत्वाचीं कामें सिद्धीस जाण्यासाठीं नवस करण्यांत येत; आणि यशःसिद्धि आल्यावर ते नवस फेडीत. सरदारांच्या नेमणुकांचे किंवा इनामांचे मोबदले करितांना वारसांकडून नजराणे घेत; आणि असे नजराणे मुख्य पेशव्याशिवाय, जवळच्या बायकामुलांच्या नांवानें ज्याची जितकी शिफारस उपयोगास आली असेल तितक्या मानानें द्यावे लागत. किल्ल्यावर निशाण प्रथम चढविणारास मोठीं बक्षिसें देत. कांहीं दैवी उपायांनींही आपलीं कामें सिद्धीस नेण्याकडे लोकांचा कल असे. पेशव्यांचेही असे इलाज कांहीं कमी नव्हते. ता. १६-३ १७५० रोजीं पेशवा दीक्षितास लिहितो. 'एतदर्थें कांहीं दैवी उपाय बापूभट टोकेकर या करवीं आपण करवावा, कीं राजश्रींची कृपा चित्तांत आहे ते वृद्धीस पाववून, आम्हांस निरोप देत. महिना पंधरा दिवसांत होय ऐसें असेल तर करावें. द्रव्यवृद्धि अति करतां येत नाहीं याचा विचार आपल्या विचारें कसा तो करावा' [ ११-७९ ].

**५ श्रावणमास दक्षिणा.**—श्रावणमासांत ब्राह्मणांस विद्योत्तेजनादाखल दक्षिणा वांटण्याचा प्रघात शिवाजीच्या वेळेसच सुरू झालेला शाहूनें पुढें चालविला. प्रथम तें काम तळेगांवास दाभाडे सेनापति करीत, पुढें बाजीरावानें तें पुण्यास चालविलें, तें पेशवाई अखेर चाललें. दक्षिणेचे आंकडे कित्येक सालचे आढळतात ते असेः—

| | |
|---|---|
| स. १७३६–रु. १६३५४; | सन १७३७—रु. ४९०७३ |
| स. १७४९–रु. १२३५६०; | स. १७५१—रु. अडीचलाख. |

स. १७५२–रु. ६२८३५३; स. १७५३–रु. १२०६०१९
स. १७५४–रु. आठलक्ष; स. १७५८–रु. अठरालक्ष.

पुढील पंचविस वर्षांत दोनपासून पांचलक्ष पावेतों दक्षिणा दरसाल वांटण्यांत येत असे. विद्वान पंडितांस सोन्याचीं नाणीं देत. श्रावण शु० ६ स वांटण्याची सुरुवात होई. हा समारंभ प्रथम खबुतरखान्यांत होत असे, पुढें पर्वतीवर स. १७५८ पासून होऊं लागला. ‘दरवाजास तट बांधून ब्राह्मण कोंडले. ब्राह्मणांची संख्या ८० हजार व देकार अठरा लक्ष झाला. खबुतरखान्यांत भणंग भिकार अठरा पगड जाती यांस देकार देवविला. चौदा प्रहर दक्षिणा वांटली, जवळ जवळ दोन अहोरात्र ब्राम्हण कोंडलेले असत.’ दक्षिणे शिवाय शिधे व खिचडी वांटीत.[१]

या शिवाय इतर दानधर्म पुष्कळ असत. शाहू छत्रपतीचें व बाजीरावाचें वृंदावन व श्राद्धपक्ष यांची व्यवस्था नाना सा० मोठ्या दक्षतेनें ठेवी. मंदिरांचे जीर्णोद्धार व नवीन स्थापना हीं कामें सदैव चालूच असत एकंदरींत पेशव्यांचे अंमदानींत कर्मनिष्ट धार्मिक बाबती जोरांत चालू होत्या. अशा बाबतींचे खालील उल्लेख स्मरणीय आहेतः—

१८·११·१७४८ थेउरास कल्पलतादान. ऑगस्ट १७४९ बनेश्वर मंदिराची सुरवात.
२६·७·१७५० ब्रह्मांड दान ३३०० तोळे. २५·७·५१ राधाबाईची रौप्यतुला.
२३·७·५२ सुवर्ण हस्तिरथ दान, सवालक्ष; गजगौरी व्रत.
१२·८·५३ सुवर्ण धेनुदान पर्वतीवर देवदेवेश्वरासंनिध.
१६·६·१७५४ नानासा० चें तुलादान पर्वतीवर, सुवर्ण, लोह, कांस, शिसें, नारळ व चंदन, खर्च रु. १०३४१२.
१४–२० मे १७५९ वडगांवास शकुंतेश्वराची स्थापना.
११·४·६१ नर्मदेवर मांधाता येथें तुलादान.

---

१ टीप.—[ खं. ६ पु. रो. पृ. ६८, ८४, ९४, ११०, १२२ यांत दक्षिणेचे उल्लेख असून या विषयावर वि. ज्ञा. वि. १९१३ जानेवारीच्या अंकांत रा. ब. पारसनीस यांचा लेख आहे ].

६. **पर्वतीचा देवदेवेश्वर.**—' पुण्याजवळील एका सुंदर टेकडीवर लहानसें देवस्थान पूर्वीपासून होतें. त्या ठिकाणाहून दिसणारा रम्य देखावा मनांत आणून नानासाहेब पेशव्यानें तेथें एक भव्य मंदिर बांधून, त्यांत देवदेवेश्वराची व चार कोपऱ्यांस चार लहान मंदिरें बांधून, त्यांत देवी, गणपति, सूर्य व विष्णु यांची स्थापना केली. जुन्या पर्वताईची मूर्ति अद्यापि देवीच्या मंदिरांत ठेविलेली दृष्टीस पडते. या भव्य पंचायतन मंदिरासमोर चौघड्याची उंच इमारत असून तेथून चौघड्याचा सुस्वर आवाज त्रिकाळ झडून लांबवर पसरतो, व मनास आल्हाद देतो.' या रम्य टेकडीवरील मंदिरावर नानासाहेबाची इतकी प्रीति जडली कीं त्यानें तेथें जवळच एक वाडा स. १७५४ त बांधिला; व विष्णूचें एक स्वतंत्र मंदिरही बांधिलें. ' दर एकादशीस खासे जाऊन पूजा करूं लागले.' खालच्या उतारावर मैदानाची जागा पाहून तेथें ब्राह्मणांच्या प्रतिवर्षी वाढत्या देकाराकरितां रमणा तयार केला. सरकारांत होणारीं सहस्र भोजनें आणि श्रावणमासांतील दक्षिणा, या टेंकडीवरील वाड्यांत व खालच्या रमण्यांत होऊं लागलीं. शाहू छत्रपतीच्या पादुकाही पेशव्यानें देवदेवेश्वराच्या मंदिरांत ठेविल्यामुळें या पर्वतीवरील मंदिरास विशेष महत्त्व व शोभा आली; आणि पेशव्यांचें त्या बाजूस वारंवार जाणें होऊं लागल्यामुळें, तिकडे शहरांतील लोकांच्या बागाही तयार झाल्या. पर्वतीच्या पायथ्याशीं एक ओढा असून त्याच्या अलीकडे पेशव्यांनीं स. १७५५ त एक तलाव बांधिला. तेथें खासे जाऊन बसत. त्याजला या ओढ्याचें पाणी घेऊन तें ज्यास्त झाल्यास पुनः त्याच आंबील ओढ्यांत काढून देण्याची व्यवस्था केली. [ दु. रं. पृ. ७३-७४]. याच ओढ्यांत सन १७६० सालीं भाद्रपद मासीं पाणी येऊन पक्षाचे ब्राह्मणांपैकीं दोन चारशें असामी बुडून मेले. पर्वतीच्या या मंदिराचें काम १७४९ त सुरू होऊन स. १७६१ त संपलें. देवदेवेश्वराच्या मूर्ती स. १७४७ त तयार झाल्या. स्थापना पुढें दोन वर्षांनीं झाली. मंदिराच्या कळसास स. १७६१ त सोनें चढविलें, तोळे १०८०. ता. ४-६-१७४९ चा उल्लेख आढळतो तो असा. ' खर्च रु. ९०२० धर्मादाय पोतापैकीं पर्वती येथें श्रीदेवाच्या स्थापनेस श्रीदेव-

देवेश्वर बाण, रुप्याचा महादेव वजन तोळे ६७३४, मांडीवर मूर्ती सुवर्णाच्या, उजवीकडे गणपति, डावीकडे पार्वती वजन तो. ६८६, बाहेर गणपति पाषाणाचा व पर्वताई भवानी' [ ना. रो. २·३४३ ].

नानासा० च्या वेळेस स्वास्थ्य प्राप्त होतांच राजवैभवाच्या पद्धती अनेक बाबतींत अंमलांत येऊं लागल्या. पेशव्यांच्या स्वारीचें वर्णन येणें प्रमाणें केलेलें आढळतें. ' नानासाहेबास बादशाही थाटाची आवडही होती, त्यामुळें त्याजपाशीं निरनिराळ्या देशांतील प्रवासाचें उंची उंची सामान एकत्र झालें होतें. पेशव्यांचा तंबू लागावयाची जागा बिनीवाल्यांकडून आगाऊ साफ होऊन तिच्या भोंवतीं चारही बाजूंनीं चित्रविचित्र कापडाची मोठी कनात भिंतीप्रमाणें लावीत. तिला चार मोठे दरवाजे ठेवलेले असत. या कनातीच्या आंत अनेक उंच तंबू उभारले जात. त्यांत मुख्य पेशव्याच्या तंबूस सुवर्णाचे कळस असून ते दूरवर मोठे रमणीय दिसत. तंबू मोठे विस्तीर्ण असून त्यांत निरनिराळीं दालनें उंची रेशमी जरतारी कापडाच्या कनातींनीं केलेलीं व सर्व सोयींनीं परिपूर्ण अशीं असत. स्नानगृह, स्वयंपाकगृह वगैरे करितां निराळे लहान तंबू असून त्यांचे भाग लहान कनातीच्या भिंतींनीं तोडलेले असत. सारांश, मोठ्या कनातीच्या आंत शिरल्यावर आंतील जागा एखाद्या टोलेजंग वाड्यासारखी भव्य दिसे. मुख्य दरवाजापुढें एक मोठें विस्तीर्ण मैदान मोकळें असून त्यांत शृंगारलेले हत्ती घोडे नेहमीं पाळीपाळीनें उभे असत. मैदानाच्या चारही बाजूंस निरनिराळ्या रंगांचीं निशाणें फडकत असत. दर मुक्कामावर फौजेच्या उतरण्याची शिस्त बांधलेली असे. श्रीमंतांच्या तंबूपासून कोस दोन कोसपावेतों दोनही बाजूंनी दुकानें लागलेलीं असत. हीं दुकानें लहान पालांतून मांडलीं असून त्यांत सर्व तऱ्हेचे जिन्नस विकत मिळत. दुकानांच्या मागें दोनही बाजूंस निरनिराळ्या पथकदारांच्या जागा नेमलेल्या असत. बहुतेक पथके राहुट्याच वापरीत '

**७. पुण्यनगरीचें ऐश्वर्य.**–' नानासा० पेशव्याच्या अंमदानींत पुण्यांत जें ऐश्वर्य खेळत होतें, तसें पुनः कधीं दिसलें नाहीं. पानपतच्या आघातापूर्वी

मराठशाहीचें राज्य अत्युच्च शिखरास पोंचलें होतें. काशीपासून रामेश्वरापर्यंत पेशव्यांच्या कीर्तीचा डंका वाजत होता. देशोदेशींचे सावकार पुण्यास एकत्र झाले होते. देशोदेशींच्या उत्तम जिनसा, उत्तमोत्तम हत्ती, घोडे, कसबी लोक व राजेरजवाडे त्या पुण्यभूमींत एकवटले होते. हल्लींच्या गाड्यांऐवजीं त्या वेळेस नानाप्रकारच्या सुवर्ण अलंकारांनीं सुशोभित झालेल्या जरीच्या वेलबुट्टानें उन्हांत प्रकाशणाऱ्या व भालदार चोपदारांच्या ललकारण्यानें रस्त्यांस गजबजून टाकणाऱ्या अनेक पालख्या राजमार्गांतून फिरत घोड्यांवरून फिरणारांची तर गणतीच नव्हती ( दुर्दैवी रंगू पृ. ६० ). त्या वेळेस पुण्याची हवा व पाणी या दोनही गोष्टी फारच निरोगी व ताकद देणाऱ्या होत्या. वस्तीही नवीन व मोकळी असल्यामुळें जमिनीचा स्वच्छपणा व हवेची शुद्धता यांत वैगुण्य उत्पन्न झालें नव्हतें. तशांत ती राजधानी हिंदुस्थानच्या सार्वभौम पदास चढली होती. सारांश, निरोगी हवा, पाचक पाणी, रुचकर अन्न, स्वादिष्ट फळें, सुगंधी फुलें, यांच्या समवायांत राजकीय ऐश्वर्य, कौटुंबिक स्वास्थ्य, व राष्ट्रीय उमेद या पुण्य-नगरांत एकवटल्या होत्या, त्या वेळची शोभा व लोकांच्या तोंडावरची टवटवी काय वर्णावी !'

पुणें शहरावर पेशव्यांचें प्रेम अतोनात होतें. त्याची सुधारणा करण्याकडे त्यांचें लक्ष सदैव असे. हिंदुस्थानभर शें पन्नास वर्षे चाललेल्या त्यांच्या संचारांत जे जे प्रकार त्यांच्या नजरेस येत ते पुण्यांत शक्य तितके उठवून देण्याचा त्यांस हव्यास होता. मंदिरें, पेठा, रस्ते, वाडे वगैरे बाबतींत लोकांस सवलती व उत्तेजन देऊन त्यांनीं नगररचना करविली. मंदिरें, हौद, वाडे, पेठा वगैरे स्मारकें त्या वेळच्या स्थितीचीं निदर्शक आहेत. ममत्वाचा झरा सदैव ओला असल्याशिवाय कोणतींही राष्ट्रीय कामें यशस्वी होत नाहींत. पेशवे रसिक, उद्योगी व अनुकरणप्रिय असल्यामुळें त्यांनीं पुणें शहर विशिष्ट प्रकारें सजविलें. याचे उल्लेख साधन ग्रंथांतून भरपूर आहेत [ पे ब पृ. ४३, ४५, ५२, ५७; व ना. रो. २ पृ. २०९]. सदाशिव पेठेच्या शेजारीं दुसरी पेठ वसवून तिला मुलाचे नांवावरून नारायण पेठ नांव ठेविलें. शहरास

चिरेबंदी कुसूं घालण्याचा कारखाना जिवाजीपंत खासगीवाल्यांचे मार्फत चालविला [ स. १७५८, पु. रो. ]. पर्वतीसंस्थान केलें. चतुर्थीस थेउरास स्वारी जात असे. थेऊर, आळंदी, गणेशखिंड या मार्गें झाडें लाविलीं. शेतें मोडून पुण्याची वस्ती वाढविली. पेशव्यांनीं कात्रज येथें तलाव बांधून आपल्या वाड्यासाठीं नळ बांधून पाणी आणिलें. त्याचें काम स. १७२९ त सुरू होऊन आठ वर्षांनी पुरें झालें. पुढें तेवीस वर्षांनीं मूळचा खापरी नळ काढून दगडी घातला. पश्चात् नानाफडणिसानें दुसरा तलाव बांधून सदाशिवपेठेच्या हौदांत पाणी आणिलें. पेशव्यांचे वाडे, नळाचें पाणी, नगर रचना वगैरे सर्व माहिती येथें थोडक्यांत देणें शक्य नाहीं. केसरी १६·८·१९११ व टाइम्स् ऑफ् इंडिया १८·६·१९१४ यांत कांहीं माहिती आहे.

कर्जाचे कांहीं आंकडे उपलब्ध आहेत [ ना. रो. २-२५४ ], त्यांवरून अंतसमयीं पेशव्याचें कर्ज १६४२०८२ रु. होतें. त्याच्या वीस वर्षांतील कारभाराचे कर्जाचे व व्याजाचे आंकडे व सावकारांचीं नांवें आहेत त्यांचा उपयोग विशिष्ट अभ्यासकांस होईल. खं. ११ ले. १२, १३, १७, १८, २६, ८०, ८१, यांतही असेच ८० वर्षांचे आंकडे व व्याजाचे दर आहेत. व्यापार, कारखाने, दुकानें, कर, टांकसाळी, टपाल, विहिरी, तलाव, किताब, बहुमान [ ना. रो. २·१२५ ], पुणें शहराच्या पेठा, तिळगुळ पाठविण्याच्या याद्या, वगैरे विषयही अभ्यसनीय आहेत [ ६·३४९, ३६९ ].

पुण्याच्या बंदोबस्तासंबंधानें ११·११·१७५९ रोजीं पेशव्यानें नानाफडणिसास लिहिलेलें पत्र वाचण्यालायक आहे तें असें. ' जागजागांचे हशमी लोक पुण्यास आणविले होते ते आले न आले त्याचा समाचार घेऊन, आले नसतील त्यांस पत्रें पाठवून जलदीनें आणावणें. तूर्त आळंदीची यात्रा भरत असेल, वाणी उदमी यात्रेस येत असतील, त्यांची रखवाली जाली पाहीजे. तरी लोक जमा जाले असतील त्यांपैकीं दोन तीनशें माणूस आळंदीचे यात्रेचे रखवालीस पाठवून देणें. पुण्यामध्यें चोऱ्या होतात म्हणून कळलें, त्यास चौकीस माणसें ठेवून चोरांचें पारिपत्य करून चोरी न हो तें करणें. फासेपारधी, कोल्हाटी वगैरे चोऱ्या करतात त्यांस मुलखांतून काढून देणें' [ ३. १४३ ].

# प्रकरण बत्तिसावें.



## शाहूकालीन प्रसिद्ध घराणीं.



**१. आनुवंशिक प्रयोजन.**—मराठशाहींत अनेक लहान मोठ्या घराण्यांचे उद्योग राष्ट्रकार्यास पोषक झाले, त्यांचे शक्य तितके उल्लेख राष्ट्रेतिहासांत

आले पाहिजेत. मुख्य ऐतिहासिक विवेचनांत बऱ्याच व्यक्तींचे व घराण्यांचे वृत्तान्त येऊन गेले आहेत, तत्रापि त्या घराण्यांचे उदयास्त व अन्य तपशील जे या पूर्वी मुख्य कथाभागांत येऊं शकले नाहींत, तेही बोधप्रद असून स्वतंत्रतेनें या कलमांत द्यावयाचे आहेत. याजवरून एकंदर राष्ट्रास व विशेषतः त्या घराण्यांचे वंशजांस पूर्वजांचें स्मरण ताजें होऊन या त्रोटक हकीकतींत ज्यास्त भर घालण्याची स्फूर्ति व्हावी असा उद्देश आहे.

छत्रपति, पेशवे, शिंदे, होळकर, गायकवाड वगैरे कित्येक प्रमुख घराणीं मुख्य भागांतच पूर्णत्वानें घेतल्यामुळें, त्यांच्या हकीकती या कलमांत घेतल्या नाहींत. तसेंच ऐतिहासिक कालांत काम करणारीं सर्वच घराणीं येथें आलीं असेंही समजावयाचें नाहीं. खरें ऐतिहासिक साहित्य अद्यापि फारच थोडें बाहेर आलें असून, त्यांत जे उल्लेख विखुरलेले सांपडले, तेवढेच येथें एकत्र केले आहेत. कित्येक घराण्यांच्या वंशजांकडून पत्रानें वगैरे तपास करितां माहिती मिळाली तिचाही अंतर्भाव येथें केला आहे.

मराठशाही बुडाल्यावर जरी राष्ट्रीय इतिहासाचें कार्य संपतें, तरी या ऐतिहासिक घराण्यांच्या वंशावळी मिळाल्या तितक्या, महत्त्वाचे मानानें, प्रस्तुत कालपर्यंत दिल्या आहेत. यांत एक विशिष्ट उद्देश असा आहे कीं, सामाजिक व आनुवंशिक दृष्टीनें आपल्या समाजाचा विशिष्ट विचार होणें अगदीं जरूर आहे. निर-निराळीं ऐतिहासिक घराणीं घेऊन, त्यांची उन्नति व अवनति कोणत्या कारणांनीं कशी झाली याचा तपास झाला पाहिजे. कांहींचा वंशविस्तार अतिशय झाला, तर कांहींचा वंशक्षयही तितकाच झपाट्याचा दिसतो. कांहीं घराण्यांत अनेक पिढ्यांपर्यंत पराक्रमी पुरुष निपजले, तर कांहींत एकाद-दुसराच पुरुष कर्तृत्ववान दिसतो. उद्योगास क्षेत्र असतां, कांहीं नुसते नामशेष झाले, तर कांहींनीं स्वतःच्या करामतीनें नवीन क्षेत्र उत्पन्न केलें. कांहीं अल्पायुषी तर कांहीं दीर्घायुषी, कांहींची संतति विस्तृत तर कांहींची दत्तकमालिका फारशी कधीं सुटलीच नाहीं. असे अनेक प्रकार सामाजिक दृष्टीनें विचारांत घेऊन, शेंपन्नास ठळक उदाहरणांवरून एखादा सामान्य बोध आपल्या

राष्ट्रानें घेण्याजोगा निघतो कीं काय, साक्षरता व निरक्षरता, तसेंच व्यसनाधीनता किंवा निर्व्यसनता, यांचा पराक्रमावर व संततीवर काय परिणाम घडतो, लहानपणीं लग्न झाल्यापासून राष्ट्राचें किंवा घराण्याचें नफानुकसान काय झालें, अशा अनेक बाबतींचा आधुनिक शास्त्रीय पद्धतीनें विचार व्हावा, निदान या दृष्टीनें विचार करण्यास जरूर लागणारी अनेक घराण्यांची तपशीलवार माहिती तरी बाहेर यावी, हा एक उद्देशही घराण्यांच्या हकीकती येथें देण्यांत ठेविला आहे. सुप्रजाजननाचा विषय अत्यंत महत्त्वाचा असून, त्याजकडे नुकतें कोठें लोकांचें लक्ष जाऊं लागलें आहे, तेव्हां त्या विचारास चलन मिळण्यास ह्या घराण्यांच्या हकीकती उपयोगी पडतील असें वाटतें.

२. **छत्रपतींचे चिटणीस,**[१] **गोविंद खंडो** (१७१६-८५).–सन १७२६त खंडो बल्लाळ वारल्यावर वडील पुत्र जिवबा सोळा वर्षांचे, ते मिजासी, दुसरे पुत्र बापूजीबाबा तेरा वर्षांचे, घरीं लिहावयास सांगणेस बहुत असतां, कोणाचें न ऐकतां, घोड्यांचे छंदांत वागावें, याजकरितां त्यांचे मामा गणेश रुक्मांगद यांनीं तोडांत दिली. ते समयीं उत्तर केलें कीं, लिहिण्याकरितां मीं भार घेतला, त्यापेक्षां मी लेखणी धरणार नाहीं. त्यामुळें मामांनीं त्यांचे लिहिण्याचा छंद सोडिला. परंतु घोड्यावरील लढाईंत कुशल, शूरत्वाविषयी तृतीय राम अशी विद्या शिकले.' नानासाहेब पेशव्याला बापूजीचें साह्य नेहमीं असे. तिसरे बंधु गोविंदरावबाबा दहा वर्षांचे, त्यांस मामांनीं लिहिण्यांत हुशार केलें. चौथे सापत्न बंधु बाबूराव बाबा, सात वर्षांचे लहानपणीं आईचे लाडांनीं विद्या राहिली. खंडेराव वारल्यावर प्रथम गणोबामामाच चिटणिसीकडील सरकारी लिहिणें करूं लागले. पुढें कोंकणांतील जिंकिलेल्या मुलखाची चिटणिसी, जमेनिसी व कारखाननिशी, शाहूनें जिवाजी खंडेरावास करून दिली (भा. व. प. या. ले. ६६, ७०, ७१, ).

१ आधार. खं. ६·२, ९३, १३८–१४०, ४४२, ४४४, ४५५, ४५९; महाराष्ट्र साहित्य व. १ अं. १०–११; कुळकर्णी कृ. ऐ. जु. ले. पु. १–२; शा. म. च; भा. व. शा. म. ब;

चिटणिसीच्या कामांत गोविंदराव लवकरच चांगला वाकब झाला. 'गोविंदरावबाबानें रात्रंदिवस महाराजांजवळ असावें, परंतु लिहिण्याचें काम न सांगितलें. सेवेंत राहण्यामुळें सकवारबाईसाहेब थोरला महाल यांजकडे जाणें येणें परंतु लोभ नाहीं. दुसरा महाल सगुणाबाईसाहेब यांचा अत्यंत लोभ, पुत्रवत् लालनपालन करणें, काम सांगणें. यामुळें बाईच्या अनुषंगानें वागणें, कचेरींत बाईसाहेबांकडील बातमी राखणें. गोविंदरायाकडे लोभ विरुबाई ह्यांचाही होता. त्यांनीं न घडती गोष्ट विरुबाईस समजावून महाराजांस सांगून आपण समजावून शर्थबशर्थ करावें. त्यांनीं एकांतीं महाराजांस विनंति करावी कीं महाराज, चिटणिसांचे श्रम या दौलतीविषयीं बहुत, मुलें माणसें जात विजात केलीं. राज्यास रक्षिलें. त्याचे मुलाची अशी दशा महाराज गरीबनवाज कसे मनांत आणीत नाहींत! गोविंदरायाची चाल पाहून महाराज संतोषी झाले. नित्य पांचशें डौल ( कामांचा निकाल ) करून द्यावी. कारभारी यांनीं व्यवस्था समजवावी; अशी चाल असतां, महाराजांनीं प्रसन्न चित्तें कारभाऱ्यांस सांगावें कीं गोविंदरायास सांगितलें आहे. तो सांगेल त्याप्रमाणें कामाचा उलगडा करून डौलें भरून देईल त्याचे सांगण्याप्रमाणें करा. स्वारी अंतर्गृहांत गेली म्हणजे जितकीं कामें उलगडलीं असतील तितकीं गोविंदरायांनीं इत्थंभूत तपशीलवार सांगावीं. कारभाऱ्यांनीं विचारल्यास, रायास विचारा, त्यांचे विचारें करा, असें सांगावें. गोविंदरायांनीं रुकार न दिला म्हणजे डौल भरणें राहिलें, तो शिक्का महाराजांकडे यावा. महाराजांनीं समजून घेऊन, ' गोविंदरायाचे मनास न आला तो आम्हास शेवटास कसा जातो, म्हणावें, त्यांची मर्जी बिघडेल; महाराजांनीं सांगितलें त्या अन्वयें रायांनीं मोडला हें मनांत आणून रायांचे मनोदयासारखें केलें पाहिजे. असा उच्चार करून रायाच्या सांगितल्याप्रमाणें करतों. आतां राव तुम्ही खुषी झालां किंवा नाहीं, बोलावें. तो स्वामिमुखींचा गौरव केवळ अमृततुल्य त्या योगानें लहान थोर कारभारी यांनीं राव सांगतील तसें करा, आमची मात्रा त्यांपुढें चालत नाहीं म्हणावें. येणेंकरून कामकाजाचा सर्व ओघ गोविंदराव बाबाकडेच पडला. गोविंदराव चिटणिसांचा

व बाळाजीपंताचा घरोबा फार चांगला. कोणतेही विषयीं सरकारचाकरींत अंतर न करितां एक विचारें चालल्यामुळें कित्येकांनीं महाराजांस अनेक प्रकारें समजाविलें. परंतु महाराजांचा लोभ पूर्ण. न्यूनाधिक प्रपंचांतील राज्य घर-संबंधीं सर्व गोविंदरायास अवशीं पहांटेस समजावून रायाचे विचारें करणें तें करीत असावें.' शाहूचा एवढा मोठा संपूर्ण विश्वास गोविंदरायावर असून, सर्व राज्याच्या उलाढाली त्याचे हातांत असतां, त्यानें आपल्या अधिकाराचा दुरुपयोग केला असें उदाहरण नाहीं. नाना प्रकारचे उल्लेख बखरींतून आढळतात, परंतु गोविंदरायानें अन्याय केल्याचा एकही उल्लेख नाहीं. अशा या राजनिष्ठ पुरुषाचें नांव मराठ्यांचे इतिहासांत विशेष स्मरणीय झालें पाहिजे. शाहूच्या अंतकाळीं पेशव्यांनीं राज्याची व्यवस्था गोविंदरायाचे सल्ल्यानें ठरविली. पुढें राज्यकारभार पुण्यास चालूं लागला आणि गोविंदरावास आपलें आयुष्य सातान्यास रामराजाचे संनिध कंठावें लागल्यामुळें, यजमानाप्रमाणेंच गोविंदरावाचें महत्त्व कारभारांत राहिलें नाहीं. तथापि मरेपर्यंत सातान्यास तो प्रमुख होता. शेवटीं शेवटीं पुतण्याशीं कलह उत्पन्न होऊन त्यास फार त्रास झाला, त्यांत त्यानें सर्व कौटुंबिक उत्पन्नें पुतण्याचे नांवें लिहून दिलीं. गोविंदराव ता. ८·७·१७८५ रोजीं मरण पावला. त्याचा मुलगा लक्ष्मण गोविंद पेशवा राघोबा याचे तर्फेनें सुरतेस इंग्रजांशीं तह करण्यास गेला होता. ( धा. रा. च. ).

खंडोबाचा धाकटा भाऊ निळोबा कर्नाटकांत राजारामाचा दासीपुत्र राजा कर्ण याजपाशीं असे. राजा कर्णाचे पश्चात्‌ही त्याचा कारभार कांहीं वर्षे निळोबानें पाहिला [ भा. व., शा. म. ब., ५३–५६ ]. पुढें तो कांहीं दिवस कोल्हापुरास संभाजीकडे व वारणेच्या तहानंतर सातान्यास शाहूकडे आला. गोविंद खंडोनें त्याचें कर्ज वगैरे वारलें, आणि शाहूनें त्यास पेशव्याची चिटणिसी दिली. 'मृत्यु पावले तेव्हां त्यांचें सार्थक गोविंदरावानें केलें.' निळोपंताच्या वंशास पुणेकर म्हणतात. त्याचा मुलगा आवजी निळकंठ यास बाळाजी वि० नें चिटणिसीची सनद दिली ( इ. सं. पु. ७ ). आवाजी व त्याचा मुलगा महिपत हे नानासाहेब पेशव्याचें चिटणीसी काम मोठ्या विश्वासानें करीत होते. निळोबाचा दुसरा नातू आनंदराव हा पानपतावर मृत्यु पावला.

वंशावळ, चिटणीस. रा. बाळकृष्ण मल्हार कुळकर्णी यांजकडून मिळाली. फार विस्तृत असल्यामुळें केवळ ऐतिहासिक संदर्भापुरती येथें घेतली आहे. म. रि. पू. पृ. ५४९ व खं. ६·४५५ पहा.



जिवाजी खंडेराव ता. ६ जानेवारी १७४३ रोजीं वारला ( शा. म. ब. पृ. ८३ ), तेव्हां त्याचा मुलगा रामराव सात वर्षांचा असतांही शाहूनें चिटणिसी वस्त्रें व दरख त्याच्याच नांवानें करून दिला. अर्थात् गोविंदराव सर्व कर्ते काम करीत होता, तरी घराण्याचा दरख त्याजकडे आल्याचें दिसत नाहीं. एकंदरींत या चिटणीस घराण्याची सर्वांशीं गोडीनें वागून राष्ट्रकाज करण्याची पद्धत नमुनेदार असून, आजच्या स्थितींतही अशा भावनेची आपणांस मोठी वाण आहे.

सन्मार्गानें वागणारीं जीं कांहीं थोडीं बालबोध घराणीं महाराष्ट्रांत उदयास आलीं, त्यांत चिटणिसांच्या घराण्याची गणना करण्यास हरकत नाहीं. अगदीं अली-कडच्या काळपावेतों व हल्लींही या घराण्यांतील पुरुष बहुधा कर्तृत्ववान, नीतिमान व उद्योगी असे आहेत. बाळाजी आवजी, खंडो, जिवाजी, रामराव, मल्हारराव या पुरुषांची माहिती महाराष्ट्राचे इतिहासास आहेच. मल्हाररावाच्या बखरी हल्लींच्या इतिहासाचा मुख्य आधार होत. मल्हाररामराव हा मराठशाही व इंग्रजशाही यांच्या संधिमर्यादेवरचा पुरुष असून, त्याचा मुलगा बळवंतराव यानें प्रतापसिंहमहाराजांची नोकरी बजावून मान्यता मिळविली. [भा. व. प. या. ले. ७२ ]. त्यानें अग्निहोत्र घेतलें होतें. त्याचा मुलगा खंडेराव सामान्य परंतु देवभक्त असून तो नुकताच (२०-८-१९१७ रोजीं) आपल्या वडिलार्जित बोरगांवीं ९३ वर्षांचें वय होऊन मरण पावला. खंडेरावाचा मुलगा मल्हारराव जगन्नाथ शंकरशेटची स्कॉलरशीप मिळवून एल. एल. बी. झाल्यावर उमरावतीस वकिली करीत असे, तो १९०८ त वारला. त्याची कविता व ज्योतिषावरचे ग्रंथ उपलब्ध आहेत. त्याचा मुलगा नरहर मल्हार हयात आहे. एवंच बाळाजी आवजीपासून आठ नऊ पिढ्या या घराण्यांत पराक्रमी निघाल्या हें नुसतें महद्भाग्याचें निदर्शक नसून, त्यांच्या सदाचरणाचेंच द्योतक आहे. असें कळतें कीं बहुधा या घराण्यांत व्यसनाचा प्रादुर्भाव नव्हता. सामान्यतः त्यास कोर्टाची पायरी चढावी लागली नाहीं. बरेचसे पुरुष पापभीरु, स्नान-संध्याशील, पुष्कळांनीं मांसान्न सुद्धां वर्ज्य केलेले, असा प्रकार दृष्टीस पडतो.

महाराष्ट्रांतील ऐतिहासिक घराण्यांत दोन तीन पुरुष एकसारखे चांगले निघा-ल्याचीं उदाहरणें जर दुर्मीळ, तर वरील दीर्घ परंपरेच्या घराण्याबद्दल आपणास आदर वाटला पाहिजे. विपुल संतति व आयुरारोग्य यांचें बीज सदाचारांत असून चिटणीस घराण्यांत दत्तकाची जरूर फारच थोडी भासली आहे. सर्व मराठे सरदारांस चिटणीस पुरविण्याचें काम या घराण्याचें असून, त्यामुळें त्याचा विस्तार व परिचय इतर सर्व ऐतिहासिक घराण्यांस झाला होता. हल्लींच्या वंशजांनीं आपल्या घराण्याचा स्वतंत्र इतिहास लिहून काढिल्यास, त्यामुळें स्वराष्ट्रेतिहासांत मोठीच भर पडेल.

**३. अक्कलकोटकर फत्तेसिंग भोसले.**–शाहूची स्वारी बादशहाच्या कैदेंतून सुटून दक्षिणेंत येत असतां पारद गांवच्या पाटलाचा अल्पवयी मुलगा त्याच्या आईनें शाहूच्या पायांवर घातला, तो हा फत्तेसिंग भोसले होय. त्याची हकीकत शाहूच्या कार्किर्दीच्या वर्णनांत ठिकठिकाणीं आलीच आहे. शाहूनें त्यास केवळ पोटच्या मुलाप्रमाणें वागविलें आणि त्याच्या अंगीं विशेष कर्तृत्व असतें तर त्यास आपल्या पश्चात् राज्याचा मालक करण्यासही शाहूनें कमी केलें नसतें. परंतु त्यानेंच राज्याची जोखीम अंगावर घेण्याचें ना कबूल केलें. तो सज्जन व सालस होता. रघूजी भोसल्याप्रमाणें उलाढाली करण्याचा त्याचा स्वभाव नसून, स्वतःच्या जबाबदारीवर एखादी स्वारी अगर कामगारी तडीस नेण्याचें सामर्थ्य त्याच्यांत नव्हतें. परंतु तो निर्व्यसनी, पापभीरु, व राजनिष्ठ होता. शाहूनें त्यास पुढें आणण्याचे अनेक प्रयत्न केले. कर्नाटकांतील स्वाऱ्यांत शाहूनें त्यास प्रमुखपण दिलें, तरी तें त्यास स्वतःच्या बुद्धीनें चालवितां आलें नाहीं. पेशव्याशीं त्यानें विरोध असा फारसा केला नाहीं, तरी मनाचा कल पाहिला तर तो पेशव्याच्या विरुद्ध पक्षांतच दाखल असे. विरूबाईनें त्याला दत्तक घेऊन आपली सर्व संपत्ति दिली. शाहूनें त्यास अनेक इनामें व उत्पन्नें करून दिलीं. मृत्यूपूर्वी थोडे दिवस फत्तेसिंगाचा बंदोबस्त शाहूनें करून दिला तो असा. ' श्रियासह चिरंजीव रा. रा. फत्तेसिंग भोसले यांसी आशीर्वाद, आज्ञा ऐसीजे. तुमचें मानस, स्वामींनीं पुत्र करून, दौलत देऊन महत्पदारूढ केलें

तेविशीं अक्षय चालण्याचें खास दस्तुर व मुद्रांकित पत्र असावें म्हणोन चिटणीस यांजपासोन विनंति केली. त्याजवरून स्वामींनीं चित्तांत आणून ठरावून हें पत्र सादर केलें असे. पातशहांनीं स्वामीचे बेजमीस महाल करून दिल्हे, त्यांपैकीं परगणे अक्कलकोट तुमचे बेजमीस पूर्वीपासून चालत आहे, तो तुमचेकडे दरोबस्त इनाम वंशपरंपरेनें दिल्हा असे. तुमचे निसबतीस सरदार व महाल व मोकासे नेमून दिल्हे आहेत, त्याप्रमाणें फौज घेऊन त्यांत राज्यसाधनाचे उद्योग करावे. स्वामींनीं तुम्हांस कुळांत घेऊन राजपुत्र केलें. राज्यपदारूढ होतील ते तुम्हांकडे परगणे अक्षयीं चालवितील. तुम्हीं त्यांजपाशी राहून राज्यसाधन सेवा करणें. आशीर्वाद.' [ता. ३ मार्च स. १७४९--इ. स. पे. द. मा. पृ. १७६].

शाहूनें असा बंदोबस्त करून दिला, तरी उतारवयांत नानासाहेब पेशव्याकडून फत्तेसिंगास बराच त्रास पोंचलेला दिसतो. आपाजी राम गाडगीळ या नांवाचा गृहस्थ अक्कलकोटकरांचा दिवाण असून तो नानासा० पेशव्याचा साडू होता. म्हणजे आपाजी रामाची बायको व गोपिकाबाई या दोघी बहिणी. या दिवाणाचें व फत्तेसिंहाचें पटेना, आणि त्याजकडून परभारें कागाळ्या ऐकून नानासाहेबानें फत्तेसिंगाचे बंदोबस्तांत व जहागिरींत बरीच घालमेल केली, त्याची थोडी बहुत कल्पना पुढें दिलेल्या पत्रांतील उताऱ्यांवरून होईल. आपाजी राम यास नवलगें गांव इनाम असून त्याचा वाडा वाईस आहे.

शाहूच्या मृत्यूनंतर लवकरच ताराबाई व रामराजे आणि पेशवे यांजमध्यें वितुष्ट उत्पन्न होऊन सांगोल्याची स्वारी झाली त्यांतच फत्तेसिंग व पेशवे यांची घासाघीस सुरू झाली. ता. १६ नोव्हेंबर १७५० रोजीं फत्तेसिंग पेशव्यास लिहितो. 'आम्हांकडील सरंजामापैकीं आठ लक्षांचा ऐवज घेणें त्या संबंधानें पुण्यांत आपण करार केला, त्यांत तफावत आली. चांगले परगणे जिवट तेवढे निवडून घेतले. सारांश गोष्टी हेच कीं आमच्या सरदारीचें अगत्य पूर्वी थोरल्यापंतांनीं धरून हे उभारणी केली होती, त्या उपरांत रायांनींही आमचें साहित्य केलें. तदुत्तर आपले कारकिर्दीस आपणही वडिलांचाच अर्थ चित्तीं धरून, हरएकविसीं आमचें साहित्यच केलें. तेव्हां थोरले महाराज होते. त्यांच्या

पाठीमागें आम्हांस रुसावयास ठाव आपण आहेत. आम्हांस बुद्धिवाद आपण काय सांगतात त्या प्रमाणेंच वर्तणूक करावी हा आमचा निश्चय आहे. तरी आम्हांस लिहावयाचें तें लिहून पाठवावें. सर्व भरंवसा तुमचा आहे. कळावें.'

यानंतर उदाजी चव्हाणाची समजूत करून पेशव्यांनीं त्यास नवीन सरंजाम देऊन ठेविलें. तो फत्तेसिंगाचे मुलखास उपद्रव देऊं लागला. फत्तेसिंग लिहितो, ' उदाजीनीं व आपण ऐक्यतेनें असावें, म्हणोन तपशिलें लिहिलें, त्यास आमचीं ठाणीं कांहीं आज कालचीं नाहींत; आज चाळीस वर्षांपासूनचीं आहेत. उदाजीकडे सरंजाम अलीकडे जाला. आपण या गोष्टीचा शोध न करितां, सांगितल्यावरूनच लिहावें हें विहित नव्हे. सविस्तर वर्तमान आपणांस कळावें म्हणोन लिहिलें आहे.' असें हळू हळू प्रकरण विकोपास जातां शेवटीं खालील पत्र फतेसिंगानें निकरावर येऊन सदाशिवराव भाऊस लिहिलें आहे. 'आम्हांकडील सरंजामाचा व स्वकीय अर्थ वरचेवरी श्रुत करीत गेलों, परंतु चित्तांत येऊन कोणे गोष्टीचा निकाल आम्हांकडील तिळतुल्य जाला नाहीं. आमचे सरदारीची उभारणी पहिलेपासून थोरले नानांनींच केली. बाजीरावांनीं व आपांनीं संरक्षण केलें, त्या प्रमाणें तुम्हीं उभयतांनींही हा काळपर्यंत चालवावयास अंतर केलें नाहीं. शेवटीं राजश्रींचा काल जाला ते समयीं तुमचे हातीं आम्हांस निरऊन दिल्हें. असें असोन चौघांनीं चार गोष्टी, लटिक्या कंड्या सांगोन, आमचेविशीं चित्तांत विपर्यास आणून, सरदारी मोडावी, ये सरदारीवरी चार पथकें उभीं करावीं, कांहीं भारी पथकें पहिलीं आहेत तीं हुजरातीस लावावीं, अगदीं आमच्या सरंजामाची फांदाफांदी करून आम्हांस मोडावें, इनाम गांव देखील काढावे, असा प्रसंग दिवसेंदिवस दिसोन आला. जे समयीं तुम्हीं जें सांगितलें तें तें आम्ही ऐकतच गेलों. आतांही तुमच्या वचनाव्यतिरिक्त आहों असें नाही. जे वेळेस आज्ञा कराल ते वेळेस दहा पंधरा हजार फौजेनिशीं एक बाजूच तुमची सांभाळिली. तुम्हांस तों ईश्वरें दुसऱ्यांच्या फौजांच्या साह्याचा प्रसंग पडों दिल्हाच नाहीं. हा मुलूक व हे सरदारी केवळ तुमचीच आहे. असें आजपर्यंत आम्ही जाणत होतों, आणि

आमचा निश्चय असा आहे कीं तुम्हां व्यतिरिक्त दुसऱ्या कोणास आप्त म्हणतों असें नाहीं. हा अर्थ आपणही पुरता ध्यानांत आणून, आमचे सरदारीचा जोड जैसा आहे तैसा राखून, कार्य आमच्या हातें घेणें, आणि जसा बंदोबस्त करावयाचा तसा करणें; परंतु मोडून अपेश न घेणें. या कितेक गोष्टी बोलोन मनांतील संदेह काढावयास तेथें यावें असा निश्चय केला आहे. तेथें आलियावरी, चार गोष्टी मनांत आहेत त्या बोलोन, आपल्या वडिलांनीं दाली बांधिली, ते तुमची तुम्हांजवळी सोडून ठेवावी, आणि आपली आज्ञा घेऊन जे स्थळीं राहवयास सांगाल ते स्थळीं राहूं, अथवा तेंही अनुकूळ न पडे, तरी आपलीं पत्रें घेऊन दस्तकें घेऊन महायात्रेस जाऊं, हाच विचार चित्तांत आणिला आहे. उत्तर पाठवावें. उत्तर आलें न आलें तरी एक वेळ दर्शनास येतों. येथें राहून चार लटकीं दुर्निमित्यें लोकांनीं आपल्यास सांगावीं, आपल्या चित्तांत विक्षेप यावा यांत नफा काय आहे! आणि दुसरें, अव्यवस्थित चित्त ज्यांचें त्यांसमीप मातबर मनुष्यांनीं राहूं नये. आपल्यास ईश्वरें सर्वांचे संरक्षण करावयाची शक्ति दिली आहे. तेथें आम्हीच जड होतों असें नाहीं. लोकांचे बोलें आम्हांस मोडावें हा धर्म नव्हे. ईश्वरें तुम्हांस बुद्ध संमत दिली आहे. परंतु आम्हांजवळ आपले विश्वासू ठेवून, शोध घेऊन मग जें करणें तें करावें. सारांश, आम्ही तुम्हांस सुटत नाहीं. वडिलांनीं ओटींत घेतलें, लेकांबरोबर वाढविलें तें कैसें सुटेल! याचा विचार ध्यानांत आणावा. तुमचें तुम्हांस संकट आहे. जे वेळेस तुम्हांस तैसा प्रसंग पडेल, ते वेळेस मालमुलूक जिवानिशीं हजर होऊं हे खातरजमा असावा. आमचा कंटाळा जाहला असेल तर महायात्रेस वाटे लावावें हें उचित आहे. फार लिहावें तर आपणांस विषाद येईल. थोरांस उचित तें करावें. बहुत काय लिहिणें.' [इ. सं. पे. द. मा. पृ.१७६-१८१].

या पत्रावर तारीख नाहीं आणि हा तंटा कसा उपस्थित झाला तें उलगडत नाहीं. तात्पर्यार्थ एक दिसतो तो असा कीं 'शाहूनें पूर्वीची व्यवस्था आहे तशीच चालवावी,' ही जी आज्ञा केली ती पुढें जाचक होऊं लागली राज्यकारभारांत नवीन कामें उपस्थित झालीं, नवीन अडचणी आल्या, नवीन उपाय

योजणें प्राप्त झालें. फौजा सरंजामदारांच्या हातांत, ते उत्पन्न खाऊन फौजा योग्य ठेवीतना, अर्थात् अन्य व्यवस्था करणें कारभाऱ्यांस प्राप्त झालें. आपल्या व्यवस्थेंत ढवळाढवळ केल्यापासून सरदारांस पेशव्यांची चीड आली, अशा स्थितींत राज्याचा कारभार चालावा कसा, आणि दररोज उपस्थित होणारीं नवीन प्रकरणें विल्हेस लागावीं कशीं ! मराठशाहीच्या मर्यादा वाढत जात होत्या, त्या मानानें उत्पन्न वाढत नव्हतें, आणि उत्पन्नाशिवाय पेशव्यांस कारभार चालवितां येईना. हें या प्रकरणाचें बीज असून, हाच प्रकार इतर सरदारांचा होऊन, ते मनांतून हळू हळू पेशव्यांशीं विरुद्ध होत चालले.

फत्तेसिंग भोसले ता. २० नोव्हेंबर स. १७६० रोजीं मरण पावला; आणि त्याचा सरंजाम पुतण्या शहाजी भोसले याजकडे आला. शहाजीस फत्तेसिंगानें दत्तक घेतलें होतें. फत्तेसिंगबावा वारल्यावर त्रिंबक हरि पटवर्धन शहाजी राजास बरोबर घेऊन पेशव्याकडे आला. अक्कलकोटच्या जहागिरीची ही भानगड पुढें दोन तीन वर्षे चालू होती. अक्कलकोटकरांकडे बाबूजी नायकाचें कर्ज येणें होतें, त्यासाठीं जहागिरीची वहिवाट आपल्या हातीं असावी अशी नायकाची खटपट होती. ती मान्य न करितां पेशव्यानें त्रिंबक हरीच्या सल्ल्यानें जहागिरीचा सर्व अधिकार शहाजीस दिला. त्यामुळें नायकानें शहाजीच्या मुलखांत दंगा उसळून त्रास देण्यास आरंभ केला. फत्तेसिंगबावांस देवाज्ञा जाहल्यानंतर बाबूजी नाईक अक्कलकोटास जाऊन सर्व वित्त विषय होता तितका घेऊन शहाजीसह येथें ( पटदुरास ) आले, श्रीमंतांची भेट जाहली. तीस हजार मोहरा व जवाहीर अगदीं दिलें. सर्व विप्र मंडळीं आली आहे. गोपाळपंत आले लाहेत [ ऐ. ले. सं. भा. १ ले. २६ ]. 'यवनानें अक्कलकोट परगणा मारून ताराज केला. शहाजी बाबांची खराबी झाली. चार महिने आबाजी नायकाबरोबर गेले, त्यानें पोटास देखील दिलें नाहीं [ सदर ले. ३५ ता. २९ जून १७६१ ]. अशी धामधूम चालू असतांच पेशवा नानासा० मरण पावला.

**वंशावळ. भोसले अक्कलकोटकर.**

१ फत्तेसिंह १७०८–६०
| =राणोजी लोखंडे पाटील पारद.
२ शहाजी द० १७६०–८९.
|
३ फत्तेसिंह दुसरा १७८९–१८२२.
|
४ मालोजी १८२२–२८.

४ मालोजी.
५ शहाजी दुसरा — फत्तेसिंह
| १८२८–५६
६ मालोजी दुसरा — सुभानजी — तुळजाजी.
| १८५६–६६
७ शहाजी तिसरा १८६६–९६
|
८ फत्तेसिंह द० १८९६– चालू.

**४. पिलाजी जाधव***.—संपूर्ण अर्धे शतकपावेतों हरएक महत्त्वाच्या प्रसंगीं मराठी राज्याची सेवा केलेला आणि शाहू छत्रपतीची समग्र कारकीर्द पाहिलेला असा पिलाजी जाधव हा एकच प्रमुख सरदार त्या वेळचा दिसतो. याचे घराण्यास वाघोली व वाडी हे गांव इनाम असल्यामुळें हल्लीं त्यांचीं वाघोलीकर व वाडीकर अशीं दोन कुटुंबें आहेत. देवगिरीच्या जाधवांशीं यांचा संबंध असला पाहिजे; परंतु त्याजबद्दलची वंशावळ उपलब्ध नाहीं. पिलाजीची वंशावळ.

**वाडी व वाघोली येथील जाधव.**




* टीप.—इ. सं. १ पेशवे द० माहिती, व २ ऐति० च० भाग ११२. खं. ६–१७, १९, ३४, ४९, २७०, २७१.

१. बडोद्याचे गणपतराव महाराजांची चतुर्थ पत्नी.

२. विद्यमान. यांनीं आपल्या घराण्याचे कांहीं कागद खासगी छापले त्यांवरून ही वंशावळ जुळविली आहे.

सन १७०७ त शाहू दक्षिणेंत आला तेव्हां त्यास जी मंडळी सामील झाली त्यांत पिलाजी जाधव होता. चंद्रसेन जाधव बाळाजी विश्वनाथाचे पाठीस लागला, तेव्हां पिलाजी जाधव व यमाजी धुमाळ यांनीं चंद्रसेनाशीं लढून बाळाजीची सुटका केली. दमाजी थोरातानें दंगा चालविला, तेव्हां त्याचा पराभव करून त्यास पिलाजीनेंच पकडून साताऱ्यास शाहूपुढें आणिलें. त्यावरून त्यास दिवें व नांदेड येथील इनाम शाहूनें दिलें. तेव्हांपासून पिलाजी सरंजामी सरदार बनला. बाळाजी विश्वनाथाबरोबर पिलाजी दिल्लीस गेला होता; आणि तेथून पुढें प्रत्येक महत्वाच्या मोहिमेंत तो हजर असे. सन १७२४ त निजामाच्या औरंगाबादेकडील प्रदेशावर पिलाजीनें मराठ्यांचा अंमल बसविला. निजामुल्मुल्कशींही त्यानें राजकारण बांधिले होतें, आणि निजामाकडून त्यास इनाम गांवही मिळाले आहेत. नानासाहेब पेशव्यानें तर त्यास वहुतेक निजामावर देखरेख ठेवण्याचीच कामगिरी दिली होती.

सन १७२८ त माळव्यावर चिमाजी आपानें स्वारी केली तेव्हां त्याजबरोबर पिलाजी जाधव होता, आणि तेव्हांपासून दयाबहादर व महंमद बंगश यांजबरोबरील युद्धांत व बाजीरावानें छत्रसालास मदत करण्याकरितां बुंदेलखंडावर स्वारी केली त्यांत पिलाजी जाधव हजर होता. बाजीरावास झांशी प्रांत मिळाला, तेव्हां पिलाजीसही तिकडे पांच गांव इनाम मिळाले. पुढें कांहीं दिवस बाजीरावाशीं पिलाजीचा बेबनाव झाला होता, ( खं. ६–४९ व श. ). बाजीरावाचे व पिलाजीचे वारंवार खटके उडत. स. १७२४ च्या एका पत्रांत बाजीराव लिहितो. ' तुम्ही लोकांस निरोप देतां म्हणून ऐकलें. त्यास तुमचे लोक गेलियावर लष्कर कैसें राहेल ? यांत लष्करास निरोप द्यावा ऐसें तुमचे उभयतांचे चित्तास आलें असेल तरी आम्ही आलियावर भलते गोष्टींची वाट काढून निरोप द्यावयाचा; त्यास, ते उठण्यांत विचारास येईल. लष्करचा गाझा न उठे तें करणें. आम्हीं आपले वाईट बुद्धीनें यास भेटलों; करूं नये तें केलें. आतां तुम्ही तरी सारे विचार चित्तांत आणून एवढें युद्ध होई तें करावें. ... पुढें कांहीं तरी डाउ. उपाय अत्रास करूं नये. वेळेस बाहेर शरम राहे तें

करावें. एक चुकले तरी दुसरियानें सावरावें. यांत जें तुम्हास योग्य तें कराल. सर्व लष्करचा ओढा तुम्हांसच ओढणें लागेल, छ ४ जिल्काद.'(६·१९) जंजिरा, दिल्ली, वसई वगैरे मोहिमांत पिलाजी हजर होता. त्यानें लिहिलेली वसईची हकीकत वाचण्यालायक आहे ( इ. सं. ऐ. च. पृ. ७२ ). नादीरशहा गेल्यावर मराठ्यांची फौज बुंदेलखंडांत बंदोबस्तास गेली, तिजवर पिलाजीचा मुलगा सटवोजी व व्यंकटराव घोरपडे हे सरदार होते. ( व्यंकटरावाचीं दोन पत्रें, स. १७३९ डिसेंबरची, वा. वि. जोशी, सातारा यांजकडून ).

पिलाजी जाधवाचे घरण्यांतील एक मुलगी बडोद्याचे माजी महाराज गणपतराव गायकवाड यांस स. १८५० सालीं देण्यांत आली, त्या संबंधानें जाधवांचे वंशज बडोद्यास आले, त्यांस इल्लीं तेथें नेमणूक आहे. पिलाजी जाधवास नानासाहेबानें लिहिलेलीं कित्येक अस्सल पत्रें या वंशजांकडून लेखकास मिळालीं असून, त्यांवरून नानासाहेबाच्या उद्योगावर कांहीं ज्यास्त प्रकाश पडतो. यांपैकीं कांहीं पत्रें पुढें यथास्थळीं देण्यांत येतील. एक पत्र चिमाजी आपास ऑक्टोबर ३ स. १७२८ चें असून बाकीचीं १८ पत्रें २३ ऑक्टोबर १७४६ ते १५ एप्रिल १७४७च्या दरम्यानचीं आहेत. वसईची मोहीम जरी स. १७३९ त झाली तरी तिकडील प्रदेशांत बंदोबस्त व व्यवस्था होण्यांत बराच काळ गेला. या कामगिरीवर पांच सात वर्षें पिलाजी वसईकडे असून जव्हार वगैरे उत्तर कोंकणांतील प्रदेश जिंकण्याचें काम करीत होता. पेशवा पिलाजीस लिहितो. 'किल्ले रतनगडकर रायकुवरबाई इणें शिक्यांचे लोक घेऊन विक्रमपतंगराव जव्हारकर याजवर जावें ऐसें वर्तमान आलें, त्यास हरप्रकारें शिर्क्यांची गुंज मोडे, ते उपद्व्याप न करीत, ते गोष्ट विचारें करून केलीच पाहिजे. तुम्ही जवळ आहां, या गोष्टीचा शोध करणें. कोण्ही लबाडी करीत असतील त्यास बरे वजेनें धमक देऊन धमकेनेंच वारा पाणी होत, मनसुबा सिद्धीनें न जाई तें करणें; व तुम्ही राणीशीं राजकारण करून विचारें आपले लगामीं लावून घेणें, (२३ ऑक्टोबर १७४६). नंतर ता. २१ नोव्हेंबरच्या पत्रांत पिलाजीचा कांहीं नाजूक मनसुबा घडवून आणल्याचा उल्लेख आहे. त्या पुढच्या डिसेंबरांत नादा–

शिवरावाची रवानगी पेशव्यानें कर्नाटकांत केली, तेव्हां प्रथम पिलाजीस बरोबर आण्याची ताकीद केली; परंतु पिलाजीस जातां आलें नाहीं. पोर्तुगीझांनीं रेडी घेतल्यामुळें त्यांचा बंदोबस्त करण्याची सूचना नानासा० नें पिलाजीस ९ डिसेंबरच्या पत्रांत केली आणि त्यास वसईच्याच बंदोबस्तास पाठविले. 'तुम्हांसारखे सलाबतीचे सरदार असलियानें गनीम येऊं पावणार नाहीं. आला तरी तुम्ही सर्व प्रकारें तर्तूद व मर्दुमकी करून नामोहरम कराल हे निशा आहे. तरी तुम्ही वसईस जाऊन वज्रयोगिनीस राहवें. जागा लाग भाग सर्व पाहून शंकराजी पंतास सांगून बंदोबस्त लढाईचा करावा. आरमार जवळच ठेवावें. म्हणजे अर्नाळयांत लोक उत्तम राहतील. चांगले लोक असलियावर काय चिंता आहे. सारांश, तुम्ही सर्व घावदाव मनांत आणून बंदोबस्त करविणें. '

या पत्रांतील व दुसऱ्या अशाच अनेक उडत्या उल्लेखांवरून स्पष्ट दिसतें कीं चिमाजी आपानें वसई काबीज केली तरी कैक वर्षेपर्यंत त्या प्रदेशाचा बंदोबस्त झाला नव्हता. पोर्तुगीझ फिरून अचानक येऊन केलेला उद्योग फुकट घालवितील म्हणून नानासाहेबानें पांच सात वर्षेपावेतों या भरंवशाच्या सरदारास जव्हार वसईकडे ठेवून दिलें होतें. जव्हारचें राजकारण जोरांत होतें ( ना. रो. १·१२–१५ ). जानेवारी ता. २२ सन १७४७ च्या पत्रांत जव्हारकराचें पारिपत्य करण्याचा मजकूर असून वसईसंबंधानें पाण्यांतील गनिमाबद्दल सावधगिरी ठेवण्याविषयीं नानानें पिलाजीस इशारा दिला आहे. त्याच महिन्यांत पिलाजी आजारी पडून वाघोलीस आला, तेव्हां प्रकृतीची काळजी घेण्याबद्दल नानानें खालील कळकळीचें पत्र पिलाजीस लिहिलें.

' राजश्री पिलाजी जाधव गोसावी यांस अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद. सु॥सबांअर्बैन मया व अलफ. तुम्हीं पत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. डोई तिडकूं लागली, जखमांचें अंग तिडकतें, सीत ज्वरही येतो, यास्तव वाघोलीस यावयाचा विचार केला, वाघोलीस आलों, म्हणोन लिहिलें तें कळलें. ऐशियास तुम्ही वाघोलीस आलां, उत्तम केलें, तुमचें शरीर अशक्त जाहलें आहे, प्रस्तुत अनारोग्यताही प्राप्त झाली आहे.

तरी औषध उपाय उत्तम प्रकारें करणें; पथ्य करीत जाणें. पहिले शरीर-दक्षतेचा विचार आतां चित्तांत आणून औषध उपाय करावयास अथवा पथ्यपाणी घ्यावयास रेटारेट करून शरीरास अधिक दुखणें करून घ्याल. तरी पहिल्या कटाक्षाचें लक्ष या वयांत शरीरास आणून उपाय करून घ्यावयास आळस न करणें. तुम्हांस तेथें वडील कोणी सांगावयास म्हणावें तरी तुम्हीच वडील, यास्तव शरीराची जतन करून पूर्ववत् प्रमाणें दृढीकरणता कटाक्षाची होऊन आरोग्य होय तो विचार करणें. वारंवार आरोग्यतेचें व भावनेचें वर्तमान लिहीत जाणें. रा. सटवोजी जाधव यास फौजेंत रवाना केलें म्हणून तरी त्यास फौजेंत रवाना केलें. उत्तम केलें. परंतु या दिवसांत गनीमाची हालचाल माफीकच आहे. दुसरें, या दिवसांत त्यांनीं तुम्हांजवळच असीलें पाहिजे. तरी त्यास पत्र पाठवून माघारे आपलेजवळ आणणें; आणि फौजेंत राजश्री जोत्याजी जाधव अथवा सुभानजी जाधव याजबराबर बाबूराव यास देऊन पाठविणें. तेथें राहतील. पथ्य करून वोखद घ्यावयास आळस कराल तर आण आहे. वरकड फौज वसईस ठेवून सटवोजी जाधवास बोलावणें.'

सुरतेच्या मोगल अधिकाऱ्यांचें एक जहाज मराठ्यांच्या आरमारानें वसई-जवळ पकडून ठेविलें, तें सोडून देण्याविषयीं सुरतच्या अधिकाऱ्यानें पिलाजीस विनंति केली. तें विनंतिपत्र पेशव्यांकडे पाठवून जहाज सोडून देण्याविषयीं पिलाजीनें परवानगी विचारिली, त्यावर नानासाहेबानें लिहिलेला जबाब मोठ्या धूर्ततेचा आहे. ' त्या गलबतास आठ महिन्यांचा कौल दिल्हा, त्याप्रमाणें मुदत होऊन गेली, उपरांत गलबत दस्त केलें. त्यास बंदरचा शिरस्ता ऐसा आहे, त्यांत त्यांनीं रदबदल करावी ऐसें नाहीं. सुरतकरांनीं तह करून अंमल दिल्हा म्हणजे मग जहाज पुढें कशास धरतील ! त्यांनें रुजू व्हावें उचित असे. ' सर्वत्र मराठशाहीची सत्ता बसविण्याचा नानासाहेबाचा उद्देश यांत व्यक्त होतो.

पेशव्याचा पिलाजीशीं केवढा घरोबा होता हें तीं पत्रें वाचलीं असतां चांगलें कळून येतें. प्रथम चिमाजीचा व पुढें नानासा० चा पिलाजीशीं मोठा लोभ असून नानासा० त्यास काका असें म्हणे. पिलाजीस पोटशूळाची व्यथा

असून त्याच कारणानें तो वाघोली येथें ३·७·१७५१ रोजीं मरण पावला, तेव्हां नानासा० समाचारासाठीं वाघोलीस गेला होता. त्याचा मुलगा सटवोजी व पुतण्या सुभानजी बापासारखेच पराक्रमी असून, सटवोजीनें चुलत भावास पानपतावरून लिहिलेलीं पत्रें वाचण्यालायक आहेत ( ६·४०४, ४०६, ४०९ ). पिलाजी जाधव, शिंदे होळकरांहून जुना व पेशव्यांच्या विरुद्ध पक्षांत कधीं सामील होणारा नसतां, इतरांच्या मानानें तो मागें कां पडला तें समजत नाहीं. बाजीरावाची उपलब्ध तसबीर वाघोलीच्या घराण्यांत सांपडलेली आहे.

५. **शंभुसिंग जाधव माळेगांवकर.**–धनाजीस दोन बायका असून पहिलीचा मुलगा संताजी, व दुसरीचे मुलगे दोन, चंद्रसेन व शंभुसिंग. संताजीचें व धनाजीचें पटत नव्हतें म्हणून त्यानें त्यास बोरगांव पाडळी (साताऱ्या नजीक) वगैरे ठिकाणचें वडिलार्जित उत्पन्न सांभाळण्यासाठीं ठेवून दिलें होतें. संताजी स्वभावानें तामसी असून स्वतंत्र राहूं इच्छित होता. धनाजीच्या मृत्यूनंतर शाहूनें हीच व्यवस्था कायम ठेवून चंद्रसेनास सेनापतीचीं वस्त्रें दिलीं; आणि शंभुसिंगास त्याचे हाताखालीं मुतालिक नेमिलें. चंद्रसेनास कोणत्याही उपायानें मिळवून घ्यावें अशी शाहूची मोठी इच्छा होती; पण तो उघडपणें शत्रूकडे गेल्यावर होनोपंत वरेकर, नारोराम मंत्री, जीवनराम सुमंत, आनंदराव रघुनाथ वगैरे मंडळी आरंभीं चंद्रसेनाकडे होती, त्यांस शाहूनें हळू हळू फोडून आपल्या बाजूस आणिलें; आणि त्या सर्वांस कांहीं नवीन सरंजाम करून दिले. चंद्रसेनाचें सेनापतिपद काढून तें कांहीं दिवस शाहूनें संताजीस दिलें; [ जाधव घरा. कै. दळवीकृत ]. तें पुनः त्याजकडून कां काढण्यांत आलें तें समजत नाहीं. चंद्रसेनाचा भाऊ शंभुसिंग भावाबरोबर निघून गेला होता, त्यास परत आणण्याचा शाहूचा प्रयत्न प्रतिनिधीमार्फत एकसारखा चालू होता. बरेच वर्षे दोघे भाऊ एक विचारानें चालत होते. परंतु पुढें त्यांजमध्यें वितुष्ट येऊन चंद्रसेन आपणास कैद करणार असें वर्तमान समजल्यावर शंभुसिंग पळून शाहूकडे आला. त्या वेळीं शाहूनें त्यास लिहिलेलीं पत्रें १४ ऑक्टोबर १७२९ व ५ जानेवारी १७३०चीं शा० रोजनिशींत आहेत [पृ. १६–१५]. शाहूनें संभाजीवर

पन्हाळ्याकडे स्वारी पाठविली, तींत शंभुसिंगानें चांगली मदत केल्यावरून शाहूची मर्जी त्याजवर प्रसन्न झाली. पुढें संभाजीची व शाहूची भेट होऊन वारणेचा तह ठरला, त्या भेटींत शंभुसिंग दोघां राजबंधूंच्या मागें हत्तीवर खवासखान्यांत बसला होता. जंजिऱ्याचे सीदीवर प्रतिनिधीस शाहूनें पाठविलें, त्याजबरोबर शंभुसिंग होता. स.१७३२ता.१७ नोव्हेंबर रोजीं शाहूनें शंभुसिंगास माळेगांवच्या इनामाची सनद करून दिली. हा गांव अद्यापि त्या घराण्याकडे चालत आहे. स. १७३९ च्या कर्नाटक स्वारींत फत्तेसिंग भोसल्याबरोबर शंभुसिंग होता. या स्वारींत चंद्रसेन विरुद्ध पक्षाबरोबर होता. तथापि त्याने कांहीं विशेष पराक्रम केल्याचें आढळत नाहीं. शंभुसिंग स. १७६० त वारला. पश्चात् त्याचा मुलगा अमरसिंग बाबासाहेब यानें माळेगांवास राहून दौलतीचा कारभार करून घराण्याचा लौकिक कायम राखिला. कवि मोरोपंतास अमरसिंहानें आपल्याबरोबर काशीयात्रेस नेलें होतें. बारामती येथें मोरोपंताच्या व अमरसिंगाच्या भेटी वरचेवर होत असत. अमरसिंग स. १८१७ त वारला. वंशावळ.

[ दळवीकृत कैफीयतींतून ] **धनाजी जाधव** जयसिंहराव.

| | | |
|---|---|---|
| संताजी ऊ. सुजनसिंह | चंद्रसेन मृ. १७५१ | शंभुसिंग मृ. १७६० |
| धनसिंग. याचा वंश बोरगांवास आहे. | रामचंद्र, १७६९ त निजामाकडून मारला गेला. | अमरसिंग मृ. १८१७ |
| | खाशेराव. टिपूबरोबरच्या लढाईत मृत्यु १७९१. उत्पन्न खालसा. | रत्नसिंह मृ. १८७६ |
| | | अमरसिंह मृ. १८७८ |
| | | शंभुसिंह द० स. १८८१ हयात. |

६. **नागपुरकर भोसले**[1].–मूळ पुरुष मुधोजी शिवाजी महाराजांजवळ शिलेदार होता. त्याच्या सात पुत्रांपैकीं बापूजी, साबाजी व परसोजी हे विशेष प्रसिद्धीस आले, आणि त्यांस शिवाजीनें इनामें करून दिलीं. संभाजीनें त्यांस सोयराबाईस सामील असल्याच्या संशयावरून नोकरींतून दूर केलें. पुढें

टीपः–१ आधार ना. भो. ब., मराठ्यांचा दरारा, ६०

परसोजी खानदेशांत जाऊन पुंडावा करूं लागला. राजारामानें त्याचा पराक्रम ओळखून त्यास सेनासाहेब सुभा हें पद दिलें. शाहू सुटून दक्षिणेंत येत असतां परसोजी त्यास बऱ्हाणपुराजवळ सामील झाला, आणि शाहूस राज्यपद मिळाल्यावर त्यानें परसोजीचें सेनासाहेब सुभा हें पद त्याजकडे कायम करून, जरीपटका, साहेब-नौबत व शिकेकटार देऊन वऱ्हाडांत मुलुखगिरीवर रवाना केलें. तिकडे त्यानें गोंडवण, देवगड, चांदा व वऱ्हाड या प्रांतीं अंमल बसविला. स. १७०९ त परसोजी मरण पावल्यावर त्याचें पद मुलगा कान्होजी यास मिळालें. कान्होजीनें अठरा वर्षे कारभार करून शाहूची मर्जी संपादिली. कान्होजीचे बंधु संताजी व राणोजी बाळाजी वि० बरोबर दिल्लीचे स्वारींत होते. पुढें भोसले बंधूंत वितुष्ट पडून शाहूस त्याची तडजोड करावी लागली. ‘ राणोजी व कान्होजी उभयतांचें समाधान करून सरंजामाची वांटणी करून दिली आहे. मसूरचे मुकामीं सरंजाम बाळाजी प्रधानाचे विद्यमानें करार करून दिला, त्यापैकीं दोन तक्षिमा कान्होजी, व एक तक्षीम राणोजी व रघूजी यांसी. हल्लीं पराभव संवत्सरीं (स. १२६-२७), स्वामींनीं सरंजाम दिला, त्यापैकीं तीन तक्षिमा कान्होजी भोसले, व बाकी चौथी तक्षीम राणोजी व रघूजी, येणेंप्रमाणें वांटणी करून तुम्हास ( म्ह० राणोजीस ) व रघूजीस कान्होजी बरोबर दिलें आहे. तुम्हीं मान्य करून स्वामींच्या पायांची शपथ केलीत. या उपरी कान्होजीचे विचारें वर्तणूक करणें. सर्वांनीं एक विचारें स्वामिकार्य करणें.’ [इ. सं. पे. द. मा. पृ. १८५ व शा. म. रो. १६३, ता. २७·४·१७२७]. स. १७२८ चीं कान्होजीच्या नांवचीं आज्ञापत्रें असून [ ६·६०२,०३ ], त्यानंतरचीं आढळत नाहींत, यावरून स. १७२९ च्या सुमारास शाहूनें कान्होजीस अधिकाराहून काढिलें असें दिसतें. ता. ११·२·१७२९ रोजीं कान्होजीच्या कारभारांत दखल न करण्याबद्दल शाहूनें बाजीरावास आज्ञा केली आहे [ शा. म. रो. ४१ ].

बापूजीचा नातू रघूजी हुड व पराक्रमी असून कान्होजीबरोबर मुलुखगिरीवर होता. त्यास दत्तक घ्यावा अशी कान्होजीची इच्छा होती, परंतु कान्हो-

जीस मुलगा झाल्यावर उभयतांचें वैमनस्य आलें. गोंड राजांना कान्होजीनें कबज्यांत आणिलें होतें, त्यांजकडे संधान ठेवून रघूजीनें कान्होजीविरुद्ध खटपट केली, त्यामुळेंही उभयतांचें वितुष्ट आलें असेल. एवढें खरें कीं रघूजीनें साताऱ्यास येऊन रामाजी नारायण कोल्हाटकराचे शिफारसीनें शाहूची मर्जी प्रसन्न करून घेतली. रघूजीची बायको राणी सगुणाबाईची चुलत बहीण होती. रघूजीनें कान्होजीस पकडून साताऱ्यास आणिलें, तेथें तो बरींच वर्षे कैदेंत राहून तेथेंच मरण पावला. कान्होजीचे कबिल्यांस रघूजी त्रास देऊं लागला, तेव्हां शाहूनें रघूजीचा निषेध केलेला आहे [ ता. २०·११·१७३४ शा·म· रो. २२२ ].

शाहूनें रघूजीस वऱ्हाडांत रवाना केलें, तेव्हां त्याजबरोबर कोन्हेरराम मुजुमदार, भास्करराम बक्षी, शंकराजी रखमाजी पोतनिस, महादाजीपंत प्रभु फडणीस, रखमाजी गणेश चिटणीस, इत्यादि मंडळी शाहूनें नेमून पाठविली. त्यांच्या साह्यानें रघूजीनें पूर्वेकडील प्रदेशांत विलक्षण पराक्रम केले, त्यांचें वर्णन पूर्वी आलेंच आहे. या घराण्याची वंशावळ पुढील पानावर देण्यांत येत आहे.

## वंशावळ—नागपुरकर भोसले.

( बखरी व इतर आधारांवरून ).

परसोजी

चिंबाजी

मुधोजी — रूपाजी

(मुधोजी): बापूजी. साबाजी, स्त्री रमाबाई. १ परसोजी, सेनासा० सुभा. कान्होजी. दुर्गोजी. आबाजी. हाबाजी

(रूपाजी): बिंबाजी ऊ० लिंबाजी

(बिंबाजी): ३ रघूजीबाबा मृ. १४·२·१७५५ आजी रमाबाई इनें लहानपणीं वाढविलें.

(परसोजी): २ कान्होजी. संताजी. राणोजी (?)

(कान्होजी): रायाजी, उमरावतीकर.

(रघूजीबाबा) — थोरलीचे: *मुधोजी सेनाधु० मृ० १९·५·१७८८. विमा, कमळजा. बिंबाजी मृ. जून१७८७. उमाबाई, आनंदी०

धाकटीचे: *४ जानोजी, से० सा० धु०. मृ. २१·४·१७७१. साबाजी. मृ.२६·१·१७७५. सगुणाबाई, (बायको साबाजीची). बांकाबाई [ ना. भो. ब. पृ. ७९. ].

(मुधोजी): ५ रघूजी द. दि. खंडूजी चिमणाबापू. व्यंकाजी मन्या बापू. सेनाधुरंधर मृं. जुलै १८११ बाळाबाई, ठकूबाई. झिंगराबाई.

(व्यंकाजी): ७ मुधोजी आपासा०

(जानोजीस दत्तक): ५ रघूजी द. ऊ. बापूसा० मृं. २२·३·१८१६

(रघूजी): ६ परसोजी बाबासा० खून २·२·१८१७

## ७. धार देवासचे पवार. वंशावळ. साबाजी [ मावजीकृत कैफीयतींतून पृ. ६९-७९ ].

साबाजी
कृष्णाजी.

* हे तिघे बंधु शिवाजीजवळ होते. शिवाजीनें विश्वासराव हा किताब दिला तो वडील घराण्याकडे चालला.

*बुबाजी 'विश्वासराव'. सुपेकर. | *रायाजी अ. राणोजी. वाघाळकर. | *केरोजी, नगरदेवळेकर.

*केरोजी → धिराजी [मोगलाईंत गेला].

बुबाजी → काळोजी वि० | संभाजी.

काळोजी वि० → कृष्णाजी वि० | तुकोजी. देवासपाती १ | जिवाजी. देवासपाती २ | मानाजी.

तुकोजी, जिवाजी — बाजीरावाबरोबर माळव्यांत.

संभाजी → १ उदाजी. | २ आनंदराव. १७२९-३६ | जगदेवराव.

कृष्णाजी वि० → बुबाजी वि०

बुबाजी वि० → माधवराव वि०. | राणोजी. | कृष्णाजी द. देवास १

राणोजी → बुबाजी विश्वासराव → माधवराव → आनंदराव → हेबतराव.

मानाजी → यादवराव.

यादवराव → चंद्रराव. | मल्हारराव. मृ. १८०२ राजसबाई

उदाजी → मैनाजी. | गोविंदराव. | दारकोजी | चंद्रराव.

२ आनंदराव → ३ यशवंतराव. १७३६-६१ | रायाजी

मल्हारराव (मृ. १८०२) → ४ गोविंदराव गायकवाडांचा जांवई.

आनंदराव | ४ खंडेराव. १७६१-८०

यशवंतराव → मल्हारराव. | विठ्ठलराव.

खंडेराव → ५ आनंदराव दुसरा. मैनाबाई १७८०-१८०५ | बळवंतराव | हनुमंतराव.

जगदेवराव → गोविंद. | दारकोजी.

दारकोजी → अवधूतराव.

५ दुसरे आनंदराव धारचे, मृ. १८०५.
स्त्री मैनाबाई.
६ रामचंद्रराव औरस मृ. १८०८ — ७ रामचंद्रराव दुसरे द. मृ. १९·१०·१८३३
८ यशवंतराव दुसरे द. मृ. १०·५·१८५७
९ आनंदराव तिसरे द. मृ. १५·७·१८९८
१० उदाजीराव द. १४·७·१८९८

१ तुकोजी–देवासपाती १ १७२८–५३
२ कृष्णाजी द. १७५३–८९
३ तुकोजी १७८९–१८२७
४ रुक्मांगद १८२७–६०
५ कृष्णाजी १८६०–९९
६ तुकोजी १८९९—
७ विक्रमसिंह

१ जिवाजी, देवासपाती २ १७२८–७५
आनंदराव — २ सदाशिव १७७५-९०
हैबतराव — ३ रुक्मांगद
४ आनंदराव १८१७-४०. — १७९०-१८१७
५ हैबतराव १८४०–६४
६ नारायण(१८६४-९२, जिवाजी
७ मल्हारराव द० १८९२— — मल्हारराव द० — सदाशिव
यशवंतराव

पवारांचें हें घराणें महाराष्ट्रांत फार पुरातन, अतिविस्तृत व विख्यात आहे. हे मूळचे सुपे पेठ्यांतील कित्येक गांवचे पाटील शहाजीच्या जहागिरींत नांदत असतां शिवाजीजवळ काम करून उदयास आले. ह्यांच्या कित्येक घराण्यांच्या हकीकती मावजींचे कैफीयतींत उपलब्ध झाल्या तेवढ्याच येथें दाखविल्या आहेत. तथापि ह्यांचीं अनेक घराणीं माळवा व महाराष्ट्र वगैरे प्रांतांत कालमानानुसार गुजराण करीत आहेत. येथें तीनच घराणीं दाखविलीं आहेत. उदाजीचा बाप संभाजी

यानें जिंजीच्या वेढ्यांत पराक्रम केल्यावरून त्यास रामचंद्रपंत अमात्यानें योग्यतेस चढविलें. पुढें उदाजी व त्याचे बंधु शाहूपाशीं उदयास आले. केरूजी, कृष्णाजी, व संभाजी पवार यांचे उल्लेख शा. म. रो. ले. ९,४३, ६५ येथें आहेत.

८. **बारामतीकर जोशी.**—हे मूळचे कोंकणांत केळशी गांवीं राहणारे. त्यांच्या पैकीं केशव नाईक नांवाचा एक पुरुष काशीस जाऊन सावकारी करूं लागला. हा बहुधा शिवाजीचा समकालीन असावा. केशव नायकास सदाशिव, कृष्ण व अंतोबा असे तीन पुत्र. पैकीं कृष्णाजी नाईक शाहूबरोबर दक्षिणेंत आला. साताऱ्यास येऊन राज्य मिळेपर्यंत शाहूस पैसा लागला तो नायकांनीं पुरविला, म्हणून शाहूचा त्यांजवर लोभ जडून त्यानें नायकांस उदयास आणण्याची खटपट केली. सदाशिव नाईकही सावकारींत हुशार म्हणून गणला जात असे. त्यांच्या पेढ्या सर्व मोठमोठ्या ठिकाणीं देशभर होत्या. महादबा उर्फ बाबूजी नाईक हा जरी पेशव्यांचे स्पर्धेमुळें प्रसिद्धीस आला, तरी या घराण्यांतील पुरुष बहुधा उद्योगी, बुद्धिमान व साहसी होते. कृष्णाजी नायकास शनिवार पेठेची चौधरी अंमलदारी होती. कृष्णाजीचा मुलगा विश्वनाथ साताऱ्यास सावकारी करी आणि दुसरा मुलगा नारायणराव नागपुरच्या भोसल्यांकडे दिवाणगिरीवर असून लढाईंत मृत्यु पावला. नारायणरावाचा मुलगा कृष्णराव उत्तरपेशवाईंत प्रसिद्ध असून साताऱ्यास नायकांचा वाडा आहे तो या कृष्णरावानें १७८५ त बांधिला. तो पेशव्यांकडून टिपूजवळ वकील होता. टिपूनें पेशव्याची तसबीर पायखान्यांत टांगून ठेविली, त्यासंबंधानें टिपूस दिलेला रोख जबाब या कृष्णरावानें दिला, अशी आख्यायिका आहे. पेशवाई बुडाल्यावर तो महाराजांचा खासगी कारभारी होऊन स. १८२५ सुमारास मृत्यु पावला. याचे वंशज साताऱ्यास आहेत ( हतवळणे, सातारा वर्णन, व रा. वा. वि. जोशी ).

सदाशिव नाईक हा बारामतीकरांचा मूळ पुरुष समजला जातो. तो व त्याचे मुलगे सावकारीचा धंदा करीत असतां बाळाजी विश्वनाथानें आपली मुलगी भिऊबाई आबाजी नायकास दिली, त्यामुळें नायकांस विशेष पाठिंबा

मिळून त्यांना राज्याचीं कामें करण्यास संधि मिळाली. माळव्याचे कामगिरीवर असल्या वेळचें नाईक बंधूंचें पत्र उपलब्ध आहे, तें असें:—

'रा. तेजकर्ण व न्यहालकर्ण मंडलोई यांसी स्ने० बाबूजी व आबाजी नाईक नमस्कार. सु० सल्लास सल्लासीन मया व अलफ. साल गु० नारोशंकर याजकडे इंदूर होतें त्यास नारोशंकरानें तुम्हांस दिलगील केलें असें जाणोन सालम० परगणे इंदूर आम्ही आपल्याकडे मल्हारजी होळकर यांजकडून केलें असे. तर आम्हीं केलें तें तुम्हीं केलें ऐसें जाणून चित्तामध्यें दुजा भाव न धरणें.' ( रा. श्री. वि. आठल्ये यांजकडून ). नाईक पेशव्यांचें कांहीं दिवस वितुष्ट पडलें त्याचा वृत्तान्त मागें ठिकठिकाणीं आला आहे. स. १७४३ त बारामतीस जहागीर मिळवून नाईक तेथें वाडा बांधून राहूं लागले. स. १७५३त नाइकांनीं पेशव्याशीं समेट केला. माधवराव पेशव्यास त्यांचें साह्य चांगलें होतें. स. १७६२ त नायकानें चंद्रसेनाचा पुत्र रामचंद्र जाधव यास निजामाकडून फोडून पेशव्याचे बाजूस आणिलें. ( भा. व. १ प. या. २ ). माधवरावाच मरणसमयीं बाबूजी नाईक त्याचे जवळ थेउरास होता. रघुनाथरावाची मुलगी दुर्गाबाई बाबूजीचा मुलगा पांडुरंगराव यास दिलेली असून हें लग्न ७.२.१७७३ रोजी झालें. परशुरामभाऊ पटवर्धनाची मुलगी बाबूजींच्या चवथ्या मुलास दिलेली असून, तो मुलगा लग्नाचे पंधरावे दिवशीं वारला. याच विधवा मुलीसंबंधानें पुनर्विवाहाचा प्रश्न उपस्थित झाला होता. नारायणरावाचे खुनानंतर बाबूजी नायकानें रघुनाथरावाचा निषेध केला व त्याचा पक्ष स्वीकारिला नाहीं.

भट घराण्यांत पेशवेगिरी गेल्यापासून सुमारें सत्तर वर्षें मराठशाहीच्या कारभारांत वावरत असलेला असा बाबूजी ना० हा एकच पुरुष दिसतो. तो रसिक व गुणज्ञ होता मोरोपंत कवीचा उद्योग प्रगट होण्यास बाबूजीचा आश्रय कारण झाला, एवढी एकच गोष्ट नायकांची राष्ट्रसेवा ध्यानांत ठेवण्यास पुरेशी आहे. बाबूजी ना० १७८० च्या सुमारास व त्याचा मुलगा पांडुरंगराव १७९४ सालीं वारला पश्चात् या घराण्याची वाताहत झाली.

**वंशावळ, बारामतीकर जोशी.**-सातारकर वंशजांनीं तपासून दिली आहे स. १९१८ पावेतों. [ रा. वां. वि. जोशी सातारा यांजकडून ].




९. **पुरंदरे.**—कोंकणांतून वरघांटीं आल्यावर ज्या पहिल्या घराण्याचा आश्रय पेशव्यांस मिळाला तें हें सासवडचे कुळकर्णी पुरंदऱ्यांचें घराणें होय. बाळाजीस पेशवाई मिळाली तेव्हां पुरंदऱ्यांस पेशव्यांची दिवाणगिरी व हुजरची

मुतालिकी मिळाली. शाहू महाराजांजवळ राहून हे पुरंदरे पेशव्यांचा कारभार करीत असत; आणि जरुरीप्रमाणें स्वारींतही त्यांजबरोबर जात. हिशेबाचें व देण्याघेण्याचें कामही तेच पाहत. थोरल्या माधवराव पेशव्यानें हें काम पुरंदऱ्यांकडून काढून नाना फडणिसास दिलें. पेशवे पुरंदऱ्यांस चिरंजीव म्हणून लिहीत आणि कुटुंबीयांप्रमाणें त्यांस वागवीत. पेशवे बाहेर स्वारींत असतां सर्व घडामोडी उभयतांमध्यें पत्रव्यवहारानें चालत. रा. राजवाड्यांच्या ६ व्या खंडांत पुरंदऱ्यांनीं लिहिलेली एक रोजनिशी आरंभींच छापलेली असून, तिचीं सर्व टांचणें उपलब्ध असतीं तर बाजीराव व नानासाहेब या दोन कारकिर्दींचा समग्र इतिहास उपलब्ध झाला असता. बाळाजी पुणें प्रांताचा सरसुभेदार असतां त्याचा व पुरंदऱ्यांचा स्नेह जमला असला पाहिजे. भारतवर्षांत शाहू महाराजांची बखर छापली आहे तींत खालील मजकूर आहे. ' सासवडास अंबाजीपंत पुरंदरे राहत होते. रोजगार-संपन्न, चार रुपये जवळ, घरवाडा चांगला, शेतवाडी करून, कर्जवाम मिळेल तें ठेवून प्रपंच चांगल्या रीतीनें करीत. त्यांचा वाडा थोर, शें पन्नास घोडें माणूस राही असा पाहून बाळाजीपंत त्यांजकडे जाऊन उतरले ' ( पृ. ४८ ). अंबाजीपंतानें बाळाजीस कसकसें साह्य केलें त्याचा उल्लेख शा. ब. त ठिकठिकाणीं आला आहे. अंबाजीपंत पुरंदरे स. १७३५ त काशीयात्रेस गेला, तेव्हां मुलगा व नातू लहान असल्यामुळें त्यानें आपला पुतण्या मल्हार तुकदेव यास शाहू महाराजांकडून मुतालिकी देवविली. अंबाजीपंत काशीयात्रा आटपून बाजीराव हिंदुस्थानचे स्वारींत असतां तिकडेच त्यास येऊन मिळाला, आणि परत आल्यावर लवकरच मरण पावला. अंबाजीचा वडील बंधु तुकोपंत याचा मुलगा मल्हार तुकदेव ऊर्फ दादोबा हा अंबाजीबरोबर व त्याचे पश्चात् मुतालिकीचे कामावर शाहूजवळ असे. त्यास शाहू महाराजांनीं सन १७४१ त पालखीचा मान दिला. दादोबाचा मुलगा धोंडोपंत ऊ० धोंडो मल्हार हा दिल्लीस वकील असून त्याजकडून पेशव्यांस आलेलीं पत्रें पुष्कळ उपलब्ध आहेत. अंबाजीचा मुलगा महादोबा हा दादोबानंतर नानासाहेबांबरोबर पुण्यास व स्वारींत असे,

आणि त्रिंबक सदाशिव ऊ० नाना हा सातान्यास मुतालिकीवर राहून कामकाज पाही. शाहूच्या मृत्यूनंतर नानासाहेबाचें व पुरंदऱ्यांचें पटलें नाहीं. नानानें सदाशिवराव भाऊस कारभारावर घेतलें, तेव्हां सन१७५०त महादाजी अंबाजी, व धोंडो मल्हार हे सखाराम बापू बोकीलच्या मसलतीनें पेशव्यांवर रुसून घरीं बसले, ( खं. ६ पृ. ६० ). परंतु पुढें लवकरच स. १७५१ त त्यांची थोडी बहुत समजूत झाली. ( सदर पृ. ७१ व ८१ ). नानासाहेबानें पुरंदऱ्यांचीं उत्पन्नें काढून घेतलीं नाहींत. कांहीं वर्षांनीं निजामावरील स्वारींत महादोबानें पराक्रम केल्यामुळें त्यास नानासाहेबानें फौजेंत सरदारी दिली; आणि नीळकंठ महादेव यास पुण्याचा सुभा सांगितला. महादोबा स. १७६० त मृत्यु पावला आणि नानासाहेबही पुढें एक वर्षानें वारल्यावर, महादोबाचा मुलगा नीळकंठ यानें माधवरावाबरोबर सातान्यास जाऊन स्वतःसाठीं पूर्वीप्रमाणें पेशव्यांची दिवाणगिरी व हुजूरची मुतालिकी मिळविली. नीळकंठ महादेव स. १७६५त मरण पावला. त्यानंतर कारभारांत नाना फडणीस प्रमुख होऊन मुतालिकीचें प्रयोजन राहिलें नाहीं.

(मावजीकृत कैफीयती व यादा.)

**वंशावळ पुरंदरे.**




* नाना व आबा पुरंदरे दुसऱ्या बाजीरावाचे वेळेस प्रसिद्ध होते

१९

**१०. भगवंतराव अमात्य.**—रामचंद्र नीलकंठास मुलगे तीन, भगवंतराव ऊ० बाजीराव, मोरेश्वर ऊ० आपाजीराव, व शिवरामपंत, आणि मुलगी एक त्र्यंबूबाई. हीं मुलें त्यास उतार वयांत झालीं. भगवंतरावाचा जन्म माघ शु. १५ शके १५९८. (इ. सं. पे. द. मा. पृ. १). रामचंद्रपंत वारला (म. वि. पृ. ४८) तेव्हां भगवंतराव चाळीस वर्षांचा असून तोच कोल्हापुरचे राज्यांत अमात्य झाला, परंतु ह्या घराण्यावर संभाजी व शाहू दोघांची इतराजी असल्यामुळें, त्यांचे उद्योगास राष्ट्रांत अवकाश राहिला नाहीं. भगवंतराव तेजस्वी व बाणेदार होता. कोल्हापुरकर जिजाबाई लिहिते,'तुम्हांसही रामचंद्रपंतानीं सकलकलाविद्यासंपन्न केलें. त्यांमागें आपण प्रतिदिनीं पुराण—श्रवण, देवब्राह्मणांचे ठायीं भक्ति धरिली. धर्मशास्त्र इत्यादि सर्वही नीति तुम्हांस करतलामल' ( खं. ८—९९ ). भगवंतराव शाहूस वैतागून लिहितो, ' सेवकाचे चित्ताचा हेतु ऐसा आहे जे, साहेबांची सेवा करावी. कालवैपरीत्यें वडिलांचे हातून सेवेसीं अंतर पडलें. अलीकडे वडिलांप्रमाणें यथाकालानुसार सेवकानें या राज्यांत सेवा जीवाभ्य केली. परंतु सार्थक नाहीं. दरबारीं क्षुद्र माणसांचा पर्वकाळ झाला आहे. यास्तव सेवकाचें मन उद्विग्न आहे. साहेबीं दयांतःकरणें साभिमानपुरःसर बहुमानपूर्वक सेवकाचे हातून सेवा घेतली तरी हजीर आहे.' ( भा. व. प. या. ५४ ). परंतु शाहूनें त्याजवर लोभ केला नाहीं. उदाजी चव्हाणास हातासीं धरून संभाजीच्या तर्फेनें लढण्याची भगवंतरावानें शिकस्त केली, पण त्यास यश आलें नाहीं. आपल्या विरुद्ध हा खटपट करितो असें वाटून संभाजीनें त्याचे गांव जप्त केले. या संबंधांत जिजाबाईशीं झालेला त्याचा पत्रव्यवहार स. १७२८-३२ चे दरम्यानचा पाहण्यालायक आहे, ( खं. ८, ९२–१३५ ) लेखांक ९९ चें द्वारकोजी यादवाचें पत्र भाषा, राज्यकारस्थान, राष्ट्रीय भावना इत्यादि कारणांनीं महत्वाचें आहे. आंगरे व सावंत यांच्या दरम्यान अमात्याचा प्रदेश असल्यामुळें त्यांच्याशीं याचे युद्ध—प्रसंग वारंवार होत. त्याचा पुढें सलूख झाला, त्याचे कागद ( खं. ८-१५१ ) वाचले असतां, मराठे सरदारांचीं अंतर्वैमनस्यें कळून येतात. वारणेच्या तहाच्या प्रसंगीं आपली व्यवस्था लावण्याकरितां भगवंत-

राव साताऱ्यास गेला, पण त्याची दाद लागली नाहीं. पुनः स. १७४० त तो संभाजीबरोबर साताऱ्यास गेला, तेथें शाहूनें दोघांची गोडी करून दिली, आणि अमात्याची व्यवस्था यथास्थित चालविण्याची संभाजीकडून शपथ घेवविली. परंतु शिल्या पराक्रमावर उत्पन्नें खाण्याची चटक महाराष्ट्र-मंडळास लागल्यामुळें, संभाजीच्या राज्यांत अमात्याची डाळ शिजली नाहीं. तेव्हां तो वैतागून निजामाकडे जाण्याच्या बेतांत होता ( खं. ८ ले. १७२-१८२ ). इतक्यांत अंतकाळीं रामराजास आणण्याकरितां शाहूस भगवंतरावाची जरूर लागली आणि रामराजा गादीवर आल्यावर साताऱ्चें अमात्य-पद त्यास मिळालें. तथापि पेशव्यांनीं सर्व आटोप केल्यामुळें भगवंतरावाचा उत्कर्ष झाला नाहीं, त्याची हकीकत मागें ठिकठिकाणीं आलीच आहे. ( म. वि. २ पृ. २३९ ). वंशावळ ( म. रि. पू. पृ. ७०७, व अमात्यांचें वंशवृत्त. )

**१ रामचचंद्र नीळकंठ**
२ भगवंतराव १७१८-५५.
| ल. व्यंकूबाई निळोपंत पिंगळे.
३ कृष्णराव १७५० ६१.
४ सुबराव १७६१-१८१०.
६ मोरेश्वर. ५ रामचंद्र द०
| १८१३-२६ १८११-१३
७ गोविंदराव १-२६-३४
८ रघुनाथ द०-८३५-४५
९ रामराव द० १८४७-४९
१० मोरेश्वर द० १८५०-६७
११ माधवराव द० १८६८- चालू.
परशुरामराव

भगवंतराव स. १७५५ त पुण्यास मरण पावला. त्याचा मुलगा कृष्णराव यास कोल्हापुरचें अमात्यपद स. १७५० त मिळालें, तें अद्यापि त्याचे वंशाकडे चालत आहे. भगवंतरावाची बायको व्यंकूबाई हुशार असून तिनें अनेक खटपटी करून पुष्कळ वर्षे जहागिरीचा बचाव चांगला केला. घराण्याचें वंशवृत्त छापलेलें आहे.

**११. कोल्हटकर.**—रत्नागिरिजवळ नेवरें येथें रामाजी नारायण कोल्हटकर नांवाचा एक कर्मनिष्ठ ब्राह्मण राहत असे. त्यानें वाई प्रांतांत पांडवगड येथें वतन संपादन केलें. पांडवगडाहून नेवऱ्यास येण्याची वाट कोंकणा काठानें दक्षिणेस बाहिरवगडापावेतों जाऊन तेथून पश्चिमेस चिपळुणावर उतरत असे. बहिरवगडाचे खालीं बापूजी, सावाजी व परसोजी हे भोसले बंधू राहत असून,

त्यांच्या घरीं रामाजीपंताचा मुक्काम होऊन उभयतांचा परिचय जडला. एकदां जंजिरेकर हबशानें बहिरवगडावर स्वारी करून भोसल्यांस कुटुंबसह पकडून जंजिऱ्यावर नेऊन ठेविलें; तेव्हां त्यांजबद्दल तीन हजार रुपये दंड रामाजीपंतानें पदरचा भरून भोसल्यांची सुटका केली. त्यावरून भोसल्यांनीं आपलें उपाध्येपण रामाजीपंताचे वंशास कायमचें लिहून दिलें. रामाजीपंताचा प्रवेश शाहूकडे होता आणि त्याचे मार्फत भोसले बंधु शाहूस मिळाले. विठ्ठल कान्हो ठोसर म्हणून शाहूच्या लोभांतला एक गृहस्थ साताऱ्यास होता, त्यास शाहूनें वाकनिशी दिली ( वा. इ. वृ. १८३५ ले. ८२ ), आणि विठ्ठलपंताची एक मुलगी शाहूच्याजवळ वाढलेली होती, तिचा विवाह शाहूनें रामाजीपंताचा मुलगा कोन्हेरराम याजबरोबर करून दिला. येणें करून शाहूचा लोभ कोन्हेररामावर विशेष जडला. पुढें रघूजी भोसल्यास शाहूनें सेनासा० सुभा पद दिलें. तेव्हां त्याची मुजुमदारी त्यानें कोन्हेररामास दिली, आणि त्यांस वऱ्हाडांत पाठवून त्यांजकडून कान्होजीस पकडून साताऱ्यास आणिलें. पुढें भास्कररामास भोसल्यांची बक्षीगिरी शाहूनें देवविली. या दोघां कोल्हटकर बंधूंच्या साह्यानेंच रघूजीनें पुढें बंगालपावेतों प्रदेश काबीज करून अनेक पराक्रम गाजविले. भोसल्यांचें राज्य असेपर्यंत नागपुरास कोल्हटकरांचाही लौकिक होता.[1]




**१२. दिल्लीचे वकील हिंगणे.**-स्वराज्यांत कर्तृत्वास अवकाश मिळाला

---

१ टीप—आधार, का. सं. ना. भो. का. २, इ. सं. ऐ. गो. २-३२-३३; खं. ३-१८४, १८५, २३०, २३१, २३४.

म्हणजे लायक माणसें कशीं तयार होतात, याचें उत्कृष्ट उदाहरण या हिंगणे घराण्याचें आहे. हे पेशव्यांचे नासिकचे तीर्थोपाध्ये. शंकराजी मल्हार सचिवा-बरोबर महादेवभट हिंगणे प्रथम बाळाजी वि०चे स्वारींत दिल्लीस गेला आणि पुढें पंचवीस वर्षेपर्यंत दिल्लींत मराठी सत्तेचा जम बसविण्याची त्यानें विलक्षण खटपट केली. महादेवभट पिशाच्चलिपी व फारशी भाषा जाणत होता. वक्तृत्व व बहुश्रुतपणा या गुणांचे योगानें त्यानें आपली छाप सर्वत्र बसविली. सन १७३० पासून हा दिल्लीचे मराठी वकिलातीवर असल्याचा उल्लेख सांपडतो. माळवा वगैरे प्रांतांच्या सनदा मिळविण्यांत महादेवभटानें मोठी खटपट दिल्लीस केली ( खं. ६–९५,९७ ). या कामगिरीबद्दल संतोष दर्शवून बाजीरावानें त्यास वर्षासन ठरवून दिलें ( सदर १२३ ). हिंगण्याबरोबरच मल्हार दादो बर्वे व त्याचे मुलगे बाबूराव व रामचंद्र मल्हार, तसेंच यादव प्रल्हाद ( स. १७३२–३९ ), मयाराम [ १७४२ ], आसाराम [ १७४५–४७ ] असे आणखी अनेक गृहस्थ दिल्लीच्या मराठी वकिलातीवर असलेले आढळतात. इंग्रजांचें परराष्ट्रीय खातें वाढत गेलें, तसाच प्रकार त्या वेळीं मराठ्यांचाही झाला. सवाई जयसिंगाकडून पैसे मिळवून कर्जमुक्त होण्याची खटपट नानासा०नें महादेव भट हिंगण्यांचे मार्फत सिद्धीस नेली. हळूहळू हिंगण्यांनीं सावकारीचाही धंदा आरंभिला आणि सर्व उत्तर हिंदुस्थानांत प्रतिष्ठा मिळविली. स. १७४४ त महादेव भटाचा चमत्कारिक रीतीनें खून झाला, तो प्रकार खालील पत्रांत उपलब्ध होतो. 'चिरंजीव राजमान्य राजश्री धोंडोबा यांसी सदाशिव चिमणाजी आशीर्वाद. उपरी. ता. २५ मोहोरम. विशेष. काल दोनप्रहरां दिल्लीहून इच्छाराम वकिलाचें पत्र तेविसाचे रोजीं येथें आलें, त्यांतील खुलासा हाच कीं नादीरशहानें रूमच्या बादशाहीवर चढाई केली, त्यास नादीरशहास मारून काढिलें. फिरून नादीरशहा आपली फौजबंदी करीत आहे, व तोहमारकुलीखान खंदाहारच्या मुलुकांत आहे, त्यासही नादीरशहाचें पत्र आलें आहे कीं येणें, व रूमांतही फौजबंदी होत आहे. हें एक वर्तमान लिहिलें; व दुसरें लिहिलें आहे कीं मनसूर-अलीखान व अमीरखानही दिल्लीस आले आहेत, त्यास सांप्रत महादेव भटांनीं

सवाईजी मेलियावर त्याची वकिली आपणाकडे करून घेतली आहे. पहिला कृपाराम होता, त्यास जयनगरांत ठेविलें. महादेव भट मनसूर अलीखान याच्या दरबारीं गेले, त्यास बरोबर सवाईकडील जमातदार व प्यादे होते, त्यास त्यांची यांची हक्काविशीं बोली जाहली, त्यास महादेव भटांनीं शिवी दिली आणि आपले लोकांस बोलले कीं धरा. त्यावरून त्यांची यांचा लटापटी जाहली. महादेव भटास जखमा लागल्या. संध्याकाळीं घरास नेले. मध्यरात्रीं मृत्यु पावले. पुत्र मात्र वांचले. मोठी गोष्ट वाईट जाहली. पत्रें आलीं तीं तीर्थरूपांकडे रवाना केलीं. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद. (भा. इ. सं. मं. पुणें, पुरंदरे दप्तर). पो. २५ मोहोरम.'

हें पत्र साताऱ्यासच लिहिलेलें आहे. जयसिंग १७४३ त मरण पावल्यावरचा मोहोरम १७४४ फेब्रुवारींत येतो. स. १७४५ च्या पुढें महादेव भटाचें नांव येत नाहीं. म्हणून त्याचे मृत्यूचा स. १७४४ किंवा १७४५ असूं शकेल.

बादशाही उमरावास तोंडावर शिवी देऊन हिंगणे धरा म्हणतो, यावरून मराठ्यांचा जोर किती वाढला होता याचें अनुमान होतें. महादेवभटाचे चारही मुलगे पराक्रमी निघाले आणि त्यांनीं आपल्या कर्तबगारीनें दिल्लीची वकिलात भरभराटीस आणिली. स. १७५० पासून ६१ पावेतोंच्या दिल्लीकडील सर्व उलाढालींत ते अग्रेसर होते. रोहिले, जाठ, रजपूत, नवाब वजीर या सर्वांवर त्यांची छाप होती. अंताजी माणकेश्वर पेशव्यांचे तर्फे दिल्लींत फौज घेऊन होता, त्याचें व हिंगण्यांचें पटलें नाहीं आणि रघुनाथराव दिल्लीस आला तेव्हां त्याचें व हिंगण्याचेंही वांकडें आलें. त्यामुळें हिंगण्यांची बरीच वाताहत झाली. [ ख. १·१, खं. ३·२३३, खं ६·१९८, ४९७, ४९९ ]. तथापि हिंगण्यांशिवाय पेशव्यांचें चालणारें नव्हतें आणि माधवरावानें पुरुषोत्तम व देवराव यांस पुनः स. १७६९ त दिल्लीच्या वकिलातीवर स्थापिलें. पुरुषोत्तम महादेवानें हें काम चांगलें करून नाना फडणिसाची मर्जी संपादिली. तो स. १७८२ त दिल्ली येथें मृत्यु पावला. (का. सं. प. या. २९३). त्यानंतर महादजी शिंद्यानें स्वतः दिल्लींतील कारभार हातीं घेतल्यावर हिंगण्यांचे वकिलीची जरूर राहिली नाहीं, आणि त्यांचे घराण्यास उतरती कळा लागली तींतून ते सावरले नाहींत.

या उत्तरकालीन शिंद्यांतील कारभाराचीं म्ह० इ. स. १७८०–९५ पर्यंतचीं हिंगण्यांनीं नाना फडणिसास लिहिलेलीं पत्रें इ. सं. त छापिलेलीं वाचण्यालायक आहेत. इतर लेखकांनीं लिहिलेल्या हकीकतींचा पडताळा पाहण्यास त्यांचा उपयोग चांगला होतो; आणि इंग्रजांच्या हालचालींचीही त्यांवरून चांगली उमज पडते. कनिष्ठ बंधु देवराव महादेव, अहिल्याबाई व तुकोजी होळकर यांचा तंटा मिटावण्याकरितां नाना फडणिसाचे सांगण्यावरून महेश्वरास गेला होता, त्या वेळीं त्यानें केलेल्या कामाचीं पत्रें 'होळकर दरबारांतील हिंगण्यांची वकिली' या नांवानें इ. सं. त प्रसिद्ध झालीं आहेत. देवराव हिंगणे ता. १७ जून स. १८०७ त वारला. त्याचे वंशज नाशिक जिल्ह्यांत चांदोरी येथें आहेत. पेशवाईंतील साडेतीन शहाण्यांत नागपुरकर देवाजीपंत चोरघोडे याची गणना नसून तो हा देवराव हिंगणेच होय असें कांहीं संशोधकांचें म्हणणें आहे. (भा. इ. मं. इ. वृ. १८३५, ले. ४४).

वंशावळ–हिंगणे ( खं. ६·४५७ ).

महादेव गोविंद मृ. १७४४.




**१३. लाला कृपाराम.**—हा एक हिंदुस्थानी कायस्थ ब्राह्मण जयपुरचा प्रसिद्ध राजा सवाई जयसिंग याचे पदरीं हुशार मुत्सद्दी म्हणून नांवाजलेला होता. बाजीराव व सवाई जयसिंग यांचा स्नेह घडवून आणण्यांत कृपारामाचें साह्य बाजीरावास चांगलें मिळालें; आणि बाजीरावानें त्याजकडे आपल्या वकिलातीचा हुद्दा सांगितला. कृपाराम मृत्यु पावल्यावर त्याचा मुलगा तुळजाराम

यानें मराठ्यांच्या वकिलातींत काम केलें. तुळजारामानें एका पत्रांत कृपारामाच्या कामगिरीचा खालील उल्लेख केला आहे. ' कै. बाजीरावसाहेब हिंदुस्थानांत गेले, त्या वेळेस सेवकाच्या वडिलांचे विद्यमानें, सवाई जयसिंग याजकडील मामलतीची तडमोड झाली, ती सेवकास ठाऊक आहे. खानदौरा मीरबक्षी व कमरुद्दीनखान वजीर हे उभयतां राव कै० यांजवर चालून गेले, त्या वेळेस सेवकाचे वडिलांनीं उभयतांचा कज्जा होऊं न दिला. सवाई जयसिंगांनीं इशारा करवून, कालिकेचा मेळा भरला होता तो लुटविला. त्यावर राव कैलासवासी दिल्लीहून निघून जयसिंगाचे मुलखास आले, त्या वेळची जाबसालाची माहितगारी सेवकास आहे.' तुळजारामाचा मुलगा लाला सेवकराम हा थोरल्या माधवरावाचे कारकिर्दींत जयपुरास मराठ्यांचे वकिलातीवर होता. त्याला मराठी भाषा चांगली येत असून त्याचीं पत्रें मोडींत लिहिलेलीं आहेत. राजकारण-प्रसंगानें त्याचें येणें पुण्यास वारंवार होत असे. पुढें नारायणराव पेशव्याचा वध होऊन इंग्रज मराठ्यांचें युद्ध सुरू झालें तेव्हां पुणें दरबारानें लाला सेवकराम यास आपल्या भरंवशाचा वकील म्हणून स. १७७७ त कलकत्यास इंग्रजांचे जवळ ठेविलें. पुरंदरचा तह होऊन कर्नल अप्टन ता. ११ फेब्रुवारी स. १७७७त पुण्याहून कलकत्यास रवाना झाला, त्याच वेळेस लाला सेवकराम याचीही परत रवानगी पुरंदराहून झाली. तेव्हांपासून सन १७९३ पर्यंत हा वकील कलकत्यास होता असें त्याच्या पत्रांवरून दिसतें. त्यास दरमहा ३०० रुपये ( अर्काटी ) वेतन मिळत होतें. सेवकरामास चिमणलाल व लाला गुलाबराय असे दोन मुलगे असून तेही कलकत्ता व पुणें येथे जाऊन येऊन असत. चिमणलाल यानें नाना फडणिसास लिहिलेल्या एका पत्रांत खालील मजकूर तत्कालीन स्थितीचा निदर्शक आहे. ' तेथून ३०० रु. आर्काटी दरमहा मिळतो. त्याजपैकीं २५ रु. बट्टा व ५ रु. दरबार खर्च व १७५ रु. घराचें भाडें दरमहा लागतो. बाकी ९५ रु. राहतात. त्यासी तेथें घोडा एक व पालखी व दिवट्या व आबदागिऱ्या वगैरे माणसें, व जातीचे खर्च व तेथील सरकारचे चोपदार, खिजमतगार, ऐसा खर्च आहे. याजमुळें बारा तेराशें

रुपये अधिक लागतात. व येथें कुटुंबाचीं माणसें आहेत. तीन पुस्तांपासून सेवा करितों, दुसरें घर पाहिलें नाहीं. सेवकाचें अंतःकरण हेंच कीं चरण-सेवा करावी आणि आपलें दरिद्र स्वामींजवळ अर्ज करावें. त्यासी स्वामींनीं कृपाळु होऊन, ज्यांत सेवकाचें व कुटुंबाचें संरक्षण होय ऐशी रा. बाबुरावजीस मखलसीची आज्ञा करणार स्वामी धनी समर्थ आहेत. सेवकासी आज्ञा वंद्य आहे. हे विज्ञापना.' ( इ. सं. पर. रा. म. वकील पृ. ५७ ).

**१४. कायगांवकर दीक्षित पाटणकर.**--संधि मिळाली म्हणजे कर्तबगारी निर्माण होते याचें दुसरें उदाहरण या दीक्षित घराण्याचें होय. नारायण दीक्षित पाटणकर नांवाचा एक कोंकणांतील ब्राह्मण सतराव्या शतकांत इ. स. १६५० नंतर देशावर येऊन गंगातीरीं पैठण येथें तपश्चर्या करूं लागला. तो संस्कृतज्ञ, विद्वान व कर्मठ होता. पुढें तो भिक्षावृति–अवलंबन करून औरंगाबादेजवळ सातारें या गावीं राहत असे. कांहीं काळानें तीर्थयात्रा करीत तो हिंदुस्थानभर फिरला. त्याच्या साधुवृत्तीची, तपश्चर्येची व अन्नदानाची कीर्ति बाळाजी विश्वनाथाचे कानावर जाऊन त्याची त्या साधु पुरुषाचे ठिकाणीं भक्ति जडली. पुढें शाहू महाराजही त्याचे भजनीं लागला. आपल्या कार्यांत अशा सत्पुरुषांचे आशीर्वाद घेण्याचा प्रघात त्या वेळीं सार्वत्रिक होता. ब्रम्हेंद्रस्वामी व नारायण दीक्षित समकालीन होते. दक्षिणेंतील व कोंकणांतील कारस्थानांत दीक्षितांचें अंग होतें. दीक्षिताचें वास्तव्य पुढें बहुधा काशीसच झालें आणि त्यानें अनेक ठिकाणीं अन्नछत्रें सदावर्तें वगैरे घातलीं. काशीस दीक्षित-पुरा म्हणून त्यांनीं बसविलेला एक भाग आहे. आपल्या प्रवासांत ठिकठिकाणच्या राजकारणाची बातमी ठेवून ती तो बहुधा पेशव्यांस देत होता असें दिसतें. बाजीराव, चिमाजी आप्पा व नानासा० यांचा दीक्षितांशीं पत्रव्यवहार होता. चिमाजी आप्पा लिहितो. ' आम्हीं लेकरें स्वामींचीं आहों. आमचें कल्याण व आमची बुद्धि उत्तम कार्याचे ठायीं दिवसेंदिवस लागून यशाची अभिवृद्धि होय, ऐसा आशीर्वाद स्वामी देतीलच व देवाची प्रार्थना करतीलच यांत संशय नाहीं.' ( का. सं. प. या. ११ ). ' कै० बाळाजीपंतापासून आमचें त्यांचें चालत आलें.

आमच्या वचनाचा त्यांस विश्वास असे. त्यापेक्षां तुमच्या तीर्थरूपांची निष्ठा आमच्या उभयतांच्या स्थळीं असे, जे तीर्थरूपांसारखे मानीत आम्हां क्रोधें करून नाना प्रकारें रागेजून पत्र लिहीत असों. परंतु त्यांस क्रोध तिलमात्र येत नसे. त्यापेक्षां तुमचें नांव उत्कृष्ट व्हावें असा ईश्वरें आम्हांस दृष्टांत झाला आहे. तुमच्या पित्याच्या स्थळीं ममता होती, त्यापेक्षां तुम्हांवर अधिक आहे. हेंच ईश्वराजवळ प्रार्थना करितों कीं यांचें उत्कृष्ट चालो.' ( सदर २६ ). पेशवे किंवा सरदार राज्यांत आपला जम बसवूं लागले म्हणजे हें केवळ तपश्चर्येचें व आशीर्वादाचें फल होय, असें हे साधुपुरुष त्यांस स्मरण देत व त्याचा मोबदला मागत. बहुधा अल्प मोबदला त्यांस पुरत नसे. ब्रम्हेंद्र-स्वामी व दीक्षित एकाच वर्गांतले दिसतात. 'काशी येथें वैशाख मासीं पंच-पक्वान्नांचें लक्ष भोजन करावयाचा प्रारंभ करून मग कार्तिक मासपर्यंत वांचलों तर एक वेळ त्या प्रांतास सिंहस्थास गोदास्नान करून, उत्तम लक्षभोजन गोदातीरीं करून, सर्वांच्या भेटी घेऊन यावें. दर्शनानंतर सर्व विदित होईल.' नारायण दीक्षितानें बाजीरावाजवळ मथुरेसंनिध धर्मकृत्यास दहा गांव मागितले, याचा अर्थ बाजीरावानें तो प्रांत जिंकण्याचा उद्योग करावा असा दीक्षिताचा उद्देश होता. त्या वेळच्या लौकिक भावना कशा प्रकारच्या होत्या हें यावरून दृग्गोचर होतें. गोदाप्रवरासंगमीं कायगांवास दीक्षितांनीं वास्तव्य केलें म्हणून त्यांस कायगांवकर हें नांव पडलें. हें गांव गोदावरीचे कांठीं उत्तर हिंदुस्थानच्या हमरस्त्यावर होतें. दीक्षित सावकारी करीत. निजामाकडील व उत्तरेंतील व्यवहारांत दीक्षितांचा उपयोग पेशव्यांस होत असे. शेंदुर्णीचे हल्लींचे जहागीरदार यांचेच वंशज होत. ( इ. सं. ऐ. च. २·५ ). वंशावळ [ खं. ३·३७० ].

नारायण गोविंद दीक्षित टकले ( मृ. १४·१०·१७४८ ).



**१५. यशवंतराव महादेव पोतनीस**[1]–हे महाडचे देशपांडे प्रभु से खोरेकर. या घराण्याचा मूळपुरुष मुरारबाजी शिवाजीच्या वेळेस पुरंदरावर डला. त्याचा भाऊ महादाजी बाजी यास शिवाजीनें योग्यतेस चढवून खास-नेशीचा दरख दिला. महादाजीस मुलगे तीन, आनंदराव, बाजी व यशवंतराव. आनंदराव महादेव यास चंदावर मुक्कामीं राजारामानें पोतनिशी व खासनिशी ई दरख करून दिले. शाहू दक्षिणेंत आल्यावर आनंदराव महादेव ताराबाईस सोडून त्यास मिळाला, तेव्हां शाहूनेंही त्याचे पूर्वीचे दरख कायम केले. पुढें आनंदराव महादेवाकडून कांहीं आगळिक घडल्यावरून शाहू त्यास कांहीं शिक्षा करणार होता, असें कळल्यावरून तो आपला भाऊ बाजी महादेव यासह फिरंगणांत गोव्याकडे पळून गेला. पुढें त्याचा सापत्न बंधु यशवंतराव महादेव भोरप येथें होता, त्यास घेऊन त्याची मातुश्री शाहूस भेटली. तेव्हां तो आपल्या बंधूस सामील नाहीं अशी खात्री झाल्यावर त्यास शाहूनें प्रथम हलकें काम देऊन पुढें त्याची कर्तबगारी व निष्ठा दिसून आल्यावरून त्याजकडे पूर्वीचे दरख कायम करून दिले. स. १७२२ च्या एका कागदावर (खं. २० ले. ४४) यशवंतराव महादेवाची खासनीस अशी सही आहे. उदाजी चव्हाणानें बंड केलें तें मोडण्यास शाहूनें यशवंतराव महादेवास पाठविलें. त्याचा मोड होऊन चव्हाणानें त्यास कैद केलें असतां शाहूनें दंड भरून त्यास सोड-वून आणिलें. पुढें संभाजीचा तह घडवून आणण्यांत यशवंतराव महादेवाचा शाहूस चांगला उपयोग झाला. ती कर्तबगारी पाहून पुढें शाहूनें त्यास राय-गडचा सुभा सांगून जंजिऱ्याच्या मोहिमेंत पाठविलें. त्यानें युक्तीनें रायगडचें राजकारण सिद्ध केलें त्यावरून तो किल्ला पुढें प्रतिनिधीनें काबीज केला. तेव्हां-पासून त्याजवर शाहूची अत्यंत मेहेरबानी होती. कोल्हापुरच्या संभाजीचाही त्याजवर लोभ होता, (खं. ८ ले. १५४ व १५७). शाहूच्या अंतकाळीं पुढील राज्यव्यवस्था ठरविण्यांत यशवंतराव प्रमुख होता. पुण्याचे सरदार पोतनीस हे याचे वंशज होत.

---

१. **आधार.** बखरी, का. सं, व भा. व. व., आणि म. मं. ब. टू. २६, भा. व.

**वंशावळ** पोतनीस व खासनीस. [ **मावजीकृत कै.** ]




१६. **इचलकरंजीकर घोरपडे.**—यांचा मूळ पुरुष नारो महादेव जोशी, याचा मुलगा व्यंकटराव नारायण बाळाजी विश्वनाथाचा जांवई झाला, तेव्हां पेशवे व शाहू या दोघांचा त्यास पाठिंबा मिळून त्याचें घराणें प्रसिद्धीस आलें. नारो महादेवाकडे कांहीं दिवस कोल्हापुरचें सचिव पद होतें, तें संभाजीनें व्यंकटरावास दिलें नाहीं आणि घोरपड्यांनींही आश्रय काढून घेतला, तेव्हां व्यंकटराव शाहूचे आश्रयास साताऱ्यास आला. बाजीरावानें त्यास पुण्यास वाडा बांधून दिला, तेथें त्यास दोन अपत्यें झालीं, मुलगी वेणूताई व मुलगा नारायणराव तात्या. वेणूताई ही त्रिंबकराव मामा पेठे याची बायको. स. १७३९ त व्यंकटरावानें इचलकरंजीचें ठाणें बांधिलें. चिमाजी आपानें वसईवर मोहीम केली, तेव्हां व्यंकटरावानें गोव्यावर स्वाऱ्या करून जोरानें तिकडे पोर्तुगीझांस चांगला पायबंद दिला. व्यंकटराव स. १७४५ त मरण पावला तेव्हां त्याची आई अनूबाई इनें शहाणपणानें वागून इचलकरंजीच्या जहागिरीची भरभराट केली.

**हेरवाडकर पंडित.**-इचलकरंजीकरांचे पदरीं दुसरें एक ब्राम्हण घराणें उदयास आलें, तें हेरवाडकर या नांवानें कोल्हापुरांत नांदत आहे. त्याचा मूळ पुरुष हरिराम व भाऊ येसाजीराम यांची नांवें नानासा० पेशव्याचे कारभारांत वारंवार येतात, ह्मणून तीं स्मरणीय आहेत.

**वंशावळ.**-इचलकरंजीकर, आधार-खरेकृत इचलकरंजीचा इतिहास.

विश्वनाथपंत जोशी.
- नारोपंत ( हुपरीकर ).
- महादाजीपंत=गंगाबाई
  - नारो महादेव=लक्ष्मीबाई
    - व्यंकटराव १७०१-१७४५=अनूबाई मृ. १७८३.
      - वेणूताई=त्रिंबकराव पेठे
      - नारायणराव तात्या १७२४-७८.
        - व्यंकटराव दादा १७५०-९५ ल. रमाबाई भिडे पुणें; यानें आत्महत्या केली.
          - नारायणराव द०

१७. **राजाज्ञा.**-राजाज्ञा हें पद शिवाजीच्या वेळेस नव्हतें. औरंगजेबानें रायगड काबीज करून स. १६९० त येसूबाईस व शाहू वगैरे मंडळीस पकडून नेलें तेव्हां त्याजबरोबर उद्धव योगदेव राजाज्ञा हा गृहस्थ होता, असा उल्लेख बखरींतून आहे ( शा. म च. पृ. ३, ४, ८ ). यावरून राजाज्ञा हें पद संभाजीच्या वेळेस उत्पन्न झालें असावें. पुढें याचा समावेश प्रधान मंडळांत होऊन इतर अष्ट प्रधानांप्रमाणें सरकारी कागदावर राजाज्ञानें ' संमत सरकार ' अशीं अक्षरें लिहावीं लागत. शाहूच्या वेळेस राजाज्ञाची बरीच महती होती. तो बादशहाचे कैदेंत असतां त्याचा राजकीय कारभार उद्धव योगदेव पाहत असे. त्यानेंच शाहूकरितां मुली पाहून त्याचीं लग्नें केलीं. शाहू सुटून दक्षिणेंत आला, तेव्हां उद्धव योगदेव येसूबाईबरोबर दिल्लीस गेला, तेव्हां इकडे दत्ताजी शिवदेव हा राजाराम ताराबाईचा राजाज्ञा होता, तो शाहूस सामील झाला नव्हता तोंपर्यंत म्ह० १७०८—०९ सालीं रंगराव उद्धव शाहूचा राजाज्ञा होता, ( इ. स. पे. द. भा. पृ. ३३६ ), तो उद्धव योगदेवाचा मुलगा असावा. स. १७१२-१३ त नारोराम व स. १७१६-१७ त चिमणाजी दामोदर राजाज्ञा पदावर होते. (वरील पृ. ३३७). चिमणाजी दामोदर पंडित राजाज्ञा यास स. १७२६-२७ चें शाहूचें

पत्र आहे. ( शा. म. रो. २८ ). सन १७२२ तल्या एका कागदावर दत्ताजी शिवदेव व चिमणाजी दामोदर ह्या दोघांच्याही सह्या आहेत. ( खं. २०-४४ ). सन १७२७-२८ त दत्ताजी शिवदेव हा राजाज्ञा होता. मिरज येथें बंडखोरी करणारा उदाजी चव्हाण याचें पारिपत्य मोरो जिवाजीनें केलें, म्हणून शाहूनें त्यास राजाज्ञा पद दिलें, ( भा. व. म मंडळाची ब. पृ ४०-४१ ), तें पुढें त्याच्याच वंशांत चाललें. मोरो जिवाजी हा आंधळी बनवडी येथील देशस्थ ब्राह्मण. यांचे निमे हिसेदार उंब्रजकर देशपांडे व निमे वाईचे देशपांडे.

वंशावळ मोरो जिवाजी राजाज्ञा ( स. १७२८-२९ ).

- हरि
- भवानीशंकर
  - हैबतराव ( १७४६-७६ ).
    - भवानीशंकर द. ( १७७६-१८०३ )
      - मोरेश्वर आपासा०
        - विनायक
        - खंडेराव
      - आनंदरा०
        - भवानीशंकर
      - नारायणरा०
        - बाबूराव.
      - हैबतराव
      - गंगाधररा०
      - माधवराव.
- गंगाधर

१८. विठ्ठल शिवदेव विंचूरकर.— यांचें मूळचें उपनांव दाणी असून वतन सासवड येथें होतें. मराठशाहींत प्रसिद्धीस आलेलीं पुष्कळशीं देशस्थ घराणीं पुणें सासवड पट्टयांतलीं आहेत. दाणी कुटुंबाच्या दोन शाखा झाल्या: वडील शाखा माळेगांवास राजे बहाद्दर या नांवानें उदयास आली, आणि धाकटीचा मूळपुरुष विठ्ठल शिवदेव याचे वंशास विंचूरकर असें नांव मिळालें. शिवाजीपंत दाणी यास तीन मुलगे झाले, आबूराव, त्रिंबकराव व विठ्ठल. विठ्ठलचा जन्म स. १६७५ त झाला. हा लहानपणापासून मोठा द्वाड असे. त्यास घोड्यावर बसण्याचा अत्यंत शोक असून दांडगाई करीत असल्यामुळें बापानें त्यास घरांतून घालवून दिलें. तेव्हां तो साताऱ्यानजीक मर्ढे येथें अमृतस्वामींच्या सेवेस जाऊन राहिला. तेथें असतां शाहूचे बक्षीशीं त्याची ओळख होऊन त्यास

बक्षीच्या पागेंत नोकरी मिळाली. एकदां शाहू डुकराची शिकार करीत असतां विठ्ठलानें पळून जाणारा डुकर हातांनीं अडवून धरिला. त्यावरून शाहूची त्याजवर मेहेरबानी होऊन त्यास पागेंत दहा स्वारांची मनसब मिळाली. स. १७२० त चिमाजी आपानें हबशावर स्वारी केली तींत विठ्ठल शिवदेवानें सीदीसाताचे घोडे पकडून चांगला पराक्रम व्यक्त केल्यावरून त्यास शाहूनें पेशव्यांचे हाताखालीं नेमिलें [ खं. २ पृ. ४३ ]. पुढें तो बाजीरावाबरोबरच्या बहुतेक स्वाऱ्यांत हजर असे. लवकरच त्यानें आपल्या हाताखालीं मोठी फौज जमा केली, आणि दयाबहादर व बंगसावरील स्वाऱ्यांत मोठा पराक्रम केला. नृसिंह हें त्याचें कुलदैवत असून निरानरसिंगपुरचें मंदिर त्यानें बांधिलें. स. १७३९ च्या बसईवरील मोहिमेंत विठ्ठल शिवदेव हजर असून त्यानें अनेक प्रसंगीं चांगला पराक्रम व्यक्त केला. स. १७४० च्या नासिरजंगावरील स्वारींत जी जहागीर बाजीरावास मिळाली तिची वहिवाट त्यानें विठ्ठल शिवदेवास सांगितली. त्याची हकीकत पुढें ठिकठिकाणीं येईल. तो १७६७ त मरण पावला, तोंपर्यंत राष्ट्रकार्य करीत होता.

**वंशावळ. विठ्ठल शिवदेव** साताऱ्याजवळ निगडीचा कुलकर्णी.

शिवाजीपंत. मल्हारपंत. बाजीराव. नरसिंगराव. खंडेराव.

(शिवाजीपंत:) गणपतराव अमृतराव. दाजीबा.

(खंडेराव:) नरसिंगराव अन्या. — विठ्ठलराव द०

( यांची हकीकत का. सं. चे बखरींत छापली आहे. )

**१९ मालेगांवकर राजे बहादर.**—माळवा प्रांत जिंकण्यासाठीं पहिल्या जोराच्या प्रयत्नांत जी मंडळी दक्षिणेंतून उत्तरेंत गेली तींत नारो शंकर उदाजी पवाराचे दिमतीस होता. हाच या घराण्याचा मूळ पुरुष ता. १७-१०-१७२० च्या मंडलोई मरांतील एका पत्रांत नारोशंकर उदाजी पवाराच्या बरोबर असल्याचा उल्लेख आहे सन १७३० त त्याची दिंमत मल्हारराव होळकराकडे झाली. ता. १०-१७३० त नारो शंकरास माळव्याचे कामावरून काढण्यांत आलें म्हणून मल्हारराव होळकर लिहितो, ' रा० तेजकर्ण मंडलोई व कुंवर

न्यहालकर्णे प० इंदूर गोसावी यांसी. से. मल्हारजी होळकर दंडवत. सु. सल्लास सल्लासीन मया व आलफ. तुम्हीं ज्येठमल पाठविला त्यास रा. नारोशंकर यांजला पेशजीस प्र० मजकूरच्या धंद्यावरून दूर केलें होतें. हल्लीं जेठमल यानें सांगितलें कीं नारोशंकर प्र० मजकुरास गेलीया प्र० उज्याड होईल. त्यास साल मजकूर नारोशंकर यांजकडून धंदा दूर केला असे; तरी तुम्ही आपली खातरजमा राखोन तमाम प्र० म० च्या रयतीस कोल करार देऊन आबादी करणें. बोहरे उज्जनीस पळोन गेले त्यांस घेऊन येणें. तुम्हीं कोणे गोष्टीचा वसवसा न धरणें. जे गोष्टीनें परगण्याची कीर्द आबादानी होय तें करणें. जाणीजे. छ २७ रबिलाखर[1].

नारोशंकर, अंताजी माणकेश्वर, गोविंदपंत बुंदेले वगैरे मंडळी आरंभापासूनच शिंदे होळकरांबरोबर उत्तरेंतील उद्योगांत थेट पानपतापर्यंत वावरत होती. नारोशंकर होळकराबरोबर असे. स. १७४२ त नाना सा० पेशव्यानें झांशीच्या दक्षिणचें ओर्छा ठिकाण हस्तगत केलेलें हातचें गेलें तें परत घेण्याची नारोशंकरास आज्ञा झाली. या कामावर तो कैक वर्षे होता. शिंदे-होळकरही जाऊन येऊन त्या उद्योगावर असून त्या संबंधांत रामचंद्रबाबास लिहिलेलीं पेशव्यांचीं पत्रें उपलब्ध आहेत. ( पारसनीस संग्रह ). असेंच एक विस्तृत पत्र नारोशंकरानें पेशव्यास लिहिलेलें ता. ३१-५-१७४६ चें रा. यशवंत रा० गुप्ते यांजकडून मिळालें आहे. शेवटीं ओर्छा जिंकून झांशी सुभा नारो शंकरानें हस्तगत केला. [ २८-११-१७५०, खं. ११-७५ ].

नारोशंकरासच पुढें पेशव्यांनीं झांशीच्या सुभ्यावर नेमिलें.त्यानें तीस पसतीस लाख उत्पन्नाचा प्रांत हस्तगत केला. झांशी खेडें होतें, त्याची वसाहत करण्याबद्दल लाखों रुपये खर्च करून सुभा राहण्यालायक जागा केली. पुण्यास श्रीमंतांस कोणीं गैरवाका समजाविल्यावरून त्याजला पुण्यास बोलावून आणिलें. नौबत वाजवीत शहरांतून थेट पेशव्यांचे वाड्यांत गेला, आणि तेथें उतरण्यास जागा मागूं लागला, अशी आख्यायिका आहे. इतराजीचा डौल दिसण्यांत आला, तेव्हां दत्ताजी शिंद्याच्या मध्यस्थीनें तंटा तुटून त्याजबरोबरच स. १७५७ त नारो-

१. असेंच पत्र बाजाराव बल्लाळाचेंही आहे. रा. श्री. वि० आठल्ये यांजकडून.

शंकराची रवानगी पूनः हिंदुस्थानांत झाली. पानपताचे प्रसंगीं तो दिल्लीचे संरक्षणांस होता. माधवरावाचे कारकिर्दीतही त्यानें कामगिरी केलेली आहे. भवानराव प्रतिनिधीवर पेशव्यांची इतराजी झाल्यानें कांहीं दिवस प्रतिनिधीचें काम स. १७६२ त नारोशंकरास देण्यांत आलें होतें. नारोशंकराचा मुलगा त्रिंबकराव नारायण कांहीं दिवस शिंद्यांचे दिवाणगिरीवर होता. त्याचे भाऊ आबाजी व लक्ष्मण भावाबरोबर बावरत होते. लक्ष्मणशंकराचा मुलगा विश्वासराव हा झांशीच्या सुभ्यावर बरेच दिवस होता. निजामाशीं लढतांना माधवराव पेशव्याचे वेळेस नारोशंकरानें केलेलें काम त्यानें स्वतः विस्तारानें लिहिलें आहे. [ भा. व. १ प. या. १.२ ]. शिवाय नारोशंकराची एक बखर रा. राजवाड्यांनीं छापली आहे. ( खं. १ पृ. ३१० ).

**वंशावळ**




२०. **कऱ्हाडकर मुतालिक.**— सातारा जिल्ह्यांतील जावळा तालुक्यांत बामणोली गांव आहे, तेथें शिवदेव चावरे नांवाचा एक इसम राहत असे; तो खेड्यांत किरकोळ देवघेवीचा व्यापार करून उदरनिर्वाह करी. त्यास अंताजी व यमाजी असे दोन मुलगे होते. हे मुलगे राजारामाचे कारकीर्दींत परशुराम त्रिंबकाचे हाताखालीं कारकुनी करूं लागले; आणि अंगच्या हुशारीनें लवकरच प्रसिद्धीस आले. कैक वर्षांनीं म्ह० स. १७४२–४३ त यमाजीस प्रतिनिधींची मुतालिकी मिळाली ( सदर पृ. १६७ ). यमाजी मुत्सद्दी असून शिपाईगडी

होता. शाहूच्या कारकिर्दीत प्रतिनिधीचें वजन खालावत जाऊन पेशव्याचें वाढत चाललें तें या हुशार यमाजीस दुःसह झालें; आणि संधि सांपडेल तेव्हां पेशव्यांशीं स्पर्धा करून त्यानें आपल्या धन्यास प्रमुखत्व आणण्याचा खचून उद्योग केला. परंतु प्रत्यक्ष प्रतिनिधीच्या अंगीं विशेष पराक्रम नव्हता, आणि पेशव्यांप्रमाणें घरांतच तयार झालेली स्वतःची होतकरू तरुण मंडळीही मदतीस नव्हती. तेव्हां यमाजी स्वतः कीतीही हुशार असला तरी दुसऱ्याचे तर्फेनें त्यास वागावयाचें असल्यामुळें पेशव्यापुढें त्याचें बल चाललें नाहीं. शाहूच्या अखेरच्या भानगडींत यमाजीनें सकवारबाईचा पक्ष उचलिला आणि कांहीं दिवस पेशव्यांस अगदीं दमवून सोडिलें. परंतु शाहू मरण पावतांच पेशव्यांनीं त्यास व प्रतिनिधीस पकडून बंदोबस्तांत ठेविलें; आणि पुढील राज्यकारभाराची व्यवस्था लागल्यावर मग मुक्त केलें. त्यानंतर ताराबाईस हाताशीं धरून फिरून यमाजीनें पेशव्याशीं विरोध सुरू केला, पण त्यांत त्यास यश आलें नाहीं. पेशव्याच्या वाढत्या सत्तेस आळा घालण्याचें सामर्थ्य त्याच्या ठिकाणीं नव्हतें, आणि फौज व सरदारही त्यास अनुकूळ नव्हते. उलट पक्षीं पेशव्यांचा जम तीन पिढ्यांपावेतों सर्वत्र चांगला बसलेला पाहून शेवटीं त्यानें विरोध सोडून दिला. नानासा॰नें मृत्युपूर्वी उत्तरेंत स्वारी केली तेव्हां त्याजबरोबर यमाजी शिवदेव होता. त्याच्या पश्चात् मुतालकीचें काम मुलगा गमाजी पाहूं लागला. हा गमाजी विठ्ठल सुंदराशीं संधान करून पेशव्याशीं लढण्यास आला असतां राक्षसभुवनच्या लढाईत मारला गेला ( स. १७६३ ). अंताजीचा मुलगा वासुदेव हा प्रथमपासूनच पेशव्याचे बाजूचा असून गमाजीनंतर त्यासच पेशव्यांनीं मुतालकीवर दाखल केलें. गमाजी स्वभावानें क्रूर असल्यामुळें, ' यमाजीस (काळास) न भ्यालें तरी गमाजीस भ्यालें पाहिजे,' अशी म्हण मराठी भाषेंत आली आहे. मुतालिकांचें राहण्याचें मुख्य ठिकाण कऱ्हाड होय.

अंताजी शिवदेवासंबंधानें खालील उल्लेख आढळतो. ' रा. यमाजी शिवदेव यांणीं उंब्रजचे मुक्कामीं स्वामीसंनिध विनंति केली. कै. राजाराम महाराज चंदीचे मसलतीस गेले ते समयीं किल्ले जगदेवगड हस्तगत करावयाचेविशीं

ंताजी शिवदेव यांसी आज्ञा झाली. त्यावरून किल्ल्यावरी हल्ला करून दरवाजावरी चालोन घेतलें. स्वामीचे दृष्टीं ठार झाले, त्याजकरितां महाराजांनीं यांची स्त्री मनुबाई यांस मौजे कोरेगांव इनाम करून दिला. त्या वेळचीं इनामाचीं पत्रें अग्नीचा उपद्रव होऊन दग्ध झालीं. तरी नूतन पत्रें करून देऊन इनाम चालविलें पाहिजे, म्हणून त्याजवरून मौजे मजकूर गांव इनाम करून दिल्हा असे'. [ ता. ८ एप्रिल १७३८, इ. सं. पे. द. मा. पृ. २८ ]. तसेंच स. १७३०–३१ त विशाळगड काबीज करण्याचे कामीं श्रीनिवासराव प्रतिनिधींचे हाताखाली अंताजी शिवदेव यास पाठविलेलें असून, अंताजीबरोबर कान्होजीराव पासलकर पाठविलेले होते. पासलकरास शाहूनें विशाळगडच्या कामगिरीबद्दल इनाम करून दिलें, तो बहुधा बाजी पासलकराचे वंशांतलाच असावा. [ इ. सं. पे. द. मा. पृ. २५ ] वरील दोन उल्लेखांतील विरोधावरून अंताजीच्या मृत्युकाळाचा संशय राहतो.

**वंशावळ.** मृतालिक प्रतिनिधींचे. [ हतवळणेकृत सातारावर्णन ].

| | | |
|---|---|---|
| अंताजीशिवदेव | १ यमाजीशिवदेव | ५ नारायणराव |
| ३ वासुदेव | २ रामाजी | ६ अंताजीदादासा० मृ. १८६५ |
| ४ अंताजीद० | | ७ नारायणराव बाळासा० |
| ५ नारायणराव मृ. १८३५ | | ८ अण्णासाहेब. |

**२१. रास्ते.**–आदिलशाहीचे अंमलांत गंगाधरपंत गोखले हा रत्नागिरि जिल्ह्यांत गुहागर नजीक वेळणेश्वर गांवीं महाजन म्हणून राहत असोन, हवेली व जाफराबाद या दोन महालांचा रसदभरणा दाभोळ सुभ्यास करी. त्याचा नातू हरिपंत दाभोळ सुभ्याचा भरणा विजापुरास नेऊन करूं लागला, तेव्हां आदिलशहानें त्यास रसदा असा किताब देऊन विजापुरास ठेविलें, आणि त्याजकडे दुसऱ्या अनेक सुभ्यांच्या रसदा भरण्याचें काम दिलें. हरिपंताचा नातू श्यामजीपंत यास शाहू छत्रपतीनें साताऱ्यास आपलेजवळ आणिलें. त्याचा मुलगा भिकाजीपंत यानें महालचा पोतें-भरणा व व्यापार करून साताऱ्यास

शनिवारांत वाडा बांधिला. त्याची सचोटीची वागणूक व व्यापारांतील हुशारी पाहून 'रसदे' हें पद मोडून शाहूनें रास्ते (रास्तवागणारे) हें पद त्यास दिलें. बाजीराव पेशव्यानें भिकाजी नाइकाची सर्वांत वडील कन्या आपला मुलगा नानासाहेब यास केली, तिचें नांव गोपिकाबाई. लग्न वाईंत जाहलें. ह्या विवाहापासून पुढें रास्त्यांचा उदय झपाट्यानें झाला. भिकाजी नायकास सात मुलगे व दोन मुली झाल्या. दुसरी मुलगी सगुणबाई ही आप्पाजीराम गाडगीळ यास दिलेली असून, त्यास नानासाहेबानें अक्कलकोटकर भोसल्यांची दिवाणगिरी दिली. पुढें रास्ते पुण्यास वाडा बांधून राहूं लागले, तेथें त्यांचें वास्तव्य अद्यापि असून त्यांच्या नांवची स्वतंत्र पेठ आहे. भिकाजी नायकाचा पांचवा मुलगा गंगाधरराव यानें वाईंत वाडा बांधिला. तो पंचवटींत गोपिकाबाईजवळ राहत असे.

**वंशावळ**

[ मावजीकृत कैफीयती व यादी, भा. व. पृ.२ महाराष्ट्र मंडळाची बखर.]

गंगाधरपंत
|
हरिपंत
|
श्यामजीपंत.
|
भिकाजी नाईक आप्पा.
|
२ मुली व ७ मुलगे.☞

☞१ मल्हारराव—० ☞३ आनंदराव. ☞४ लक्ष्मणराव. ☞५ गंगाधरराव.

☞२ गणपतराव — कन्या, माधवराव द. | (आनंदराव); श्यामराव (लक्ष्मणराव); व्यंकटराव, विश्वासराव आप्पा.. (गंगाधरराव)

गणपतराव: काशीराव, माधवरावद० दिला., यशवंतराव.
काशीराव | मल्हारराव
यशवंतराव | गणपतराव भाऊ
माधवराव द. | लक्ष्मणराव | श्यामराव — बळवंत, गंगाधर, यशवंत
विश्वासराव आप्पा.. | ०

☞६ रामचंद्रराव ☞७ जीवनराव.
रामचंद्रराव | ०
जीवनराव | अमृतराव.

☞ या खुणेचे ७ मुलगे भिकाजीचे.

**२२. चिमणाजी दामोदर.**—याचे वंशास रिंगणगांवकर जहागिरदार असें म्हणतात. यांचें उपनांव मोघे. मराठी रियासत पूर्वार्ध पृ. ७४५ वर दिलेली वंशावळ अपुरी असून त्यांचे दप्तरांतील कागदांवरून खालील वंशावळ उपलब्ध भा. इ. सं. मं. इ. वृ. श. १८३७ ले. १७९ पृ. ३२२ ].

दामोदरपंत.

- त ( वडील ) ३९ नंतर
- चिमणाजीपंत ( लहान ) मृ. १७३३–३४.
  - बळवंतराव मृ. १७५२–५३.
    - त्रिंबकराव. पानपतावर हजर. मृ. १८१८ चे सुमारास.
      - हरि
        - माधवराव
        - बळवंतराव
          - कृष्णराव
            - ०
        - रामचंद्रराव
          - वासुदेवराव

शाहूच्या आगमनप्रसंगीं चिमणाजी दामोदर हा मराठी राज्यांत प्रतिष्ठित पुरुष होता. ताराबाईनें परसोजी भोसले याजबरोबर चिमणाजी दामोदरासही शाहूचा प्रतिकार करण्यासाठीं खानदेशांत ठेवून दिलें होतें; परंतु शाहूनें त्यास आपल्या पक्षास वश करून पुढें पंडित राजाज्ञा हें पद दिलें. [स. १७०८–०९, इ. स. पे. द. मा. पृ. ३३६]. स. १७२४ त शाहूनें त्यास निजामावर पाठविलें असून ( शा. म. रो. ४, ६ ) त्याच सालीं माळव्यांत राजा गिरिधरवर स्वारी झाली, तींतही तो हजर असल्याचा उल्लेख सांपडतो. स. १७२७ च्या फेब्रुवारींत चिमणाजी कलबुर्गे प्रांतीं कान्होजी भोसल्यास मिळाला (शा. म. रो. २३ २४, २६, २८, ) आणि त्यांनीं ऐवजखानास नरम केलें. पुढील सालीं शाहूस सोडून चिमणाजी कोल्हापुरच्या संभाजीस मिलाफी झाला आणि संभाजीनें त्यास

पंडितप्रधान पद दिलें, (इसवी सन १७२८). संभाजीच्याच तर्फेनें दाभाड्याचे मदतीस येऊन तो डभईच्या लढाईत पाडाव होऊन बाजीरावाचे हस्तगत झाला. स. १७३४ पासूनचा पत्रव्यवहार त्याचे मुलाचे नांवचा असल्यामुळें त्यादरम्यान तो वारला असावा. चिमणाजीचा भाऊ शिवाजीपंत व मुलगा बळवंतराव यांचा पुढें बाजीराव व नानासाहेब यांजशीं चांगला स्नेह असून, डभोईच्या लढाईनंतर खालसा झालेलें त्यांचें उत्पन्न पेशव्यांनीं मोकळें केलें. बळवंतराव रुसून गेला होता, त्यास नानासाहेबानें समजाविशी करून आपल्या पक्षांत आणिलें, तेव्हां-पासून त्यांनीं राष्ट्रकाम केलेलें आहे. यां दोन घराण्यांचा लोभ जिव्हाळ्याचा असून नानासाहेब बळवंत चिमणाजीस ‘ चिरंजीव ’ लिहितो. त्याचा मुलगा त्रिंबकराव बळवंत पानपतावर होता.[1]

**२३. रामाजी अनंत दाभोळकर.**—हा सारस्वत ब्राह्मण म्हणून समज असल्यास तो बरोबर नाहीं. हा कोंकणस्थ ब्राह्मण मूळचा रत्नागिरी जवळ बसणी म्हणून गांव आहे तेथचा राहणारा, उपनांव काळे. दाभोळकर टोपणनांव त्यास पुढें प्राप्त झालें. नानासाहेबाच्या हिशेबी कचेरींत हा कारकून असून, हुशार व भरंवशाचा असल्यामुळें रामचंद्र मल्हाराचे पश्चात् ता. २४-६-१७५० रोजीं त्यास शिंद्यांचे कारभाराचीं वस्त्रें देऊन पेशव्यानें हिंदुस्थानांत रवाना केलें. शिंद्यांचा कारभार करून शिवाय रमा वेळच्या रिवाजानुसार तो लढण्याचेंही काम करी. शिंद्यांच्या उद्योगाचीं सन दहा सालचीं पत्रें रामाजीनें लिहिलेलीं सविस्तर व मुद्देसूद आहेत. नगरजिल्ह्यांत अकोळनेर येथें त्याचे वंशास जहागीर असून, तेथें हा वंश अद्यापि नांदत आहे. पानपतावरील पळ सुरू झाल्यावर नाना-फडणीस, रामाजी अनंत व बापुजी महादेव हिंगणे यांनीं सर्व वस्त्रभाव टाकून लंगोट्या लावून रात्र झाल्यावर पळून जात असतां रणभूमीच्या पश्चिमेस दहा बारा कोसांवर शत्रूंनीं हात लावून झाडा घेतला; रामाजीपंत व बापूजीपंत यांस जखमी करून तोडून टाकिलें. नानाफडणास मात्र बांचला.[का. सं. प. या. ले. ५३].

---

१ टीप. रा. श्री. वि. आठल्ये यांनीं रिंगणगांवचें दप्तर चाळून घेतलेल्या नकला मला दिल्या, त्यांवरून ही हकीकत बनविली आहे.

**वंशावळ.** [ घराण्याचें इंग्रजी चरित्र मोरोकृष्णानें लिहिलें त्यावरून ].

रामाजी अनंत काळे, बसणीकर—ऊ० दाभोळकर.




२४. **पानशे.**—पुरंदर किल्ल्याच्या टापूंतील अनेक देशस्थ घराणीं पेशवाईत प्रसिद्धीस आलीं, त्यांपैकींच पानसे होत. यांचें मूळगांव सोनोरी पुरंदरजवळ असून पानशांस इनाम आहे. पानसे हे तेथचे कुळकर्णी. इतर अनेक ऐतिहासिक घराण्यां प्रमाणेंच, पेशवाईत कार्यक्षेत्र मिळतांच या विस्तृत घराण्यांतील तमाम पुरुषांनीं राष्ट्रकार्य करून इतिहासांत आपलें नांव कसें चिरंतन करून ठेविलें हें खालील हकीकतीवरून ध्यानीं येईल.

सोनोरीकर **पानशे**. ( मावजीकृत कैफीयत व यादी पृ. १२२. )




मूळ अर्जक यशवंतराव हा शाहू छत्रपतीजवळ हुजरातींत तीनशें स्वारांचा सरदार होता. शाहूनें त्यास बाजीरावाचे तैनातीस दिलें. बाजीराव व चिमाजीआप्पा यांजबरोबर राहून मर्दुमकी दाखविली, तेव्हां बाजीरावानें त्यास तोफखान्याचें काम सांगितलें. हें काम यशवंतराव व त्याचा वडील बंधु माधवराव असे करीत असत. ते वसईच्या स्वारींत हजर होते. सावनूरचे स्वारींत यशवंतरावानें तोफखान्याचें काम मोठ्या सिताफीनें केलें. लढाईत यशवंतरावाचे पायास भाल्याची जखम लागली, तेव्हां पेशव्यानें त्यास साहेब नौबत व अंबारी दिली. यशवंतरावाचा धाकटा भाऊ रघुनाथरावाच्या गुजराथ स्वारींत तोफखान्याचा अंमलदार होता. त्या स्वारींतील कामगिरीबद्दल नानासाहेबानें ९ मार्च १७५३ रोजीं केशवरावास दोन परगण्यांची मज्मू व फडणिसीचे दरख दिले. निजामावरील तांदुळजाच्या लढाईत केशवराव जोडगोळीनें मारला गेला. यशवंतरावाचा धाकटा भाऊ महिपतराव पानपतचे लढाईत हजर होता. त्या लढाईत तोंडावर तलवारीच्या जखमा लागून तो परत देशीं आला. नंतर कांहीं काळ त्यानें तोफखान्याचा कारभार केला. यशवंतरावाच्या पश्चात् तोफखान्याचा कारभार कांहीं दिवस कृष्णरावानें व पुढें भिवरावानें केला. राक्षसभुवनच्या लढाईत,

तोतयाचे पाडावांत व स. १७७६-७९ मधील इंग्रजांवरील लढायांत भीवराव पानशे आपल्या फौज तोफखान्यासह हजर असून, तळेगांवच्या लढाईंतील पराक्रमाबद्दल ता. ११ नोव्हेंबर सन १७७८ त भिवरावास चौघडा जरीपटका व नव्वद हजारांचा सरंजाम पेशव्यांकडून मिळाला. जयवंतरावानेंही त्या युद्धांत अनेक पराक्रम केले कृष्णराव हैदरअलीवरील स्वारींत कामास आला. सखारामपंत हा नानाफडणिसाबरोबर बादामीच्या लढाईंत व पुढें खर्ड्याच्य ।लढाईंत हजर होता. विश्वासराव पानसे बारभाईच्या कारस्थानांत व पुढें इंग्रजांबरोबरील युद्धांत प्रमुख होता. महादजी शिंदे हिंदुस्थानांतून दक्षिणेंत आल्यावर त्याचा पक्ष विश्वासरावानें घेतला होता, त्याबद्दल त्यास महादजीनें चाकण पेठ्यांतील नाणवली गांव इनाम करून दिला. पुरुषोत्तमरावही पुण्यांत राहून तोफखान्याचें कामकाज व हिशेब पाहत असे. विश्वासरावाचा मुलगा गणपतराव खर्ड्याचे लढाईंत हजर होता. पुढें तोफखान्याचें सर्व काम त्याजकडे आलें. कोल्हापुरकरांबरोबरील युद्धांत गणपतराव प्रमुख होता. सन १८२५ सालीं गणपतराव वारल्यावर त्याचें कांहीं उत्पन्न मुलगा दामोदरराव यास मिळालें.

२५. **नारोराम मंत्री.**—हा सावंतवाडी नजीक कोचरें गांवचा कुळकर्णी सारस्वत ब्राम्हण. यास नारबा मंत्री म्हणत. स. १७०७चे सुमारास तो धनाजी जाधवाजवळ येऊन राहिला. स. १७१३त त्यास शाहूनें चन्द्रसेन जाधवाकडून काढून मंत्रीपदाचा अधिकार दिला. कारण पूर्वीचा मंत्री पुंडे हा ताराबाईचे पक्षांत होता. नारोमंत्री आपल्या बंधूं सह सातारा जिल्ह्यांत मागणी येथें राहत असे. अद्यापि हा गांव त्या घराण्याकडे इनाम चालतो. नारबा विशेष कर्तृत्ववान नव्हता, तथापि सुस्वभाव असून पेशव्याशीं उघड विरोध करीत नसे. तो सन १७४८ त मरण पावल्यावर भावाचा मुलगा घनश्याम यास दत्तक देऊन त्याचे नांवानें शाहूनें मंत्रिपद चालविलें. रामराजाच्या वेळेस घनश्याम नारायण मरण पावला आणि त्याचा मुलगा रघुनाथ घनश्याम यास मंत्रीपदाचीं वस्त्रें मिळालीं. तो इस्लामपुर येथें राहूं लागला. रघुनाथरावाचा भाऊ नारायण

घनश्याम याचा व त्याचा तंटा लागला. त्याचा वंश तुकाईचे वाडीस आहे. रघुनाथराव वारल्यावर त्याचा पुत्र जयवंतराव यास धाकटे शाहूनें मंत्रीपदाचीं वस्त्रें दिलीं. जयवंतरावानें आपला बंधु बचाजी याचा मुलगा रघुनाथराव दत्तक घेतला. जयवंतराव स. १८२९ चे सुमारास मरण पावल्यावर रघुनाथरावाकडे मंत्रीपदाचा अधिकार चालला. रघुनाथरावास मुलगे दोन आनंदराव व माधवराव.




२६. सचिव भोरकर.—शंकराजी नारायण सचिव सन १७०८ त वारला तेव्हां त्याचें वय सुमारें पंचेचाळीस वर्षांचें होतें. त्यास महादजी नांवाचा एक दत्तक पुत्र व नारायण नांवाचा औरस पुत्र मरणसमयीं दोन वर्षांचे वयाचा होता. लगेच शाहूनें नारोशंकर यास सचिव पदाचीं वस्त्रें दिलीं. नारोशंकर यास स. १७०७ त दमाजी थोरातानें धरून हिंगणगांवचे किल्ल्यांत कैदेंत ठेविलें. तेथून पुढें तीन महिन्यांनीं बाळाजी विश्वनाथानें त्याची सुटका केली. शंकराजी नारायण चांगला होतकरू होता, परंतु त्यास पराक्रम गाजविण्याची संधि मिळाली नाहीं. तो सन १७३७ त ( शके १६५९ ज्येष्ठ ? ) मरण पावला. त्यास मूल नव्हतें. म्हणून त्याचा वडील भाऊ महादजी याचा मुलगा चिमणाजी

महादेव बहुत करून शाहू जवळ असे, त्यालाच चिमणाजी नारायण असें नांव ठेवून शाहूनें सचिवपदाचा अधिकार व वस्त्रें दिलीं. नीरा नदीच्या कांठी भोर हें राहण्याचें ठिकाण या चिमणाजी नारायणानें केलें; त्यापूर्वी वरोंडा येथें ते राहत असत. तेथील वाडा जळाला, तेव्हां तो भोरास गेला. स. १७५७ त चिमणाजी नारायण मरण पावला; त्यास तीन मुलगे होते, सदाशिवराव, आनंदराव व रघुनाथराव. ताराबाईनें स. १७५८ त सदाशिवरावास सचिवपदाचीं वस्त्रें दिलीं. तो सन १७८७ त मरण पावल्यावर धाकट्या भावास वस्त्रें मिळालीं. त्याचा मुलगा शंकरराव यास सखाराम बापू बोकील व रामशास्त्री प्रभुणे यांच्या मुली दिल्या होत्या. मूल झालें नाहीं.

**वंशावळ** सचिव. शंकराजी नारायण मृ. १७०८.




२७. **थोरात.**—शाहू व संभाजी यांचें भांडण चालत असतां अनेक मराठा सरदारांचें मधल्या मध्यें चांगलें फावत असे. ते दोघेही एकमेकांचे सरदार फोडीत. शिवाय त्यांचे व्यवहार एकमेकांशीं कसे चालत हें ले. ४५३ खंड ३ यांतील थोरातांच्या हकीकतीवरून दिसून येतें. या घराण्याचा मासल्यासाठीं येथें थोडक्यांत निर्देश केला आहे. सिधोजी थोरात यानें शाहूची कामगिरी चांगली करून शाबासकी मिळविलेली आहे. (शा. म. रो. १३ व १६).

सुभानजीनें आष्ट्याचें ठाणें घेतलें व सर्व बंधु एकत्र राहूं लागले. सिधोजी नारोपंत घोरपड्याजवळ चाकरी करून होता, त्यास मिरज येथें सरंजाम मिळाला. जिवाजी व येसबा थोरात आणि विठोजी चव्हाण हे सर्व एकत्र स्वाऱ्या करीत. हिंगणगांवचा दमाजी थोरात तो या घराण्याहून वेगळा होय.




२८. **विसाजी नारायण जाखी.**—हे सारस्वत ब्राह्मण पांच पिढ्यांपर्यंत प्रतिनिधींचे चिटणीस होते. 'यांनीं थोरले कैलासवासीपासून निष्ठेनें सेवा केली. औरंगजेब पातशहा विशाळगडास वेढा घालून बसले ते समयीं परशराम पंडित यांजपाशीं श्रम साहस केले.' (इ. सं. पे. द. मा. पृ. १९२०). याचा व बाळाजी वि० चा अत्यंत घरोबा होता. पेशवे प्रतिनिधींचीं पुढें चांगली गोष्ट झाली त्याचें कारण हे जाखी होत. तिसां अशर मया व आलफ छ १५ सवाल ( स. १७१८ ) च्या पत्रांत बाळाजी वि० विसाजीबावास लिहितो. 'पूर्वी अजंनवेलीस असतां आमचें सर्व प्रकारें आपण चालविलें. संकटें आम्हावरी पडलीं त्या प्रसंगी आपण आम्हांवरी कृतोपकार फार केला. आम्हांमुळे सर्वस्वें खराब होऊन आमचें संरक्षण केलें. हल्लीं ईश्वरें आम्हांवरी कृपा केली यास्तव आपण आम्हापाशीं राहवें, आम्हीं सर्व प्रकारें चालवावें, हें आमचें मानस, यास्तव आग्रह बहुत केला, त्यास आपण सांगितलें जे, आपला वृद्धापकाळ आणि योगक्षेम चालत आहे. ज्यांचे संनिध आह्मी तेही उत्तम प्रकारें चालवितात. मुलें ठेवावीं तर तीं लहान. यास्तव त्यांचे उपयोगी पडे ऐसें पत्र लेहून द्यावें, म्हणोन बोलिलां, त्यावरून हें पत्र तुम्हांस लेहून दिल्हें असे. प्रस्तुत आम्ही आपणास रु. ७०० प्रतिवर्षी करार करून दिले आहेत. दरसाल प्रविष्ट करूं. [ भा. इ. सं. वृ. १८३६ ले ९ ].

**जाखींची वंशावळ.** गोत्रवत्स, सूत्र आश्वलायन, सारस्वत ब्राह्मण.

( रत्नागिरि जि० बामणोली गांव इनाम चालू आहे. )




२९. **धडफळे.**–पुण्यांतील जुन्या घराण्यां पैकीं धडफळ्यांचे घराणें आहे. त्यांचा पूर्वज रंगो बापूजी धडफळे हा मलिकंबरच्या वेळेस पुण्याचा ठाणेदार होता. दुष्काळानंतर पुण्याची वस्ती वाढवून व पेठा स्थापून जमाबंदीचे वगैरे नियम ठरविण्याचें आरंभींचें काम या धडफळयांनीं केलेलें आहे. पेशव्यांनीं पुणे शहराची पूनर्रचना केली त्यात त्यांस धडफळ्यांनीं सर्व मदत केली. ( भा इ. मं. इ. वृ. १८३५ पृ. ३७५). बिनायक नारायण व गणेश नारायण व मल्हार गोविंद धडफळे हे बाजीरावाचे वेळेस प्रमुख होते ( रा. खं. ३ ले. १६६ ). थोरातानें हिंगणगांवचे गढींत बाळाजी विश्वनाथास कुटुंबसह अडकवून ठेविलें त्या वेळेस मोरो विश्वनाथ व गणेश नारारायण धडफळे यांनीं कष्ट मेहनत करून, जामीनागिरी पत्करून सर्वांची सुटका केली. पुढें पेशवे पुण्यास आले ते प्रथम धडफळयांचे वाड्यांत राहिल्यावर बाजीरावानें स्वतःचा वाडा पुण्यास बांधिला, त्याचें काम धडफळ्यांचे हातचेंच आहे. पेशव्यांनीं धडफळयांस वंशपरंपरा इनामें वगैरे करून दिलीं होतीं. पेशव्यांच्या ऋणानुबंधी देशस्थ घराण्यांपैकीं हें एक होय.

नारायण.

विनायक  गणेश.

**३० फडके.**—हे पेशव्यांचे उपाध्ये पुण्यास राहत होते. त्यांस साष्टी, वसई वगैरे काबीज करण्याच्या कामगिरींत पाठविण्यांत आलें. त्यांनीं श्रम साहस बहुत केलें. शंकराजी केशव कच खाऊन युद्ध सोडून पळाला, त्यावरून बाजीरावानें फडक्यांची खूब निर्भर्त्सना केली. त्यावरून चिडून महादाजी केशव माहिमास पराक्रम करून कामास आला. वसई काबीज झाल्यावर तेथील काम पेशव्यानें शंकराजीस सांगितलें, तें त्यानें पुष्कळ वर्षें चांगल्या प्रकारें केलें, [ खं. ३·५५४ ].

**वंशावळ.** केशवभट




**३१. महादाजी राम पारसनीस.**—या घराण्याचा संबंध आंग्र्यांचे व्यवहारांत येतो. **वंशावळ.** [ रा. रामराव नारायण प्रधान यांजकडून ].

महादाजीराम.



कोल्हापुरकर संभाजीचा प्रधान नीळकंठ प्रभु पारसनीस व हा महादाजी-राम एकाच महाडकर कुटुंबांतले असावे. महादाजी व त्याचे मुलगे विठ्ठल त्रिंबक संभाजी आंगऱ्या विरुद्ध मानाजीस मिळाले होते, त्या संबंधांत महादाजीस मानाजीनें पत्र लिहिलेलें प्रसिद्ध आहे ( म. वि. १ पृ. २९३ ). विठ्ठल व त्रिंबक या दोघां बंधूनीं व त्यांचे पश्चात् जिवाजी विठ्ठल व अनाजी त्रिंबक यांनीं पेशवाईत राज्याचे अनेक उद्योग केले आहेत.

**३२. रेठरेकर.**—हें देशस्थ घराणें पेशव्यांचें ऋणानुबंधी होतें. भीवराव रेठरेकर व बाळाजी विश्वनाथ यांचा स्नेह असून, भीवरावास मुलगे झाले, त्यांचीं नांवेंही त्यानें बाजीराव व चिमाजी अशींच ठेविलीं. बाजी भीवराव तारापुरचे हल्ल्यांत मारला गेला ( स. १७३९, इ सं. पे. द. मा. पृ. ३० ); त्या वेळीं त्याच्या मातुश्रीस व भावास लिहिलेलीं पत्रें फार प्रेमळ आहेत. ( खं. ३·१५५, १६७, १६८ ). बापूजी बाजी नानासाहेबाचे वेळीं अनेक कामगिरींवर होता. ( का. सं. प. या. ६० १०३, १०४, ४९५ ). याच घराण्यांतील त्रिंबकराव हा दुसऱ्या बाजीरावाचें साह्य करीत होता.

३३. **सुमंत.**–आनंदराव रघुनाथ सुमंत हा ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण औरंगाबादेस राहत असे. तेथून शाहू दक्षिणेंत येत असतां त्यास सुमंतपद देण्यांत आलें. हा आपल्या कामांत कुशल होता, तथापि बहुधा पेशव्याचे उलट वागत असल्यामुळें राज्याच्या उद्योगांत त्याचा म्हणण्यासारखा उपयोग झाला नाहीं. पेशव्यांच्या मध्यस्थी शिवाय तो परभारें उद्योग करी, त्यामुळें एकतंत्री उद्योगास व्यत्यय येई. कदाचित् पेशव्यांवर दाब ठेवण्यासाठींच त्यास शाहूनें मुद्दाम हाताशीं धरिलें असावें. भागानगरास निजामाकडे व नादीरशहाच्या वेळेस जयसिंगाकडे आनंदराव होता. ता. २७·३·१७४१ रोजीं तो निजामाकडे असल्याचा उल्लेख आहे ( शा. म. रो. १४९ ). त्यानंतर तो केव्हां तरी वारला असावा (शा. म. ब. ७३ ). त्याचा वडील पुत्र सामान्यच असल्याळें सुमंतपद प्रथम माईपतरावास व नंतर धाकटा मुलगा विठ्ठलराव यास मिळालें. ( इ. सं. ऐ. चर्चा. पृ. १४ )

**वंशावळ सुमंत.** रघुनाथपंत भोपळे.




**३४. न्यायाधीश. वंशावळ—**




**३५. पंडितराव.** मुद्गलभट उपाध्ये, स. १७१३



**३६. बाजी महादेव प्रभु** उरवडेकर.—हा मुठे खोऱ्यांतील महादाजी रघुनाथाचा मुलगा. याचा जन्म चैत्र शु० ९ शके १६५१ (२७ मार्च १७१९) रोजीं उरवडेगांवीं झाला. सन १७४९ त नानासा० पेशव्याच्या हुजूर फौजेंत यानें नोकरी पत्करिली, तेव्हांपासून स्वपराक्रमानें चढत चढत त्यानें स. १७९९ पावेतों स्वराष्ट्राची सेवा बजाविली. सांगोल्याच्या लढाईत सदाशिवरावाच्या हाताखालीं राहून त्यानें प्रतिनिधीचा पराभव केला. त्यानंतर निजामाबरोबर व कर्नाटकांत जे युद्धप्रसंग नानासाहेबानें केले त्यांत तो हजर असून स १७५८च्या लाहोरस्वारींत तो रघुनाथरावाबरोबर होता. उत्तर पेशवाईत त्यानें अनेक प्रसंगांत पराक्रम गाजविले आणि सवाई माधवरावाचे वेळेस त्यानें बडोद्यास येऊन गोविंदराव गायकवाडाची नोकरी केली. ( इ. सं. ऐ. चरित्रें २–४ ).

**३७. ठाण्याचे बिवलकर.**—साष्टी कल्याणचा सुभेदार रामाजी महादेव हा पुष्कळ वर्षें कोंकणांतील कारभारावर असून, आंगरे यांच्या प्रकरणांत तो मुख्य होता वसईच्या युद्धांत रामचंद्र महादेव जोशी म्हणून गृहस्थ होता, तो हा नव्हे. ठाण्यास बिवलकरांचा वाडा असून तेथील कौपीनेश्वराचें मंदिर चिमाजी आपाच्या हुकुमानें रामाजी महादेवानें बांधिलें. कुलाब्यास पुढें अव्वल इंग्रजींत बिवलकर आंगऱ्यांचे कारभारी झाले, ते या रामाजीच्या वंशापैकीं नव्हत.

**३८. मेहेंदळे.** बहिरव भट्ट, ल० बाळाजी वि० ची बहीण.

- विश्वनाथ भट्ट.
  - बहिरवपंत.
- गणपतराव.
  - रामचंद्र ऊ. बळवंतराव, मृ. पानपत.
    - कृष्णराव ऊ. आपा बळवंत.
      - बळवंतराव द.
  - मुलगी.[1]
  - बाबूराव.
  - आनंदराव.
    - गणपत.

१ नानाफडणिसाची आई.

**३९. ग्वाल्हेरचे शिंदे**— शिंदे होळकरांच्या हकीकती मुख्य भागांत परिपूर्ण आलेल्या असल्यामुळें येथें फक्त संदर्भापुरत्या त्यांच्या वंशावळी दिल्या आहेत.

दत्ताजी, कन्हेरखेडचे पाटील.

जनकोजी

मृ. १९·७·१७४५ **राणोजी**, १ मैनाबाई ( निंबाबाई ), २ चिमाबाई ( रजपूत ).

- जयाप्पा, मृ. १७५५. सखूबाई.
  - जनकोजी,=काशीबाई[1]. मृ. १७६१,
  - ४ मुली.[2]
- दत्ताजी, मृ. १७६०. भागीरथीबाई.
- जोत्याजी, मृ. १७४४ सगुणाबाई.
- तुकोजी, मृ. १७६१ लक्ष्मीबाई.
  - केदारजी मृ. १७७०. स्त्री तुळजाबाई.
  - आनंदराव, स्त्री मैनाबाई.[3]
    - दौलतराव, दत्तक महादजीस.
- महादजी,[4] मृ. १७२७–१२·२·१७९४. स्त्रिया ९.
- भवानीबाई.

---

१. निजामशाहींतील व्यंकटराव निंबाळकराची बहीण.

२. पैकीं एक मुलगी वाडीकर खेमसावंतास दिलेली होती.

३. कुलाब्याचे येसाजी आंगरे याची मुलगी.

४. महादजीच्या नंतरचा वंश पुढील भागांत येईल.

१६·३·१६९३—१·५·१७६५.

२ खंडेराव मृ. १७५४ — ३ तुकोजी—पुतणे मृ. १५·८·१७९७

२ स्त्री अहल्याबाई मृ. १३·८·१७९५

मुक्ताबाई — २ मालेराव मृ. १७६५

काशीराव मृ. १७९८ — मल्हारराव मृ. १७९७ — विठूजी मृ. १८०० — ४ यशवंतराव मृ. २८·१०·१८११

५ स्त्री तुळसाबाई

८ हरिराव, गादी १७·४·१८३४-१६·१०·१८४३. ६ मल्हारराव १८११—३३ १० तुकोजीराव १८४४—१८६६

भागीरथीबाई — राधाबाई

९ खंडेराव मृ. १८४४

७ मार्तंडराव मृ. १८३४

११ शिवाजीराव ( १८८६—१९१० ) यशवंतराव

तात्यासाहेब — मल्हारराव

१२ तुकोजीराव १८९०—प्रस्तुत

१ चंद्रावती रा० — २ इंदिराबाई

मनोरमा — यशवंतराव — स्नेहलता.

**सूचना.** विशिष्ट प्रसंगांचा व घडामोडींचा संदर्भ त्यांतील प्रमुख व्यक्तींच्या नांवाखालीं मिळेल. प्रसिद्ध घराण्यांचीं आडनावेंही सूचींत घेतलीं आहेत.

# श्री सयाजी साहित्यमाळा.

| छपायेलां पुस्तक. | किंमत. |
|---|---|
| **१. विज्ञान-गुच्छः—** | |
| २. भूपृष्ठविचार ( सचित्र ). | ०-१०-० |
| ११. देहधर्मविद्यानां तत्त्वो. | १-०-० |
| १२. विज्ञानप्रवेशिका. | ०-११-० |
| १३. जिंदगीनो विमो. | ०-११-० |
| १७. उद्भिज्जविद्यानुं रेखादर्शन ( सचित्र ). | १-०-० |
| १८. करोळीआ ( सचित्र ) | ०-१४-० |
| २२. प्राणीविद्यानुं रेखादर्शन ( सचित्र ). | १-०-० |
| २५. मनुष्यविद्यानां तत्त्वो. | १-०-० |
| ३५. जीवविद्या ( सचित्र ). | १-०-० |
| ३८. तुलनात्मक भाषाशास्त्र. | १-४-० |
| ४६. राजनीतिनो संक्षिप्त इतिहास. | १-४-० |
| ४७. समाजशास्त्रप्रवेशिका. | १-४-० |
| ४८. बाळउछेर. | १-८-० |
| ५०. बाळस्वभाव अने बाळउछेर | १-८-० |
| ५१. शरीरयंत्रनुं रेखादर्शन. ( सचित्र ) | १-४-० |
| ६७. प्राणीसृष्टि ( सचित्र ) | १-८-० |
| ७०. रसायणन प्रवेशिका ( सचित्र ). | १-४-० |
| ७५. वडोदरानुं अर्थशास्त्र. | ०-१२-० |
| ८४. सनईवादन पाठमाळा पु. ३ ( मराठी ). | १-२-० |
| ८५. सदर सदर पु. ४ ( मराठी. ) | १-१२-० |
| ८६. अवताररहस्य. ( हिंदी ) | ०-१४-० |
| **२. चरित्र-गुच्छः--** | |
| ८. प्रेमानंद ( सचित्र ). | १-०-० |
| १४. दयाराम. | ०-११-० |

| | |
|---|---|
| ०. मीरांबाई. | ०-१२-० |
| ०. गिरधर. | ०-१४-० |
| ३. भालण ( सचित्र ) | १-०-० |
| ०. तुकाराम ( सचित्र ) | ०-१४-० |
| १. महाराजा शिवाजी ( मराठी ) ( सचित्र ) | १-६-० |
| ५. विष्णुदास. | १-०-० |
| ९. वीर शिवाजी ( सचित्र ) | १-०-० |
| ३. मणिशंकर कीकाणी. | १-६-० |
| ६२. दलपतराम. | १-२-० |
| ७२. समुद्रगुप्त ( सचित्र ) | ०-१३-० |
| ७७. चक्रवर्ती अशोक | ०-१४-० |
| ७८. समुद्रगुप्त. ( हिंदी ) | ०-१२-० |

**इतिहास-गुच्छः—**

| | |
|---|---|
| १. संस्कृत वाङ्मयाचा इतिहास ( मराठी ) | २-८-० |
| ९. जगत्नो वार्तारूप इतिहास, भाग १ लो. | ३-८-० |
| १९. ब्रिटिश राष्ट्रीय संस्थाओ. | ०-१३-० |
| २४. पॅलेस्टाइननी संस्कृति. | ०-१२-० |
| २६. जगत्नो वार्तारूप इतिहास, भाग २ जो | १-०-० |
| ३२. पार्लामेन्ट. | १-४-० |
| ३४. इतिहासनुं प्रभात. | १-४-० |
| ४३. नवीन जापाननी उत्क्रांति. | १-०-० |
| ५५. चीननी संस्कृति | १-६-० |
| हिन्दुस्थानचा अर्वाचीन इतिहास. | |
| ६५. मराठी रियासत, मध्य विभाग १. | २-१२-० |
| ६६. ,, मध्य विभाग २. | २-१२-० |
| ६८. ,, मध्य विभाग ३. | २-४-० |
| ६९. हिंदुस्ताननी संस्कृति. | १-१२-० |
| ९०. मराठ्यांच्या प्रसिद्ध लढाया (मराठी) | ३-०-० |

४. वार्ता-गुच्छः—

| | |
|---|---|
| ३. आपणा लघुबन्धु अंग्रेज (अंग्रेज बालजीवन बीजी आवृत्ति.) | १-०-० |
| ४. अलकानो अद्‌भुत प्रवास (सचित्र). (बीजी आवृत्ति.) | १-४-० |
| १६. वीर पुरुषो. | ०-१२-० |

५. धर्म-गुच्छः—

| | |
|---|---|
| ६. हिंदुस्थानना देवो (सचित्र). | ४-०-० |
| २३. दीघनिकाय (भा. १ ला.) (मराठी) | १-८-० |
| ३२. तुलनात्मक धर्मविचार | ०-१३-० |
| ३६. धर्मनां मूळतत्त्वो. | ०-१०-० |
| ४२. विविध धर्मोनुं रेखादर्शन. | ०-१२-० |
| ४४. उत्तर युरोपनी पुराणकथा. | ०-१४-० |
| ८०. तुलनात्मक धर्मविचार ( हिंदी ). | १-०-० |

६. नीति-गुच्छः—

| | |
|---|---|
| ५. माबापने बे बोल (त्रीजी आवृत्ति). | ०-६-० |
| ७. नीतिशास्त्र. | ०-१४-० |
| २७. नीतिविवेचन. | १-२-० |
| २९. कॉबेटनो उपदेश | ०-१५-० |
| ३७. नैतिक जीवन तथा नैतिक उत्कर्ष. | ०-१५-० |

७. शिक्षण-गुच्छः—

| | |
|---|---|
| १०. बालोद्यानपद्धतीचें गृहशिक्षण (सचित्र) (मराठी). | ०-१०-० |
| २८. बालोद्यानपद्धतिनुं गृहशिक्षण (सचित्र). | ०-१४-० |
| ५२. शाळा अने शिक्षणपद्धति. | ०-१५-० |

८ प्रकीर्ण-गुच्छः—

| | |
|---|---|
| १५. सुधारणां आणि प्रगति. (द्वितीयावृत्ति) मराठी | ३-०-० |
| २१. शिस्त (मराठी) | १-०-० |
| ३९. हिंदुस्तानचा लष्करी इतिहास व दोस्तराष्ट्रांच्या फौजा (मराठी) | २-८-० |
| ५४. संस्कृति अने प्रगति | २-८-० |
| ७३. जबाबदार राज्यपद्धति (मराठी). | ०-१३-६ |

---

# श्री सयाजी बालज्ञानमाळा.

**छपायला पुस्तकाः--**

| | | |
|---|---|---|
| १ | गिरनारनुं गौरव (बीजी आवृत्ति) सचित्र | ०-६-० |
| २ | ऋतुना रंग (बीजी आवृत्ति) | ०-६-० |
| ३ | शरीरनो संचो (बीजी आवृत्ति) सचित्र | ०-६-० |
| ४ | महाराणा प्रताप (बीजी आवृत्ति) सचित्र | ०-६-० |
| ५ | कोषनी कथा (बीजी आवृत्ति) सचित्र | ०-६-० |
| ६ | पाटणसिद्धपुरनो प्रवास ( बीजी आवृत्ति ) | ०-६-० |
| ७ | पावागढ (बीजी आवृत्ति) | ०-६-० |
| ८ | औरंगज़ेब (बीजी आवृत्ति) सचित्र | ०-६-० |
| ९ | मधपुडो (बीजी आवृत्ति ) सचित्र | ०-६-० |
| १० | रणजीतसिंह (बीजी आवृत्ति) सचित्र | ०-६-० |
| ११ | सुखी शरीर (बीजी आवृत्ति ) | ०-६-० |
| १२ | श्रीहर्ष ,, | ०-६-० |
| १३ | सूर्यकिरण ( सचित्र ) | ०-६-० |
| १४ | वातावरण | ०-६-० |
| १५ | ग्रहण. ( सचित्र ) | ०-६-० |
| १६ | बाल नेपोलिअन. | ०-६-० |
| १७ | **कोषकी कथा** ( हिंदी ) सचित्र | ०-८-० |
| १८ | लोहीनी लीला | ०-६-० |
| १९ | **श्रीहर्ष** ( हिन्दी ) | ०-८-० |
| २० | सिंकंदरनी स्वारी | ०-६-० |
| २१ | सुरत | ०-६-० |
| २२ | एशियानी ओळखाण, भाग पहेलो | ०-६-० |
| २३ | भूस्तरनी कथा. | ०-६-० |
| २४ | लॉर्ड विलियम बेन्टिक | ०-६-० |
| २५ | नाना फडनवीस | ०-६-० |
| २६ | चंद्र | ०-६-० |